# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय ९ वा
## ' राजविद्याराजगुह्ययोग '

लेखक
डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर
फलटण



फलटण १९५१

## लेखकाचे दोन शब्द—

जीवित जगते कसे ! जीवितात असणे म्हणजे काय ? ' देहराज आत्मा ' हाच मुळीं कसा शोभविला ' हे जाणल्याशिवाय, का तोच होऊन असल्याशिवाय, आत्म्याच्या नुसत्या गोष्टी करणे म्हणजे काहीच उपयोगाचे नाहीं, उपयुक्ततेचे नाहीं म्हणून येथे अगोदर हा देह जो जन्मतो तो उत्तमतेने जन्म केला असा, तेथे जीवित शोभेचे, विद्यावततेचे, योग्यतेचे हें जर नच जाणलें, नच पाहिले, देखणे देखिले, तर काहीच जाणले नाहीं असे होय

येथे अनेक गोष्टी जाणल्या त्या उपयोगास नच आल्या, नच आणिल्या, उपयुक्त अशा नच केल्या, तर त्या जाणून न जाणलेल्या होत म्हणून ' जाणणे ' का ' ज्ञान ' जे तेच मुळीं रुसून असते अशी ही जाणीव का शहाणीव ( मला माहीत आहे हो ! अः ! त्यात काय आहे ! ) तर पदरातच मुळी काही पडू देत नाहीं येथे नेहमीं दुर्लक्ष्य अथवा ' आपल्याला काय करायचे आहे, कांहीं का असेना ( नसेना ) ' असाच कल चहूकडे ह्या दृष्टीचा येथे परकेपण का पोरकेपण ( असा सकोच ! ) महत्त्व पावून असल्याने, तेथ जवळ येणेच मुळीं नाहीं, का जवळचे असे होणेच नाहीं-कसल्याहि प्रकाराचे होईचना फक्त एकच गोष्ट येथे सर्वांठायीं वागविली जाते-ती म्हणजे ह्या आयत्याची का आहत्याची होय तडजोड करण्याची, जोडण्याची का पोकळी भरून काढण्याची ( आसपण त कस बावणीचे होईल ) गोष्ट तर मुळी बोलूच नका ! ह्या जीविताची किमत नडविणें का अडविणे होत असलेले-तेथ पोहोचतीं व्हावीत अशीं ऋणे कशानेहि वागविलीं ( कां फेडिलीं ) जाणारीं होईचनात म्हणून येथे एक जे तेच दुसरे, दुजे असे पाहाणें केलेले ते सागितले आहे

जीविताचा भार उचलिला, योग्य केला जाणे केव्हा होणार कोण जाणे ! मी जीविताचा जीव केव्हा होईन अशी येथ मार्गप्रतिक्षा करीत असलेली जीवदशा तेथे प्रीतीने का प्रेमाने क्षेमभाग शोभविला, भेटविला, सलग्न झाला, जाणला, जीवभाव दिसू लागला असे केव्हा बरे होणार !!!

' श्रुतिविप्रतिपन्ना ' बुद्धि नेहमी ऐकणे ऐकावे, ऐकवावे, बोलणे बोलावे, बोलवावे, कानाला गोड लागावे, दृष्टीला सुरेख दिसावे, ती बोलण्याची रम्यता, ऐकण्याची शैली वर्णनास आली अशीच नेहमी-अनेक व्यवसाय आड आलेले, त्याचेच होणे जे, तेच मुळीं जीवितप्रकाशाचे अडविणेच करून असते, म्हणून त्या त्या ऐकण्याचें का पाहाण्याचे का बोलण्याचे ' महत्त्व ते योग्यपण ' ह्या जीवितास तर मुळीं श्वासच घेऊ देत नाहीं

येथ जर श्वसणे नाहीं तर जीविताचे काहीच गम्य पदरात पडणे नाहीं-जीवित जसे का सर्वांठायीं वाटले गेले असे होत आहे वाटच नाहीं, वाटाच काहीं पदरात पडेना, असे जे तेच सुगम, तेच कसे व्यवस्थित करावे हे नवव्या अध्यायात सागितले आहे येथे जीवित, देहराज आत्मा प्रकाशू लागला, योग्यतेयोग्य केला म्हणजेच ऋषींचा का सताचा सन्मान केला असे होय-त्याची सेवा केली असे होय-त्याचेच होऊन असणे होय यापेक्षा काहींच दुसरी एकादी मोठी थोरली गोष्ट येथे करण्याची आहे असे नाहीं

तें त्याचे योग्यपण-महत्त्व लक्षण-येथे वागविले म्हणजे सहजपणेच तें त्यांना दिले-त्याना उभे केले, जागविले असे होय " पण कदाचित् ( दुजेपण मनोधर्मे ) दुसऱ्यास मिळेल ह्या मात्सर्यतेमुळें

माझे तें सौंदर्यावरहि सुंदरपणानें मात का ताव करणे ते कदाचित् मजला औदासिन्याची छटा काय औपचारिक अहो असे म्हणूं करील तर ते बरे नव्हे, असे म्हणून एक आयतजीवित नुसतेंच लुडविणे का बुडविणें जेव्हां तेव्हां पाहिलें तर ते एक भाडोत्री वाहन, तें फक्त एका रडण्याकरिताच असलेले-आलेले-जन्मलेले असे होतें" म्हणून जराशी तरी ती जीवित जगण्याची पद्धत नेहमीं पुढे स्पष्ट केलेली असली, तर तेथे हें पाहाणे, ऐकणे, बोलणे ह्या तिहींनीं सत्र.कालाच्या चरणाने असणे होय : म्हणजेच हें जीवित उचलून धरून खऱ्या जीवितार्चे करणे असे होय . जीविताने आपल्या जिवत-पणाचें असणे तेथें काय ऐकण्याचा, पाहाण्याचा का बोलण्याचा गुणधर्म कां योग्यता असूं शकत नाहीं ?

'अनुप्रपन्न' असे वरचेवर शरण शरण म्हणणारे जीवित जर वरील तिन्ही गुणधर्मांनीं ह्या जीविताच्या जगण्याच्या योग्यतेचे केले नाहीं, तर काय तें जीवित जगणे शोभले म्हणावे ? ( फक्त ते 'जीवित कथ्य ऐकण्याचें' केले असेच होय )

येथे सहजपणेच एक प्राणधारण असणे, व्यवहारणे, अनुस्मरण असणे हे मुळी त केंस तें बरें ! येथे पुष्कळसे बोलिले, ऐकिले, पण त्या ऐकण्यानें काय काहीं जीवितास जगण्याची योग्यता पोहोंचती होणारी ? येथे आपलेपण कसे शोभावे, तें जाणतेपणाचे व्हावे, अशी ही जाणते होण्याची हौस ज्याची त्याची इच्छा दानत ही पुढे झाल्याने, अनेकानीं येथे वित्तसबधी द्रव्यद्वारा हातभार लाविला ही त्यांच्या मनोदेवतेच्या मोठेपणाची का कसलेहि पण हे गोड करून घेण्याची सहनशीलता का साक्ष होय

सतच ते येथे संतपणाची पारख ! तेच होऊन असावे असे तें सतपण होय !

विनियोगसौरस्य हे एकच येथे-'आडात नाहीं तर पोहऱ्यात कुठचे ?' असे हच मुळीं आपला सर्वभार घेऊन चालत असलेले-अशा त्या सर्वांचे मी मनोभावेकरून वाह ! भले ! करून आभार मानतों अहो, नुसती आपली सदिच्छा का होईना पण ती जर झाली, तर अर्घ्याहून अधिक काम होते.

महाराज ! श्रीज्ञानेश्वर माऊलींचें, श्रीज्ञानदेवाचे सर्वज्ञान्या भवदृशश्रोतृवृंदसमाजामध्ये अतुल्य व अप्रतिमतेचे ते बालकाचे बोबडे बोल –

प्रभु तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि स्वेच्छा वोलहावा लाहो । येथहि सलगी करूं बिहा । तरी निवों कें पा ॥ ५ ॥

प्रभु तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुर्बळ अर्चितसे भक्ती । म्हणोनि बोल जरी गगावती । तरी स्वीकाराल कीं ॥ १४ ॥

म्हणोनि मज लेंकुराचेनि बोलें । तुमचें कृपाळुपण निदेलें । त चेइले ऐसें जाणवलें । यालागीं बोलिलों जी ॥ १९ ॥

असे आईबापाना ! का मातापितराना म्हटलेलें ते ह्या भूतलावर अद्वितीयतेचें होत अहो, अशी जी हृदयास पाझर फोडणारी महिमा तिचे असे –

आपलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । येकसरें व्यक्तिमात्राचेनि नावें । नमूंचि आवडे ॥ २२३ ॥

अखंड अगर्वता होऊनि असती । त्याची विनय हेचि संपत्ति । जय जय मत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥ २२६ ॥

हे बोल माझेंपणच नसल्यानें कसे शोभतील असे करणें, जें तेंच मी होऊन आहे, विनयसपदा ती तर 'अमर', पण मी ती कशी शोभेल असे करून आहे : यापेक्षा आणिक काय लिहूं ? येथे आपली कृपादृष्टीच एक ती सर्व काहीं घडवून आणणारी होय

ह्या अध्ययाचें काम अतिशीघ्रतेनें श्री रामभाऊ हिरे, बी ए ह्यानीं सपविलें त्याचे आभार आहेत हें सर्व काहीं आहे, पण नच उगवल्यानें काहींच नाहीं-तें पावतच मुळीं नाहीं-असेच नेहमीं होत राहिल्यानें तें समजेच्या योग्यतेस आणण्याकरितां कसे माडावे तें येथे आता झाल्यानें-(पण येथे तें माडणे हेच मुळीं आडविलें जाणारें हरघडीं)-आता जराशी काहीं निराळी हवा लागल्यानें-तें व्यक्तिमात्रान्या आटोक्यांत येणारें कदाचित् होईल, सतलक्षण तें सहजपणास पाहील, आदरानें धाकाचे होईल असे सहज अंदाजाचें होऊन येत आहे पण माउलीची कृपादृष्टि ही अवर्णनीय-तीच मुळीं प्रसन्न व्हावी, प्रसन्न होऊन असावी असे ह्या सेवेचें विनवणें तिचे चरणीं हात जोडून आहे, नम्र होऊन आहे

हल्लींच्या काळात कागदाची महर्गता असूनसुद्धा व इतरहि पुष्कळ अडचणी असूनसुद्धा मोहन मुद्रा-मंदिरानें ह्या नवलान्या अशा नवव्या अध्यायाचें काम अत्यत सत्वरतेनें तसेच सुबकपणे करून दिलें याबद्दल त्या मुद्राणालयाच्या व्यवस्थापकाचे जेवढे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत त्याचप्रमाणें या अध्यायाच्या प्रसिद्धीच्या कामीं ज्यानीं द्रव्यद्वारा मदत करून माऊलीवरील आपले प्रेम व्यक्त केले व इतर तऱ्हेनेंहि ज्यानीं ज्यानीं या कार्यास हातभार लावला त्या सर्वांचे आभार मानून हें पुरें करतों

फलटण
ता १४-१-५२

सताचा दासानुदास
**गोविंद रामचंद्र उपळेकर**

---

# निवेदन —

श्रीमद्‌भगद्‌गीतेच्या नवव्या अध्यायास 'राजविद्याराजगुह्ययोग' असें नांव आहे. विद्येनेंच विद्या शोभते, विद्येनेंच विद्या राजते, ही विद्या सर्व विद्यांचा अलंकार आहे, राजा आहे : आत्मा आहे : ही माझी विभूति आहे (अध्यात्मविद्या विद्यानाम्) : हें रहस्य सर्व रहस्यांत अनुत्तम म्हणजे श्रेष्ठ असें आहे : हें ज्ञान पवित्र, उत्तम, अनुभवगम्य व सुखकारक आहे : ज्ञानासारखें उत्तम व पवित्र ह्या भूतलावर दुसरें कांहींहि नाहीं. हें ज्ञान समजण्यास प्रत्यक्ष आहे, धर्मास धरून आहे व आचरण्यास सोपें आहे आणि हें शाश्वत आहे.

श्रीभगवान् अर्जुनास म्हणाले, आतांपर्यंत ब्रम्हप्राप्तीचे दोनच मार्ग जगतामध्ये शाश्वततेचे असे मानिलेले आहेत-ते म्हणजे एक देवयान मार्ग व दुसरा पितृयान मार्ग होय. ह्याशिवाय आणीकहि एका मार्गानें ब्रम्हपद प्राप्त होऊं शकतें-तो मार्ग म्हणजे भक्तिमार्ग होय. ह्या मार्गानें सगुण ईश्वराचें ज्ञान विज्ञानासह होऊन मनुष्य ब्रम्हत्वाला पोंचतो. श्रीगोपालकृष्णांनीं अशा तऱ्हेनें अर्जुनाचें चित्त नवीन उपदेशविण्यांत येणाऱ्या भक्तिमार्गाकडे वेधलें.

व्यक्त स्वरुपास विविधसृष्टिज्ञान अथवा विज्ञान म्हटलें आहे, व अव्यक्त स्वरूप जें त्या ज्ञानास आत्मज्ञान असें म्हटलें आहे; हें जाणल्यावर या लोकीं आणीक दुसरें जाणण्यासारखें कांहींहि उरत नाहीं.

या अध्यायास 'अध्यात्मयोग' असेंहि म्हणतात : जीव म्हणजे अक्षर ब्रम्हाचा प्रत्येक देहांतील अंश त्यासच स्वभाव किंवा अध्यात्म म्हटलें आहे. ह्यांत कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग यांचा त्रिवेणी संगम झालेला आहे. अध्यात्म म्हणजे आत्म्यासंबंधींचें विशेष ज्ञान-ह्या ज्ञानाकरितां ह्या मृत्युलोकावर मनुष्यप्राणी हा नेहमीं मार्गप्रतीक्षेनें-हपापलेला-असतो. अध्यात्म व योग यांची जोड जी, ती त्या त्या विषयांमधील जी क्रियाशक्ति तीसच मुळीं त्या अध्यात्माची योग्यता प्राप्त झालेली असल्यानें तेथें क्रियायोग हा त्याविषयाची मुळीं रंग-रूप-रेखा होय. म्हणून अध्यात्म तें क्रियायोगानें क्रियारूपाचें करावें, तेव्हांच तें आपलेपणानें प्रतिष्ठेस पाहाणारें होतें. श्रीमद्‌भगवद्‌गीतेस योगशास्त्र म्हटलें असल्यानें, तेथें त्या त्या नामनिर्देशानें प्रतिष्ठा घेऊन असलेला तो तो विषय त्या तेथीलच्या क्रियायोगानेंच मुळीं महत्त्वाप्रत येतो. एरव्हीं नुसतेंच 'कर्मयोग'-'संन्यासयोग'-'अध्यात्मयोग' इ. नीं म्हटलेले तें-तेथें जर ती ती त्या त्या योगाची जी विशेषसी 'संभावना', 'कर्मफलत्याग', 'भूतभाव्य' इ. नीं दर्शविलेली ती ती योगस्थिति स्थितीस आणावी, तरच मग तेथें तें नामनिर्देशाचें 'कर्मयोग' इ. चें महत्त्व क्रियाभाराचें सर्वथैव असेंच होऊन येतें. म्हणून, येथें क्रियायोग हाच सर्वतोपरी सर्व ठिकाणीं आपल्या महत्त्वानें जर असेल, तरच तो विषय आपलेंपणास येऊन शोभूं लागतो.

विद्या ही शोभते कशी ? राजते कशी ? तर ह्या विद्यमानास राजविण्यानेंच विद्या ही शोभिवंत होते व स्वतःहि शोभते. विद्या राजते-प्रकाशते, विद्यत्व पूजित होतें, विद्यमान हें विद्येप्रत येतें व तें या नरदेहास भूषणास्पदतेचें अलंकरण होतें. महत्त्व कां रहस्य तेंच ह्या विद्येमुळें आपल्या प्रकाशभाराचें होतें. विद्यारहस्य शोभिवंत होतें, प्रकाशमान होतें, स्वतःस शोभणारें होतें तें विद्यमान जें त्यास सुविद्य करण्यानें होय. ह्यास स्वभाव किंवा अध्यात्म असेंहि म्हणतात. हें ज्ञान आपल्या महत्त्वानें

स्वधर्मास अनुसरून असतें येथें स्वधर्माचरण ( हे अवश्य असते ) व ह्या उपासनामार्गास अवश्य असणारी एकनिष्ठ श्रद्धा तसेच शांति अंतःकरणात असणे जे त्यासच धर्म्य म्हटले ज्याचा उपासनारूपी किंवा भक्तिरूपी धर्मावर व तदनुसार आचरणावर विश्वास नसतो, त्याना परमेश्वराची प्राप्ति न होता, ते जन्ममृत्यूच्या मार्गांत फिरत राहातात-ते मुक्त होत नाहींत

श्रीभगवान् आपला ऐश्वर्ययोग सांगतात —अव्यक्त मूर्तीनीं मीं हे जग विस्तारले आहे, सर्व सृष्ट पदार्थ माझ्या ठिकाणीं आहेत पण मी त्याचे ठिकाणीं अवस्थित नाहीं-म्हणजे मी त्याचा आधार घेऊन अधिष्ठित आहे असे नाहीं ' भूतसृष्टि ही साक्षात माझ्या ठिकाणीं नाहीं माझे तत्त्व सृष्टीला धारक व सृष्टीचे पोषक असूनहि त सृष्टीवर अधिष्ठित नाहीं-म्हणजे सृष्टि ही त्याचा आधार नव्हे, सृष्टीचा मी आश्रित नव्हे मीं हे सर्व जग व्यापिले आहे, तरी पण माझे हे जग व्यापणारे स्वरूप भूतमात्राना-तसेच इंद्रियाना-अगोचर आहे हे माझे अचिन्त्य ईश्वरी सामर्थ्य पाहा-ते द्योतनात् देव असे आहे माझा आत्मा भूताना उत्पन्न करणारा व धारण करणारा असूनहि त्या भूतमात्रात राहात नाहीं . ' मत्स्थानि भतानि न । मे योगमेश्वरम पश्य । ममात्मा भूतभावन. । भूतभृत् न । च भूतस्थ. न ॥

हे सर्व जग (प्रकृति) माझ्या स्वामित्वाने मी उत्पन्न करता व तेथे तीं प्रकृतीचीं जीं प्राकृततेचीं करणी-सविकारता-तीं मला कोणत्याहि तऱ्हेने बाधत नाहींत गुणमयी प्रकृतीच्या तिन्ही विकाराना भुलून गेल्यामुळे त्या गुणाच्या पलीकडे असणारा अव्यय किंवा अविनाशी जो मी त्यास हे जग जाणत नाहीं ही दैवी गुणमयी माया उल्लंघण्यास दुस्तर आहे . अनन्य भावाने जे माझा आश्रय करतात तेच या मायेस तरून जातात . उलट, वाईट कर्म करणारे बुद्धिहीन जे, ते मी सर्व भूताचा महेश्वर असा माझा श्रेष्ठ भाव-स्वरूप-न जाणता, सौम्य मानव स्वरूप धारण करणारा जो मी त्याची अवज्ञा करतात कामुक भक्त स्वर्गप्राप्तीकरिता सकाम उपासना करतात-पुण्याची पुंजी संपली म्हणजे स्वर्गामधून पतन पावतात व पुन्हा मृत्युलोकीं जन्मास येतात जरी तिन्ही धर्माप्रमाणे वागणारे तरी हे कामुक लोक मुक्त होत नाहींत ते नेहमीं वासना कमवीतच जन्ममृत्यूच्या येरझारा करीत असतात श्रद्धेनें अन्य देवताची भक्ति करणारे उपासक माझेच भजन करितात, पण त्याचे त यजन (भजन) अयोग्यतेचे म्हणजे योग्य मार्गास सोडून असते. परंतु दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले महात्मे, सतत युक्त होऊन, अनन्य भावाने माझे गुणनाम-संकीर्तन व चिंतन करीत मजप्रत येऊन मिळतात ते मीच होतात अशा अनन्य भक्ताचा योगक्षेम मीच चालवितो श्रीभगवंतानीं आपली भक्ति अति सुलभ आहे व तिचे फळ अविनाशी आहे असे सांगून स्त्रिया, वैश्य, शूद्र आणि पापयोनी मूढ लोक यानीं भगवताच्या आश्रय केल्यास ते परम गतीस पोहोंचतातच पोहोचतात असे आश्वासिले आहे

म्हणून श्रीकृष्णानीं अर्जुनास सांगितले कीं, तू

माझ्या ठिकाणीं मन लाव .

माझा भक्त हो :

माझे यजन कर :

मला नमस्कार कर :

व याप्रमाणे आत्म्याला मत्परायण केलेस म्हणजे तूं मलाच येऊन मिळशील, तं मीच होऊन असशील · हेच माझें गौप्य धन-राजविद्याराजगुह्य

## हृद्गत —

येथें आतां अंतःपरिशीलन जें कांहीं एक तें कसें तें आतां काय लिहिण्यास येईल किंवा कसें हें आपल्या विचारांतच अद्याप असल्यानें, तेथें ती जी एक यथार्थतेनें आपल्या भावबळाची होणारी अशी जी स्वसंज्ञा ती कशी बोलेल हें पाहाण्यास गेलों, तों ती काय एक विचित्रच नटनाटाचें जसें कांहीं तेथें कांहीं गम्य आहे असें म्हणणारी होईचना !

आतां येथें एक जी सहजतेची अशी सभ्यपणाची संभावना पुढें घेतली, तर ती तेथें अनेक गोष्टी पुढें करून असते : येथें जें देवपणास एक स्वभाजन म्हणजे मित्रत्वाचें असें स्थान देऊन असणें, तें जर आपल्या दृढपणाचें असें कांहीं एक बळाचें जर झालें, तर तेथें कामकाज हें सहज उत्तम अथवा हितगुजाचें-( किंवा कळकळीची भूमिका)-आहे असें पाहाणें होतें :

येथें काय लिहावें-लिहावेंच नुसतें, तें जर आपल्या बळाचें होऊन येईल, तरच बरें ! परंतु तें दुहावें कसें, काय लिहावें, तेथें खाण्यास कांहीं पक्वान्नच जसें द्यावें असें कसें होणारें तें समजेचना ! लिहावें तर 'आधीं केलें मग सांगितलें' असें येथें कदाचित्‌च ! बरें, मुलांना 'कढीचं पाळं फुटलं' असें वाटणें तें काय कसें ! किंवा प्रेम तें कसें बोलणारें होईल ! तेथें जीवदशेची जी कांहीं एक आर्द्रता ती कशी त्या प्राणमहत्त्वाची होईल तें ज्याचें त्यानेंच समजावें : परंतु जेथें शब्दाचें श्रेष्ठत्व अथवा रहस्यगम्यत्व हें द्वंद्वसमालोचनाचें (एकाच शब्दाचे अनेक अर्थ, जसें ध्यान ह्या शब्दाचे अनेक अर्थ होणारे), तेथें सामासिक शद्ब हा आपले शद्बद्वंद्वाचें जर द्वंद्व काढून टाकून, नच पाहून, नच लक्षांत घेतां, तेथील देवलक्षणच जर घेईल, तर तेथें कळवळा हा सम्यकतेचा 'साम्य' असा व्यवस्थिततेचा जो भाव तोच येथें अनेक होऊन येणारा होईल. तर तेथें बहुत्वानें जसा देवच एकपणास आला व तेथें मग मुद्रा ती अंगची जशी एक राजराणी किंवा अधिकारपरत्वें अक्षरांची अशी एक आज्ञाच तेथें उगवावी अशीच इच्छा होय.

अहो ! ह्या ब्रम्हांडभर जरी अनेक जाति असल्या, तरी ह्या एका प्रेमाच्या जातीचें जें नैपुण्य-पुण्य, हें अद्वितीय असेंच असल्याकारणानें, तेथें काय अनेक विद्या, अनेक ह्या देहपंजराचें भाग्य हें उत्तम असल्याकारणानें, तेथें ही एकच जाति ही आपल्या सर्वोत्तमतेच्या प्राकारानें प्रामाण्याची झालेली असल्यानें, तेथें याहून आणखी एकादी जाति ह्या ब्रम्हांडामध्यें सांपडणेंच नाहीं. तिनें सर्व कांहीं ह्या देहाचा संसार पुरविता करून असल्यानें, त्या ह्या जातीनें सर्व कांहीं पुण्य केलें-सर्व कांहीं पुरविलें-सर्व कांहीं शृंगारलें-सर्व कांहीं आपल्या 'ज्यास जी योग्यता पाहिजेच पाहिजे ती तेथें पुरविल्यामुळें' ह्या जातीस इतकी उत्तमता आलेली कीं, सर्वांच्या सर्व देवलोकामध्यें एक ह्या जातीशिवाय दुसरीचें नांवहि पण ऐकूंव येत नाहीं : तिनें असें सर्व कांहीं ज्यास त्यास पुरविल्यामुळें, तेथें एक गोष्ट सरती करून घ्यावी लागणारी होय-व ती म्हणजे प्रेम देऊन प्रेम घेणें, बोल देऊन बोल घेणें, अगोदर देणें व मग घेणें, देऊन घेणें, जेवण्यास घालून जेवणें-दिल्याशिवाय मुळीं कांहींच घेऊं नये असा तेथीलचा एक जो न्याय तो ह्या जगतामधील सर्व न्यायांना पार कोणत्या कोपऱ्यांत लपवून ठेवतो तें समजतच नाहीं : म्हणून अगोदर देऊन मग घे-दिल्याशिवाय घेऊं नको : अक्षर दिल्याशिवाय अक्षराचें होणें हें आवडत नसतें, परवडत नसतें : जेवणाची तृप्ति ही दुसऱ्यास पोहोंचल्याशिवाय तेथें कांहीं एक जिव्हाळा उगवतच नाहीं : म्हणून येथें काय ती चवी ही ब्राम्हण्यासहि ओलांडून गेलेली अशी विश्रांतीची असून,

तिचे मित्र होणे-ती मित्रत्वाची करून घेणे-हे एक उत्तम कर्तव्य असेच असून, तेथे ही लाज वाहून घेऊं नको-मागें सरूं नको : ह्या जातीच्या उत्तमत्वामुळें काय मनुष्य, काय पक्षी योनी, काय दुसऱ्या योनी ह्या आपल्या उत्तमतेच्या संपूर्णपणाच्या अशा स्वभावास आल्या म्हणजे तेथं सहजदेव हा उभाच राहातो : तेथ काय हा पिंडदेह पार विसरूनच गेला-विरून गेला-ओलांडला : तेथे कसचें कर्म कसचे काय, कर्माचे अथवा देवाचे असे म्हटले जाणारे ते सर्व देव होऊन गेले : तथे सर्वोत्तमता ही पार ब्रम्हांड-भर पसरून असल्याने, तेथे प्रिय प्रिय बहुप्रिय अशी स्नेहधारा-सर्व प्रेमच एक प्रीतीस आले : तेथे स्वभावाची रम्यता ही नाद लागल्याने, ते सहजगुणधर्म हे सहज सहज असे आनददायकच-रम्य असेच ते एक ह्या जीविताचे जन्मणें, तेथे काय आणखी काहीं एखादा कोणीकडचा स्वर्ग स्वर्ग म्हणून गाजलेला ह्या भूतलावर असेल असे नाहींच अहो ! येथे ते जे नावाजलेले वाखाणलेले असे जे देवत्व तेच जणूं ह्या भूलोकाला नादण्यास-नादविण्यास आले आहे असे दिसूं लागणारे होऊन असतें-असेच असतें-असेच ते दिव्य एक ह्या देहाचे . स्वभावाचे शौर्य हे शोरीच जसा एक जन वन-मन-रजन-प्रेम-दिव्य-सहनशीलतेचा प्रभाव-खपून असणारे असे ते असन-हे एक कामातच रमलेले असल्यानें, तेथे मुळींच काहीं ह्या मनास उद्विग्नता ही नाहींच : तेथे कामच चाकरी करूं लागले, ते नटले, रमले, रंगले, विश्रांतीस आलें-दिव्यच पाहू लागले ! !

स्वभावास ‘ प्रत्यक्षपण ’ देणे हेच एक येथे धर्म्य म्हणजे अमृतातच असणे असून, तथे पवित्र तेस पोहोंचणे झाले असे असून, तेच ‘ सुसुख कर्तृम ’ म्हणजे सहज असे सुखाचे एक रम्य स्थळ ते केव्हाहि नाहींसे होणारे नाहींच येथे आता हातास हात आले, पायस पायाचे होणे झाले, येथे काहीं खर्च नच होता ह्या अवयवानीं आपले अगास पाहिल्यामुळे तेथे अंगोअंगीं एक अवयव उगवला -प्रेमास आला व आता जशी एक शुश्रूषाच झाली ह्या श्रवणमहिम्याची-अगास अगच भिडले त्यामुळे तेथे एक लक्षण जे उगवणारे झाले ते म्हणजे प्रेमच एक, प्रीतिच एक आपल्या सहोदराची अशी

म्हणून मन (चद्रमा) हे मीच हे ऊन ऐस-भजनामध्ये जे श्वासोश्वासीं रमणारे अक्षर तेच तू होऊन ऐस-तेथे एक तऱ्हेने ह्या जीवदशेची जशी का निगाच केली अशी एक समरसना होऊन येईल-तेथे मग इतर काहींच संकल्पणे नको-सकल्पाची ती व्यथाच एक ती नाहींसी होते : हेच जसे काहीं चोरून मुटकून ठेविलेलें असे गुह्य तेच तू सांभाळण्याचे करीत जा म्हणून अगदीं बाजूसच हो-निराळा हो-बाजूस सर-एकीकडे हो व ह्या भक्तीची कास धर : भक्ति म्हणजेच ही जी जीवदशेची वर सांगितलेली प्रेमकहाणी-प्रेमानेच जशी बेहोश नव्हे तर आतच सामावली अशी होऊन असने

जीवदशेचे जे काहीं एक-जसा बाजारच भरला आहे असे ते म्हणजे-मरणच जसे विक्रीस ठेविलेलें-तेथे त्रेधाच एक ह्या मनास बेजार करते-म्हणून सुखाचे गिऱ्हाईक येथे भेटणारे जर झालें तर बरे-तेवढीच एक जागा खरेदीच करून असतच जा तरच बरे-तेथे दैवप्रयत्नपरत्वे एक अधिकारच जसा ब्राम्हण्यास पाहू लागला असे होतच जात : येथे भक्तिच एक वर मागितलेली, तीच जशी का आज्ञाच-अक्षरेंच-मुद्राच-समुद्रावगाहनच-स्वभावाची किमतच एक असल्याने, तेथे मग काय ते एक सुवर्णाच्या स्वभावाचे अंगच पाहिले किंवा पाऊलें तेथे असे होऊन जाते : येथे जातीगोतीचा कायसाहि संबंध आड येत नाहीं : तेथे मग जी कांहीं एक ह्या गुणाना गैरसावध असताना-लक्ष्यावर नसतांना-जो एक फुलपांखरासारखाच जसा का रंग जेथे-पतंगास एक रग दिलेला, तो दिव्यावरच जसा स्वत. झडप घालणारा होतो-तेथे अधमतेचे एक विटणेच जसे क्षणास आले-तेथे मोल वाया गेलें : तेथे तुका म्हणे देवा। मज झणीं ऐसे दावा ॥ असे जर का पाहाण्यास मिळाले किंवा स्वतःचें तसे ते बेगड रगाचे होणे झालें, तर तें एक अधमतेचें लक्षण तेच जसे त्या पापयोनींत ढकलणारे होते : म्हणून एक प्रेम-

भावच पाहा-तेथेंच राहा हा भावच एक सर्वस्वाचा करून अस तरच बरें! येथें आम्ही भावाचे पाहुणे भलतयाचेहि ठिकाणीं राहाणारे होऊन असतो-पत्रपुष्प हेंच एक निमित्त : यामुळेंच तेथें ह्या देहासच जसें श्रृंगारिलें व आतां हें जीवित जसें एक रम्य असेंच स्थळ सहजतेचें-तें कांहीं लोभाचें होत नाहींच : तेथें चित्तच मुळीं सर्वच्या सर्व उक्तेंच जसें ह्या देहाचें मागणें केलें! काय येथें उपमेचें सादृश्य हें-'गर्भगोळ हा कोणत्याहि उद्यमास जाणीत नाहीं'-तसें पक्षिणीचें पिलाकरितां-ज्या पिलास मुळीं पंखच फुटले नाहींत अशाकरितां-श्रमून असणें तें सुखच पांघरणें एक तिचें त्या सायासांनीं!

नित्यानंदाचें एक असें स्वरुपामध्येंच रमून असणें तें पापपुण्याची गोष्ट बोलतच नाहीं. ह्या भक्तीस्तव जसें अमृताच्या विहिरींतच बुडून जाणें होय. यथें अनन्यासच एक जास्तपण तें काय अनु. भवानें पाहाणारें, येथें गतिच जशी अनेक पुरुषांची झाली-तेथें सर्व पुरुष हाच आला -हा ज्ञानयज्ञच एक : तेथें भेद हाच कसा भावानें नाहींसा केला जातो तें पाहाण्यास मिळतें : येथें कैवल्य प्रत्यक्ष डोळयास दिसलें-तेथें आत्मानुभव, राज्यसुख, महाभिषेक, समाधिसुख हे शब्दगौल्य कसें तें काय बोलावें-असें नाहींच : येथें बोलणें बंद झालें-व एक कर्तव्यच उरलें : येथें आकारशून्यानें असलेला तो आकारास आणणें म्हणजे जसें कां तें बांधलेंच शून्यानें-तेथें हा देहच आंवरलेला असा शून्यानेंच तो-भव्य-भाव्य-प्रभव हेंच ह्या देहाचें ऐश्वर्य तें ह्या प्रकृतीस जन्मण्यास, देहधारणेनें येण्यास दिलें : तेथें मर्म जें दंशाचें तेंच हातीं आलें म्हणजे तेथें कांहींच शोभण्याचें उरलें नाहीं : मग तूंच तूं एकटा असाच होऊन असणारा-तेथेंच असणार तेंच व्यवस्थित केलें व आपलेंपणास आलें-भूतभास हा संपला म्हणजे स्वरूपच एक : म्हणून देवलोकचें एक रत्न असें हें तुला काय वाटत नाहीं?

नुसतें आहे आहे काय? तेथें आहेचा होच हो! उद्यां हा शब्दच मुळीं आहेचा असाच पाहा-आहेचा होऊन ये : श्रीच्या हृदयींचें तें पाण्यानें किंवा कर्मानें खोंचलें जातच नाहीं : तेथें चित्तच तें हृदयींचें झालें-साधुकथाच एक तेथें तिचाच हो! उंचावरून पडलेलें पाणी तें तळींच गेलें, तेथें नमणें झालें अशा सद्‌भावाचा हो! हीच गुरुवी भक्ति गुरुपणासच विणारी होते-समर्थ अशी आज्ञा ती सनाथतेनें सहजपणास आली-कार्यरत झाली : येथें मद्याजी म्हणजेच आपणपेंचें असें उपचारणेंच एक -तेथें लाग साधणें हें प्रेमच एक-काय ह्या देहाचें धारण हें नाहींच असें 'उदासच' तर काय! उद्यां शब्दानें मजाच केली : त्या खापरांतच जसें पक्वान्न वाढलें त्या लवळपणासच-'बौहे, पौहे' हे शब्दच जोडले-देहाचें जें असणें तें अंतर्बहि जसें पाहाणारें झालें!

म्हणून येथें हातवटी हीच साधली म्हणजे तेथें द्रवणें हें साधणारें, जसें तें चंद्राच्या पोटींच असणारें! येथें अवधान हेंच चारापाणी किंवा दाणापाणी असून, तेथें तत्त्वच तें जसें ह्या अक्षरांना पेलूनच येणारें होतें-असणारें होतें : तेथें अर्घ्यच एक दिले, जसे तेथें आरतीच झाली व विनाशक असें तें जें ह्या मनास खजिल करणारें तें आतां अर्घ्य देण्यानें हा सूर्यच एक स्तविला गेला, प्रार्थू आदरिला : तेथें प्रकृतीचें दैव हेंच दैविकीचें झालें व आतां सुखच एक तें श्रीमंततेचें असें संत-शांत : येथें भूत-भव्य-भवत् प्रभुः हाच निश्चयानें गतीस सादरानें सगुणतेस पीक देऊन, तेथें 'न दुजें' दुजेंपण नाहींच असें स्वभावशीलच-तें रम्यच असें देवत्वच दैवास आलें!!

---

## आभार —

या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या कामीं खालील सद्गृहस्थानीं आश्वासनें देऊन प्रेमानें व उदार अंतःकरणाने मदत करून ग्रंथाच्या प्रकाशनाचे काम सुकर केलें त्याबद्दल त्याचे आभार मानणे उचित होय

**मदत देणारांचीं नांवें**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्री कृष्णाजी चिंतामण ऊर्फ बागोबा कुकडे | रु | २५६- ४-० |
| २ | श्री पांडुरंग त्रिंबक दिवे | रु | २५६- ४-० |
| ३ | श्री ओंकार भिकाजी वाईकर | रु | १५१- ०-० |
| ४ | श्री आर एच देशपांडे, असिस्टंट रजिस्ट्रार | रु | १०१- ०-० |
| ५ | श्री. व्ही एच देशमुख | रु | १५१- ०-० |
| ६ | श्री पी एल पवार सिव्हिल सर्जन | रु | १०१- ०-० |
| ७ | श्री बी व्ही मंजेश्वर, डिस्ट्रिक्ट जज्ज | रु | ३०२- ०-० |
| ८ | श्री आर एम् गंगापूरकर | रु | २५१- ०-० |
| ९ | श्री एस बी पोकर्णा | रु | १०१- ०-० |
| १० | श्री सरदार जगन्नाथ महाराज | रु. | १०१- ०-० |
| ११ | श्री नेमीचंद केशरचंद मुनोत | रु | १२५- ०-० |
| १२ | श्री कृष्णाजी जनार्दन जोशी | रु | २५६- ४-० |
| | | एकूण रु | २१५२-१२-० |

या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या कामीं यापेक्षा पुष्कळच जास्त खर्च आलेला आहे आणखीहि प्रकाशनाचें काम होत आहे व होणार आहे तेव्हा नगर येथील जनता या सत्कृत्यास उत्साहानें व प्रेमाने साहाय्य करील अशी आशा वाटते याप्रीत्यर्थ पाठवावयाची रक्कम श्री कृ ज जोशी, जनरल मॅनेजर, नगर डिस्ट्रिक्ट अर्बन सेंट्रल को बँक लि याजकडे पाठवावी ज्यानीं आजपावेतों श्रीज्ञानेश्वर माऊलीच्या प्रेमानें ज्ञानेश्वरीचे अध्याय छापवून घेण्यास साहाय्य केले व पुढेहि त्याच प्रेमाने साहाय्य करतील त्या सर्वांचे नम्रतापूर्वक आभार मानून श्रीज्ञानेश्वर माऊली त्याना अशाच प्रेमात सतत ठेवो अशी प्रार्थना करतो

**ग्रंथकर्ता**

## कांहीं पाठभेद

| ओवी | चरण | चे जागीं | असेंहि आहे |
|---|---|---|---|
| ३ | ३ | श्रीमंतें | श्रीमंत |
| ७ | ४ | करितं | करितां |
| १० | २ | ऐकवर्णे | ऐकर्णे |
| १७ | २ | घेतलेसा | घेतलासा |
| २१ | १ | वोथिजवें | वोथिजवावें |
| ३० | ३ | सायखडियानें | सायखेडेनें |
| ४२ | १ | नांवानांवा | मांवानांव |
| ४३ | ३ | फोडोवाडें | फाडोवाडें |
| ५४ | ३ | अनायासें | अनयासें |
| ५९ | २ | आहाती | — |
| ६१ | २ | गिळिता | — |
| ७५ | १ | सागरींच्या | सागराच्या |
|  | ३ | अवोतर | अव्हांतर |
| ८३ | १ | धर्ता | धरिता |
| ८९ | ३ | सहज | सहजे |
| ९२ | १ | कल्पितें | काळीं तें |
| १०६ | ३ | पटीं | पाटीं |
| ११३ | १ | अभिप्रायो | अभिप्रावो |
| ११६ | ३ | कवण | कवणा |
| ११८ | ३ | वेल | वेला |
| ११९ | १ | बाला | बाळा |
| १२२ | २ | कां सृजिलीं | सृजिलीं तरी |
| १२५ | १ | धूम्र | धूम |
| १२६ | ३ | कार्यजात | कर्मजात |
| १२९ | १ | कां साक्षीभूत | साक्षमूत |
| १३१ | ३ | प्रभवीं | प्रभावीं |
| १३२ | २ | होती | होत |
| १३८ | २ | दिसे | — |
| १३९ | २ | झकवीजती | झकवती |
|  | ४ | आथी | आधी |
| १६२ | ३ | सकळ | सकळा |
| १६५ | २ | अकर्तयासी | अतर्कयासी |
| १७७ | २ | जैसीं कुमारी | जैसे कुमारा |
|  | ३ | कां अशौच्या | किं अशौचा |
| १८० | ३ | तामसियेचे | तामसीचिया |
| १९६ | ३ | नवलाव | नवलावो |
| २०४ | ३ | एकादे वेळ | एकादि वेळे |
| २०९ | ४ | आपणयांचि | आपणपांचि |
| २२१ | २ | वरूनि | धरूनि |
| २२२ | २ | सजीव | साजीव |
| २२६ | २ | विनय | विनयो |
| २३० | २ | दैविकिया | दैवकिया |
| २४० | ३ | हाचि | हेचि |
| २४४ | ४ | अवभृतीं | अवभृत |
| २५२ | २ | आनाना | आनाने |
| २५७ | २ | होआवें | व्हावें |
| २६२ | ४ | अप्राप्तीसी | अप्राप्तासी |
| २७३ | ३ | जो वेदार्था | जे वेदार्थाचा |
| २८० | ३ | अभिळासि | अभिलासि |
| २८७ | ३ | नामरूपादि | नामरूपाहि |
| २९५ | ४ | आकारु | आकाश |
| ३२३ | ३ | वाटिका | वटिका |
| ३५४ | ४ | आनानीं भावीं | आनान भाविती |
| ३५८ | २ | जयांचीं | ते जयांचीं |
| ३६३ | १ | वाहात | वाहातु |
| ३७४ | १ | सरिसी | सरसी |
| ३८१ | ४ | जाणो | जावो |
| ३८७ | ३ | पत्रचि | तें पत्रचि |
| ३९५ | ३ | सुदामयाचिया | सुदामाच्या |
| ४०२ | २ | से | से कांहीं |
| ४३७ | २ | पविजेचि | पवतीचि |
| ४८५ | १ | अंगानिळें | अंगअनिळें |
| ४८७ | १ | निवविल | निवबिलें |
| ४८८ | ४ | बसे | बैसे |
| ४९१ | ४ | वर्षावीं | वर्षायीं |
| ५०३ | ३ | सुखाची | सुखाचे |
| ५१३ | १ | जन्मलिया | जन्मलयां |
| ५१७ | ३ | जे | जिया |
| ५२३ | ४ | उगाचि | तैसा उगाचि |
| ५२८ | १ | आटऊ | आटु |

॥ श्रीगणेशायनमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय - नववा

### उपक्रम

**अध्यायसंगति :**

सर्व द्वाराचा निरोध करून व मन हृदयामध्ये कोंडून, चित्त स्थिर झाल्यावर प्राणाचा प्रणव करावा व अनुवृत्ति मार्गानें मूर्ध्नि म्हणजे मस्तकात आणावा तेथें आकाशास मिळतो न मिळतो इतक्या बेतानें ठेवावा, जोपर्यंत तिन्ही मात्रा अर्ध बिंबात मिळून जात नाहींत तो वायु निरगळामध्यें स्थिर करावा, जसा लग्नामध्ये ओंकार बिंबामध्येच विलसून असतो अशा तऱ्हेचें जे बोलणें तें म्हणजे योगमार्गानें ब्रम्हप्राप्ति करून घेता येतें असें होय पितृयान व देवयान असे दोन मार्ग जगतामध्यें स्वरुपाप्रत जाण्यासाठीं शाश्वत मानले गेले आहेत हे जाणल्यानें योगी मोह पावत नाहीं वेद, यज्ञ, तप, दान यानीं जे पुण्य सागितलें त योगी मार्ग टाकून त्यापलीकडील आद्य स्थानापर्यंत पोहोचतो म्हणून योगयुक्त व्हावेंच व्हावे असा तो देवयान मार्ग जरी, तरी पण ब्रम्हप्राप्तीला आणखी एक उपाय आहे, तो म्हणजे भक्तिमार्ग होय पैं भक्ति एकी मी जाणें। तेथें सान थोर न म्हणे। आम्ही भावाचे पाहुणे। भलतेया ॥ ३९५ ॥ तरी झडझडोनि वाहिला निघ। इयें भक्तीचिये वाटे लाग। जिया पावसी अव्यंग। निजधाम माझें ॥ ५१६ ॥ असा हा जो उपाय आहे (भक्तिमार्ग) व या मार्गाबद्दलचें जे काहीं अत्यंत श्रेष्ठप्रतीचें व अत्यंत गुह्य असे ज्ञान आहे ते या अध्यायात देव सागणार आहेत म्हणून या अध्यायास श्रेष्ठ विद्येचें गुह्यातलें गुह्य-राजविद्याराजगुह्य-असे नाव दिलें आहे वर सागितल्याप्रमाणें वेद, यज्ञ, तप व दान यापासून जे पुण्य लाभते व त्यामुळे मिळणाऱ्या स्वर्गसुखाची व आत्मज्ञानापासून प्राप्त होणाऱ्या ब्रम्हसुखाची तुलना करून पाहिल्यावर, योग्याना या ब्रम्हसुखापुढे स्वर्गसुख तुच्छ वाटत, आणि म्हणून ते सामान्य जनाच्या मनाला मोहित करणाऱ्या स्वर्गसुखाची पायरी करून, ब्रम्हसुख प्राप्त करून घेतात. तें ब्रम्हसुख वर सागितल्या मार्गाशिवाय निराळ्या रीतीनहि (भक्तिमार्गानें) मिळविता येतें. ते कसे तें या अध्यायास सांगावयाचें आहे

**लक्ष देण्याविषयीं संतांस विनवणी :** (ओव्या १-७)

श्रीज्ञानेश्वरमहाराज श्रोत्याना विनंति करतात कीं, अहो श्रोतेजनहो, आपण माझे बोलणे सावधान चित्तानें ऐकावे म्हणजे अहो, अवधान-लक्ष-देऊन तें आपण परिसत असावे अशी आपणास माझी नम्रपणाची विनति आहे. तेथें सहज प्रेमाचें असे तें समजणे व्हावे म्हणून आपणास पुन्हां एकवार सागणें केलें. सलगीच एक आपणाशीं करून मी असे प्रार्थीत आहे, कारण काय तर येथें लक्ष देण्यानेंच सर्व सुखे मिळण्याची योग्यता येईल. सुखभार तो कसा पाहावा हें समजूं लागेल, असे तें आहे. असे हें माझे आपलेंच जसे ते एका प्रतिमेस उत्तर दिलेले प्रसन्नपण त जसे मजकडून होणारे बोलणें तें विन.

वणेच, ते आपण स्पष्टपणे ऐकावे अहो, आपणापुढे मी हे काहीं डौलानें बोलत आहे असे नाहीं आपणासारख्या शहाण्या लोकांच्या सभेमध्ये सलगीची अगी नम्रपणाची विनवणी एक जशी करीत आहे कीं आपले लक्ष असावें महाराज, अहो, आपल्यासारखीं माहेरें-म्हणजे माहेरचें मनमोकळे, मोठ्या मनाचे ते, तेथे ह्या जीवदशेस सुखाकरिता लागलेली ओढ ती पुरविली जाणारी-तेथे श्रीमंत माहेरें असेच म्हटलें. अहो, आईबापाप्रमाणे पोटचें प्रेम भेटणारें असे त लाभल्यावर मजसारख्या लाडक्याचें तसेच आवडतयाचें सगळे लाड (आवड) पुरतील असे का न व्हावे? अहो, तेथे तर प्रेमाची ओढ ती गोड झाली असे होईल येथे आपणास प्रसन्नपणाचे अगेच तें भेटणे होईल, आणि मनोरथा पूर्ण होतील तुमच्या कृपादृष्टीच्या ओलाव्यानें प्रसन्नतेचे मळे-निसर्गसिद्ध जे ते तर येथे देहश्रांताचे दृष्टिसुखसपन्न असे मळेच ते-भरास आले आहेत, आणि त्या मळयाच्या शीतल छायेत आपलेपणाचा महत्त्वभार परमशात असा गभीरपणाचा-तेथे संसारतापाने तापलेल्या मला विश्रांतिसुख लाभत आहे अहो प्रभु, आपण सौख्यसुधारसाचे डोह आहात, म्हणून माझ्यासारख्याला जेवढे पाहिजे तेवढे सुखामृत घेता येते अशा ठिकाणीं मीं लडिवाळपणा न करावा तर करावा कोठे? प्रेमळ आई आपल्या लेकराच्या वेडयावाकडया चालण्याचे व बोबडया बोलाचे कौतुक करते, ती सर्व समाधान पावते याप्रमाणे तुम्ह सताची प्रीति कसेहि करून-कसीहि तरी-मजवर व्हावी अशा उत्कट इच्छेने मी हे सलगीचे बोलणे -आवडणारे असे बोबडे का नव्हे-तें करीत आहे

**श्रीज्ञानेश्वरमहाराजांची लीनता :** (ओव्या ८-१९)

अहो भवादृश श्रोतेहो, आपली सर्वज्ञता मला बोलण्यायोग्य करील सहजच आपण सर्वज्ञ आहा, कुटुंबवत्सलेचे आपण सर्व संसारनेत्र आहात आपणापुढे प्रवचन करून मला आपणास काहीं शिकवायचे आहे असे नाहीं. सरस्वतीपुत्राने धडे घेऊन-खडे माडून-शिकावयाचे-शिकणे-संभवनीय नाहीं अहो, असे पाहा कीं, काजवा पाहिजे तेवढा मोठा असला, तरी सूर्यतेजापुढे त्याचें महत्त्व नाहीं महत्त्वाचे ते म्हणणे कीं काय अहो! अमृताचे ताट तेथे पक्वान्नेच वाढावीं लागणारीं-तेथे पाकनिष्पत्ति ती कशी असावी, केवढया तरी परिपूर्णतेच्या रसभारतेची अगी ती पाकनिष्पत्ति कोठून आणावी बरें!! अहो, शीतलरश्मी चंद्राला पंख्यानें वारा घालणें, किंवा प्रत्यक्ष नादब्रम्हास गाणे ऐकवणे, किंवा अलकाराना अलंकारानीं नटविणें सजविणें हे काहीं कोठे झाले आहे? सुवासानें हुगावे त काय? सागराने न्हायाचे ते कुठे? सर्व गगन सामावेल असा विस्तार कोठून आणावा? एवढी मोठी पैस कुठची असणार? त्याप्रमाणे तुमचे चित्तास संतुष्ट करून, तुमचे लक्ष तृप्त होऊन आणि तुमच्याकडून धन्योद्गार मिळविण्याइतके ववतृ व कोठून आणावे? पण विश्वप्रकाशित करणाऱ्या सूर्याला काडवातीने ओवाळतात ना? अपरपार समुद्राला चूळभर पाण्यानें अर्घ्य देत नाहींत? येथें तसे मी करीत आहे-येथे माझे बोलणे तसल्या प्रकारचे आहे अहो प्रभु, आपण प्रत्यक्ष महेशाच्या मूर्ति आहात आणि मी दुबळा आपणापुढे भक्तीची याचना करीत आहे हे माझे बोल बोलणे जसे का बेलाच्या अभावीं निर्गुडीच्या त्रिदळानीं महेशाचे पूजन झाले व त्र्यंबकेश्वरांनीं तिचा मस्तकावर स्वीकार केला म्हणून ती गंगावती जरी तरी आपण स्वीकारालच लहान मूल बापाच्या ताटांत हात घालून माताचा घास लडिवाळपणानें बापाच्याच तोंडात घालूं लागते, आणि बापहि पण त्यामुळें संतोषलेल्या प्रेमानें तो स्वीकारण्यास पुढे तोंड करतो त्याप्रमाणे माझे वेडेवांकडे व सलगीनें बाळमतीनें केलेलें भाषण आहे त प्रेमानें ऐकून घ्यावे व तुम्हीं संतोषावे अशीच प्रेमाची जाति होय अशा त्या आपलेपणाच्या मोहानें तुम्ही संत बहुत प्रकारें करून आपलेपणाचें महत्त्व घेऊन आहांत. असें आहे म्हणून, येथें मी जी सलगी दाखविली आहे, तीबद्दल:तुमचे आभार आहेत असे नाहीं, तुम्हांस आभाराचें केले असें नाहीं अहो, तान्हया मुलाचें-वत्साचें-दुसणें लागल्याबरोबर प्रेमळ

आईस अधिकच पान्हा फुटतो, त्याप्रमाणें प्रीतीचें बोलणें ऐकल्यानें प्रेम हें दुप्पट होऊन येतें. आणि म्हणून मी जो लेंकुरवा लहानाहून लहान जो आहे, त्याच्या बोलण्यानें तुमचें कृपाळुपण जें निद्रिस्त आहे तें जागतं झालें असे मला जाणवलें म्हणून मी बोललो

**श्रोत्यांचें लक्ष हीच वक्त्याची मनोरथपूर्ति :** (ओव्या २०-३३)

एरव्हीं चांदणें आढींत घालून काय पिकविलें जातें ? किंवा वाऱ्यास गति-मार्ग-देणें होतें ? गगनाला गवसणी ती कशी घालावी ? अहो, पाण्यास पातळ करणें नाहीं, नवनीतास रवीचें घुसळणें नाहीं, त्याचप्रमाणें जेथें साहित्य अपरपार असे आहे, कृपाळूपणच जेथें सर्व महत्त्व घेऊन आहे, जेथें सर्व व्याख्यान मुरलेलें असे आहे, जेथें व्याख्यानच मुळीं लाजून मागच्या पावलीं परत फिरतें, जेथ वेदध्वनि हा शब्द मावळल्यावर विश्रांतीस येतो असा तो गीतार्थ मराठींत बोलणें हे कसे शक्य आहे ? तें रसभरित असे कसे बरे होईल ? आपल्यासारख्या सज्जनाना धीट होऊनच आवडता व्हावे याच एका आशेनें मला धैर्य आलें आहे अहो, चालचलणूक, रीतिरिवाज, चालरीत, रीतभात ही आपणापासून शिकणें होतें कुटुंबियतेच्या वत्सलतेच्या रीतिरिवाजाचा आपण उदड असा नेत्रच एक आहात. तेथें सर्व नेत्रच उघडाच जसा-रूपच तो-उदंडपणें पाहण्यास मिळाला होतो : तेथें अंगांत अग सचरून जीव जोड करीत आहे, लज्जा ही जवळ येत नाहीं, व दिव्याची वातच एक तेवत असलेली असे तें बोलणे हे घरचा सर्व कारभार पाहणारें होत तेथें अबोला हा चित्त दुश्चित न करता पाहावा व मगच ते गुज सांपडणारें. अशी ह्या परमेश्वराची तऱ्हा ती काय खोडी म्हणावी ? तेथें सर्व संसार डोळयांपुढें उभा होतो तरी आता चद्रापेक्षाहि जास्त प्रसन्न करणारे, अमृतापेक्षाहि अमर करणारे अशा त्या आपल्या लक्ष्याने माझे मनोरथ हे वाढते होतील-पूर्ण होतील आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव होईल, तेव्हा सकळ पुरुषार्थांची सिद्धि व्हावी म्हणून बुद्धि ही अमृतत्वाप्रत येते : एरव्हीं पाहिलें तर, अंकुर येऊन वाढीस लागलेली स्फूर्ति, तुम्ही जर उदासीन असाल, तर सुकेल अहो, असे पाहा कीं, या वक्तृत्वास लक्षरूपी चारा दिला, तर शब्दाना अर्थाची पुष्टी येईल अर्थ हा बोलाची प्रतीक्षा करून असेल. तेथें अभिप्राय हा प्रियपणास वितो व या मतीवर भावाची जशी पुष्पवृष्टीच झाली असे होतें. म्हणून संवादाचा अनुकल वारा वाहील, तर हृदयाकाशामध्ये सारस्वत हे वळणास येते, पण श्रोता हा जर अनवधानाचा असा दुश्चित्त असेल, तर माडलेला रसच मुळीं वितळतो अहो, चद्रकांत हा द्रवलेला होतो, परंतु तें कौशल्य चंद्राच्याच हातीं असतें. त्याप्रमाणे वक्त्याचें वक्तृत्व हें श्रोत्याशिवाय आपल्या भारास येत नाहीं. परतु आता आम्हास गोड करावे असे तादुळानीं (सगुण रूपांनीं) कशास विनवावे, किंवा कळसूत्री बाहुल्यानीं सूत्रधारास त काय प्रार्थावयाचे ? अहो, तो सूत्रधार काय बाहुल्यांचें महत्त्व पुढे घेऊन असतो ? किंवा तो आपल्या चातुर्याची कळा वाढवितो ? म्हणून अशा या उठाठेवींशीं आम्हांस काय काज ? तेव्हा श्रीगुरूनीं म्हणूं केलें कीं, हे तुमचें जे बोलणे तें योग्यतेप्रत येऊन आम्हांस पावले आहे, आता श्रीकृष्णदेवानीं जें निरूपण केलें तें सागावे निवृत्तिदासांनीं उल्हासाप्रत येऊन म्हणूं केले कीं, श्रीकृष्णांनीं जे बोलणे केलें ते ऐकावें

**गुह्यज्ञानग्रहणास पात्रता :** (ओव्या ३४-४१)

श्रीभगवान म्हणाले.-तरी आतां, हे अर्जुना, अतःकरणांतील जीवाची दुसऱ्यास न सागण्यासारखी गुह्य गोष्ट तुला सांगणार आहे परंतु जर जीवाचें हृदयच उघडें केलें, व मग मला गुज असें तें कशास सागतां असे जर तुझ्या मनानें घेतलें, तर आता तुझ्यासारखा बुद्धिवान्, ज्ञानार्जनाविषयीं तीव्र इच्छा बाळगणारा व सांगितलेल्या गोष्टीचा अनादर न करणारा श्रोता मला मिळाला, म्हणून माझ्या अंतःकर-

णांतील दुसऱ्यास न सांगण्यासारखी गुह्य गोष्ट तुजजवळ बोलून गेलो आहे, परतु त तुझ्या मनात पूर्णपणे उतरो म्हणजे गुह्य गोष्ट प्रकट केल्याचे सार्थक हं ईल अगा अर्जुना, थानामध्ये दूध हे गुप्तपणान असतें, परतु त्याची गोडी थानास नाहीं, म्हणून जर अनन्य मिळाला, तरच ती सेवन करणाराची इच्छा पूर्ण होते मुड किंवा पेढीमधून बीज काढले व मग साफ केलेल्या भमींत पेरिले, तर त साडणेलवड ण्यावर गेले असे म्हणता येईल काय ? याकरिता मनाच्या सात्विकतेच्या भावाचा व शुद्धमति असा-जो अनिंदक व अनन्यगति अशास गौप्यहि पण सुखे करून सागावे तरी आता प्रस्तुत तुझ्याशिवाय या गुणानीं युक्त असा दुसरा कोणी नाहीं म्हणून तुझ्याजवळ तरी निदान असे त गुज लपवू नयच

**ज्ञानाची महति :** (ओव्या ४२-५६)

जशीं खरीं व खोटीं नाणीं एकत्र मिसळलीं गेलीं असता ती पारखून निराळीं काढतात, त्याप्रमाणे ज्ञान आणि विज्ञान हे निरनिराळे करून तुला दाखविणार आहे-सागणार आहे राजहस ने जसे चोचीच्या चिमटयाने दूध व पाणी वेगळे करणे होत, त्याप्रमाणे ज्ञान व विज्ञान हीं निरनिराळी करता येणे साधकास अवश्य आहे, तसे त तुजला दाखवून देऊं मग वाऱ्याच्या प्रवाहात पडलेला कोडा जसा उरतच नाहीं व कणाचीच सर्व अशी राशी होते, त्याप्रमाणे जे जाणल्याने पाचभौतिक शरीर पंचभूताना अर्पण करून मुमुक्षूस जे मोक्षाच्या सिंहासनावर बसविते असे ज सर्व विद्यात श्रेष्ठ, जे सर्व गुप्त गोष्टींचा स्वामी, जे सर्वांत अत्यन पवित्र आणि धर्माचे माहेरघर जे उत्तम ज्ञानामधं ल उत्तम, ज्याचा लाभ झाला असता मनुष्य जन्ममरणापासून मुक्त होतो . जे गुरुमुखातून किंचित उदय झ त्यासारखे दिसतें, पण जे वस्तुतः प्रत्येकाच्या अत.करणात स्वयंभच असत, आणि साक्षात्पणेच त आपोआपच प्रकटणारे होतें ' त्याप्रमाणे सुखाच्या पायरीने चढणे केले असता, ज्याच्या भेटीप्रत आपण येतो व भेटल्यावर तर मग सुखासच मिठी पडते-भोगणाराहि उरत नाहीं : परतु भोगाच्या अलीकडल्या सीमेवर चित्त सुखानें उभरून उभे होतें, असे त सुलभ आणि अनायासे मिळण्याजोगे असे-याहिवर परब्रम्ह परंतु याचे विशेष लक्षण हे कीं, त एकदा प्राप्त झाले कीं, नित्य व अविकृत राहात शिवाय अनुभविले असता काहींच तेथें वेचनहि नाहीं व त्याचा कटाळाहि पण येत नाहीं असे ह ज्ञान आहे येथ इतकी ही जर अमोल वस्तु आहे, तर ती आजपर्यंत लोकाच्या दृष्टींतून कशी चुकली अशी शका कदाचित तूं घेशील जे एकोत्र्याच्या व्याजवाढीकरिता जळत्या आगींत उडी टाकतात, ते स्वगोडी अनायासे कशी साडतील ? तरी पवित्र आणि रम्य, त्याचप्रमाणे सहज उपायानें लाभणारी, जाणण्यास सोपी, उत्तम सुखाची अशी, परम धर्मयुक्त अशी ही वस्तु आहे-त्याहिवर आपणच आपणास भेटणारे होतो असा हा सर्व अनुकूलतेचा ठावच होय-तरी लोकाच्या हातून कसा उरणारा बरे ? अशी शंका मोठे महत्त्व घेऊन असते-पण अशी शका तूं धरू नकोस.

**हृदयस्थ परमात्म्याची विषयांमुळे अनोळख :** (ओव्या ५७-६३)

अशा शंकेचे उत्तर हे आहे कीं, गाईच्या सडात पातळ त्वचेच्या आड पवित्र आणि स्वादिष्ट दूध असत पण गोचिड त टाकून रक्त पितात कीं नाहीं ? किंवा कमळाचे कद आणि बेडूक चिखलात एकत्र राहातात, पण भ्रमर कमळाचा पराग लुटतात व बेडकांच्या वांटयास चिखलच येतो. अथवा निर्दैव जो त्याचे घरीं मोहोराचे सहस्त्रावधि हंडे पुरलेले असले, तरी तेथे बसून तो दारिद्र्याप्रमाणें उपवासच करीत असतो त्याप्रमाणे सर्व सुखाचा ठेवा ( आराम, बाग ) मी आत्माराम प्रत्येकाच्या हृदयात वास करीत असता, मूर्ख (भ्रांत) लोक विषयोपभोगाकडे आकर्षिले जातात मृगजळ पाहून तोंडांतला अमृताचा घोट थुंकावा, अथवा शिंपेच्या लोभाने गळयात बाधलेला परीस तोडून फेकून

द्यावा, त्याप्रमाणे अहममतेच्या गडबडींत या विचाऱ्याना मी भेटत नाहीं, आणि म्हणून ते जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडून धक्के खातात. वस्तुत. मी त्याच्या अगदीं डोळयासमोर आहे व कुठे नाहीं किंवा कुठे दिसत नाहीं असा न्यूनाधिक होणारा नाहीं

**विश्वाभास :** (ओव्या ६८–७०)

कारण हे सारे विस्तारलेले (विकास पावण्याच्या गुणाचे) जग मीच आहे जसे दुधाचे रूपातर म्हणजे दहीं, किंवा बीजच तरु झाले, किंवा सोन्याचे रूपातर म्हणजे त्याचे घडविलेले अलकार, तसे माझ्या अव्यक्त रूपाचे साकार रूप म्हणजे हे जग आहे हे अव्यक्तपणाने थिजलेले आहे, तेंच मग जणू काय साऱ्यात घालून विश्वाकाराप्रत ओतले गेले, तसे अमूर्त हे त्रैलोक्य मूर्तिमयाने विस्तारले जाण महत्तत्त्वापासून देहापर्यंत हीं सर्वहि भूत मजवर व्यक्तरूपाने भासमान होतात, तसे हें जग माझ्याठायीं व्यक्तरूपाने दिसत, परतु फेसात जसे पाणी दिसत नाही, किंवा जागे झाल्यावर स्वप्नामधील अनेकता दिसत नाहीं, त्याप्रमाण हीं भूत माझ्या ठायीं दिसलीं, तरी मी त्यांच्यात नाहीं हे मीं तुजला माग सागितलेंच आहे म्हणून जे मागे बोललेच आहे त्याचा पाल्हाळ नको पण तुझी दृष्टी मजमध्ये प्रसरण घेऊन असो

**विश्व परमात्मस्वरूपाचा विकास व विकार .** (ओव्या ७१–८०)

मायेचा पडदा बाजूस सारून, कार्यकारण कल्पना सोडून देऊन, माझे स्वरूपाचा विचार केला, तर तुला असे दिसून येईल की, हीं भूत माझे ठायीं आहेत हे म्हणण सुद्धा मिथ्याच आहे, कारण सर्व काहीं मीच आहे अज्ञानाची झापड डोळ्यावर आल्यामुळे हे भूतमात्र वेगळ दिसते इतकेच · पण सकल्पाची झापड जेव्हा सपते, तेव्हा हे अखडित एक स्वरूपच असे दिसते, जसे का माळेचे सापपण हे शका जाता क्षणींच लोपते कुभार आपल्या कल्पनेने निरनिराळ्या आकाराचीं मडकीं बनवितो, तीं काहीं जमिनीतून स्वयंभू बाहेर पडत नाहींत ना तर्री सागराच्या पाण्यात काय तरगाच्या खाणी आहेत ? पण ही वाऱ्याची अवातर करणी नव्हे काय ? कापसाच्या पोटात काय कापडाचा गठ्ठा असतो ? पण नेसणाराच्या दृष्टीनच कापसाचे कापड बनते जर सोने हेच अलकार झाले, तरी त्याचे सोनपण मोडत नाहीं, पण अलंकार हे स्थूलदृष्टीने पाहाता अगावर घालणाराच्या भावनेने ते अलकार झाले प्रतिध्वनीचीं उत्तरे किंवा आरशात प्रतिबिंबित होत त आपले का खरोखरच ते तेथे होत ? त्याप्रमाणे ह्या माझ्या निर्मळ स्वरूपावर जो आपल्याच कल्पनेने भूतसृष्टीचा आरोप करतो, त्याला त्याच्या कल्पनेप्रमाणे तेथे भूताचा भास होतो ती कल्पना करणारी माया सपली म्हणजे तो मूळचाच मिथ्या भास जाऊन माझे शुद्ध अविकृत स्वरूप तेवढे राहात प्रतिध्वनीरूपी प्रत्युत्तरे किंवा आरशामध्ये जे प्रगट होत, त आपले स्वतःचे किंवा त तेथेच खरेपणानें अगोदर होते ? शब्दा प्रति ध्वनि–ध्वनि प्रति ध्वनि–म्हणून मूळ जो शब्द त्या शब्दावर ती कल्पनाच एक समूळ, जसे का तेथे भूतच एक आभासले होते म्हणून कल्पिती प्रकृति संपली, कीं भूतभास सपलाच–जसे का स्थाणूवरच उभारले जाणे होय जसे का घरामध्ये बसून राहिले तर अनेक ध्वनिप्रतिध्वनीस स्पष्टता देणारे असल्यानें, जसे का मनच पछाडले गेले, त बाहेर जाण्यात जेथींच्या तेथचें होऊन या मनास मोकळेपणाची हवा देते ब्रम्हकल्प किंवा तिन्ही देवाचे जे जन्मस्थान ती गुणमयी मूळमाया तेथेच विसावते

**ऐश्वर्ययोग :** (ओव्या ८१–९७)

बरें हें असो आंगीं भोवळ आली, स्वतःभोंवतीं गरगर फिरणे केलें, तर गिरीकंदर हे फिरतें आहे असे दिसतें. त्याप्रमाणे आपल्या कल्पनेमुळे अखंड अशा ब्रह्मस्वरुपाच्या ठिकाणीं भूतें भासमान

होतात ती कल्पना जर सोडून दिली, तर मी भूतांमध्ये व भूतें माझ्या ठायीं असें हें स्वप्नांतसुद्धां कल्पना करतां येण्यासारखें नाहीं आता मीच एकटा सर्व भूतांना धारण करणारा अथवा भूतांमध्ये असणारा अशी ही संकल्पसन्निपाताची (त्रिदोषाचीं) बोलणीं होत. म्हणून हें प्रियोत्तमा, ऐक : याप्रमाणें मी विश्वासहित विश्वात्मा असा या लटक्या भूतग्रामास नेहमीं भाव्य असा आहे किरणाच्या आधारानें नसतच मृगजळ जसे भासतें, त्याप्रमाणें भूतजात माझ्या ठिकाणीं भावी व मातेंहि भावी. मी अशा प्रकारे भूतांचा उत्पन्न कर्ता, परंतु भूतांना अभिन्न असा आहे, जसा सूर्य आणि त्याची प्रभा एकच आहेत. यालाच आमचा ऐश्वर्ययोग (ईश्वरी सत्तेसंबंधीं योग) म्हणतात. तूं तो उत्तम तऱ्हेनें पाहिलास ना ? तर आता सांग बरें येथे भूतभेदाचा तो संबंध आहे काय ? म्हणून भूतमात्रें माझ्यापासून वेगळीं नाहींत हा सिद्धांत खरा आहे, आणि मला भूताहून वेगळा असा कधीं मानूं नकोस जेवढें म्हणून आकाश आहे, तेवढाच वायु आहे पण पंख्यानें हालवावें तेव्हाच वायूचें वेगळेपण भासतें, एरव्ही तो आकाशच नव्हे काय ? त्याप्रमाणें केवळ कल्पनेनें प्राणिमात्र माझे ठिकाणीं असल्याचा भास होतो नाहीं तर, मीच एकटा सर्व ठिकाणीं आहे. म्हणून नाहीं आणि असे हें कल्पना प्रसवणारें अज्ञान–तें कल्पनेवरच उभारलें जाणारें व कल्पनाभ्रंशानें नाहींसे होणारें मुद्दल कल्पना ही नाहींशी झाली तर हें नाहीं आहे हे कसचें ? म्हणून असा हा ऐश्वर्ययोग तू नीट समजून घे अशा अनुभवरूप समुद्रात तूं स्वतः लाट बनून जा, मग जर तूं चराचरात पाहूं लागलास, तर तूंच आहेस अशा या जाणण्याची जाग तुला आली ना असें देव म्हणाले, तर आता सांग बरें जें द्वैत स्वप्न होतें तें वाव झालें कीं नाहीं ? आणि मग कदाचित् बुद्धीस कल्पनेची झोंप आली, तर अभेद बोध जाऊन स्वप्नात पडणे होत म्हणून या निद्रेची वाट मोडेल असा शुद्ध उद्बोधच (ज्ञानाचा प्रकाश) –आपण शुद्ध ज्ञानस्वरूप आहोंत असें जें वर्म तें–आता दाखवितो. तरी हे धनुर्धरा धैर्या, नीट लक्ष दे : सर्व भूताना ही माया हारीच देऊन असते–भूताना ही माया आपल्या आहारींच करते : म्हणून व्यसनाच्या आहारीं जाऊं नये कारण इंद्रियाचें अफाटपण हेंच तेथे आकळिलें जाणारें व व्यसनें हीं तर इंद्रियांचीं केलेलीं

**द्विविधा प्रकृति :** (ओव्या ९८–१०५)

जीस प्रकृति म्हणतात, ती तुला द्विविध अशी सांगितली आहे–एक ती अष्टधा भेदव्यक्ति व दुसरी ती जीवरूपा होय हा प्रकृतीचा विषय तू मागें ऐकला आहेसच, म्हणून तच पुनः पुनः सांगावयाचें त काय ? तरी माझ्या ह्या प्रकृतीमध्ये महाकल्पाच्या शेवटीं सर्व भूतें हीं अव्यक्तामध्ये ऐक्यास येतात ग्रीष्माच्या कडक उन्हात बीजासहित तृणें हीं भूमीमध्ये गुप्त होतात : किंवा वर्षाऋतूंतील मेघांचें अवडंबर संपलें कीं, शरदृतूचा (शारदीयेचा) गुप्तपणा प्रकट होतो, तेव्हा मेघजात जें गगनामधून निघालेलें ते गगनींचि आटून जातें : किंवा आकाशाच्या पोकळींत वायु निवातपणें लोपतो का तरंगाकार हा जळामध्येच हारपून असतो किंवा जागत्या वेळेस स्वप्न हे मनातल्या मनांत मावळतें : त्याप्रमाणें प्रकृतीपासून झालेलें सर्व कल्पक्षयीं प्रकृतींतच मिळून जात मग पुढें कल्प सुरू झाला म्हणजे मीच उत्पत्ति करतों, अशी लोकवार्ता असते तरी याजबद्दल खरी ती उपपत्ति ऐक

**प्रकृतीचा अंगीकार म्हणजेच सृष्टीची उत्पत्ति :** (ओव्या १०६–१२३)

तरी ही माझी स्वकीय अशी प्रकृति सहजपणेंच मी अंगीकारतों, तेव्हां असे दिसतें कीं, वस्त्र विणताना पटात तंतु समवायी म्हणजे उपादान कारण असतो, मग त्या विणकरीच्या आधारानें प्रथम लहान लहान चौकड्या होत होत वस्त्र तयार होतें, त्याप्रमाणें पंचभूतांचे आकारांची प्रकृतिच होते.

ज्याप्रमाणें विरजणामुळे दूध आटूं लागत, त्याप्रमाणें प्रकृति सृष्टिपणाच्या अगाची होते, सृष्टि उत्पन्न होते वीं ज्याप्रमाणे पाण्याच्या जवळिकेचें होते, आणि तेंच पाणी जेव्हा शाखोपशाखीं पसरतें, त्याप्रमाणे मला हें भूताचे करणे आहे. अगा, नगर ह रायानें केले ह म्हणणे खरे जरी, तरी वास्तविक पाहाता तेथें रायाचे हात काय शिणलेले होते ? आणि मी प्रकृति अंगीकारतो, ते कसे तर जो स्वप्नीं असतो तोच मग जागृतावस्थेमध्यें प्रवेश करणारा होतो तरी स्वप्नामधून जागेपणास येताना, ह अर्जुना, काय पाय दुखतात ? किंवा स्वप्नामध्ये असताना प्रवास होतो काय ? असे हे जे काहीं म्हणणे तेथीलचा आशय तो कसा-तर या भूतसृष्टीचे जे काहीं तें एकहि मजला करणं नाहीं असाच अर्थ ज्याप्रमाणे रायाच्या सत्तेवर वागणारी प्रजा आपापल्या कामकाजानीं व्यवहार करते, तसा प्रकृतिसंग माझा होय, बाकी सर्व काहीं ती प्रकृतीच करते असे पाहा कीं, पूर्ण चंद्राच्या भेटीने समुद्राला अपार भरती येते, तेथे साग कीं चंद्रास काय श्रम पडतात ? जड जरी, परतु जवळीक जोडल्यानें -सान्निध्यानें-लोह चळत-ते चळणारे जरी, तेथे लोहचुंबकास जवळ असण्याचे काहीं श्रम आहेत काय ? किंबहुना याप्रमाणे मी आपल्या प्रकृतीचा अंगीकार करतो, आणि भूतसृष्टि एकसारखी उत्पन्न होऊ लागते जे हे सर्व प्राणी आहेत ते प्रकृतिअधीन असे आहेत जस बीजाच्या वेलींना व पल्लवाना समर्थ भूमि किंवा बाल्यादि अवस्थाना जसा देहसंग गोसावी म्हणजे प्रभु-मुख्य कारण-आहे, किंवा आकाशात मेघाची पक्ति वर्षाकाळास कारण आहे, अथवा स्वप्नास कारण जशी निद्रा, त्याप्रमाण प्रकृति ही सर्व भूतसमुद्रास स्वामीण होय, कारण होय स्थावर का जगम, स्थूल अथवा सूक्ष्म अशा सर्व प्राण्याना प्रकृतिच मूळ होय म्हणून भूतें हीं उत्पन्न करावीत, उत्पन्न केलेलीं तीं साभाळावींत अशीं हीं करणीं आमच्या आगास मुळीं येतच नाहीत जळामध्ये चद्रिकेच्या ज्या वेली पसरतात, तेथं ती वाढ चंद्रानें काहीं केलेली नसते त्याप्रमाणें मला पावन कर्मे हीं दूरच राहिलीं असे आहे.

**प्रकृतिविकारांपासून अलिप्तता :** (ओव्या १२४-१३९)

आणि सुटलेल्या सिंधुजलाचा लोट हा सेधवाच्या घाटाने आवरला जात नाहीं, त्याप्रमाणे सर्व कर्मांना मीच शेवट असल्याने, तीं काय मला बांधणारीं होतील ? धुराच्या कणाचा विस्तार वाहात असलेल्या वायूला हाक मारून थाबवील काय ? किंवा सूर्यबिंबामध्ये अधारे शिरेल काय ? हें असो, पर्वताच्या हृदयीं जे आहे, त पर्जन्याच्या धारानीं काहीं भोसकले जात नाहीं, त्याप्रमाणे प्रकृतीचे कर्मजात मजला लागत नाहीं एरव्ही पाहिले असता या प्रकृतीच्या विकारात म्हणजे स्थूल सृष्टींत मीच एक आहे असे जाण, पण उदासीनाप्रमाणे मी काहींहि करीत नाहीं व करवीतहि पण नाहीं ज्याप्रमाणे घरात ठेवलेला दीप कोणालाहि नियमीत नाहीं व निवारीतहि नाहीं—तो जसा का साक्षिभूत असलेला, गृहामधील व्यवहार करण्याची जी प्रवृत्ति तिचा हेतुच होय त्याप्रमाणे भूतकर्मांमध्ये (प्रकृतीच्या कार्यांत) मी अनासक्त असतो असा एकच अभिप्राय प्रिय असा पुन. पुनः सागून अनेक उपपत्तींचा उहापोह कशास ? येथे एकवार एवढेच जाणन ऐस कीं, या सर्व लोकचेष्टांना सविता निमित्तमात्र, त्याप्रमाणे विश्वाच्या उत्पत्तीला, हे पाडुसुता, मी हेतु जाण कारण मीं प्रकृतीचा अंगीकार केल्याने, या चराचराची उत्पत्ति होऊं लागते म्हणून मी या उत्पत्तीला हेतु घडे म्हणजे असतों : अशी ही उपपत्ति आहे : अशा या बुद्धीच्या प्रकाशानें ऐश्वर्ययोगास न्याहाळण्याचे कर : तो कसा तर मजमध्ये भूते असतात, पण मी भूतांमध्यें नसतो : अथवा भूतें हीं माझ्या ठायीं असतात आणि भूतामध्ये मी नाहीं अगा या खुणा तूं कंहीं चुकूं नकोस : : हेंच आमचें सर्वस्व असे गूढ होय, परतु तुजला उघड करून दाविले आहे आतां इंद्रियांचें द्वार बंद करून हृदयामध्यें हें भोगण्याचें कर असे हें रहस्य जोपर्यंत तुझ्या हातीं येत नाहीं, तोंपर्यंत माझें खरे स्वरूप सर्वथैव सांपडणार नाहीं, ज्याप्रमाणे कोंड्यांतील कण वजनदार

असल्याने राशीचे होतात व कोंडा हा उपणतांना वाऱ्यानें उडून जातो एरव्हीं, अनुमानाच्या जोरानें पाहिलें असता, खरोखर कळले आहे असे वाटतें, पण मृगजळाच्या कोलांशाने काय भूमि चिंब भिजते ? जें जाळे जळामध्ये पसरलेले असतें, तेथे चंद्रबिंब सापडलेले दिसतें, परंतु बाजूस काढून झटकलें असता तेथे बिंब असते काय ? त्याप्रमाणे वाचेच्या बळाने कितीहि बोलणे केले, तर अनुभवाची दृष्टी ही विनाकारणच झकविली जाते, मग खरेपणाच्या बुद्धिबोधाच्या वेळेस ते आहे असें होत नाहीं–खऱ्या बोधाची म्हणजे परीक्षेची वेळ आला म्हणजे त्याचा ठावठिकाणाहि नसतो.

**लोकांची गैरसमजूत आणि वेडेपणा :** (ओव्या १४०–१५४)

किंबहुना संसाराविषयीं भीति आणि जर मजविषयी खरी आवड असेल, तर तूं ह्या उपपत्ति जतन कर एरव्हीं, दृष्टी ही काविळीची झाली, तर स्वच्छ चांदण्यास पिंवळे म्हणतें, त्याप्रमाणे माझ्या निर्मळ स्वरुपामध्ये दोष दिसूं लागतो ताप आला असता दूध जसें विषासारखे कडू लागते, त्याप्रमाणे मज अलौकिकाला मनुष्यलौकिकाचा नसताहि मनुष्यपणे मानतात म्हणून, हे धनंजया, वरचेवर हेच सांगणे कीं, अशा या उद्देशास तूं विसरूं नकोस. कारण स्थूल दृष्टीनें पाहिलेंस तर, तें व्यर्थ असेच होईल परंतु मला स्थूल दृष्टीने पाहाणे तेच न देखणे होय हे खरें जाण ज्याप्रमाणे स्वप्नामध्ये प्यालेल्या अमृताने अमरपण प्राप्त होणे नाहीं एरव्हीं, मूढ जे ते स्थूलदृष्टीच्या पक्केपणाने मला जाणतात, परंतु ते जाणणेच ज्ञानाच्या आड होते नक्षत्राचें प्रतिबिंब पाण्यात पाहून, तीं मोत्ये समजून, हंस उडी घालून फसतो. मृगजळास गंगा समजून कोणीं जर तेथे जाणे केलें, किंवा बाभळीस कल्पवृक्ष समजून हातीं धरले, तर काय लाभणार ? नीळमण्याचा दोन सरींचा हार समजून कवड्या साप जर हातीं आला, किंवा रत्नें म्हणून गारा जर वेचल्या, किंवा गुप्तधनाचा ठेवा समजून जळजळीत निखारे पदरात घेतले, किंवा पडछाया न जाणता सिंहाने विहिरींत उडी घेतली, त्याप्रमाणे मी परमात्मा साकार होऊन अवतरतो अशी मनाची दृढ समजूत करून घेतल्यामुळे प्रपंचात बुडी मारणाऱ्यांना तसला लाभ होतो, त्यानीं तर चंद्राकरिता जळामधील चंद्राची प्रभाच धरली त्याप्रमाणे कृतनिश्चय वाया गेला का तर कांजी पिण्याने अमृतासारखा परिणाम पाहू लागला असें होतें त्याप्रमाणें या नाशवंत देहांत मला अविनाशाला अगदीं भरंवशानेंच पाहू जाणाराना मी कसा दिसणार ? किंवा पूर्व दिशेच्या रस्त्याला लागून पश्चिम समुद्राच्या किनाऱ्यास पोहोचावे असे कसे शक्य आहे ? किंवा कोंडा काढून कोठें काहीं कण सापडणार होतील ? त्याप्रमाणे माझ्या प्रकृतीच्या विकारापासून निर्माण झालेली ही स्थूळ सृष्टी जाणल्यानें मी जाणला जातो असें म्हणणे निरर्थक होय काय फेस पिण्यानें पाणी सेविले होईल ?

**विपरीत ज्ञान :** (ओव्या १५५–१७१)

म्हणून मनाचा भ्रांतिमूलक ग्रह करून व स्थूळ हाच परमात्मा असें समजून या स्थूलाचीं जन्ममरणादि कर्मे मजवर लादतात मी नामरहित असून मला नाम देतात, मी क्रियाहीन असून कर्माचा, विदेह (निर्गुण स्वरुपाचा) असून देहधर्माचा मजवर आरोप करतात निराकार असून आकाराचा, निरुपचाराचा असून तसेच उपाधीचा नसून उपचाराचा, आचारविचाररहित असून व्यवहाराचा, वर्णहीन असताहिं वर्णाचा, गुणातीत असून गुणाचा, निरवयव असून हस्तपादादि अवयवाचा, मी अपरिमित असून परिमाणाचा, व्यापक असून एकदेशी मानतात, समजतात— ज्याप्रमाणें झोपलेला स्वप्नामध्ये भोगविलास पाहतो-आथरुणामध्ये उपवनविहार, वन, उद्यान, ताठवागृह पाहातो मी श्रवण नसून कानाचा, मी अचक्षू असून नेत्राचा आहे म्हणतात. गोत्र नसून गोत्राचा, रुप नसून रुपाचा, मला

अव्यक्ताला व्यक्तित्वाचा, इच्छारहित असणारा जो मी त्यास इच्छेचा, स्वयंतृप्त असतां तृप्तीचा असे मानतात अनावरणाचा असा त्यास वस्त्राचा मानतात, भूषणरहित असा मी जो त्यास भूषणाचा व सकळकारणाला मला ते कारणाचा मानतात मी स्वयंसिद्ध असता माझ्या मूर्ति घडवितात, मी स्वयंभु असता माझी प्राणप्रतिष्ठा करतात, मी निरंतर असा त्या माझे आवाहन-विसर्जन करतात मी नित्य, स्वयंसिद्ध, एकरूप व अविकृत असता, बालपण, तारुण्य व वार्धक्य या अवस्थाचा संबध माझ्याशीं जोडतात माझी अद्वैत स्थिति असता माझ्यामागे द्वैत लावतात मी अकर्ता व अभोक्ता असता, कर्म करतो व भोग भोगतो असे म्हणतात मला कुळगोत नसता माझ्या कुळाचे वर्णन करतात मी नित्य असता माझ्या मरणानें दु खी होतात मी सर्वांच्या अंतर्यामीं असतां मला शत्रुमित्र असे मानतात निजानंदात निमग्न असा त्या मला अनेक सुखाची इच्छा आहे असे मानतात मी सर्वसम असता एकदेशी म्हणतात मी चराचरामध्ये आत्मपणाचा असता, एकाचा कैवार घेतो आणि एकास रागावून मारता असेच प्रसिद्धीस आणतात-असेच रूढीप्रत आणतात साराश, माणसाचे सगळे सामान्य धर्म माझ्या ठायीं आहेत असे मानतात . एकाद्या मूर्तीस देव समजून तिची भक्ति करतात आणि ती भंगल्यावर तेथें देव नाहीं असे समजून ती फेकून देतात अशा अनेक प्रकारानीं मला ते मनुष्याकाराचा समजतात असे त्याचे विपरीत ज्ञान माझ्या स्वरूपाविषयींच्या खऱ्या ज्ञानाला झाकून टाकते असले त्याचे ते विपरीत ज्ञानच सत्य ज्ञानाला प्रतिबधक होतें

**तमोगुणानें अविवेक ·** (ओव्या १७२-१७९)

म्हणून अशा पुरुषाचा जन्म वृथा म्हटला पाहिजे जसे का पावसाळ्यावाचून आकाशीं दिसणारे ढग, किंवा मृगजळाच्या लाटा या दुरूनच पाहाव्यात असे ते होत अथवा मातीचे केलेले घोडेस्वार किंवा जादूचे अलकार, ढगाच्या आकृतींत दिसणारे रम्य नगर जसे आभासते, शेराचे झाड सरळ वाढले तरी वर फळ नाहीं आत पोकळ जसे किंवा शेळीचे अजागळ स्तन जसे, (हीं जशीं केवळ दुरून पाहाण्यालायक व निष्फळ), त्याप्रमाणे या मूर्ख पुरुषाचे जीवित असते त्यानीं केलेले कर्म निरुपयोगी व धिक्कारास पात्र असे होते-जसे का शेरास आलेल्या फळाचे घेणे देणे होत नाहीं, ज्या शेरास मुळीं फळच येत नाहीं, तेथे त फळ येणे, का घेणे, का देणे त कसचे? ते जे काहीं शिकले त सर्व मर्कटानें नारळ तोडल्याप्रमाणे (त्याचे ते नारळ तोडणे व्यर्थच-त्यास ते खाता येत नाहीं) का आधळ्याच्या हातात पडलेल्या मोत्याप्रमाणे वायफळ होय त्याचीं शास्त्रें हीं कुमारीच्या हातीं दिलेल्या शस्त्राप्रमाणे किंवा अशुद्ध पुरुषास सांगितलेल्या बीजमत्रासारखीं निरर्थक होत. त्याप्रमाणे सर्व ज्ञानजात जे ते त्याना वायाच असे होय ते चित्तहीन असल्यामुळे ते जे काहीं आचरतात किंवा आचरले त व्यर्थ होय तामसी प्रकृतीरूपी राक्षसीच्या (रात्रीं फिरणारी, अज्ञानात वावरणारी, तामसी गुणाची मायाराक्षसी) तावडीत सापडल्यामुळे त्याची सद्‌बुद्धि व विवेक नष्ट होऊन जातात-विचाराचें ठावठिकाण मोडतें

**तामसी प्रकृतीचे भूतोंडी :** (ओव्या १८०-१८७)

त्या प्रकृतीनें ग्रस्त झाल्यामुळे चिंतेच्या आधीन झाले व वर तमोगुणाच्या मुखातच जाऊन पडले या निशाचरीच्या मुखात आशेच्या लाळेत हिंसारूपी जीभ लुळलुळत असते, आणि असतोषाचे चोथे अखंड चघळीत असते. अर्थाचा अनर्थ ऐकण्याकडे ओठाचे भाग हे चाटीत जशी ती जीभ बाहेर निघते व जी सदा सर्वदा प्रमादपर्वताची दरी मातलेली अशी तिच्या द्वेषरूपी दाढा ज्ञानाचा खसखसा चुगडा करीत असतात, कारण अशा स्थूलबुद्धि मूढ पुरुषाना त्वचा व अस्थि याची पलीकडची दृष्टिच

नाहीं. अशा मायारूपी राक्षसीच्या तोंडात जे पडले, ते भूताचा बळीच होऊन बसले, म्हणून ते भ्रांतीच्या कुडांत बुडाले तमोगुणाच्या खळग्यातून त्याना बाहेर काढण्यास विचाराचे हात त्याच्या-पर्यंत पोहोंचतच नाहींत हें असो, ते कोठे गेले त्याचा पत्ताच लागत नाहीं म्हणून निष्फळ अशीं हीं मूर्खांचीं बोलणीं असूं देत व याचाच आणखी विस्तार केला, तर आपली वाणी वायाच शिणलेली होईल अशा या देवांच्या बोलण्यावर पाडवानें जी जी, बरे असो, असे म्हणितलें : आता जेथे वाणीला विश्रांति मिळेल ती साधुकथा ऐकण्याचे करावे

**दैविये प्रकृतीचें दैव :** (ओव्या १८८-१९६)

तरी ज्यांच्या निर्मळ मनामध्ये-ज्याच्या पवित्र अतःकरणात-मी वास करतो, ज्याचे वैराग्य (विषय निवृत्ति) स्वप्नातसुद्धा ढळत नाहीं-तेथें मी कायमचा असतो . ज्याच्या श्रद्धायुक्त भावनेत धर्माचे साम्राज्य असतें : ज्यांच्या मनात विवेकाचा सदा ओलावा असतो : जे ब्रह्मज्ञानयुक्त, समाधानी शात वृत्तीचे असे म्हणजे शातिरूपास नवीन अकुर उगवलेले असे होत : जे पूर्णावस्थेचे अकुर होत-पूर्णस्थिति-ब्रम्हरूपताच जशी : जे धैर्यमंडपास दिलेले स्तभ होत, जे आनद समुद्रामध्ये बुडवून भरलेले कुभ होत : ज्याना भक्तीचें परम सुख एवढे मिळाले असतें कीं, जे मोक्षाला दूर सारतात, भक्तीपुढें मुक्तीला तुच्छ मानतात, व ज्याच्या लीलेमध्ये नीति ही जिवतपणाची अशी दिसते . ज्यानी सर्व इंद्रियांना शातीचे अलकार लेवविले आहेत, व ज्याचें चित्त मज व्यापकाचें साठवणच जसे असे ते महात्मे माझें सर्व स्वरूप जाणून दैवी प्रकृतीचें भाग्यच झालेले-भाग्यच होत असे ते माझें सत्य स्वरूप जाणून उत्तरोत्तर अधिक प्रेमाने मजला भजणारे महान् समर्थ असे थोर पुरुष होत ते काहीं मात्रहि द्वैतभाव न ठेवणारे होत त्याचें चित्त द्वैताला नुसता स्पर्शहि करीत नाहीं असे मीच होऊन मत्स्वरूप होऊन, हे पाडवा, माझी सेवा करतात, परंतु येथे आश्चर्य सागण्याचे त एक आहे तें सांगतों ऐक

**मातें भजती जे महात्मे :**

**भजनप्रकार (१) : तिहीं वैकुंठचि केलें आघवें :** (ओव्या १९७-२११)

तरी कीर्तनप्रसंगीं ( परमेश्वराचे यश वर्णन करण्याने ) भक्तीच्या भरात नाचण्याने उडण्याने (पापक्षालनाचे सर्व प्रकार व्यवसाय योजन ) माझे भक्त पापच नाहींसे करून टाकतात ( नामस्मरणाचा चाळा, सतत उत्कर्ष = नटनाच ) यम म्हणजे मनाचें संयमन व दम म्हणजे इद्रियाना विषयापासून आवरणें यांचें कामच पडत नाहीं असें करतात अशा भक्ताच्यामुळे तीर्थक्षेत्रे ओस पडतात व यमलोकीची राहाटीच बंद पडते यमाने म्हणूं केले की, मनाचें संयमन येथे सर्व आहे, आतां यमावे तें काय ? दम म्हणूं लागला कीं, इद्रियाना विषयांपासून आवरणे येथें सर्व आहे, आतां दमावे तें काय ? तीर्थे म्हणूं लागलीं कीं, पाप नाहींसे झाल्यामुळे क्षेत्रे हीं ओस पडूं लागलीं व औषधास सुद्धा दोष नसल्यामुळे आतां खायाचें तें काय ? केवळ माझ्या नामघोषानें (नामस्मरणाच्या गजराने, नामाच्या जयजयकाराने) ते विश्वाचें दुःख नाहींसें करून सर्व जग सुखमय करून सोडतात ते ज्ञानाने जगाला प्रकाशित करतात ते पहाटेशिवायच आत्मज्ञानाचा प्रकाश देतात, अमृतावांचून अमरत्व देतात, अमृताशिवायच जीवित देतात, जिवंतपणाचे करितात व योगसाधनावांचून मोक्षाचा अनुभव आणून देतात. रायारंकामध्ये समानता राखतात, लहानथोर हा विचार त्यांच्या मनांत येत नाहीं. एकसारखे आनंदाचें आवारच जसे असे ते जगास देतात-जग करून ठेवितात-कधींहिं न संपणारा आनंद असे ते जगाला होत. एखादा (एक अर्धा), जरी वैकुंठास गेला-एकादा वैकुंठास जावा-तों त्यांनीं तें सर्व वैकुंठाचें असे केलें,

तेथें गर्दीच झाली-सर्व जग हेच तेथे आलें-सर्व जगासच तें वैकुंठीचें भाग्य भोगण्यास दिलें असें त्यांनीं केलें : अशा प्रकारें नामघोष हा परम गौरवाचा झाल्यानें, सर्व विश्व पावन झालें ते सूर्यासारखे तेजस्वी असतात, पण सूर्याला अस्त असतो हा दोष त्याच्यात नाहीं चंद्र पूर्णिमेसच तेवढा पूर्ण असतो, पण हे तर नेहमीं पूर्ण असे-परिपूर्ण असे असतात मेघ उदार आहे खरा, पण तोहि ओसरून जातो, म्हणून त्याची उपमा येथे पुरती होत नाहीं, कारण हे निःशंकपणे सदय असून सिंहासारखे कृपेच्या कामीं शिवच होत त्याच्या वाचेपुढें माझें अखंड नाम प्रेमानें व आवडीनें नाचत असतें व त्या नामाप्रत एकवेळ येण्याकरिता हजारो जन्म घेऊन सेवाच करावी लागणारी : असा तो मी एकवेळ वैकुंठींहि पण नसेल, या सूर्यबिंबामध्येहि पण एकाद वेळ नसेल, आणि योग्याच्या मनानाहि उमरडून उल्लंघून जाणारा असा परतु जेथे माझा नामघोष बरवा असा होतो, केला जातो, तेथे मात्र मी जो हरवलेला तो सापडावाच सापडावा असा असतो अहो, कसे बरे ते जे देश किंवा काळास (स्थळ किंवा वेळ) विसरून माझ्या गुणामध्ये सुखी झाले व कीर्तनसुखानेच आपलेपणाचे असे-आपलेआपणच असे-सुखावलेले माझे भक्त माझ्या गुणसंकीर्तनात इतके दंग होतात कीं, स्थळकाळाचाहि विसर पडून कीर्तन-भजनातच ते आत्मसुख पावतात तोडाने कृष्ण विष्णु हरि गोविंद या नामाचा उच्चार चाललेला असतो व मधन मधून मोकळेपणाने आत्मचर्चा होत असते आणि माझ्या गुणाचीं गीतें गात असतात हे सर्व काहीं असे असून याप्रमाणें ते माझे गुणानुवाद गात चराचरामध्यें आनदानें विहार करीत असतात

**भजनप्रकार (२) : आत्मानुभव राज्यसुख :** (ओव्या २१२-२१९)

अर्जुना, यावर आणिक जे काहीं करतात ते म्हणजे सर्वथा अत्यंत परिश्रमानें मनाला पंचप्राण वाटाड्या घेऊन (साहाय्यास घेऊन, स्वसत्तेत घेऊन) हे जतन करीत असतात बाहेर यमनियमाचे कुपण घालून आतमध्ये मूळबंधाचे आवार तयार केले व प्राणायाम करणारीं वाहातीं यंत्रे जशीं व्यवस्थितपणाने माडलीं तेव्हां कुंडलिनीच्या प्रकाशाने व मनपवनाच्या साहाय्यानें सतराव्या जीवनकलेचें चद्रामृताचे तळे स्वाधीन करतात मग अंतर्मुख केलेल्या इद्रियाच्या एकाग्रतेची परमावधि होते, विकार थाबतात, सर्व इद्रिये आतल्याआत हृदयात दडपलीं जातात मग अशातच धारणापरिपक्व होऊन तिची मोठी मदत झाल्याकारणानें, पचमहाभूते एकवटून आकाशात लय पावतात तेथें मन, बुद्धि, चित्त, अहंकार या चतुरंगाचें स्थैर्य होतें व संकल्पविकल्प नाहींसे होतात नंतर ध्यानधारणेचा विजय होतो ब्रम्हैक्य आटोक्यात येते. तन्मयतेचें एकछत्र झळकूं लागते समाधिवैभवाच्या (समाधिरूप सर्व संपत्तीचा) सिंहासनावर आत्मानुभव राज्यसुखाचा (आत्मतत्त्वाची प्रतीति हाच राज्यलाभ) पट्टाभिषेक समरसतेनें (जीवशिवैक्यानें) जाहाला असे होते असे, हें अर्जुना, माझ्या भजनाचें गहनतेचें रहस्य आहे आता दुसरे कोणी जे काहीं एक करतात तें सागतों

**भजनप्रकार (३) : नमनभक्ति :** (ओव्या २२०-२२९)

तरी ज्याप्रमाणे वस्त्रात दोन्ही पदरापर्यंत एकच तंतु असतो, त्याप्रमाणें मी चराचरामध्ये भरलेला आहे याप्रमाणे माझे रहस्य जाणणारे भक्त माझ्यावांचून दुसरें काहीं जाणत नाहींत. ब्रम्हदेवापासून तो चिलटापर्यंत सर्व काहीं स्वरूपच एक माझें असें ते जाणतात मोठा लहान, वडील धाकटा, सजीव निर्जीव हा भेदभाव ते ठेवीत नाहींत दिसणारी प्रत्येक वस्तु ब्रम्हस्वरूप समजून तिचा ते आदर करतात तिजपुढे लोटांगणच घालतात मीच समजून आपलें उत्तमत्व आठवत नाहीं, पुढिलांची योग्यता कां अयोग्यता हें जाणत नाहींत : भेदभाव न ठेवितां भूतमात्रांना नमन करावे असे

त्यांना आवडले. उंचावरून पडलेलें पाणी हें तळवटापर्यंत येऊं लागतं असे, तसें भूतजात देखिलेलें जें तेथें नमनच करावे असा त्याचा स्वभाव बनतो नम्रपणा हा माझ्या भक्तांचा स्वभाव बनतो फळान लकडलेल्या झाडाची फादी जशी जमिनीवर उतरते-जमिनीला टेकते-तसे ते सर्व भूतमात्राना नम्र होतात नेहमीं नम्रपणा हेच त्यांचे सारे वैभव, नेहमीं अगर्वतचे असे त, त्याची नम्रपणा-विनय-हीच संपत्ति व वभव होय आणि ते भक्त ती नम्रता किंवा तो विनय मला 'जय जय' अशा मत्राने अर्पण करतात असे नमन झाल्याने त्याची ती मानापमानाविषयींची भावना लोपली असल्यामुळे (मानाभिमान या कल्पना नष्ट होतात) ते आपोआपच मद्रूप होऊन-मजशीं तन्मय होऊन उपासना करीत राहातात. अर्जुना, अशी ही श्रेष्ठ उच्च प्रकारची भक्ति तुला सागितली आता ज्ञानयज्ञाने जे यजनपूजन करतात, त्या भक्ताविषयीं सागतो ऐक ज्ञानयज्ञाने आराधन करणाऱ्या लोकांची रीत त जाणतच आहेस, कारण या गोष्टीबद्दल मागे चवथ्या अध्यायात सागितलेच आहे

**प्रेमळ संवादिया .** (ओव्या २२०-२२८)

तेव्हा अर्जुन म्हणाला, कीं हो, त सागितले आहे खरे. पण आता पुन्हा सागता आहात ते देवाची कृपाच होय, दैविकीचा प्रसादच होय आता त दैविकिया प्रसादाचे करणे त म्हणजे जसे का अमृताच सेवनच असे . तेथे पुरे म्हणवेल काय? पुरे म्हणवत नाहीं या अर्जुनाच्या बोलण्याने श्री अनतानी त्याची उत्सुकता जाणली व ते सुखावलेल्या चित्ताचे होऊन डोलू लागले व म्हणाले की, बा रे अर्जुना, भले भले, एरवीं पाहिले असता अशा या प्रसगी जरी त सर्वथा अयोग्य असे, पण तुझी ही आस्थाच-उत्कठा-मला बोलवीत आहे यावर अर्जुनाने उत्तर दिले की, अहो हे काय, चद्राला चितणारा चकोर जर नाहीं, तर चादणेच नाही अहो, जगास निववावें हाच त्याच्या ठायीचा स्वभावच कीं अहो जी अहो चकोर जे ते आपल्या गरजेसाठीं चद्राकडे चोच करतात, त्याप्रमाणे देव हे तर कृपासिंधुच असल्यानें, आम्ही जे काही विनवावे त थोडेच होय अहो, मेघ आपल्या मोठेपणासाठीं जगाची पीडा किवा तृषा नाहींसी करतो, खरे पाहिले तर चातकाची तृषा ती काय त्या मेघाच्या वर्षाव पाहून? परंतु एका चूळभर पाण्यासाठीं गगेची गाठच घ्यावी लागते, त्याप्रमाणे माझी तृषा ही लहान असो का बहु असो, तरी देवानीं सागण्याचे करावेच करावे तेव्हा देव म्हणाले की, स्थिर हो, तुझ्या या बोलण्याने आम्हास जो काहीं संतोष झाला आहे, त्यावर आता स्तुतीचे काहीं व्हावे असे उरलेच नाही आत्म व पर हे भाव मावळले परन्तु बालकाप्रमाणे हितच एक तुजपुढे येऊन असल्याने सावधानतेन ऐकत आहेस त तुझे ऐकणे वक्तृत्वास उत्साह देणारे आहे याप्रमाणे श्रीहरींनीं अर्जुनास गौरवून पुढे सागण्याची कृपा केली. आदराचे-कृपेचे-असे त बोलणे केले

**भजनप्रकार (४) . ज्ञानयज्ञ एकत्वानें :** (ओव्या २२९-२४८)

तो ज्ञानयज्ञ कसा आहे असे विचारशील तर पाहा की, त्याचे साहित्य असे असत.-त्याचा यज्ञस्तभ म्हणजे परब्रह्माच्या ठिकाणीं स्फुरण पावणारी-एक असून अनेक होण्याची-इच्छा . यज्ञमडप म्हणजे पंचमहाभूते व यज्ञपशु म्हणजे द्वैत (भेद) : यज्ञसामग्री ही पंचमहाभूताचे विशिष्ट गुण किवा इद्रिये आणि प्राण : होमांत टाकावयाचे तूप ते अज्ञान होय : तेथे यज्ञकुड जे ते मन आणि बुद्धि होय : तेथे ज्ञानाग्नि हा प्रदीप्त झालेला व मजबूत अशी वेदिका ती साम्य होय : सत्य-मिथ्या-विवेक करण्या विषयींचे कौशल्य ती मंत्रशक्ति होय : विद्यागौरव व शाति हीं यज्ञपात्रे (स्रुक् स्रुव) व जीव हा यज्ञकर्ता होय : : असा तो यज्ञकर्ता यजमान जीवब्रम्हस्वरुपाच्या अनुभवाच्या पात्रातून विवेक म्हणजे ब्रम्हविचाररूपी महामत्राचा घोष करीत करीत ज्ञानरूपी अग्निहोत्राने भेद नाहींसा करतो, ज्ञानाग्नीच्या

कुंडात जीव व ईश्वर यांच्या भिन्नत्वाची आहुति देतो, तेव्हा अज्ञानरूपी तूप संपले म्हणजे यज्ञकर्ता व यज्ञविधि हे दोन्ही संपतात : आणि जेव्हा यज्ञ करणारा जीव आत्मैक्याच्या जलाने यज्ञसमाप्तीचे (अवभृथ) स्नान करतो, तेव्हा भूत, विषय व इंद्रिये यांचा भिन्नपणा भासतच नाहीं, आत्मैक्यबुद्धि पूर्णपणे बिंबल्यामुळे सर्व एकच ब्रम्हरूप आहेत असे तो जाणतो आता जागा झालेला जसा तो, हे अर्जुना, म्हणं करतो कीं, ती स्वप्नातील विचित्र सेना निद्रावशनमुळे मीच झालो होतो ना ? आता सेना ते सेना नव्हे, हे सर्व काहीं मीच एक आघवे . अशा तऱ्हेने एकपणाने सर्व विश्व त्याच्या प्रतीतीस येते मग जीव आहे ही त्याची कल्पना नष्ट होते, आणि सर्व ब्रम्हरूपच आहे या ज्ञानाने तो परिपूर्ण होतो असा ज्ञानयज्ञाने मला भजण्याचा हा एक प्रकार झाला

**भजनप्रकार (२) : ज्ञानयज्ञ विश्वतोमुखाने :** (ओव्या २४९-२६४)

अथवा अनादि हे अनेक जे दुसऱ्या एकासारखे एक आणि नामरूपादिक हेहि पण भिन्नभिन्न- म्हणून विश्व जरी निरनिराळे, एकाहून एक भिन्न असे, तरी त्यांचे ज्ञान हे भेदले जात नाहीं-ज्ञान हे भेदाचे होत नाहीं, ज्याप्रमाणे अवयव जरी निरनिराळे, तरी एकाच देहाचे ते जसे किंवा शाखा या लहानथोर जरी अशा एकाच वृक्षाच्या, जरी किरणे हीं अनेक तीं एकाच सूर्याचींच, त्याप्रमाणे नानाविध व्यक्ति, निरनिराळीं नावे व निरनिराळ्या वृत्ति, तशींच निरनिराळी भूत जरी, तरी त्या सर्वांमध्ये मी अभेद असाच आहे अशा या तऱ्हेच्या वेगळेपणावर उभा केलेला तो ज्ञानयज्ञ तथे जाते जे, जाणते जे त्यांच्यामध्ये ज्ञान हे अभेदत्वे असते

अथवा ज्या ठिकाणी जे जे काही देखतात ते मीवाचून नाहीं असाच त्याचा बोध असतो अरे पाहा कीं, बुडबुडा जिकडे म्हणून जाईल, तिकडे जळच एक त्यास आश्रयाचे आहे, मग तो बुडबुडा फुटला काय किंवा राहिला काय, ते जळामध्येच होते किंवा वाऱ्याने पृथ्वीचे बारीक कण उचलले, ते पृथ्वीपणाशिवाय वेगळे न होता माघारी पडले तरी पृथ्वीवरच पडतात तसे भलत्याहि ठिकाणी भलत्याने भलत्याहि भावाने भलतेहि होऊन अथवा न होऊन असणे जे ते मीच सर्व होऊन असलेले असे अथवा ही जेवढी म्हणून माझी व्याप्ती आहे, तेवढीच त्याची व्यापकपणाची प्रतीति असते त्याप्रमाणे अनेकविध आकारामध्ये ते मीच होऊन लागतात हे भानुबिंब पाहिजे त्याला सन्मुखच जसे असते, तसे ते या विश्वाला नेहमी समोर असतात त्यांच्या ज्ञानाला पाठ किंवा पोट-मागेपुढे किंवा आतबाहेर-असे नाहीं जसा वायु हा गगनाच्या सर्वांगी असतो, तसा मी जेवढा सर्व तेच त्यांच्या सद्भावाचे (अनुभवाचे म्हणजे परमात्मा एवढाच पूर्ण बोध-अपरोक्षानुभवाचे) प्रमाण होय, आणि म्हणून भजन न करिताहि भजन झाले असे होते एरवीं पाहिले तर, मीच सर्व काहीं आहे, तरी कोणीं कसा बरे तो उपासिलेला नव्हे ? येथे ज्ञान नाहीं म्हणून मी दुरावलो आहे परंतु ते असो अशा तऱ्हेच्या योग्य अशा ज्ञानयज्ञाने यजन करणारे मला कसे उपासितात ते सांगितले अखंड असे हे सकळ सर्वांभूतीं ते मजला एकाला सहज अर्पण होय परंतु अज्ञानामुळे (न समजल्यामुळे) मूर्ख ते मला पावतच नाहींत, मजपर्यंत येतच नाहींत

**परमेश्वराचें भावैश्वर्य :** (ओव्या २६५-३००)

तेथे जर जाणिवेचा उदय झाला, तर मुद्दल वेद तो मीच होय, आणि तो ज्या विधिअनुष्ठानास देतो, असा तो क्रतुरूपी यज्ञ मीच होय. मग त्या त्या कर्मापासून जो काहीं उत्तम अथवा यथासांग यज्ञ प्रकटतो, स्पष्टतेस येतो, तो, हे पांडवा, मीच होय. देवास हविमंत्र मीच होय, पितरास हवि देण्याचा मंत्रहि मीच, सोमारसादि विविध औषधि मीच, तूप मी, समिधा, मंत्र व होमद्रव्य हे सर्व

मीच हवन जें कांहीं करावे तेथें होता तो माझें स्वरूप होय, आणि हुतवस्तु (होमद्रव्य) जें जें तेंहि मीच होय.

ज्याच्या अंगसंगानें या प्रकृतीस्तव अष्टधाप्रकारानें जें कांहीं जगानें जन्म पावणें, तेथें तो पिता मी. अर्धनारीनटेश्वरामध्ये (अर्ध भागीं पुरुष व दुसऱ्या अर्ध भागीं स्त्री अशा प्रकृतिपुरुषात) जसा जो पुरुष तोच नारी असतो, तसा मी चराचराची माता (आई, जननी) होय आणि हें जाहलेलें जग जेथें राहातें, जेणें जीवित वाढतें होतें, तें माझ्याशिवाय दुसरें खरें असे नाहीं खरोखरीनें पाहिले असता तं मीच होय. हीं प्रकृतिपुरुषें दोन्हीं ज्याच्या मनरहित स्वरुपात उपजलीं, तो पितामह या विश्वाचा या त्रिभुवनामध्ये मीच होय. आणि सर्व ज्ञानाच्या वाटा, हे सुभटा, ज्या गांवास येतात, वेदाच्या चवाट्या वर ज्याला वेद्य म्हणतात म्हणजे ज्ञान होण्याला योग्य म्हणजे ज्ञेय म्हणतात : जेथें अनेक मताची एकवाक्यता झाली, अनेक शास्त्राना एकमेकांची ओळख झाली व चुकलीं ज्ञानें जेथें येऊन मिळालीं, असे जें पवित्र म्हटले जातें : ब्रह्मबीजास अंकुर (आदिसंकल्परूपी मोड, एक असतां अनेक व्हावे असे स्फुरण) आला (परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी ह्या त्या बीजाचे अंकुर होत), तेथें त्याचें जें भवन जो ओंकार तोहि मीच : ज्या ओंकाराच्या पोटीं अ, ऊ, म अशीं अक्षरे होतात व जीं तिन्हीं वेदाबरोबरच उपजून उमटतात : म्हणून ऋक, यजु व साम हे तिन्ही मी होय असें आत्माराम म्हणाले याप्रमाणें शब्दब्रह्माचा कुलक्रम म्हणजे वेदाची परंपरा मीच होय

हें सर्व चराचर ज्या प्रकृतीच्या आंत साठविलें जातें व ती प्रकृति शिणली असता जेथे विसावते ते परम गति मी आणि ज्याच्यामुळे प्रकृति जन्मते आणि ज्याच्या आश्रयानें विश्व उत्पन्न करते, आणि जो या प्रकृतीस येऊन गुणातें भोगतो, (प्रकृतिदशेचे झाल्यावर कर्ता व कार्यतारूपाने मी असतों परंतु अलिप्तपणाने विश्वाच्या अभिलाषामध्ये समरसून असतों), असा तो विश्वलक्ष्मीचा भर्ता मीच होय या समस्त त्रैलोक्याचा स्वामी प्रभु मीच होय. आकाशाने सर्वत्र वसावे, वायूनें क्षणभर उगे नसावें, पावकानें दाहावे व जळानें वर्षावे, पर्वतानीं आपली बैठक सांडूं नये, समुद्रानीं मर्यादा ओलांडूं नये, पृथ्वीनें भूतें पाठीवर वाहावींत ही माझी आज्ञा होय मीं बोलविले असतां वेद बोलतो, मीं चालविलें असतां सूर्य चालतो, मीं हालविल्यास प्राण हालतो-जो या जगास धारण करून असतो मीं आज्ञा केल्यामुळे काळ हा भूतांना ग्रासतो असे हे सेवक, हे पांडुसुता, ज्याचे असा जो मी समर्थ आहे तो या जगाचा नाथ होय, आणि गगनाप्रमाणे साक्षिभूत असा तोहि मीच या नामरूपानीं सर्व जो सर्वत्र भरला आहे, आणि नामरूपांचाहि वोलावा म्हणजे जिव्हाळा आपणच जो. ज्याप्रमाणे जळाचेच समूळ केलेले तरंग असतात, आणि तरंगामध्येहि जळ असतें, तसे जें मी सर्व वसवितों तें निवासस्थान मी होय जो मज अनन्यपणें शरण येतो, त्याचे मी जन्ममरण निवारितों, म्हणून शरणागतास आधार मीच आहे एक जो मी तो अनेकपणानें प्रकृतिगुणामुळे वेगळाला होऊन जगाच्या प्राणाने जिवंत असा वर्ततो ज्याप्रमाणें समुद्र कां डबकें न म्हणता, हा सूर्य भलत्यादि ठिकाणीं बिंबतो, तसा ब्रम्हादि सर्वाभूताना सुह्रद तो मी होय. अगा पांडवा, या त्रिभुवनास मीच ओलावा आहे व सृष्टीच्या नाशाला व उत्पत्तीला मीच मूळ होय. बीजापासून शाखा होतात, मग तें वृक्षत्व बीजामध्ये सामावतें, तसे संकल्पें हेंसर्व होतें व संकल्पामध्ये मिळून जातें असे जगाचें बीज जो संकल्प तो अव्यक्त व वासनारूप होय त्यास कल्पातीं निक्षेपस्थान जें असतें तें मी. हीं नामरूपें लय पावतात, वर्ण व्यक्ति आटतात, जातीचे भेद संपतात, आकार नाहींसा होतो, पुन्हां विश्व निर्माण करण्यासाठीं सूक्ष्म वासनांचे संस्कार ठेवून देव जेथे राहतात तें स्थानहि मीच.

मी सूर्याचे वेषानें तापतों, तेव्हां हें शोषलें जातें, व इंद्र होऊन वर्षतों तेव्हां हें पुन्हां भरतें. अग्नि हा काष्ठें भक्षण करतो, तेव्हा काष्ठच मुळीं अग्नि होऊन जातें, त्याप्रमाणें मरणारें व मारणारें जें तें माझेंच स्वरूप होय. याकरितां मृत्यूच्या मार्गी पडलेलें (विनाशी) जें जें कांहीं ते तें सुद्धां माझेंच रूप

होय आणि न मरतें जे (अविनाशी) तें तर सहजच मी होय आता पुष्कळसें बोलून सांगायचें जें तें सर्व एकदम समजून घे कीं, सत् का असत् म्हणजे सत्य व मिथ्या तेंहि मीच असे जाण.

**प्राण्यांचें दुर्दैव :** (ओव्या ३०१-३०७)

म्हणून, हे अर्जुना, मी नाहीं असे कोणतेंहि ठिकाण नाहीं परतु भ्रांत प्राण्याचे दुर्दैव कसे कीं मी त्याना कुठेच दिसत नाहीं तरग पाण्याशिवाय सुकतात, दिव्याच्या वातीशिवाय प्रकाश-तेथें न देखणेंच होतें त्याप्रमाणे मी जे तेच मी नव्हत असा विस्मयच एक पाहा कसा तो हें आतबाहेर मींच दाटलेले आहे, निखिल सर्व जग माझेच ओतलेले आहे, परतु कर्म पाहा कसे आड आले, जे मीच नाहीं म्हणली परतु अमृताच्या कूपात पडून आपणाला दुडकून काठावर काढावे अशी इच्छा करणाऱ्या अभाग्यास काय करावे ? एका अन्नाच्या ग्रासासाठीं अध जो तो धावत फिरत असतो-भीक मागत फिरत असतो व सहज पायास लागलेला चिंतामणी आधळा होऊन हपापलेपणे लोटून देतो जसा का त्याप्रमाणे जेव्हा ज्ञान हें घगळले जाल, तेव्हा ही अशी दशा होते म्हणून जे काहीं करावे ते केले नाहीं असे ज्ञानाशिवाय होते अंधाला गरुडाचे पंख मिळाले तरी काय उपयोग ? त्याप्रमाणे यथार्थ ज्ञानावाचून सत्कर्माचे-सत्कर्माचरणाचे-श्रम व्यर्थ होतात

**यज्ञकर्त्यांचा अज्ञान मार्ग :** (ओव्या ३०८-३२०)

हे अर्जुना, असे पाहा कीं, आश्रमधर्माच्या राहाटीनें उत्तम मार्गाची कसोटीच आपण होऊन आहेत कौतुकानें यजन केलेले-तेथे तिन्ही विद्या-श्रृति गौरव-तिन्ही वेद हे माथा डोलविणारे होतात, व क्रियाकर्मे फळासहित ज्याच्यापुढे उभे होतें, असे जे सोमपान करणारे दीक्षित-जे स्वतः मुळीं यज्ञाचें स्वरूप-त्यांनीं त्या पुण्य करण्याच्या नावानें पापच जोडले होत जे तिन्ही वेदाना जाणून, शभरहि यज्ञ करुन, ज्या माझे यजन केले त्यास चुकून स्वर्गच इच्छितात-वरतात, स्वर्गसुखाची वासना ठेवितात, जसे कल्पतरूच्या खालीं बसून फडक्यास गाठ देऊन जो भिक्षा मागावयाची झोळीच करतो, असा तो निर्दैव दैन्यभाक् (करटा) असतो कल्पतरूखालीं बसून दैन्यभाक् का व्हावे ? नरदेहाची प्राप्ति होऊन निर्दैव कां व्हावे ? तसे शभर यज्ञ करून मजला यजितात व स्वर्गसुखच इच्छितात आता हें पुण्य केलेले ते खरें पाहिलें असता पाप नव्हे काय ? म्हणून मजशिवाय स्वर्गास जावे तो अज्ञानाचा पुण्य मार्ग होय ज्ञानिये जे ते अशास विघ्न म्हणतात एरवीं नरकींचें दुःख पावून स्वर्गसुखहि न पाहातांच (तेथे मी नसल्यामुळे) स्वर्गासहि म्हणूं केले कीं, यात तरी काय सुख आहे ! स्वर्गसुख हे नरकांतील दुःखाच्या तुलनेने सुख असे वाटते म्हणून नित्यानंद (अबाधित सुख) जे तेच निर्दोष असें माझें स्वरूप होय म्हणून हे अर्जुना, मजजवळ या दोन आडवाटा आहेत, मी जेथे आहे तेथे स्वर्ग व मी जेथे नाहीं तें विघ्न (अज्ञानाचा पुण्य मार्ग) होय याशिवाय जे स्वर्ग व नर्क असे बोलणे तें चोरांच्या वाटा होत. पुण्यात्मकानें स्वर्गास येणे होतें, व पापात्मकाने नरकास जाणे होतें, यावर मजला ज्यायोगे पावणें होतं, ते शुद्ध पुण्य होय आणि मजमध्ये असतां मी ज्यायोगें दुरावे तें पुण्य असे म्हणतांना जीभ ही तुटत नाहीं काय ? परंतु हे असो. आतां प्रस्तुतचे बोलणें ऐक कीं याप्रमाणें ते दीक्षित मजला यजून स्वर्गभोगाची याचना करितात मग मी ज्यायोगें पावला होत नाहीं असें जें पापरूप पुण्य तें सांपडले अशा हौशेचें होऊन स्वर्गास येतात.

**स्वर्गसुखाची अशाश्वतता :** (ओव्या ३२१-३३५)

जेथें अमरत्व हेंच सिंहासन ( स्वर्गांत अमरत्व ), ऐरावत असे वाहन ( बसायला ऐरावत ), अमरावती हें राजधानी भुवन : जेथें महासिद्धींचीं भांडारगृहेंच (अणिमालघिमादि सिद्धी), अमृताचीं

कोठारें (साठे), ज्या गांवीं कामधेनूंचीं खिल्लारेच, जेथें देवच चाकर होतात (सेवेला देव आहेत), सर्वत्र चिंतामणीच्या भूमिका, जिकडे तिकडे कल्पवृक्षांचीं उपवनेच, गंधर्व हे गायन करतात (करमणूक करण्यास गंधर्व व अप्सरा आहेत), रंभेसारख्या नृत्य करणाऱ्या अप्सरा व विलासिनी स्त्रिया तेथें उर्वशी मुख्य मदन हाच निद्रागृहात सेवा करणारा, जेथें चंद्र सडासंमार्जन करतो, व पवनासारखे धावणारे चाकर जेथें (वायूसारखे चपळ जासूद) : याहिवर मंगलाशीर्वाद देणारे ब्राम्हण, बृहस्पतीसारखे बोलके आपण, व देवगण हे बहुवस स्तुतिपाठक जसे : लोकपालांच्या मालिकेतले ज्या ठिकाणचे सरदार (घोडेस्वार) व ज्याच्यापुढे उच्चैःश्रवासारखे इंद्राचे घोडे चालत असतात हे असे असो हे बहुभोग (इंद्रास मिळणाऱ्या सुखासारखे ऐश्वर्य उपभोग) इंद्रासारखे भोगतात (अनुभव घेतात), जोपर्यंत पुण्यलेश असेल तोपर्यंत.

मग त्या पुण्याची पायरी सपते व लगेच इंद्रपणाचें तेज हे उतरत (इंद्रपणाचा अधिकार सपतो) आणि जिणे लाजीरवाणें होऊन परत मृत्युलोकास माघारीं येऊं लागतात ज्याप्रमाणे परदार करणाराचे पैसे संपल्यावर त्यास वेश्या ही दारींहि उभी करीत नाहीं त्याप्रमाणे त्या लाजिरवाण्या दीक्षितांचे काय सागावे ? याप्रमाणे मी जो सर्वत्र आहे त्या मला ते चुकले, ज्यानीं पुण्य करून स्वर्गाची इच्छा केली, त्याचे देवपण (अमरत्व) नाहींसे झाले व शेवटीं मृत्युलोकच (जन्ममरणाचा फेरा) मातेच्या उदररूपी गुहेंत (दरींत) घाणीच्या उकाड्यात नवमास शिजून जन्मजन्मून मरतात. अहो, स्वप्नामध्ये द्रव्य सापडले, ते जागे झाल्यावर सर्व नाहींसे झाले, त्याप्रमाणे वेदज्ञाचे स्वर्गसुख जाण (स्वप्नाहून खोटे ठरते). अर्जुना, वेद जाणणारा जरी झाला, तरी मला नेणता वाया गेला, माझ्या ज्ञानावाचून यज्ञादि कर्म व्यर्थ होत-ज्याप्रमाणे कण न घेता कोंडाच जसा उफणला म्हणून मज एकाशिवाय हे तिन्ही वेदोक्त धर्म अकारण होत म्हणून मला जाणून नेणता अस म्हणजे नेणत्या बाळा सारखा अस-माझे खरे स्वरूप जाणल्यावर दुसरे कसलेहि ज्ञान तूं न मिळविलेस तरी तू सुखिया होशील.

**भक्तांच्या योगक्षेमाची जबाबदारी :** (ओव्या ३३३-३४४)

जसा गर्भाचा गोळा कसल्याहि हालचालीस जाणत नाहीं तसे ज्यानी संपूर्ण भावाने एकचित्ताने स्वतःला मला अर्पणच जसे केले, त्याप्रमाणे माझ्याशिवाय ज्याना दुसरे कांहींच बरे वाटत नाहीं, व आपले जीवनच जे समजतात, जीविताला माझेच नाव दिले, असे एकनिष्ठ चित्ताने माझे चिंतन करीत असलेले-चिंतनानें उपासना करीत असलेले, सेवा करीत असलेले, त्याचीच मी सेवा करतो-सेवा करणारा होतो. ते आपला जीव एकवटून ज्या क्षणीं माझ्या मार्गाला लागले, तेंव्हापासून त्याच्या सुव्यस्थितेविषयींची जबाबदारी (चिंतवणी) मजवर येऊन पडते. मग त्यानीं जे जे कांहीं करावें, ते मजलाच करावे लागते, जसे का पख न फुटलेल्या पिलाच्या निर्वाहासाठीं पक्षिणी अहोरात्र झटते. स्वतःची तहानभूक न जाणता, लेकराला हितकर जे असेच ते करणे होते त्याप्रमाणे जे मला जीवप्राणे अनुसरले त्याचे सर्व कांहीं मी करणारा होतो, म्हणजे सर्व प्रकारे मी त्याचा सांभाळ करतों. त्याना मजमध्य मिळून असण्याची इच्छा, तीच मी कौतुकानें पुरवितो. का सेवा जर त्यांनीं म्हटली, तरी त्या सेवेत प्रेमभाव घालतो याप्रमाणें असा जो जो कांहीं भाव ते धरतात, तो तो मी त्याना पुरवितो आणि जे दिले जाते त्याचे रक्षणहि पण मीच करतों. ते जे जे मनांत आणतील, ते तें मी देतों आणि त्याचा सांभाळहि मला करावा लागतो असा त्यांचा तो योगक्षेम (चरितार्थ) हे पांडवा, मजवरच येऊन पडलो-ज्याच्या सर्व भक्तिभावाला (जीवितप्रेमाला) मीच आश्रय देऊन असतों. (योग=अप्राप्त वस्तु मिळवून देणें. क्षेम=प्राप्त करून दिलेल्या वस्तूचे रक्षण करणे)

**इतर संप्रदाय पद्धति उजू नाहींत :** (ओव्या ३४५-३५९)

आतां यावर दुसरेहि कांहीं संप्रदाय आहेत परंतु ते मला समवाये करून जाणत नाहींत मी विश्वात समवायी सबधाने नित्य भरून राहिलो आहे असे ते जाणत नाहींत ते अग्नि, इंद्र, रुद्र, सूर्य, सोम वगैरेना उद्देशून यज्ञ करितात, त्याना माझें सर्वव्यापक स्वरूप कळत नाहीं तथापि त्यांचे यज्ञ मलाच पावतात का तर, हे जे सर्व काहीं ते मीच आहे परंतु त्याची ती उपासनापद्धति-भजनाची सरळ पद्धत, उजू मार्ग-चुकने हा मार्ग द्वैतभाव असल्यामुळे हलका वाटतो. असे पाहा कीं, वृक्षाच्या खांद्या व पल्लवपानें हे एका बीजाचेच नव्हत काय ? पण पाणी जें मूळाने घ्यावयाचे तें मूळींच घातलें पाहिजे नाक, कान, डोळे हे जरी एकाच देहाचे अवयव आहेत, आणि यांनीं सेविलेले विषय तेहि पण एकाच ठिकाणीं जातात जरी, तरी उत्तम स्वैंपाक करून, कानात कसा भरावा ? किंवा उत्तम फुले आणून, तीं डोळयाना कशीं हुंगावीं ? ती उपासनापद्धति सरळ नाहीं हा द्राविडी प्राणायाम आहे कान, नाक, डोळे हे सगळे या देहाचेच अवयव, म्हणून शिजविलेले अन्न कानात घातले, किंवा फुले डोळयाला बाधलीं तीं चालतील काय ? तेथें रस तो मुखानेच सेवन करावा, परिमल तो घ्राणानेच हुंगावा, तसा मी जो तो मीच म्हणून सेवावा तसे माझे खरे स्वरूप ओळखून त्याचीच पूजा केली जाते तसे मला नेणता भजन ते वायाच जसे काहीं तरी एक-म्हणून कर्म करण्यास जी जाणीव (डोळे) ती निर्दोष अशी असावी ज्ञानदृष्टि ती शुद्ध असावी आपलें पाहाणें तेंच शुद्ध असावे भलती गोष्ट भलत्या रीतीने केल्यास ती निष्फळ होते, म्हणून कर्माला निर्मळ ज्ञानाची आवश्यकता लागते.

एरव्हीं, अगा पाडुसुता, असे पाहा कीं, या सर्व यज्ञातील पूजादि कर्मांतील हविर्यान्न भोगणारा मजवाचून दुसरा कोण असणार ? सकळ यज्ञाना मूळ मीच आणि यजनाचा परिणाम किंवा अखेर मीच परंतु दुर्बुद्धि (मूर्ख) जे ते मला चुकून हे न कळल्यामुळे इंद्रादि अन्य देवताना भजले, भजतात ज्याप्रमाणे गंगेचे उदक देवपितराच्या उद्देशाने अर्पण केलेले ते गंगेला जाते, त्याप्रमाणे यज्ञानें (यज्ञ करण्यानें) ते माझे मला अर्पण करतात खरे, परंतु ते जसे एक वेगवेगळया भावनानीं-भजनानीं असे आहे म्हणून, हे पार्था, केव्हाहि ते मला पावतच नाहींत परंतु ज्या काहीं इच्छा-आस्था ते मनात धरून असतात, तेथेंच ते येतात ज्याच्या भजनामध्ये मन, वाचा व इंद्रिये हीं देवाच्या मार्गाने-भजनाने असतात ते शरीर जाताक्षणीं देवच होतात. अथवा ज्याच्या चित्तानीं पितराच्या मार्गाने (व्रतानें) जाणे केलेले असते, त्याचे जीवित संपल्यावर त्याना पितृत्व वरते. ते पितृस्वरूप होतात अथवा क्षुद्रदेवतादि भूतें जीं तींच ज्याचीं परम दैवत होऊन असतात, ज्यानीं जारण, मारणादि कर्मांनीं त्याना सेविलेलें-उपासिलेले असतें, अशा त्याच्या त्या देहावरील पडदा दूर झाला-मृत्यु आला म्हणजे त्याना भूतत्वाची प्राप्ति होते ते भूतयोनीप्रत जाणे होते याप्रमाणे संकल्पामुळेच-संकल्पवशेंकरून-त्याचीं तीं कर्मे त्याना फळ देणारीं होतात.

**मी तो यजावा मीचि म्हणोनि :** (ओव्या ३६०-३६६)

आता माझे यजन करणारे (मद्याजिनः) ते मला येऊन पोहोंचतात, ते तेथे कसे अनुरक्त असतात ते पाहा ज्याचीं मन-वाचा-इंद्रिये हीं (देवाच्या) माझ्या भजनामध्यें असतात ते (देवच) मीच होऊन असतात मग असे ते (देवच) मीच झाल्यावर मी त्याचे पाहाणे होऊन असतों-डोळाच एक मी असे देखणें देखिलें : ज्यानीं कानांनीं मीच ऐकिला-कानहि पण मीच : ज्यानीं मनाने मीच अंतरींच्या रूपाचा केला व वाचेनें मीच गायिला : सर्वांगानीं सर्व ठिकाणीं ज्यांनीं मीच नमस्कारिला : दानपुण्यादिके जे काहीं तें माझ्याच उद्देशाने केले, मजप्रीत्यर्थ केले, मलाच पुढे करून केलें, मलाच समोर येऊन

(मोहरा) केलें : ज्यांनीं मलाच अध्ययन केलें, आंतबाहेर मीच होऊन मलाच समाधानाचें केलें : ज्यांचें जीवित्व मलाच जोडलेले आहे-मजकरिताच जगत आहे : जे देहरूपानें अलंकारच होऊन आहेत, व म्हणूं करणारे कीं, आम्ही श्रीहरीचे गुणकीर्तीस भूषण करणारे आहोत आणि जे जगामध्यें माझ्या लोभानें मजशीं लोभ करून आहेत : जे माझ्या इच्छेनेंच सकाम असे, जे माझ्या प्रेमामुळेच सप्रेम असे, जे माझ्या बोधाच्या भुलीनें सभ्रम होऊन लोकाना जाणत नाहींत, लोकसंग्रहाचें किंवा लोकाना आलोकणारे, पाहाणारे नसतात-संसारिक नव्हत असे : ज्याचीं शास्त्रे मलाच जाणतात, ज्याच्या मन्त्रानीं मलाच जीवित्वाचें जोडणें दिलें असे जे सर्व व्यवहारात मला भजले, असे ते मरणाच्या अगोदरच खचिततेनें मलाच मिळून गेलेले असतात, मग मरणीं-मरण प्राप्त झाल्यावर-आणखी दुसऱ्या ठिकाणीं कसे जातील बरें ?

**अनन्यभक्ति हीच स्वामी सेवा :** (ओव्या ३६७-३८०)

म्हणून माझें यजन करणारे जे झाले, ते माझ्याशीं मिळून असणारे असे ते झालेलेच होतात-ज्यानीं सेवेच्या हेतूनें आपलें सर्वस्व दिलेलें. अर्जुना, माझे ठिकाणीं सर्वस्व दिल्याशिवाय गोडी नाहीं. मी नुसता उपचारानीं-नुसत्या सेवेच्या हेतूने, हेतुच मनात ठेवून-कोणालाहि आकळणारा नाहीं मनात वागविलेला हेतु हा महत्त्व दिला गेला : हेतु हा सेवेचा झाला तरच ते शोभणारे पच उपचार अलकारच केले असे होईल . तेथे गंध, पुप, धूप, दीप, नैवेद्य इत्यादि पच उपचारानी देवपूजन केले असे : (जो ब्राह्मण आहे त्याने तर हे दिवसांतून तीन वेळा नाहीं तरी केव्हा तरी एकदा निदान केलेच पाहिज असे आग्रहाचे आहे.) येथे जो ज्ञानगर्व धरील तोच अज्ञान असा. (येथे जो जाणीव करतो तो नेणे असा) येथें मोठेंपण किवा कृतार्थपण मिरविणें हे गौण होय व आम्ही पूर्णता पावलो असे जो म्हणतो तो कांहींच असत नाहीं अथवा यज्ञ दान तप करणारे आम्ही असा जे डौल मारतात, त्याना माझ्यें स्वरुपीं तृणाइतकीहि किंमत नाहीं असे पाहा कीं, जागतेपण जे आहे, तेथे सर्व कांहीं जाणणारे असे जे वेद त्याच्याहून कोणी श्रेष्ठ आहे काय ? अथवा सहस्र मुखानीं बोलणारा जो शेष त्याच्यापेक्षा अधिक बोलका असा कोणी असेल काय ? तोहि ज्याचे आथरुण होतो व वेद नेति नेति म्हणून माग सरतो (बहुडे). अहो, येथे सनकादिक जे सत ते तर वेडे का पिसे असेच झाले तापसातापसाच विचार केला असता, शूलपाणीच्या योग्यतेचे कोणी आहे का ? परतु तोहि अभिमान साडून तीर्थच माथा वाहातो, तीर्थच वंदितों एवढेच नव्हे तर, उत्तमत्वच जेथे श्रेष्ठ होऊन आहे (किंवा परोपरीने संपन्न अशीच जी होऊन आहे, किंवा सरस्वतीच्या बरोबरीची अशी ती) अशी जी लक्ष्मी तिच्या बरोबरीची कोणी आहे काय ? अहो, जिच्या घरीं तर सिद्धीसारख्या दासीच होऊन आहेत, अशा त्या लक्ष्मीच्या दासी ज्या सिद्धीच म्हटल्या जाणाऱ्या त्यानीं खेळता खेळता घरकुलीं केलेलीं-लहानशी केलेलीं घरें-त्याना तर देवाच्या राहाण्याचीं घरे असेच नाव दिले तरी असे साग कीं, इंद्रादिक ज्या देवता तीं त्यांचीं बाहुलीं होत नाहींत काय ? तीं अमरपुरे जव्हा न आवडून मोडलीं जातात, तेव्हा देवाचा राजा जो इंद्र अशा मोठेपणाचे जे ते रंक होतात त्या सिद्धी ज्या झाडाकडे पाहातात, ते तर देववृक्ष होऊन जातात. अशा अनेक सिद्धी जिच्याजवळ आहेत, व असे सामर्थ्य जिच्या घरच्या नोकराना आहे, अशी मुख्य नायिका लक्ष्मी ती सुद्धा येथे पुरती होत नाहीं-मानाची होत नाहीं, ती सुद्धा स्वतःकडे मान घेत नाहीं, अभिमानाची होत नाहीं. अहो, ती तर सर्वस्वे स्वतःच्या निजरूपाने सेवा करणारी होते व सर्व अभिमान सांडून तिनें श्रीविष्णूंच्या पायच धुण्याच्या माग्याच्या योग्यतेचे आहे असें म्हणूं करून ती पाय धुण्याच्या योग्यतेची झाली. असें आहे म्हणून, बा रे अर्जुना, थोरपणाचें असणें तें दूर करावे, दूर साडावें, येथे विद्वत्ता अवघी विसरावी व जगापेक्षाहि लहान व्हावे, तरच माझें

जे मळचें असें जोडणें होतें, सन्निधता होते सूर्याच्या दृष्टीपुढे चद्रहि लोपून जातो, तेथे काजव्यानें आपल्या तेजानें गर्व वाहाणें तें कसलें ? त्याप्रमाणें लक्ष्मीचें थोरपण येथें मानाचें होत नाहीं, शंभूचें तपहि येथें (आतां तप ते पुरे असे) पुरतें होत नाहीं, असे असतांना येथे प्राकृत जें वेडगळ किंवा क्षुद्र तें कसे बरे ज्ञानाचे होईल ? पूर्ण असे कसे म्हणावे ? जाणतेंपणाचे होईल ? यासाठीं देहाभिमान सोडावा, सकळ गुणातील उत्तमत्व स्वतःत बाणवावें, सपत्तीचा गर्व सोडावा, देहाभिमान जो, गुण जे किंवा संपत्ति जी याना ज्ञानावरून ओवाळून टाकावे-या तिहींची जशी कुरवंडीच केली

**भक्तीचा उल्हास :** (ओव्या ३८३-३९७)

मग उत्कट भक्तीच्या उल्हासानें, मला अर्पण करण्याचें निमित्त करून, हवे तें एक फळ भलतयाचें असे, भक्त माझ्याकडे दाखवितां, मग मी पुढे होतों व देठ न तोडता तेंच आदराने सेवन करितों परंतु भक्तीच्या नावाखालीं फूल एक मजला द्यावे, ते वास्तविक पाहतां हुगावे, पण मी मुखातच घालतो हें असो, फुलेच काय घेऊन बसलास, पानच एक आवडतें झालें-तें साजुक असे नको-सुकले असे भलतेसे जरी असले, तरी परंतु तें सर्व भावानें भरलेले असे पाहून, जसा भुकेला हा अमृतानें संतोष पावतो, तसे ते पत्रच जरी एक तरी तें मी सुखाने खाऊं लागतों अथवा असेहि जर झाले कीं पालाहि मुळीं अर्पण करण्यास सापडत नाहीं, तरी उदकाचें ते साकडें नसेल ना ? तें भलत्याहि ठिकाणीं मोला वाचून आहेच आहे सर्वस्व करून, भक्तीचें करून, ज्याने मला अर्पिलें (भक्तीने द्रौपदीनें पत्र, गजेंद्राने पुष्प, शबरीनें फल व बळीनें तोय दिले तसली भक्ति हवी), त्यानें वैकुंठापेक्षा विशाल अशीं देऊळेंच दिलीं : कौस्तुभापेक्षा निर्मळ असे अलकार केले क्षीराब्धिरूपी मनोरम मनहर अशीं दुधाचीं शय्यागृहें त्यानीं मजसाठीं अपार अशीं निर्माण केलीं : कर्पूर, चंदन, आगरु इ सुगधाच्या मेरुतुल्य राशी मला वाहिल्यासारखे आहे : दीपमाळेवर सूर्याची काडवात लावल्यासारखे होय : गरुडासारखीं वाहनें, सुरतरूचीं उद्याने, कामधेनूसारख्या गाई मला अर्पिल्यासारखें आहे : मला अमृतापेक्षाहि सुरस अशीं पुष्कळशीं पक्वानें वाढलीं : याप्रमाणे भक्ताच्या उदकलेशाने मी पूर्णपणें तोषतों. हें एक एक काय सांगावे ? तूंच स्वत. आपल्या दृष्टीनें प्रत्यक्ष पाहिले आहेस कीं, सुदाम्याच्या पोहयाकरिता त्याच्या गाठोडयाच्या गाठी सोडल्या-म्हणजे त्याचा संसार सोन्याचा केला अहो, भक्तिच एक मी जाणतों तेथें थोर का लहान हें म्हणत नाहीं आम्ही भलतयाहि भावाचे पाहुणे होत. आतां पत्र कां पुष्प कां फळ हे भजण्याचे भक्तिभावाकरिता मिसच-निमित्त-पुढे केलेलें वास्तविक आम्हांला पूर्ण भक्तिच पाहिजे. तूं मला न विसंबणें हेंच एक बुद्धीच्या स्वाधीन करून ऐस व मग आपल्या मनोमंदिरीं मी सहजच आहे

**कर्मे ईश्वरार्पण करणें हाच संन्यास :** (ओव्या ३९९-४०८)

जे जे कांहीं व्यापार-व्यवहार-करशील, अथवा भोग जे कांहीं भोगशील, अनेक विधींनीं यज्ञानीं यजन करशील, किंवा पात्रविशेषीं दिलेलीं दानें कां सेवकाविशेषीं दिलेलीं वेतनें इ साधनें कां व्रतें जीं करशील, असे तें सर्व क्रियाजात जे स्वभावे करून निपजेल, ते मजप्रीत्यर्थ (मोहरा) भावना करोनि करावें परंतु मीं अमुक केलें अशी आठवण आपल्या जीवभावानें सर्वथैव मुळीं उरूं देऊं नको : अशीं कर्मे धुऊन माझ्या हातीं द्यावीत

अग्निकुंडामध्यें घातलेलीं बीजे हीं अंकुरदशेसच मुळीं येत नाहींत, त्याप्रमाणें मला अर्पिलेलीं शुभाशुभें हीं फळणारीं होत नाहींत कर्मं जर उरले, तर ते फळणारें म्हणजे सुख किंवा दुःख देणारें होतें, तेथें तें सुखदुःख भोगण्याकरितां देहास यावें लागतें, जन्म घ्यावा लागतो. जेव्हां कां कर्म मख

समर्पिलें तेव्हा जन्ममरण पुसिले गेले, व जन्माबरोबरच पुढचे श्रमहि पण नाहींसे झाले. याप्रमाणे हे अर्जुना, आताचीच वेळ साधून घ्यावी, म्हणजे उद्या पाहता येईल असे म्हणणे ते भाराचे (जड) होणार नाहीं. अशी ही कर्मफलत्यागाची सोपी युक्ति तुजला दिलेली आहे त्याच युक्तीचे झाल्यान सर्व दुसरी तिसरी आडविणारीं कामे वाजस करून, ह्या एका युक्तीचे होऊन, त्या निरतरच्या योगात बसावे तेथे मग सहज त्याग साधतो व भलत्याच वेळीं भलतेच असे अडविणे होत नाहीं असे अनुतापतीर्थी-प्रसंगीं नहात असावे या जन्ममरणाच्या (देहाभिमानाच्या) बंधनात पडूं नये. सुखदुःखाच्या सागरात बुडूं नये सुखाने सुखरूप होऊन माझ्याच अगाचे व्हावे-माझे अग घडीत असावे

**भक्तलक्षणें :** (ओव्या ४०९-४१५)

तो मी कसा तर जो सर्व भूतीं नेहमी एकसारखा असून ज्याला आप किंवा पर असा भाग (हिस्सा) नाहीं जे अशा मजला जाणून, देहाभिमानाचे घरटे मोडून, आपल्या कर्मांना जीव का प्राण असे करून जीवभावाने भजले, ते देहाने वागत असतात, परतु ते देहाचे नसून माझ्या ठयीचे असतात, व मी समग्र त्याच्या हृदयीं असतो वटवृक्ष जसा सविस्तरपणे सूक्ष्म बीजकणिकेमाजीं असतो, आणि बीजकण तो वटवृक्षीं जसा, त्याप्रमाणे आमच्यात व त्यांच्यात म्हणजे एकमेकात बाहयत. फक्त नावाचेच अंतर असते बाह्यात्कारी मात्र अतर असत वास्तविकपणे ब्रम्हत्वाच्या बाजून म्हणजे वस्तु विचारानें पाहिले असता मी तेच ते होत आता दुसऱ्याचे उसने आणलेले अलकार अंगावर घातले तरी त्याविषयीं आसक्ति नसते, त्याप्रमाणे देहाचे होण्याकडे त्याचे उदासीनपण असते त देहात असतच नाहींत. प्रेमळ भक्ताला त्याचे शरीर बधक होत नाहीं सुगध हा वायूमध्ये मिसळला म्हणजे मागे फूल जसे नुसतेच देठीं राहाते, त्याप्रमाणे देह हा केवळ आयुष्याच्या स्वाधीन होऊन असतो आता त्यामधील जो सर्व दम (नेट) तो माझ्या भावावर आरूढ होऊन मजमध्येच ह पाडवा, प्रविष्ट झाला, मिसळला.

**प्रथम जरी दुराचारी तरी अनन्यभक्त हा साधुच :** (ओव्या ४१६-४२५)

अशा भजणाऱ्या प्रेमभावामुळे देहभाव ज्याचे पाठीस लागत नाही, स्थल देहबुद्धीने असणे ज्याचे उरत नाहीं (देहभाव टाकावे, योगभाव सेवावे ह म्हणणे जसे), त्याने भलत्याहि जातीचे व्हावे, आणि त्याचे आचरण पाहिले, तर तो जन्ममरणाचा ठावच पुसला जातो तो सर्व दुष्कृताचा असा गेलका वाटा असतो, परंतु त्याने आपले सर्व जीवित भक्तीकरिता वेचलेले असत, भक्तीच्या मार्गावर आणून सोडलेले असते. अतीं मति तीच गति, म्हणून पहिला दुराचार सोडून ज्याने भक्तीसच सर्व जीवितच दिले, त्याचे आयुष्य भक्तीसच अर्पण केलेले असले व तो प्रथम कितीहि दुराचारी असला, तरी मरणाचे वेळीं तो भक्तिमान् असला तर भक्तीच्या सामर्थ्याने तो सर्वश्रेष्ठच ठरतो. तो अगोदरचा जरी दुराचारी असला, तरी आता सर्वोत्तमच होय असे समज, जसा का महापुरात बुडलेला एक मरण न येताच बाहेर निघाला तो वाचून अलीकडच्या कांठावर आला, म्हणून त्याचे त बुडालेपण व्यर्थ गेले, त्याप्रमाणे अनुताप झाल्यावर केलेल्या भक्तीने जें पूर्वी पाप केले ते उरतच नाहीं पाप केलेले जे त शेवटल्या भक्तीनें उरत नाहीं या कारणास्तव दुष्कृति जरी तो जाहला, तरी अनुतापतीर्थी नाहाला व न्हाऊन सर्व भावाने मीच झाला-मजमध्यें आला. पश्चात्तापाने शुद्ध होऊन माझ्या स्वरुपास आला तरी आता त्याचे कुळ पवित्र असेच समज. कुलीनपणात्व हेंच निर्मळत्व जसे व या जन्मास येण्याचे फळ त्यालाच मिळाले त्यानें जन्मल्याचें सार्थक केले तो सर्व कांहीं शिकला-पढिला, सर्व तपे त्यानेच तपिन्नलीं व त्यान

अष्टांगयोगहि पण अभ्यासिला असे हे पुष्कळसे असो पार्था, तो सर्व कर्मापासून सुटला, तो कर्मातीत झाला, जो मजकरिताच अखंड अशा आस्थेचा झाला-सर्व मनोबुद्धीचे व्यापार एकनिष्ठेच्या पेटींत भरून ती मजमध्येच ठेविली जसी

**तो मीचि होऊनि ठाके :** (ओव्या ४१६-४३३)

तो आता काहीं काळाने मजसारखा होईल असे कदाचित् तुला वाटेल, परतु जो अमृतात बुडून राहील त्याला मरण कसचें ? पण सूर्य ज्या वेळीं प्रकाशत नाहीं त्या वेळेस रात्र म्हणतात, त्याप्रमाणे माझ्या भक्तिशिवाय जे करावे ते महापाप नोहे ? म्हणून त्याच्या चित्तास माझी जवळीक जेव्हा जोडली, तेव्हाच तो तत्त्वतः माझेंच स्वरूप झाला ज्याप्रमाणे दिव्याने दिवा लावावा, तेथे आधींचा कोणचा लावलेला हें सागता येत नाहीं, त्याप्रमाणे सर्वस्वपणे जो मला भजतो, तो मीच होऊन जातो असे झाल्यावर मग माझी नित्य शाती त्यास येते, व माझी स्थिति हीच त्याची शोभा असते मग त्याची अक्षय शातवृत्ति व त्याची तेजस्विता वाढत किबहुना माझ्या जीवात आपल्या जीवाचे जीवभाव तो जिकतो. येथे पार्था तेच ते पुन्हा पुन्हा किती सागं ? जर माझी आवड आहे, तर भक्ति विसरता कामा नये, एक क्षण सुद्धा इकडे तिकडे रमाव नये . भक्तपण विसरता कामा नये-न विसबिजे अहो, कुळाच्या उत्तमपणाची जरूरी नाहीं, स्तविलेलें असे उच्च कुळहि नको व विद्वत्तेचा व्यर्थ असा बडेजाव सोस तो कशास घेऊन असावे वरं ? वशाची शुद्धता, कुलीनपणा ज्ञान, श्रीमंती, लावण्य, यौवन याच्या उर्मीच बढाया कशास हव्या ? उच्च कुळ का विद्वत्तेपेक्षा भाव महत्वाचा आहे-भाव एक सरं, जाति अप्रमाण रूप, वय, सपन्नता याची प्रतिष्ठा काय कामाची ! आम्ही मोठे आहो असे गाजणे वाजणे ते कशास ? एक जर माझा भाव नाहीं, तर सर्व काहीं व्यर्थ होय ज्या जीवनात भक्ति नाही ते व्यर्थच

**भक्तिहीनांचें जिणें :** (ओव्या ४३४-४४१)

दाणे नसलेलीं फोल कणसे अशी सोपटेंच जणु घनदाट अहो, गोमटे नगर पण जे नगर ओस आहे ते काय करायचें ? अथवा सरोवर आटलेले जसे-का रानामध्ये दुःखी जो त्यास दुःखी भेटला-ज्या फुलाना वास नाही अशा फुलानी फुललेले झाड जसे का त्याप्रमाण ते सकळ वैभव, कुळ, अथवा जातीचा गौरव होय, असे का अवयवासहित शरीर आहे, पण आत जीवच नाहीं. त्याप्रमाणे, अशा, पृथ्वीवर पाषाण नसतात काय ? जळो ते जियालेपण म्हणजे जीवित जे माझ्या भक्तीशिवाय आहे हिवराची दाट सावली सज्जनानीं जी निषिद्ध म्हणून टाकलेली, त्याप्रमाणे अभक्ताते पुण्ये डावलत गेली होतात लिंब लिबोळ्यानीं जरी लवलेला, भरून आलेला, तरी तो कावळ्याचाच सुकाळ होतो त्याप्रमाणे भक्तिहीन जो तो दोषाकरिताच मुळी वयास आलेला होतो, उच वाढलेला होतो किंवा षड्रस खापरामध्ये वाढले व ते चवाठ्यावर ठेविले, तेथे ते कुत्र्याच्या उपयोगास आले असे होतें ज्याप्रमाणे-'सुणियाचिया ऐसें जालें' ज्याप्रमाणे, तसे जो स्वप्नींहि परी सुकृत जाणत नाहीं अशा भक्तिहीनाचे जिणे होय त्याने तर सर्व समारदुःखाकरताच जणू ताट वाढिले.

**भक्ति श्रेष्ठ : जाति अप्रमाण :** (ओव्या ४४२-४५३)

म्हणून उत्तम कुळ नसले तरी चालेल, कुलीन असो, अंत्यज असो, फार काय पण पशुहि का असेना, पण भक्तिपूर्वक त्याने माझे स्मरण केले कीं तो मद्रूप झालाच जातीने अंत्यजहि व्हावे व याहिवर देह म्हटला तर तो पशूचाहि असो सावजाने (नक्राने) हत्ती धरिला, त्याने काकुळतीपणास येऊन माझे स्मरण केले, व मज पावल्यामुळे त्याचे पशुत्वहि नाहींसे झाले सर्व अधमपणाच्या

शेवटीं सर्व अमंगळ नविच आलीं अशी जी पापयोनी, तीमध्यें जे जन्मले ते मूढ-पापयोनींत जन्मलेले असे ते मूर्खच जसे कां का दगड-परंतु सर्व भावानें माझ्या ठायीं सर्व भावे दृढ असे : ज्यांची वाचा माझे गुणानुवाद गाते, ज्यांची दृष्टी माझेच भोग भोगते व ज्यांचें मन माझाच संकल्प वाहून असतें : माझी कीर्ति ऐकणेंच ज्यांचे कान करीत असतात, व ज्याना माझी सेवा हेंच सर्वांगीं भूषण होऊन असलेले . ज्यांचें ज्ञान माझ्यावाचून दुसरा विषय जाणत नाहीं व जाणीव जी ती मला एकटयासच जाणणें करते व ज्यांस असे तें ज्ञान का जाणणें लाभले, तरच जिणणे पदरांत पडणारे, एरव्हीं मरण असा सर्वतोपरी, पांडवा, ज्यानीं आपल्या सर्व भावांना जीवित्वास आणण्याकरिता मलाच जिव्हाळ्याचे केलेलें : ते पापयोनीहि असोत, ते पुण्यहीन जन्मलेले व विद्याहीन असले तरी त्यांची व माझी योग्यता सारखीच ते वेद पढलेले नसोत, परंतु मजबरोबर तुलले असता वजनास कमी भरत नाहींत असें पाहा कीं, भक्तीचें होण्याने दैत्यांनीं देवास कमीपणास आणिलें, खालीं पाहाण्यास लाविलें व ज्याच्या महिम्यावर माझे नृसिंहत्वाचें लेणें झालें आहे, असा तो प्रल्हाद मजकरिता बहुत अशीं द्वद्वे घेताना संकटांत येणारा असा नेहमीं कष्टीच-आणि म्हणून जे काहीं म्यां द्यावे तें त्याच्याच बोलानीं लाभाचे जोडलेलें असें होते प्रल्हादाची व माझी तुलना पाहाता तोच श्रेष्ठ ठरतो, कारण जे मीं द्यावे त त्याच्या शद्वानीं प्राप्त होतें दैत्यकुळ असे त जरी तरी खरेपणाने पाहिले असता त्याशीं तुलना करता इंद्रहि श्रेष्ठपणाने योग्यतेचा होत नाहीं. म्हणून येथे भक्तिच एक श्रेष्ठ ठरते व जाति ही अप्रमाण अशी.

**अर्जुना, माझेंपण सार्थक एक :** (ओव्या ४५४-४६५)

राजाज्ञेचीं अक्षरे आहेत, तीं ज्या एका कातडयाच्या तुकडयावर पाडतात, त्या चामाने सकळ वस्तु मिळणाऱ्या होतात (राजाचा शिक्कामोर्तब असलेल्या चामडयाच्या तुकडयाला महत्त्व येते व त्याच्या मोबदल्यांत सर्व वस्तु मिळं शकतात) म्हणून राजाज्ञेवांचून सोनें का रुपे तें प्रमाण असूं शकत नाहीं : येथें राजाज्ञा हीच समर्थ होय तेच चाम एक जर मिळालें, तर त्यानें सर्व वस्तु विकत मिळतात. तसें उत्तमत्व तैंचि तरतरित होतें, तैंचि सर्वज्ञता अंगीं बाणते, जै मनबुद्धि माझ्या प्रेमाने भरभरून येते, असते त्याप्रमाणे माझ्या प्रेमाने जेव्हां मन व बुद्धि तुडुंब भरतात, तेंव्हां माणसास मोठेपण येतें म्हणून कुळ का जाति का वर्ण सर्व, अगा अर्जुना, अकारण, येथे माझेंपण जे तेंच एक सार्थक होय. तेथें सार्थकपण ते मलत्याहि पण भावानें आपले मन त्याचें करून तें माझे आंत येतें व्हावे म्हणजे मत्स्वरुपीं लावावे . जर तसे तें आत आलें, तर मागील सर्व काहीं-सर्व कर्मे-नाहींसे झालें असे होय तसे तोंपर्यंतच त्याचे ते वोहळ का लहान ओढयाचे असणे, जोंपर्यंत ते गंगाजळास मिळत नाहींत असे ते एकदां मिळाले कीं, ते गंगारूप होऊन असतात खैर, का चदन का काष्ठ अशी ती विवचना तोंवरच असते, जोंपर्यंत तीं अग्नींत घातलीं जाऊन अग्नि होत नाहींत-अग्नीचें व त्यांचे एकवटपण जोंपर्यंत होत नाहीं त्याप्रमाणें क्षत्री का वैश्य का स्त्रिया का शूद्र का अंत्यज्यादि ह्या जाति तोंपर्यंतच वेगळाल्या अशा, जोंपर्यंत त्या मला पावत नाहींत माझ्याशीं जीव एकरूप झाला नाहीं तोंपर्यंत जातीचा निराळेपणा राहातो पण माझ्याशीं समरस झाल्यावर सर्व भेदाचा लोप होतो मला पावल्यानंतर जाती कां व्यक्तीवर शून्यच एक पडतें, जेव्हां कां भावानें मजशीं मिळालेले होतात ज्याप्रमाणें मीठ हें सागरामध्ये घातलें असतां तें सागरच होऊन जातें तोंपर्यंतच नद का नदी अशीं नांवे-नदाचें नांव कां नदीचें नांव-तोंपर्यंतच पूर्वेकडील का तो कां पश्चिमेकडून आलेला तो ओघ, जोंपर्यंत ते सर्व समुद्रामध्ये मिळालेले नाहींत. हेंचि (समुद्र होणें) कोण्या एका निमित्तानें "चित्त जर माझ्या ठिकाणीं प्रवेशलें" इतकें जरी झालें, तरी मग आपोआपच मीच होणें असे अगा, परिसास सोनें करण्याचें

कुठवर अंग आहे हें पाहाण्याचें जर लोखंडाने मनात घेऊन तें त्यास मिळालें, तर त्याचें ते कल्पनेचें अंग बाजूस राहून तें सर्वच सोनें होतें व परत लोहपणास येण्याचा धर्म नाहींसा होतो

**भलतेहि भावें चित्त मज आंतु होआवें :** (ओव्या ४६६-४७५)

त्या गोपींचीं अतःकरणे प्रियकर या भावाने का मिषानें मज मिळाली असता, काय माझे स्वरूपच मग तीं नव्हत ? कारण त्यानींच मुळीं प्रियकरपण हें स्थिर करण्याकरिता मागेपुढे न पाहता आपलीं अंतःकरणेंच माझीं केलीं किंवा भयामुळे (मरणप्राय वेदनाच्या भीतीमुळें) कंसाने काय मजला पावणे होत नाहीं ? किंवा शिशुपालादि चैद्यानीं अखंड वैराला वश होऊन मजप्रत येणें होत नाहीं काय ? कीं माझे सायुज्य जे तें सोयरेपणेंचि पाडवाना, माझेपणानें यादवाना व ममत्वे वसुदेवादिका सकळाना . जसा का मी भक्तीनें प्राप्त होणारा, अगा धनुर्धरा, नारदास का ध्रुवास का अक्रूरास का शुकास कां सनत्कुमारास : त्याप्रमाणेच गोपिकाना कामानें, त्या कंसास भयसंभ्रमे, व घातकी मनोधर्मामुळें शिशुपालादिकाना : मी निर्वाणींचें स्थान, मला भलत्याहि मार्गानें येणे जरी केले-भक्तीनें, का विषयविरागानें का वैरानें : प्रेमाच्या निमित्तानें म्हणा, भयाच्या निमित्ताने म्हणा, ममतेच्या निमित्तानें म्हणा, भक्तिगुणानें म्हणा, कोणत्या तरी निमित्ताने एकदा चित्ताचा प्रवेश माझ्या स्वरुपात झाला, कीं माझा लाभ घडलाच समजावे म्हणून, हे पार्था, असे पाहा कीं, माझ्या अंतरगात प्रवेश करण्यास उपायांची येथे कमतरता नाहीं-किंवा उपाय करणारे असे कोणी नाहींत आणि भलत्याहि जातींत जन्मावे, मग भजावे का विरोधी भावाचे व्हावे, परंतु येथे भक्त जे होणे का वैरी जे होणे ते माझेच होय कोण्या एकाद्या बोलानें माझेपणाचें जरी होणें केलें, तरी मी होणे ह खरोखरीनें हातासच आले असे होय याकरितां, हे अर्जुना, पापयोनी जरी, का वैश्य, का शूद्र, का अंगना यानीं मला भजले असता ते माझ्या सदनास येतात, माझ्या सदनाचे होतात.

**माझ्या ठायीं अति निपुण ते मज पावनातच :** (ओव्या ४७६-४९०)

मग चातुर्वर्णाचे राजे, मंत्रविद्येचे माहेरघर, तपाचे मूर्तिमंत अवतार, तीर्थांनाहि पावन करणारे, यज्ञयागाचे आधार सत्कर्माचा विस्तार करणारे, प्रत्यक्ष लक्ष्मीलाहि धि क्कारणारे, ज्याचें पदचिन्ह मी आपल्या वक्षस्थळाला धारण करतों-असे जे परम पुण्यवान आणि माझ्या स्वरुपात लीन झालेले ब्राह्मण, त्याचप्रमाणें जीवभावानें मला शरण आलेले राजर्षि, त्याचे अखेरचे शाश्वत सुखाचें स्थान मीच होतो यात काय नवल आहे ? जे भूदेव, जे तपाच्या मूर्तीच सावयव, अहो, सकळतीर्थां दैवच जसे उदय घेऊन आहे असे जे, जेथे अखंडपणेंच यज्ञयागामध्ये वस्ति होणारी, जे वेदाचे वज्रकवच एक, ज्याच्या कृपादृष्टीच्या मांडीवर कल्याण हे कल्याणाचे होत, ज्याच्या आस्थेच्या जिव्हाळ्याने सत्कर्म प्रसार पावतें, ज्याच्या संकल्पानें सत्य जगतें, ज्याच्या आशीर्वादानें अग्नीच अग्निरूप झाला, आपल्या शक्तीचा झाला, म्हणून समुद्राने आपले पाणी यांच्या प्रीतिस्तव दिलें : त्या लक्ष्मी दूर ढकलून बाजूस केली : कौस्तुभ मणी गळ्यातून काढून हातीं घेतला, व मग चरणधुळीसाठीं छातीची खळगी पुढे केली . अजूनपर्यंतसुद्धां त्या शातीच्या ऐश्वर्याचे जतन करण्याकरिता, हे सुभद्रा, त्या पावलाची चिन्हे मी हृदयीं वाहून आहे . ज्याचा कोप म्हणजे काळाग्निरुद्राचें स्थानच व ज्याच्या प्रसादानें सहजच सिद्धि मिळतात-सिद्धि जोडल्या जातात : असे जे पुण्यपूज्य ब्राह्मण ते तर माझ्या ठायीं अतिनिपुण असे, आता मजला ते पावतात ते हे कोणी कैसें समर्थन करावे-कोणीं प्रतिपादावे ? चंदनाच्या अंगवायने जे जवळ असे निंब होते ते शिवले गेले, त्या निर्जिवीं निंबानीं देवाचीं मस्तके वस्तीचीं ठिकाणें केलीं मग तो चंदन देवांच्या मस्तकीं पावणार नाही असे कसे समजावें, गृहीत धरावे ? अथवा समर्थन करण्यानेंच तेथे तो चंदन पोहोंचला हें खरें

होईल काय? तेथें शांत करील अशा आशेनें श्रीशंकर अर्धा चंद्र सतत आपल्या मस्तकीं धारण करून आहेत. तेथे निववणारा आणि सगळा, शिवाय सुवासानें चंद्रापेक्षा निराळा असा चंदन सहज लीलेनें सर्वांगीं का बसणार नाहीं? किंवा रस्त्यावरील उदके गंगेच्या कासेस लागलेलीं तीं अनायासेच समुद्र झालीं. आतां त्या गंगेस काय वेगळी गति आहे? म्हणून राजर्षि अथवा ब्राम्हण होत, ज्यांच्या गतीला का मतला मीच गृह होऊन आहे, अशा त्याना केव्हाहि मीचि मोक्ष व योगहि पण मीच.

**लोका येऊनि सापद्रवा कैंवी न भजिजे मातें ?** (ओव्या ४९१-५०२)

याकरिता शेंकडो भेगा पडलेल्या नावेत बसून कसे बरें निश्चित राहावें? शस्त्राचा वर्षाव होत असता उघडया अंगानें असणे न कसचे बरे? अंगावर पाषाण पडत असता ढाल पुढे का करू नये? रोगानें व्यापले असता औषधाबद्दल उदासीन का असावे? जेथे चहूंकडे वणवा जळत आहे तेथून का बरें निघून जाऊं नये? त्याप्रमाणे दुःखरूपी अशा मृत्युलोकीं येऊन मला का बरे न भजावे? अगा, मजला न भजावयालागीं असें कोणतें बळ आपल्या अंगीं आहे कीं न भजलें असता चालेल? काय घरीं असणें का भोगामध्यें असणे येथें मला न भजण्याची निश्चिती ती का? दुःखसंकटानें भरलेल्या या मृत्युलोकात मला न भजण्याइतका उन्माद कशाच्या जोरावर प्राणी करतात? घरें दारें, विषयसुखें, तारुण्य, विद्या हीं अनंत सुखाचा लाभ देतील, असा याचा कसा भरंवसा धरायचा? मला न भजता वयास येणें किंवा विद्येचे होणें असा प्राणियासी भरवसा सुखाचा तो कोठील बरें? जेवढे म्हणून भोग्य-जात तेवढे एका देहाच्या हिताकरता लागलें, आणि येथें देह पाहावा तों तो मृत्यूच्या तोंडींच जणं आहे. मृत्युलोकींचा शेवटचा बाजार (नरदेह) त्यात दुःखाच्या गठडीच्या गठडी सुटल्या आहेत, त्यात मोठया दुःखाचा माल सुटला असून मरणाचे भरंच्या भरें लोटले आहेत. सुखासहित जीविताची ग्राहिकी कशी बरी कीजेल, हे पाडुसुता? अहो, काय राखाडी फुंकिली असता दीप हा लागला जाईल? अगा, विषाचे कांदे वाटूनि जो रस त्यातून पिळून घ्यावा त्यासच मुळीं अमृत हे नाव ठेवून जसे का त्यानें अमरच होणें एक. हा मृत्युलोक म्हणजे जन्ममरणाचा नुसता बाजार आहे. येथें दुःखाच्या मालाच्या नुसत्या राशीच्या राशी पडल्या आहेत. अशा बाजारात सुखाच्या मालाचा सौदा कोठून होणार? विषारी कंदाच्या रसाला अमृत हे नाव देऊन तो प्याल्यानें अमर होऊं पाहाणें हा जसा मूर्खपणा, तसाच केवळ दुःखरूप असे जे विषयभोग त्याच्या सेवनापासून सुखाची आशा धरणे हा मूर्खपणा होय. स्वतःचे शिर तोडून पायाच्या जखमेला बांधल्यानें जितकें सुख होईल, तितकेंच मृत्युलोकींच्या विषयभोगापासून माणसाचे हित होणार आहे. त्याप्रमाणे विषयाचें जें सुख तें केवळ परम दुःख होय : परंतु काय करावें मूर्ख सेविल्यावाचून राहात नाहींत. दुःखाचें सेवन केल्याशिवाय मूर्खांचें चालतच नाहीं. जणं आपले मस्तक तोडून आपल्या पायाच्या व्रणावर बांधावें, त्याप्रमाणें या मृत्युलोकींचें सर्व काहीं अशा तऱ्हेचें भलें आहे. असें आहे म्हणून या मृत्युलोकामध्यें सुखाची गोष्ट कोणाच्या बरें कानानीं ऐकूं येईल? अहो, इंगळाच्या आथरूणावर सुखनिद्रा कोठून ऐकूं येईल?

**इये मृत्युलोकींचें उफराटें : तरी अर्जुना, झडझडोनि वाहिला निघ :** (ओव्या ५०३-५२१)

ज्या या मृत्युलोकींचा चंद्र क्षयरोगी आहे : जेथें उदय तो अस्तालागीं होतो : दुःख सुखाचें रूप घेऊन जगाला छळतें : जेथें कल्याणाच्या अंकुरावर लगेच अकल्याणाचा पोरकिडा पडतो : उदरांतील गर्भालाहि मृत्यु धुडीत येतो : जे कांहीं नाहींच मुळीं त्याची चिंता करीत बसावे, इतक्यांत तेंच मुळीं गंधर्वांनीं नेलें जाते व असें न गेलेलें जे तें कोणत्या गांवीं गेलें तें समजत नाहीं : इतर सर्व वाटा

शोधल्या तरी पाऊलच मुळीं परतत नाहीं, मेलेल्याच्याच गोष्टी हींच जेथीलची पुराणें होत : जेथे सगळें वस्तुमात्र अशाश्वत आहे, तेथें जिवानें निश्चिंत कसें राहावयाचें ? पण या मृत्युलोकाची गंमत अशी आहे कीं, जन्मलेले सर्व लोक मृत्युमुखांत गेलेले पाहात असून व पुराणांतून वाचीत असून, लोक आपले बेफिकीर आहेत जेथिलची अनित्यता ही सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या आयुष्याचेंहि महत्त्व घेऊन आहे, तेथे नाश होणार नाहीं हें कसे बरे ? अशी ही मृत्युलोकींची नादणूक आहे. तेथे जन्मास आलेले जे अनेक लोक त्याच्या निश्चितीचें कौतुक करावे तेवढे थोडेच इहपर सुखाकरिता एक कवडीहि खर्च करीत नाहींत व ज्या ठिकाणीं संपूर्ण नाश ठेवलेला तेथें कोटयावधि द्रव्य खर्च करतात. हा परलोकींचा लाभ करुन देण्यासाठीं कवडीमुद्धा न खर्चणारे सर्वस्वाची हानि करणाऱ्या विषयसुखासाठीं कोटयावधि रुपये खर्चतात जो अनेक अशा विषयविलासांत गुंतून जातो, तो साप्रत मोठया सुखात आहे असे म्हणतात व जो लोभानें माराचा होतो त्यास ज्ञानी म्हणतात विषयसुखांत निमग्न असलेल्याला सुखी व लोभग्रस्ताला ज्ञानी म्हणतात, व ज्याचे आयुष्य थोडे उरले आहे व बळ आणि बुद्धि नाहींशी झाली आहे त्याला वडील म्हणून नमस्कार करतात मूल जसजसे मोठे होत जातं, तसतसे आवडीनें त्याचे कोडकौतुक करतात, पण त्याचे आयुष्य कमी होत जात आहे याची खंती करीत नाहींत जन्मलेले मूल दिवसेंदिवस काळाचे आधीन होत जातें, परतु अधिकाधिक उल्हासाप्रत येऊन गुढयातोरणें उभारून त्याचा वाढदिवस करतात कोणास मर म्हटले तर राग येतो, आणि मेल्यावर त्याच्यासाठीं रडत बसतात पण मरण टाळण्याचा उपाय करीत नाहींत किंवा आयुष्य फुकट जातं त्याचा ते मूर्ख कधीं विचार करीत नाहींत. सापानें गिळिला असलेला बेडूक उभा जसा, व जिभेने माशा गिळीत असलेला, त्याप्रमाणें प्राणी जे ते कसल्या बरे लाभाकरितां तृष्णा वाढवीत असतात ? अहो, मृत्युलोकींचा सर्वच प्रकार असा उफराटा आहे अर्जुना, अशा मृत्युलोकात तूं दैवयोगानें जन्माला आला आहेस तेव्हा आता तरी या मृत्युलोकींच्या राहाटींतून लवकर मोकळा हो, बाजूला हो, फटकून वाग, वेगळा नीघ, वायला हो, माझ्या भक्तिमार्गास मीळ आणि ज्याच्यायोगाने तूं माझ्या स्वरुपाला पावशील असा जो भक्तिमार्ग त्याला लाग-ज्या भक्तिमार्गानें तूं माझे अव्यग असे निजधाम (निर्दोष आत्मस्वरूप) पावशील

तूं आपले मन मद्रूप कर, माझ्या भजनात रगून जा आणि सर्व ठिकाणीं माझेच स्वरूप आहे असे समजून मलाच वदन कर माझ्याचकडे सर्व चित्त ठेवून सगळे सकल्प नाहींसे कर, म्हणजेच माझे भजन करणारा हो. जेव्हा अशा माझ्या योगानं ध्यासानं-संपन्न होशील, तेव्हांच माझ्या स्वरुपास पोहोचशील असे हे अतःकरणींचे रहस्य तुला सागत आहे आतापर्यंत लपवून ठेवलेले हे रहस्यसर्वस्व तुला प्राप्त होऊन तूं पूर्ण सुखी होशील.

**अळुमाळ अवधान द्यावें इतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें :** (ओव्या ५२२-५३६)

याप्रमाणें सांवळ्या परब्रम्ह श्रीकृष्णानीं-भक्ताचे काम कल्पवृक्षाप्रमाणें पुरविणारे असे ते श्रीआत्माराम त्यानीं-अर्जुनास उपदेश केला, तो संजयानें धृतराष्ट्रास सागितला. अहो, असे पाहा कीं ऐकत आहांत कीं नाहीं ? यावर म्हातारा धृतराष्ट्र स्वस्थ बसला होता, जसा टोणगा महापुराला न जुमानता पाण्यांतच बसतो, त्याप्रमाणे तो उगाच होता तेथे संजयाने माथा डोलविला व म्हणाला कीं, अमृताच्या पावसाचा वर्षाव झाला, परंतु हा तर येथे असून जसा नसल्या सारखाच आहे परंतु हा आमचा धनी आहे, म्हणून असे बोललें तर वाचा दूषित होईल परंतु काय करावें, याचा स्वभावच असा आहे परंतु माझे माग्यच थोर, कीं श्रीकृष्णार्जुनसंवाद-वृत्तांत-सांगण्याच्या मिषानें, अहो, कसा बरे मुनिराजे श्रीव्यास-

देवें रक्षिलों आहे. एवढा मोठा मनाचा निर्धार करून सायासानें सांगत असतां, त्याचा सात्विक भाव अनावर झाला-तो त्यास आवरता येईना. चित्त हें आटणें किंवा स्थिरता घेत घेत चकित, मग्न झालें, जेथल्या तेथेंच वाचा ही पांगुळी झाली व नखशिखांत रोमांच उभे राहिले. डोळे हे अर्धोन्मीलित होऊन आनंदाश्रु वर्षूं लागले व अशा ह्या आंतल्या सुखोर्मींच्या बळानें त्याचा सर्व देह सकंपित झाला. सर्व रोमारोमांच्या मूळामध्यें घामाचे बारीक बारीक कण उगवले, मोत्यांची जाळीच जशी त्यानें पांघरली आहे असा तो दिसला, आवडता झाला, सुखाचा झाला. महासुख जें तें रसातिशयास आल्यानें, महतीं सुख असें झालें, तेथें जीवदशा नाहींशी होऊं लागली. परंतु संजयाकडे श्रीकृष्णार्जुनसंवाद सांगण्याची कामगिरी सोंपविली असल्यामुळे, श्रीव्यासांनीं जीवदशेची स्वरुपांत संपूर्ण आटणी होऊं दिली नाहीं. जीवदशा ही संपूं लागली, परंतु तेथें जीवशिवैक्य त्यांनीं होऊं दिलें नाहीं. तसेंच असें झालें कीं श्रीकृष्णाचें बोलणे हें घों घों करीत त्याच्या श्रवणपथावर आलें, त्यामुळें तो देहभानावर येऊं लागला. तेव्हां त्यानें आपल्या डोळयांतील आनंदाश्रु येण्याचा उमाळा थांबविला, सर्वांगावरचा घाम पुसून टाकला व धृतराष्ट्रास त्याने अहो जी ऐका असें म्हणूं केलें-जसें कां देवतेचें आवाहन झाल्यावर विसर्जनच एक तेथें : आतां श्रीकृष्णमुखींचे शब्द हेंच उत्तम बीज आणि संजय कसा म्हणाल तर आठ सात्विक भावाची मुरलेली अशी जमीन असल्यानें, श्रोत्यांना सिद्धांतरूपी पिकाचा सुकाळ होईल, पीक येण्यास साहाय्य होईल. मनपवन हे साहाय्य झाल्यानें भाव हे प्रकाशास येऊन अनेक सिद्धांत हे सिद्ध होऊन येतील. अहो, एकाग्रतेचें असें बारीक असें लक्ष द्यावें व असें केल्यानें आनंदाची सर्व राशीच एक तेथेंच बसणं होईल. अहो, मग बाप बाप भाग्यच कीं या श्रवणेंद्रियास पाहील व दैववान् असें होऊन पुष्पहारानें अलंकारलेलें दैवतच देवतेप्रत आलें होईल-मूर्तिमंत देवच तेथें उभा होईल. आतां भावविभूतींचा जो ठाव ( विभूतींचें ठिकाण, अधिकरण ) आहे, तो सिद्धांचे राव ( पूर्णावस्थेंत असलेले सिद्ध त्यांत श्रेष्ठ भगवान् श्रीकृष्ण) जे गोपालकृष्ण ते अर्जुनास दाखवतील, तो ऐकावा असें श्रीनिवृत्तिनाथांचे ते ज्ञानदेव म्हणाले.

---

## ॥ कमलापत्यष्टकम् ॥

भुजगतल्पगतं घनसुंदरं गरुडवाहनमंबुजलोचनम् ।
नलिनचक्रगदाकरमव्ययं भजत रे मनुजाः कमलापतिम् ॥ १ ॥
अलिकुलासितकोमलकुंतलं विमलपीतदुकूलमनोहरम् ।
जलधिजाश्रितवामकलेवरं भजत रे मनुजाः कमलापतिम् ॥ २ ॥
किमु जपैश्च तपोभिरुताध्वरैरपि किमुत्तमतीर्थनिषेवणैः ।
किमुतशस्त्रकदंबविलोकनैर्भजत रे मनुजाः कमलापतिम् ॥ ३ ॥
मनुजदेहमिमं भुवि दुर्लभं समधिगम्य सुरैरपि वांछितम् ।
विषयलंपटतामपहाय वै भजत रे मनुजाः कमलापतिम ॥ ४ ॥
न वनिता न सुतो न सहोदरो न हि पिता जननी न च बांधवः ।
व्रजति साकमनेन जनेन वै भजत रे मनुजाः कमलापतिम् ॥ ५ ॥
सकलमेव चलं सचराचरं जगदिदं सुतरां धनयौवनम ।
समवलोक्य विवेकदृशा द्रुतं भजत रे मनुजाः कमलापतिम ॥ ६ ॥
विविधरोगयुतं क्षणभंगुर परवश नवमार्गमलाकुलम ।
परिनिरीक्ष्य शरीरमिदं स्वकं भजत रे मनुजाः कमलापतिम् ॥ ७ ॥
मुनिवरैरनिशं हृदि भावितं शिवविरिंचिमहेंद्रनुतं सदा ।
मरणजन्मजराभयमोचनं भजत रे मनुजाः कमलापतिम् ॥ ८ ॥
हरिपदाष्टकमेतदनुत्तमं परमहंसजनेन समीरितम् ।
पठति यस्तु समाहितचेतसा व्रजति विष्णुपदं स नरो ध्रुवम ॥ ९ ॥

इति श्रीमत्परमहंसस्वामिब्रह्मानंदविरचित कमलापत्यष्टकं समाप्तम् ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णपरब्रह्ममूर्तये नमः ।

ॐ नमो भगवते नारायणाय । ॐ नमः परमात्मने ।

॥ श्रीवर ज्ञानेशो भगवान् प्रसीदतु ॥

# श्रीज्ञानेश्वरी

( सुबोधिनी )

## अध्याय नववा—राजविद्याराजगुह्ययोग

तरी अवधान येकलें देईजे । मग सर्व सुखासी पात्र होईजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आईका ॥ १ ॥

परी प्रौढी न बोले हो जी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं ।
द्यावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २ ॥

कां जे लळेयाचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती ।
जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हांऐसीं ॥ ३ ॥

तुमचिया दिठीवीचिये वोलें । सासिन्नले प्रसन्नतेचे मळे ।
ते साउलि देखोनि लोळे । श्रांतु जीव मी ॥ ४ ॥

प्रभु तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि स्वेच्छा वोल्हावा लाहो ।
येथाहि सलगी करूं बिहों । तरी निवों कें पां ॥ ५ ॥

ना तरी बाळक बोबडा बोली । वांकुडा विचुका पाऊली ।
चोज करूनि माऊली । रिझे जेवीं ॥ ६ ॥

तेवीं तुम्हां संतांचा पढियावो । कैसेनि तरी आम्हांवरी हो ।
या बहुवा आळुकिया जी आहों । सलगी करित ॥ ७ ॥

वांचूनि माझिये योग्यते । आणि तुम्ही सर्वज्ञ भवादृश्य श्रोते ।
काय धडियावरी सारस्वतें । पढो सिकिजे ॥ ८ ॥

(१) देईजे–दीजे (२) द्यावे- देयावें प्रौढी=आढ्यतेनें समाजीं=सभेमध्ये, समूहामध्यें. (३) मनोरथ–मनोरे. लळेयाचे=आवडतयाचे. (४) दिठीवीचिये–दिठिवेयाचिये वोलें=कृपादृष्टीच्या ओलाव्यानें सासिन्नले=भरास आले, तरारले. श्रांतु=श्रमलेला. (५) निवों- निवें=मजला समाधान कोठें होईल, कसें मिळेल ? (६) चोज–ते चोज=कोडकौतुक. (७) पढियावो=प्रेमभाव, प्रीति, प्रेम. आळुकिया=उत्कंठेनें, उत्कट इच्छेनें, उत्सुकतेनें. (८) योग्यतें–बोलतिये योग्यतें. भवादृश्य–भवादृश. भवादृश=कुटुंबवत्सलेच्या सर्व संसारभारास पाहाणारा नेत्र, पाहाणारी दृष्टी, असे आपण सर्वज्ञ. दृश=गोचर; दृश्य=दृशगोचर, दृष्टीचा टप्पा.

ह्या अध्यायाच्या आरंभीं प्रतिपाद्य विषय जो " राजविद्याराजगुह्ययोग " त्याबाबत ह्या विघ्नविनायक श्रीगणपतीस मी नमस्कार करितों, वदन करितों व हा ग्रंथ निर्विघ्नपणे पार पडावा अशी त्याचे चरणीं मी विनंति करितों.

त्या गोपींचा आनद श्रीकृष्ण भेटीमुळें कसा उचबळून येत आहे बरे (द्वैताद्वैतविरहित गौळणी)! येथे काय ते द्वैत किवा कसचे ते अद्वैत–हे कांहीं का बोलून भागणारें नव्हेच ! अहो, कशास ते तसचे बोलणे बरे ! जर तें वागायास येईना–येथें तर अगोदर वागविणे हेंच सर्वांना चाहते होणारे असल्याने–येथे उगीच, अहो उगीचच् काय तें तसचे बोलणेच नको म्हणून ज्याचीं मने त्या तसल्या द्वैताद्वैताचे विरणें झाल्यानें त्या त्या विरहितच असून तेथे त्या विद्यापात्ररूपी गौळणी आपल्या डोक्यावर अमृताच्या घागरी घेऊन–जसे ते सांजवणेच एक–त्या माता विकरा करण्याकरिता मथुरेच्या बाजारास चालल्या आहेत तेथें पाहावे तों काय एक नवल, नवलाचा असा नवलावोच तेथें देखण्यास आला तेथे पाहिला गेलेला नवलाव काय लावण्यतेचा रंगबहारच घेऊन आलेला, तेथे देवच सर्व तें त्याचे हसरे असे श्रृंगाररसाचें चातुर्य–सर्व मधुरता हीच तेथे रंगास आलेली–रूपाची झालेली–लावण्यच तो व्यवहार वर्तण्यास आलेले !! भगवान श्रीकृष्णाच्या दर्शनाने आणि त्याच्या कृपेने त्या गौळणींच्या ठिकाणचा द्वैताद्वैतभाव नष्ट होऊन त्या आत्मानंदांत निमग्न आहेत अमृतरूप परमात्माच त्यानीं संध्याकाळीं डेऱ्यात भरून, सकाळच्या प्रहरीं उत्तम श्रृंगार करून, तो गोरसाचा भार डोक्यावर घेऊन त्या मथुरेच्या बाजारात विकण्याकरिता निघाल्या. त्या श्रीकृष्णदर्शनाचे प्रेम चित्तामध्ये उचंबळून आल्यामुळें हंसत हंसगतीने चालल्या असतां त्याच्या जिवलग मैत्रिणी पुढें खेळत होत्या. त्याच्या दृष्टीचा संदेह कांबळें धारण करणाऱ्या श्रीकृष्णाची संवय लागल्यामुळे फिटला होता. अशा त्या आनंदाने चालल्या असतां वाटेंतच त्याना श्रीकृष्णदर्शन झाले. पुन्हां श्रीकृष्णाचे दर्शन झाल्यानें त्याना फार नवल वाटले श्रीकृष्णाला पाहिल्याबरोबर लाजून त्या त्याचे स्वरूपात विरून गेल्या मन लय पावून त्याची गति खुंटली. तसेच डोळ्यांचें पाहाणें व कानांचें ऐकणें मंद झालें कारण त्याचे चित्तच श्रीकृष्णाने चोरून घेतलें हो !! उगीच त्याने खूण केल्याबरोबर जीव परमात्मरूप झाला गोपी अंतर्बाह्य कृष्णरूप झाल्यामुळे त्यांचे गणगोत सर्व दूर झालें. कारण त्याचा मनुष्यपणाच नाहींसा झाला. श्रीकृष्णाच्या भेटीने त्यांचा ससार खुंटला–शद्ब मावळला–त्या परमात्मसौख्याचे लाभाकरिता त्या रूपातीत झाल्या पुन्हां घरीं जाण्याला म्हणजे प्रपंचाकडे पाहाण्याला त्याचा लिंगदेह उरला नाहीं अशी स्थिति प्राप्त झालेली एक दुसरीस सागते, "बाई, 'तत्त्वमसि' या महावाक्याने होणारी स्थिति माझी तर होऊन गेली; पण, मैत्रिणींनो, हे गुज तुम्ही मनात लपवून ठेवा या अभ्यासाला लागल्याने माझें मीपणाचे पिसे नाहींसे होऊन इंद्रियासहवर्तमान परिपूर्ण चैतन्यानंद मी भोगीत आहे द्वैतभ्रम सर्व नष्ट झाला आणि अद्वैत परमात्मरूप झालें निर्विकार परमात्म्याला आलिंगन देऊन त्याच स्वरूपाच्या बिछान्यावर आनंद दुणावत आहे. आतां श्रीविठ्ठलाची भेटी झाली–म्हणून ससारासकट मी तरलें असून आपले स्वरूपाचे ठिकाणीं जात आहे." — ज्ञा गा

एकवेळ तरी ह्या जीवदशेचा सोस फिटावा, पुरता व्हावा, ह्या बुद्धीचा प्रवास हाहि सुद्धा आपल्या योग्यतेचा व्हावा, व ह्या प्रकृतीचे जें कांहीं मावामावानीं अडविले जाणे तेंहि पण एकवेळ फिटावें, तिचे समाधान व्हावें, तिची हौसच फिटावी, हौस फिटली व आता पुरे असे म्हणलेलें ऐकण्यास मिळावें, असें घेतलें तर केवढी बरें तेथें एक हौसच् मजेदार अशी मजाच्, बुद्धिस्वारस्यतेची मौजेची अशी आनंददायिनीच् !! उत्साह आनंदास आला, बुद्धि ही स्वतःस महद्‌भाग्याची मी आहे असें म्हणूं लागली तिनें स्वभावाचें याथातथ्य तेच घेऊन तेथेंच ती रमूं लागली. परंतु असे झालें

नाहीं तर तेथें होणारी जी त्रेधा ही काय तुम्हापुढें मांडून मजला तर कांहींच मिळणार नाहीं. म्हणून आतांची ही वेळा, आतांचा हा प्रसग (सुयोग, सुवेळा ही) हा सहजतेस उत्तमता आली असा, प्रसंगातच (योगायोगाचा) प्रसंग ( सुयोग ) दिला अशा महिम्याचा झाल्यानें, अशा प्रसंगाचा ( महिम्याचा ) असल्यानें, तेथें सहजतेच्या प्रसंगानेच (युक्ततेनें) सहजसिद्ध-साम्यसिद्ध-हें युक्ततेच्या प्रासंगिकतेस (अनुकूलतेस) येऊन, अनुकूलतेस घेऊन आपली ही बुद्धि विशालपणाची करून, आपले कोड पुरवून घ्यावें अशी आहे.

सायास, प्रयत्न, नवस करूनच् असावें, व ती गोष्ट जर मांडता आली नाहीं, तर काय ते सायास आपल्या पुरतेपणास आले असे होतच नाहीं. म्हणून आता श्रीगजाननादि देवतांना हात जोडून नम्र भावानें एक विनंति करूं ! कीं, तुम्ही आपलें आस्य हेंच जसे होऊन असावे ह्या सिद्धानीं आपलें सिद्धत्व हें 'सहजसिद्ध' असे होऊन यावे व ह्या योगीजनाना आपले योग-भोग-भाग्य हे पुरविणारे असे एक सिद्ध-सहज असे.

एकादी वेळच अशी येते कीं, शभर वेळां प्रयत्न करूनहि काहीं साध्य नच् झालेलें, असे ते एखादी वेळ साम्य किंवा सहज योगाची झाली म्हणजे तेथे तुलना ही तुलनेची होणारी नव्हेच् तेथें सर्व सुखच सुखास आलें

ज्या सुखाकरितां मनुष्य हा बारा सायासांनीं अनेक जिन्नस पैदा करून हे यज्ञादि करितो, जे कशानेहि तोललें जात नाहीं, जें नित्य नवे असे आनंद देणारे, जे म्हणजे जसे कांहीं सर्व पुण्यच एकदम उभे राहिलें, जेथे ह्या निर्मळ असलेल्या परब्रम्हासच जणूं आपण परं ब्रम्ह इतके दिवस जे पोकळणेंचें असलेलें, ते आता घनतर व आतूनच भरून सोलींव झालें, रसभरित मरीव असेच जणू ते एका फळाचें असे झालें-फळलेंच जसे भाग्य असे झालें-तें काय लिहून भागणारे !! काय त्याला राहाण्यास जागा करून त तेथें भरले जाणारे असे नव्हेंच-तें सहजतेने सहजत्वाचें होणारे !! तप, दान, यज्ञ, अध्ययन इत्यादिनीं त्या सुखाकरिता अटोकाट प्रयत्न केले ! जे केव्हाहि विटणारे नव्हे, जे केव्हाहि सरणारे नव्हे ! जीवितानंद हा आनंदच पाहाणारा ! तेथें जीवित हेच आपली ती प्रेमा घेऊन तेथें काय अहो विटणे म्हणावे तरी कसे ! येथें मुळींच कधीं विटणे नाही-तेथे एक अवस्था जर पुरती अथवा सरती झाली नाहीं, तर जसे दुसरांचे अवलबन करून आपली ती प्रेममुद्रा ही सहजतेस घेऊन असावे असे असल्यानें, येथें तो आनंदच सुखास आला-प्रेमाचा झाला-असा हा आनदच एक आपले प्रियपण हुडकूं लागून जेथे ते प्रियपण हेंच प्रिय अशा-अति प्रिय, परम प्रिय, जीवितापेक्षांहि प्रिय अशा-मावांनीं थबथबलेले होऊन तेथे आनंद हाच वर्षाव्यास आला-आनंदाचा वर्षाव होऊ लागल्यानें तेथें आतां तर ते जीवित हें सरतच म्हणजे प्रिय असेच करून घेतले-व आता तेथील लडिवाळपणाचे जे जीवितप्रेम हें त्या जीवीतानंदास खंडोगणती असें हें आयुष्य होऊन आहेच आहे अशा परम उल्हासाचे-आनंदाचें-प्रीतीचें सगोपनच-आनदणेंच एक !!

परंतु भोगणारे जे आहेत, त्याचे चहाते जे आहेत, त्यांचे हरतऱ्हेने कोडकौतुक पुरविणारें असें तें आहे-तेथें ' वानणे ' अथवा तेथील जी कांहीं एक अंतरातील गोष्ट ही मातलेली अशीच होऊन असते असे हें प्रत्येक जणाचे भोगिता (भोक्ता) किंवा ' भोगितया ' चें जे धैर्य तेंच नांवाजलेलें नुसतें नव्हे, तर तेथें प्रत्यक्षत्वाचें जसें एक मुरलेले साधणें, वेळा साधणें हें पवाडाच (सुखाचा सिद्धातच, शौर्याचा उपक्रमच, पराक्रमाचा निवाडाच) गाणारें होऊन असतें. याहिवर पाहाण्याचें केलें, तर तें म्हणजे महासुखच ' भावंड ' होऊन वलन घेऊन आलें असें आहे : येथें सोयरे म्हणजे सख्खे असे असणारें महासुखच सुखाचें झाले, वंडलेलें तेजच एक ' भा ' होऊन ते वाहूं लागलें. तेथें सूर्यच जसा

आपले चरण घेऊन त्या 'भा' स भावास आणून योगभावाचा करणारा झाल्याने तेथें योगनाथच जसा आपला चरण हा आहे असे समजूं लागून, तेथें आतां सौख्य म्हणून जें आहे तेंच सोयरें झाले: काय अहो, सोयरें तें कधीं तरी होईल काय? असा प्रश्नच एक विचारणारें न असल्याने, तेथें श्रीगोपालकृष्ण हाच त्या बाल्यदशेस उचलून घेऊन तेथील बापपण हें आपणच स्वतः वागवीत असलेला!! जगदीश्वर जो श्रीकृष्ण त्यानें स्वभावाप्रमाणें त्या बाल्यबुद्धीसच बाप म्हणूं केले व आतां काय तेथें तो परमात्मा हा कधीं सरणारा का आहे–तो सोयराच एक, बापच एक व त्यानें स्वत सहि पण एक योगभावंड असे का बरें म्हणूं केले–नव्हे, असे ते परम वैचित्र्याचे स्वभावचित्र पाहाण्यास दिलेले होय!! "बाप हा माझा दीनानाथ। वाट भक्ताची पाहात॥"

येथे योगीश्वराचें जें अलौकिकपण तेंच कृपादृष्टीचें सहजत्व सौम्य होऊन आले, मृदुल झाले–आंत हळुवार असेच जे बोलण्याचे हातखंडा तेथें कौतुक पुरविलें जाऊन सर्व सुख हें वश होऊन आले, ते सुखाचें झाले त्या सुखाचीं पाऊलेंच त्यानीं आपलीशीं केलीं, सौम्य अशा पावलाचे ते झाले व आता आरूढणेंच जसे त्या सुखावर करून ते परब्रम्हच त्यांनीं गाठले–ते सुखच त्यानीं पायात घातले–अंगात चढविलें–डोळ्यात भरले–त्या सुखाचे होऊन त्यांनीं आपले डोळेच त्या सुखानें भारले–कानच त्यानीं त्या सुखानें भरले–असे ते सुखच महासुखाचे झाले.

चराचर वस्तूंना भाग्य पाहूं लागले. ब्रम्हदेवादि देवाना जे आराधन करण्यास योग्य–भोगधन असेच तें–योगियाचे भाग्य भोगधन–ह्या विश्वाचा जिव्हाळा–सर्व जाणणे जे आहे त्याची ती परम कळा असून ती आनंदाचा पुतळाच एक, योगेश्वरच–जेथे सर्वज्ञता ही ओलावा होऊन आहे असे ते अहो श्रीकृष्ण! भगवान हां! त्या पाडवाप्रति बोलते झाले.

असा हा कुरुक्षेत्रामधील वृत्तात संजय हा त्या राजा धृतराष्ट्रास सागत आहे तच आता पुढे ऐकण्याचें करावे असे श्रीज्ञानदेव म्हणतात.

हा अग्निज्योति मार्ग हा जागता, अगदीं निराळा, अगदीं स्वतंत्र (स्वतंत्राचा असा) स्वयसिद्ध व शातिसुखाचा असा आहे.

दुसरा जो धूम्रमार्ग तो पुनरावृत्तीच्या गावास येणारा असा आहे

ह्या संसारामध्ये पडले, तर तेथें मोठे कष्ट होतात, म्हणून एक वेळ आपला सर्वऱ्या सर्व वेळ हाच फेडावा, असे वेळ फेडूनच त्याची शहानिशा करावी मार्ग शोधता असेच समजून आले कीं, एकानें 'ब्रम्हत्व' होणें होय, व दुसऱ्याने पुन्हा ससाराची पुनरावृत्ति होणे होय, संसारास येणे होय. ससार हाच जेथें अदश आहे असा तुम्ही श्रोतेजन मजला तो संसार पढवावा अशी विनंति सल्गचीं एक–येथें भावच एक भाव्याने पाहविला जातो–येथे जेव्हा शद्ध ( हा बुद्धियोगाचा वागविला जाणारा तोच ) देव होऊन आला : असे तें कर्माचे दिव्यच एक जसे भवाने! भावाने! देवाने पाहिलेले असे जगत् ( म्हणून येथे अनुभव हा श्रोत्यांनीं महत् तत्त्वास घेऊन चालविलेला असा भावबळाचा ) –परिणामात्मक देवच जणूं उगवला

असे म्हटल्यानें सुद्धां तेथे ते पुरते होणारें असे नव्हेच. काय ह्या नुसत्या वर्णनाने तेथीलच्या गोडींत बसतां येईल? काय ह्या बुद्धीला जशीच्या तशीच ठेवून एकदम ते ब्रम्हत्व अंगीं बाणेल? तर ते तसे नव्हे.

तर येथें तसें चालणें पुरतें होणारे नव्हे. येथें देह हाच देहाचा नच करून, देहाचें नच होतां आपण वस्तुच होऊन असावें, मग देह हा असो अथवा जावो, आम्ही केवळ वस्तुच आहोत असेच

येथें घेणेचें. " देह आत्मा विदेह परमात्मा "-येथें तर देहानेच विदेहास किंवा परमात्म्यास चेव दिला-म्हणून येथे काय ह्या नांवाच्या पाठीमागे लपण्याचे कारणच उरले नाहीं: आता आपणच जर देह काळ इत्यादि झालों, तर तेथें मार्ग ते कसले शोधावेत, किंवा कुठे कुणीकडून जावे असे विचारणेंच नाहीं.

घट फुटला म्हणजेच काय आकाश हें नीट आपल्या वाटेस लागते? अहो, येथें ते आकाशच मुळीं आकारलोपामुळे निराकाराचें होतें एरव्हीं पाहिलें असता गगन तें गगनींच आहे. म्हणून तूं, हे अर्जुना, योगानें अस. योगयुक्त होऊन अक्षत जा, म्हणजे सर्व काळीं सहज साम्यता ही भेटणारी होईल, मग तेथें तुझी ही देहबुद्धि ही आडच मुळीं नच येणारी योगबंध जो नेहमीं ब्रह्मभावास पाहणारा तेथें मुळीं बधत्व नाहींच म्हणून ब्रह्मभाव हाच तुझा नित्याचा असा होऊन अस, म्हणजेच देहबध हा केव्हांहि नाहींच नाहीं.

असें चाललें म्हणजे तेथें मरणाने वाहविला जात नाहीं, जन्मण्यानें सांपडणारा होत नाहीं व मध्यें संसारश्रमाचें जरी लाघव पुढें आले, तरी त्याने तो मुळींच फसविला जात नाहीं.

अशा तऱ्हेनें जो योगी होईल त्यासच हा बोध नीट समजला असे मी म्हणतो: कारण येथें ह्या भोगास पेलून, तोलून, झेलूनच आपले निजरुप हे सापडणारे होत-निजरुपास येणे हेंच मुळीं ह्या भोगांनींच सर्वस्वीं आपल्याच स्वाधीन ठेविले आहे असे आहे

ह्या अभ्यासानें सहजपणच प्राप्त झालेले, मग तेथ सहज भोग! सहज योग! सहज आनंद! सहज सुख! असे जे काहीं गाजत असलेले ह्या इंद्रादि देवांच्या जवळ गाजणारे ते बगैल जे काहीं बोलणे ते काय करायचें आहे? ते नको आहे! असे म्हणून त्यानीं आपल्या राणिवतेच्या जोरावर जर ह्या " अहो पाण्डव! " भुतभाव्यानें भावाचे होणारे अथवा देवपणाचे होणारे जे भूताचें प्रतिष्ठणें, तें जर त्यांना नच दिले, तर दोषच पदरात येणारा, व तो म्हणजे ' डावलणेचा ' होय पचभूताना भाव्य करून तेथे देवत्वच जसे उगवले आता पंचप्राणानीं आत्माच पाहिला देवच तो, श्रीकृष्णच जसा-येथें जणं काहीं पाण्डवांची व देवाची भेटच होणारी! तेथें सुख हें ब्रम्ह झाले, प्राण हाच देव झाला, आत्मा हाच परमात्मा झाला! जो श्रीकृष्ण अहो! तोच ब्रम्ह होऊन आला म्हणून अहो! तुम्ही ह्या पंचप्राणाना आत्म्याचे बळ ना, व त्याना भूतभावनाचे, पचप्राणाचे असे करा-तेथें निष्काळजी होऊं नका-तेथें प्राणापेक्षाहि प्रिय असे एक पचप्राणाचें ओवाळणेंच जणं असे करून जर असाल, तरच तेथें जण ह्या पंचभूतानीं, पंचप्राणांनीं आपले प्राण ओवाळूनच आरती केली! अग्निज्योतच तेथे लाविली! उगवं आणिली! पंचतत्त्वाना पंचप्राणानीं भाव्य करून तेथें ज्योतच जागती असे केले! असे असल्याने तेथे श्रीकृष्ण अहो! येथे तर भेटणारे होतातच व तेथें श्रीकृष्ण अहो! हेच येथें जणं बोलत असलेले असे एक निक्षून सांगणे होय आता येथे सुख तर भेटलेंच, भेटतेंच! याहिवर भगवान जे श्रीकृष्ण अहो! त्याचे असेच एक ह्या मनास उल्हसित करणारे, उत्साह देणारे असे एका आनंदाचे येणे हे होणारेच आहे प्राणापेक्षाहि प्रिय असा हा प्रसग असल्याने तेथे एकाग्र चित्तानें असावें-म्हणजे सुख हे भोगण्याची पात्रता तुमच्या अगीं येईल मी पैजेन बोलण्याचें करीत आहे, असे ते स्पष्टच असे समक्षतेन ऐकावें व्यवधानानें नडविलेले ते सावधानतेने करून अस, म्हणजे तेथें उघडेच असलेले (पर) ब्रम्ह पाहण्यात येईल म्हणून ते सुख हे इतक्या जवळ येऊनहि का बरें आपले आपणच तेथींचे सुखाचे होऊं नये असें श्रीज्ञानदेव म्हणतात.

सुखाकरितां तळमळत असलेले हे मन कशा तऱ्हेने बरे त्या सुखाचे होईल, इकडे प्रत्येक मनुष्याचे मन हें केधलेले! तेव्हां आता भगवान श्रीकृष्ण ह्यानींच हे जीवित म्हणजे एक मोठेपणच प्राप्त झालेले असें म्हणून त्यास संबोधिलें. " तें सुख हें भोग पेलण्याने निजरूपाचें होत " असे त्यानीं सांगितले.

तेव्हां आतां येथे तुम्हांस विनंति कीं, मी जे कांहीं आपणांस मागणें करीत आहे, तें म्हणजे तुम्ही मजला आपलें अवधान द्यावे–तुम्ही एकाग्र चित्तानें असावें. एवढेंच एकलें एकच आपणांस माझें मागणें आहे. कारण ह्यात्वरच आपली पात्रता भोग भाग्य भोगण्याची, सुखाची पात्रता, सुख भोग भोगण्यास तुम्ही पात्र आहात, योग्य आहात किंवा नाहीं हें तोलणारा एक काटाच जसा सांपडणार असल्यानें–तेथे एकाग्र लक्ष हेंच देऊन तुम्ही आपली योग्यता ही योग्यतेची करून असावें–येथील्या अर्थ ग्रहण करण्याची योग्यता ही पुढे करून असावें–आपण आपली योग्यता ही योग्य करून ती पात्रतेची करावी हे एकटेच एक येथे लक्षच मला देण्यानें होणारें आहे करितां येथें अनुमान करूं नका; आपलें लक्ष, अवधान मजला द्यावें. अहो, हें काय उगीच, नसतेंच, नुसतच माझें सांगणें नव्हे! तर तें एक पैजेवरच जसे बोलणें केलेले असे आहे! करिता, असे हें प्रतिज्ञेवर केलेलें बोलणें तुम्हांस तर निश्चयाचें एक घरच करून असेल. (प्रतिज्ञोत्तर, एकोत्तर, एकोत्री:—प्रश्नाला एकाच उत्तरानें सर्व त्या प्रश्नाचा भर सपविला असे केल्याने तेथें एकनिष्ठतेची योग्यता येणारी होते तसे येथें प्रतिज्ञेने सांगितलेले तें ज्ञानाप्रति ज्ञानच भेटणारे असे असल्याने, तेथे आतां सर्व संसारच सर्व भरच हा ज्ञानाचा ह्या प्रतिज्ञेच्या बोलण्यानें आपलासा केला तेव्हां येणारे विश्वासाचें असेच एक ह्या ज्ञानदृष्टीचें रम्यपण !! ) असें जे बोलणें केलेलें तें समक्ष केलेले आहे समोरासमोर स्पष्टपणें केलेलें आहे उघड उघड असेच स्पष्ट तें आहे तेथें कांहीं हें गुह्य असे नाहींच. झाकलेलें असे नाहींच–उघडपणेच मी आपणांस विनवणेंच जसे एक केलेले! करितां येथे तुम्ही एकाग्र चित्तानें असा. लक्षपूर्वक हें ऐकून घ्या म्हणजेच आपली योग्यता ही आपले पदरांत पाडून घेणें होय हे स्पष्टपणेच सांगण्याचें केलें–एक पैजेचें असेच बोलण्याचें केले! (१)

ह्या आपल्या बोलण्याने मजमध्यें अति आदर उत्पन्न होऊन आहे–मी तेथे वारंवार नमस्कारच करून आहे. आपणास वाटेल कीं, हे माझें बोलणें म्हणजे नसता एक पोकळ डौलच! परंतु तुम्ही सर्वज्ञ आहात! आपण सन्माननीय असेच होऊन आहात! तेव्हा तें जें सुख, जे केव्हाहि विटणारे असे नाहीं, (परिमळा धावे भ्रमर ओढी घेऊन गोड होतो), जें सरणारे म्हणजे संपणारे असे कधीं काळीं होतच नाहीं, एवढेंच नव्हे, तर जसजसा हा भोग (भाग्य) भोगण्याचा एकएक नव्या नव्या रुचीचा आनंद पुढे होणारा, तोहि पण येथे पुरविला जाणारा! याहिवर महत्त्व असे जे एक ग्राह्य, आदरणीय, सहज-सन्मान्य व विनयशीलतेचें असे, परम नम्रता पाहाणारें असे, भावंडच एक, तेंच तें सुख! तें तेथे सुबधतेचे असेच एक परम स्नेहवात्सल्य असून तें निजरूपच जसे निजसुखाचें झाले–येथें परमशांततेचे असे एक स्वभावसुंदरच! म्हणून येथें कांहीं डौलानेंच मी तें सांगण्याचें करीत आहे असे नाहीं तुम्हां सर्वज्ञानीं हे अजमाविलेले असेच आहे, आणि म्हणूनच तर मी आपल्याशीं सलगी करूनच विनवीत आहे कीं, येथे एकाग्र असावें, अवधान द्यावें, लक्ष पुरवावें !! तुम्हाशीं सलगी करूनच हें मागणें मी मागत आहे कीं, येथे अवधानानें असावेंच असावे. (२)

ह्या विनंतीनें अशी एक आपणास विनवणी केली: मुलीला आपलें माहेरघर म्हणजे सर्व सुखाचें एक वसतिस्थानच! तेथें महत्त्व, स्वभाव मोकळा, ज्याला त्याला हवेंच असें मनुष्यलक्षण, आदर, सन्मान, जें कांहीं मागणें तें पुरविलें जाणारें–असे घडोघडीं घडविले जाणारे असे जे सन्मान्यतेचे भार तेच तेथे वस्तीस आले–असे एक ळळा पुरविणारें माहेरचें कोडकौतुक! तेथे मनोरथ हे नृत्यच करणारे असे–गीत हें गायनच होऊन आलें असे असणारे–व आतां रसाळपणाची कमाल होऊन तेथें आहे, असणारच अशी ती माहेरानें थटविलेली अशी सर्व रम्यता, ही काय श्रीमंततेची अशीच होऊन असणार! तें सर्व सुख-निधान असेंच माहेरचें करणें! तेव्हां तुम्ही सर्वज्ञ जे आहांत, ते तुम्हीच तीं माहेरें होऊन असावें!

नव्हे आहांतच ! तेव्हां आतां सुखास उणें हें केव्हांहि नच होणारें ! तेथें सर्व सुखें हीं पुरविलेलीं अशींच असणारीं !' असें तें माहेरचें सुख तें काय उपमेनें पाहिले जाणारे असें नव्हेच !

कन्या सासुरासी जाये । मागे परतोनी पाहे ॥
तैसे झालि माझ्या जीवा । कधीं भेटसी केशवा ॥

अशी ती माहेरची मिठी, माहेरच्या सुखाची गोडी म्हणजे अवर्णनीयच ! "हुरु हुरु" होणारे असें ते मनाचें केविलवाणे होणें हे तेथील प्रसंगचित्र बरोबरच्या रीतीनें पाहविते तसे तुम्ही श्रीमंत अशीं माहेरच आहात ! यावर मी आणखी काय बरें म्हणावें !' (३)

तुमच्या कृपादृष्टीचा ओलावा हा काहीं निराळाच ! तेथे जिवंतपणाचे पाणी वाहात असलेलें ! तुमची दृष्टी ही प्रेमच प्रसवणारी अशी असल्यानें तेथें प्रेमधारा ही पान्हेली होऊन येणारी-प्रेमरस हाच तेथे आपले अंगानें असणारा ! केवढी बरें तेथें प्रसन्नता ही !! ती कृपादृष्टि ही म्हणजे दत्तप्रसन्न असे सर्वांच्या सर्व अंगांना पुरवून उरणारें असे प्रेमाचे पाहाणें ! स्वभावमहती, विचार गांभीर्य, जसे काहीं तें म्हणजे घरींच पिकविलेलें असे प्रसन्नपण-पुण्यच तें-साठा होऊन आहे-(सासिन्नले, साचवन, सासवून) साठविलेलें आहे-तेथें ही जी एकंदर बोलण्याचालण्याची धाटी, वागण्याचें कौतुक, कुटुंबवत्सलतेचा भारच तेथें वागविला जाणारा ! तो काय कुणाचे कमी पडू देणारा नव्हेच ! तेथे बोलणें व्यवहार इत्यादिनीं ह्या जीवप्राणाच्या मुळाशीं बसून असे काहीं उत्तमपण ह्या कृपादृष्टीच्या प्रेमास आणलें कीं, ती दृष्टि म्हणजे सर्व पांखरच प्रेमाची-तेथील सासलेलें, अगदीं केव्हाहि कसल्याहि प्रसंगीं तें आपले पुण्यासच आले असे प्रसन्नतेचे उभे-हे कांहीं केल्या वर्णनास येणारें किंवा सांगण्याचे होणारे असे नव्हतच !! अशी ती साऊलीच तर काय ! ती साऊली पाहून मी तर अहो-जो मी श्रांत आहे, परिश्रमानें दमून गेलों आहे तो-लोळणच घालीत आहे ! तेथे मी पडूनच राहिलो आहे !!

सांसिन्नले.—प्रसन्नता ही उगवली. तेथें प्राणच जसा भेटलाः जोडीस जोड मिळालीः सिनेचा मनुष्य सिनेचा गडी पाहून आनंदित झाला. मुग्नरास भावानीं थवथबलेली नारच भेटलीः तेव्हा आता प्रसन्नतेस उणेपण नाहीं. प्रसन्नपण प्रसन्न होऊन आलें. सहज सुख सुखसंवाद करू लागलें. तेथें खेळणें रंगाचें जे ते पाहून महादेव पशुपति हाहि पण थक्कच होऊन जाणारा !! तेव्हा आता ह्या कामकाजांना सहजपणास येणें केलें व जीवित म्हणजे जसे काहीं एक फूलच असे रमणीय. तेथे सर्व प्रसन्न असे एक संलग्नतेचे लग्नच, पाणिग्रहणच ! जसें काय तें म्हणजे येथीलच्या हरएकानीं तो भार आपलाच स्वतःचा आहे असे समजून तेथे प्रसन्नता आनंदास आली-आनंदच प्रसन्न झाला श्रृंगारानें सौभाग्य पाहिलें-व एक पूजाच जशी देवत्व पाहण्यास आलीः तेथे रसास ही उणीव नाहींच !! रस हा गोड झाला !! तरुणास तारुण्य भेटलें-प्रेमास आर्द्रता आली-समवयस्कास साम्य पाहिलें व तेथे सहज लावण्यानें तरुणीचा श्रृंगारच केला-सुरनर हे भावानें नारीचें पुरुषाचें होऊन तेथे प्रेमच रंगास आलें, रूपास आलेः तेथें मग व्याख्यान काय लाजणारें नव्हेच-लज्जा मावळली आणि तिने 'राम' नामास लिगटून राहण्याचें केलें. प्रसन्नता ही तरंग होऊन आहेः तेथें डोळे हे अथवा दृष्टी ही तरतरून आली आहेः सर्व देह हा अतःप्रसन्न असा झाला आहे

( सांचीकारे-सोकरे-सोकरी-बागडी-बागडे-सोकार-सासिन्नले सांचिन्नले मळे-परा आपली शुद्धी घेऊन चित् चित् असे भावाचे नारीपण-एक नारच जशी प्रेममुद्रेची झाली-तेथे प्रेमाचा मळा पिकला.) (४)

अशा तुमच्या त्या कृपादृष्टीच्या पाघरुणानें तर तुम्ही प्रभुपणासच पाहात आहात ! तुम्ही प्रभुच जसे तसे आहात ! तसे तुम्ही, अहो प्रभु, सुखामृताचे डोहोच आहात तुमच्या त्या सुखसरितेने

अमृतच सांचवून आहे-अमृताचा डोहो तेथें-व मी आपल्या इच्छेनें तो प्रेमाचा ओलावा मिळावा असे आषलेंपण तेथे घेऊन आहे अशा तऱ्हेचें तेथीलच्या कृपादृष्टीचें कौतुक हें मजला, हें आम्हाला आमच्या आपल्या स्व-इच्छेवरूनच तेथील ओलाव्याचें व्हावे असेच बोलवीत आहे-कीं हे प्रभु, तेथीलच्या तुमच्या कृपादृष्टीच्या कौतुकाचें आम्हीं व्हावेच व्हावे, व आतां ह्या वेळेस त्या तुमच्या नवनवतीचा होणारा असा रसपूर्ण प्रेमभार हा जर अशा प्रसन्नतेचा, तर काय मीं आतां सलगी करून आपणा-जवळचें असें नच व्हावे ? अहो, अशा या वेळेस मीं तर निकटभाराचें होऊन असावे ! जर आता येथे बिहिर्णे केलें, तर माझी ती दृष्टि ही कशी बरें निवणारी होईल ? माझें श्रातपण हें सुखाचें कसे बरें होईल ? सुख समाधान हें एक मनाचें नित्रणें-तेथील धालेंपण हें मग कसे बरें मजला भेटणारे ? दिव्यौषधि ही तनूस व्याधि टाकण्यास लावून तेथीलच्या दिव्य आनंदाच्या दिव्य सुखाचें एक धालेंपणच पदरांत टाकते-अहो, असे ह्या वेळेस आलेले आहे तेव्हां येथे त्या सुखाचें मीं व्हावे अशी सलगीच करून आहे-बिलगूनच त्या सुखास मी आहे, म्हणून येथे सुखानें निवणेंच पुढें व्हावे. (५)

अहो, तो तुमचा कृपाप्रसाद हा मिळावा अशीच इच्छा मी धरून आहे तेव्हा येथे जरी एकदमच्या एकदम तें-प्रसंगाशीं सर्व सलगी ही सुखाच्या त्वरिततेस आली-असेच कदाचित्-तेथे माझें बोलणे चालणें इत्यादि हें कधीं चुकणारे, कधी भलतेच, कधीं वाकडेंच, कधीं कधींच मुळीं तें सरलेस पाहणारे असे असल्यानें-परंतु तेथे ती जी सलगी ही जवळजवळ जशी येणारी, तसतशी आपल्या भाराची होऊन असेल-व हें पाहिलें म्हणजे जसे त्या माऊलीचें आनंदणें-आनंदानें पोटच भरलें असे ते माऊलीचें पाहाणें-आपलें बालक हें बोबडेंच बोलत आहे-त्याचें ते बोबडे बोलणे व चालणे हेहि पण तसेच ! कधीं पाय उचलला होतो कधीं अर्धाच उचलला जातो-त पायाचें ठेवणे हेहि पण वांकडेपणाचें, तसेच पाय खालीं ठेवण्यास चुकणारें-पाय ह्या जमिनीवरच मुळीं ठेवण्यास येईना असे ते त्याचे पायाचें टेकविणें-हें पाहून काय बरें केवढी बरें ती माय-माऊली-आई प्रेमास येते ! तिचे तें दृष्टीचें पान्हवणें हे जसे त्या बाळास रिझवून असते व एका पूर्ण कृपेच्या पाहाण्यासच विणारे ! तिचें रिझणें हें प्रसन्नपण अद्वियनेचें असे ! (६)

म्हणून तुम्ही संत मायबाप कृपावंत असेच आहात. तुमच्या प्रेमाचा वर्षाव हा आमच्यावर कैसेनें का, कसाहि का होईना, पण तो प्रेमवर्षाव आम्हांवर व्हावाच ! तुम्हा संताचें तें पढविणे- तेथे मी जो पढणारा व तुम्ही पढविणारे-त्या तुम्हां पढविणाराचा मी सर्वथा होऊन असणारा-जीवदशेच्या जवळ असणारा जो तिचा सख्खा भाऊ तोहि पण जीवच असल्यानें तेथे ह्या चित्ताच्या सर्वथैव अशा ओळखीचे तुम्ही होऊन आहांत-तेव्हां तुम्ही वळवाल त्याप्रमाणें हें माझें मन हें वळविलें जाणारे-आपण संत श्रीमत असेच आहात, तेव्हां तो आपला ' पढियावो ' आम्हावर कशाहि तऱ्हेनें का होईना पण व्हावाच ! आपले साहाय्यच तुम्हीं पुढे केलें आपले स्वतःचें साहाय्यास तुम्ही साहाय्य घेऊन येथी-लचा जो पढिवेपणाचा भार तोच उचलून आहांत-तो पढियावा हा आम्हास भाराचा करील-आपल्या प्रेमाचे करील-तेथील तुमचें जे काहीं एक सत्तेनेंच केलेलें बोलणें हें पढियंततेचें असें प्रेम-भार-लक्षण असल्यानें, तेथें जशी भक्ति ही काहीं जशी घरींच पिकविली गेली-भक्तीचा मळाच घरीं केला असे होईल करितां, एवढयाचकरितां मी उत्कंठित होऊन आहे-अनेक तऱ्हाची ती उत्कंठा ( आळुकी ) झाली आहे-उत्कंठा ही प्रकाराप्रकाराची होऊन आहे ( आळुकिया = आळून आळून धीर हा कसा उल्हसित होईल व तो प्रकारांनींच पाहविला गेला )-व त्या प्रेमाकरितांच म्हणून मी सलगी करून आहे.

[ पढियावो = पढवितांना जें कांहीं एक मायेचें लक्षण तें बाजूस सारून सगुणश्री हीच तेथे उगवून दिली-दर्शनाची झाली-तेथे काय मदनच जसा आपली श्री घेऊन शोभिवंत असाच एक दर्शनमहिमा:

तेथे शेजारी-पाजारी पढियंता-पढवसी ( पढोसी ) : शेजारतीच जशी केल्लेली असें त्या मदनाचें गृहच सर्व एका देहाचें असे होऊन आलें: तेथें सौंदर्य हें दृष्टोत्पत्तीस आलें. तपाचें होऊन आपलें ऐश्वर्य पाहूं लागलें. ( पढवतिये-गुरुवतिये-बोलतिये-बोलवतिये) ] (७)

मजला बोलण्याची योग्यता ही आलीच पाहिजे: योग्यता ही बोलावें कसे, चालावें कसें, असेच पाहून असते, तेथें योग्यता हीच साहाय्यभूत होऊन बोलविणारी अथवा बोलणारी होते येथें योग्यता ही बोलविली जाऊन तेथें अदृश्य असा आहे जो 'भव' त्यास तुम्ही सर्वज्ञतेनें जाणणारे असल्यानें ह्या भवभावाची होणारी जीं बोलणीं तीं तुम्ही पढियते होऊन असल्यानें तेथें काय नुसता एक जीवाचा धडा हा सारस्वतें शिकविणारा होईल ? किंवा सरस्वती-सारसर्वस्व जे ते काय सहजच असे नुसत्या देहबलावर शिकलें जाईल-पाहिलें जाईल ? म्हणून मला ती बोलणारी योग्यता ही मिळालीच पाहिजे-त्याहिवर तुमचे जे काहीं अदृश्य अशा भवाचे जाणणे तेंच येथे खऱ्याखोटयाचा निवाडा करणारे असल्यानें-तुमचे ऐकणे हेंच येथीलचे जे काय मनाचें पाहाणें-ह्या मनाची सोय करून असणे-ह्या मनासच आकळून असणें हेंच जसे काहीं तें विद्यावंततेचे होणे हें पदरात टाकील ? तेथें नुसता जीवाचा धडा करूनच केलेले पवाडयाचे गाणें हे काय सरस्वतीपुत्राच्या धडयावर-त्याने घालून दिलेल्या धडयावर-नुसतें पढण्यास देईल ?

भव म्हणजे संसार किंवा भव म्हणजे तो शंभुच जसा-तेथीलचा सर्वज्ञतेचा भाव हा जसा माझ्या बोलण्यात माझी योग्यता ही किती किंवा केवढी हें जाणतो ! तेथे परम दिव्यच जसे-कसे तें बरे ? हा एक धडाच घालून दिला-अक्षराचें वळण घेऊन तेथील जीं काहीं ज्ञानलक्षणें, संसारातील अडीअडचणी, बोलणारी योग्यता-तेथ बोलणारी तसेच बोलविणारी योग्यता ही पाहिजेच ! ती तशी सर्व योग्यता पाहाणारे आपण सर्वज्ञ असेच श्रोते आहात ! तेव्हा तेथे नुसतेंच बळ हें, डौल हा, आखडून असणें असे-त काय अनकशः असणारें जे सारनाम-नाम हेच पिकविलेलें-तें काय तेथीलच्या हिंमतीवर पढणे पढवील-शिकणें शिकवील असे नाहींच ! सागरासारखे असणारे असे ससारचित्र, तसेच ह्या अदृश्यतेन असणारा जो महादेव त्यासच जसे काहीं ऐकणें-किंवा तोच जसा काहीं स्वतःचा जसा काय किंवा जो काय असणारा सर्वज्ञ भाव हा कसा माडला जात आहे-कशा तऱ्हेने माडला असता तो त्या भवाच्या भव्यतेस पाहणारा होईल असेच जणूं ऐकणारा आहे ! तेथें भव हाच भावाचा कसा होतो किंवा होईल हेच तुम्ही, श्रोतेजनहो, व्यवस्थिततेस जणू आणून आहात ! तेथील योग्यता योग्य-किंवा बोलविणारी जी योग्यता, ती आपलें प्रमाण पाहूनच एक निवाडा देत असणारी, कीं जीवाचा धडा-बळाचें होणे-हें काहीं त्या महादेवाचे जे काहीं आकाशासहि व्यापून असणें ते काय नुसत्या धडयावरच आकळविलें जाणारे नव्हे ! येथे जीवदशेचा जेवढा म्हणून धडा, वजन, महत्त्व, मोल, जीवितनाथाचे जे दिसणे, दर्शनच एक, आत्म्याचे तेथे जसे काहीं पायानीं डोके उचलिले व आता तर्कच सर्व मावळल्यामुळें विठ्ठलच देव अथवा आत्माच प्रकाशू लागल्याने तेथे 'धडाच' आता झाला, जीवित तृणवत् झाले, सर्व जीवित देवच दाखवूं लागलें. येथें संत तुकाराम कसे बोलतात तें पाहाण्यासारखें आहे. ते म्हणतात—

माझे पाय तुझी डोई । ऐसे करी गा भाव येई ॥१॥
पाहता दिसे उफराटे । घडे तैं भाग्य मोठे ॥२॥
बहु साधन मोलाचें । यासी जोडा दुजें कैंचें ॥३॥
नका अनुमानू विठ्ठला । तुका म्हणे धडा झाला ॥४॥

तेथे सारस्वते म्हणजे मन हेंच विशेष अशा उपमेनें ठरविलेलें-तेवढयाच उपमेवर उभे करून जे काहीं एका मनूचें जसें होणें, तसे ते तेथे तो एक मनूच जणूं वर आला, व त्यानें मन्वंतरच असें

माहात्म्याचें तें करून तेथीलच्या अंगानें आकाशच व्यापिलें, गगनच आकळून घेतले: तेथें " नाम सार नाम सार " असाच ओढा, व " केशव ह्याच आपले दिव्य पाय घेऊन आला " असे ते एक विशेषशा अंगाचे होय तेथे म्हणणारें म्हणजे जसे अंगास अंग देणे, अबंधास बंध, कानास कान, नादास ऐकत्र, असेच एक अंग ! तेथे दिवौकसानीं विद्या पाहिली, तेव्हा त्याना वृषभेच्या चंद्रासच ते नामसार लिगटून असलेले दिसलें !! कृष्णसार = हरिण: मन = चंद्राचें वाहन.

[ जीवो-गुरु : (स्व-स्वस्तिक) : जीव शिवैक्य : जीव-शिव
गुरुअरुणोदयकाळीं शिव गुरुवर गीतीं गावा ।
स्वहिताकारणे आपुला आपणच विचार करावा ॥ ] (८)

**अवधारा तेसणा धुंधुरु । परि महातेजीं न मिरवे काय करूं ।**
**अमृताचिया ताटीं वोगरूं । ऐसी रससोय कैंची ॥ ९ ॥**
**अहो हिमकरासी विंझणें । कीं नादापुढें ऐकवणे ।**
**लेणियासी लेणे । हें कैं आथी ॥ १० ॥**
**सांगा परिमळें काय तुरंबावें । सागरें कवणे ठायीं नाहावें ।**
**हें गगनचि ' आड ' आघवें । ऐसा पवाड कैंचा ॥ ११ ॥**
**तैसें तुमचें अवधान धाये । आणि तुम्ही म्हणा हें होये ।**
**ऐसें वक्तृत्व कवणातें आहे । जेणें रिझाल तुम्ही ॥ १२ ॥**
**तऱ्ही विश्वप्रगटतिया गभस्ती । काय हातवेन न कीजे आरती ।**
**कां चुळोदकें अपांपती । अर्घ्यु न दीजे ॥ १३ ॥**
**प्रभु तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुर्बळ अर्चितसे भक्ति ।**
**म्हणोनी हे बोल जरी गंगावती । तरी स्वीकाराल कीं ॥ १४ ॥**
**बाळक बापाचिये ताटीं रिगे । रिघोनि बापातेंचि जेववूं लागे ।**
**कीं तो संतोषोनि वेगें । मुखचि पसरी ॥ १५ ॥**
**तैसा मी तुम्हांप्रती ॥ चावटी करितसे बाळमती ।**
**तरी तुम्हीं तोषिजे ऐसी जाती । स्नेहाची आहे ॥ १६ ॥**

(९) आवडे तेसणा=हवा तेवढा धुंधुरु=काजवा महातेजीं=सूर्यतेजापुढे रससोय-रसोय= पाकनिष्पत्ति वोगरूं=वाढणे (१०) अहो-हां हो हिमकरासी विंझणे=चंद्रास पंख्यानें वारा घालणें कैं-कहीं (११) तुरबावे=हुंगावें. आड-अड=सामावेल पवाड=विस्तार, पैस (१२ धाये=तृप्त होय. रिझाल-रिझा=संतुष्ट होणे, पोट भरणे. (१३) विश्व प्रगटतिया गभस्ति=विश्व प्रकाशित करणाऱ्या सूर्याला हातवेन=काडवातीनें आपांपति=समुद्र (१४) गंगावती=निर्गुडी (१५) रिघोनि-आणि. संतोषोनि-संतोषलेनि पसरी वोडवी=पुढे करी. (१६) मी-मी जगी चावटी=लडिवाळपण तोषिजे-संतोषिजे स्नेहाची आहे-प्रेमाची असे

तेज हे तेज खरे : परंतु तेथें एक तऱ्हेची उपमा कोटी हीच कार्यामधील धुरंधरपणा हा मोजमाप कुठे लागणारा बरे ते पाहून, तेथे जसे कांहीं ह्या दिनमानाचें वैचित्र्य तेंच जसे भोजन वेळा हीच बदलून टाकून, तेथे अगदीं सकाळींच जगी-अगदीं सात आठ वाजण्याचे आंत बाहेरच ते धुधुरमासाचे जेवण जेविल्याने, तेथें आता ती जी तोलणारी जी एक कार्यसीमा तीच ह्या जेवणाने तोलून धरून, बाकीचें जे काहीं सायं अथवा रात्रीचे प्रसंगांत तो काजवा जसा काहीं आपलें सर्व तेज बाहेर टाकून दिपवून सोडणारा होतो, तसा आतां येथें ह्या जेवणानें तें जे कांहीं एक मापणे ह्या ' धुन् ' चे, ते ध्रुव-

पदासच पाहाणारें असून, काय तेथें ती स्वर्धुनी आकाशगंगा हीच आपल्या महत्त्वास आणिली गेली: ती कुठे पाहावी तर त्या धुधुरुचे जें महिमान तेंच येथें ह्या रससोयीमध्येंच तें कसे तें समजेस आणून दिलें: तेथें भरवच एक : स्वर्धुनीचा एक धुन्-धुरु (धुरेचा योगच जसा) ह्या कोटी आपल्यास समजवूं लागला.

अहो, आणखी पुढे ऐकावे तर खरें! आपल्याला आवडेल तेवढा, आपल्याला पाहिजे तेवढा जरी काजवा घेतला, तरी तो काय महातेजाचा जो सूर्य त्याच्यापुढे मिरवणारा होणाराच मुळीं नव्हे! काय त्या काजव्याचा प्रकाश हा जसा धुधच पुढे घेतलें आहे-तेथे जसें काहीं तें दिसणारे धुके अथवा आभाळच जमिनीला टेकलें-तेथे अभ्र जे काहीं घरादारात फिरणारें! तेथील धुध ह्या "रु" नें म्हणजे जीव ज्याने-जीवानें-जीवरूनें-आपली जीवज्योत ही त्यात घालून म्हणावे सर्व तें धुध प्रकाशाचें व्हावे, तर तसे तें जीवज्योतीचें असणें तें काय त्या विद्युत्‌ची बरोबरी करणारें नव्हेच! तेथे जीव तो केवढासा, व त्यानें एवढी हाव धरावी म्हणजे भलतेंच काहीं : म्हणून म्हणणें कीं, ह्या काजव्यांच्या प्रकाशानें महातेजाचा जो सूर्य त्यात मिरवणें करणें हें केव्हाहि-त्रिकाळीं-कधीं काळीं सुद्धा होणें नाहीं. म्हणून ह्या जीवदशेनें केवढीहि जरी हांव धरली, तरी ती काय-" घेऊनि मेघाचें मान, विजू एक वेढून, बरवा गर्जतु गे माये ( ज्ञा. गा. )" त्या तपनतेजाची बरोबरी करणारी अशी होणारी नव्हेच नव्हे!!!

अहो, अमृतच वाढून आलें आहे-योगरु म्हणजे वाढणेच केले आहे-अमृताच्या ताटांत अशीं कधीं कोणी पक्वान्नें करणारा नव्हेच! रसाचा राजा जे अमृत तें ज्या ताटात वाढलें आहे, त्या अमृताच्या जोडीला मजला बसव म्हणणारी अशी रसाची गोडी-असे रसाचे येणें-हें कधीं होणेंच नव्हे, बरें, कदाचित् तेथे रसाची तशी सोय झाली, तर तो स्वयपाक म्हणजे अमृताच्या योग्यतेचा जसा होऊन आला-परतु तसे तें कसेहि केलें, तरी होणेंच नाहीं! कारण अमृताच्या जोडीला बसणारी अशी रसाना सोयच (वाणी भवाची जी तीं भावास आली: सोय पाहू लागली: प्रेमच भेटणारें झाले: तेथे ह्या मनुष्यजन्माचें कौतुक दिव्यतेचे असेच भेटलें.) मिळाली जर नाहीं-तेथे रसांना जर सोयीचें केले-परंतु तें तसे रसाना-मातृकाना-सोईचें करून अमृताच्या जोडीला बसविणें हें कसचे होणारें मुळीं नव्हे असेच! तेव्हा येथें उपमेचें कौशल्य काय महत् असे सौंदर्य पुढे करून आहे! अहो, हुरहुरु होणारा जीव हा मायेचं माणूस पाहातो-काहीं सोय लागेल कीं नाहीं असे लाचावलेलें मन मोठ्या उत्कठेने विनवणीच जशी एक असे होऊन आहे तेव्हा येथे सोईची होऊन ती अमृतधारा हीच कदाचित् आपल्या जोडीची एक कला पाहाणारी झाली, तर मग काय बहारच!! तेथें ह्या रसनेचे कौतुक जेवढे करावं तेवढे थोडेंच. रससारज्ञ तो वाणी ही सर्वदा मधुर रसच पाहणारी होते, तेव्हा येथे पीयुष जे " आख्य नारायण " त्यास हे जिव्हे, पी: तें पीयूष पिऊनच अस: निरंतर असेच करून अस!!

काय अहो, " सकल कार्य धुरंधर " अशी एक पदवी, जेथें महान् योग्यता हीच तेथे पाहून असावी अशी योजनाच एक, परंतु जेव्हां महान् तेजस्विता ही काहींका जर उचलली गेली नाहीं, तेथे त्या धुरंधरपणाचें असे तें योग्यतेचें अंग जर उपयुक्ततेनें उद्युक्त झाले नाहीं, तर काय तें योग्यतेचें केलेलें बोलणें हें पुरतें कोणीं करावे बरे? तेथें सहजच मग बोलणें झाले कीं, अमृताच्या ताटात अमृतच वाढलें जावे अशी कांहीं सोय होईल काय? किंवा ती कशी बरें होईल? तेथे असेच वाढतें कीं-असेच भासमान होत आहे कीं-हें म्हणजे एक वाटेल तेवढें जरी, वाटेल तेवढ्या व्यापानें जरी, तें कार्यधुरंधरपण असले, तरी तें पुरतें होईल, परतु तसे तें येथे होईचना, आणि म्हणून तर म्हणणें करितो कीं, महातेजाचा जो एक कार्यसहकतेचा असा सर्व कार्यधुरंधरपणाच!! तेथे कोण बरें ह्या तेजासच मिठी घालून ते धुरंधरत्व पुरतें करून घेईल? अशी एक ह्या मनास अति उत्कंठा-सोत्सुकताच एक-लागलेली

असल्यानें तेथे मग काय नच म्हणूं कीं, ह्या अशा अमृताच्या ताटामध्ये अमृतच वाढले जाईल !! तेथे कोणी सोय करील, सोय पाहील ! सोय सोय करा म्हणणारे जें सोत्सुकतेचे जीवित हे ह्या एका वाला-इतक्या सोन्यासारख्या जीवपुटीचे अंग हेच तेथें पुढे झाले व त्यानें ती सोय केली, व " दुसरे " नच पाहाता- दुसरेपण दूरच ठेविले व प्रीतिच सगळी होऊन त्यात यशच संपादन करून घेतले तरच बरे !! तेथे गतीच एक ! देवच तो एक ! श्रीकृष्णच जसा कां नव्हे ! परंतु असे हें श्रीकृष्णच तो वगैरे बोलणे करण्यापेक्षा तेथें सोयच व्हावी व त्या सोईनेंच तें धुरंधरत्व हे सहजतेचे असे-प्रतीतिच एक तेजात मिरविणारी !! तेथे काय ते शब्द (कार्यधुरंधर इत्यादि) हे अध्याहृत असेच कार्यरत झाले-तेजास आले ! (९)

अहो, चंद्रास म्हणे उकडायास लागले आहे, अहो, विंझणवारा त्यास घाला ! अहो, हा नाद जो आहे तो खरोखरीच बहिरा झाला आहे, त्यास ऐकविण्यास लावा ! हे लेणे जे आहे त्यास लेणे लेइले जाईना, त्यास लेणे लेववा ! असे जे काहीं म्हणणे हें कोणत्या गावचे कोण जाणे ! अहो, अलंकार हा आहे खरा, परंतु तो जर अंगावर घालून पाहाणे नाहीं ! तेथे अलकार हाच काय ती अलकृत अशी तनु झालाः का तनु हीच अलंकृत अशी लेण्याची झाली, सौंदर्याची झाली ! तेथे अलकार पाहिला म्हणजे ती तनु ही काय दिव्यताच अशी शोभणारी होऊन असते तशी ही रसना काय ह्या रसाचे नुसतें वर्णनच ऐकत बसली, तिने जर त्या रसाना चाखविले नाहीं, स्वतःत बाणविलें नाहीं, जर ते रस आपल्या सोईचे करून घेतले नाहींत, तर काय उगीचचे उगीचच तेथे तो रसाचा बहर उगवणारा ? म्हणून येथे ती रसना ही रसबहार पाहणारी करावीच ! तरच तेथे मग लेणे हे लेइले असेच होय- एवढेंच नव्हे, तर ते अलंकारणें हें निराळे न राहता, ती रसना हीच सर्व रसाचे एक माहेरघरच होऊन आली तेथे मग सर्व रसाना पाहण्याचे झाले, तर ती व्यक्तितच जशी पाहावी तेथे सर्व चातुर्य हेच गोळा झालेले, एकवटलेलें दिसणारें झाल्याने, तेथे ह्या मनुष्यजन्माने वागणारे असे वागीश्वरीन रूपच जसे घेतले असेच दिसणारें होऊन आलें !

त्याचप्रमाणें ध्वनि हा प्रत्येक पिंडापिंडामध्ये वाहाणारा आहेच ! तेथे ज्याने त्याने जर तो ध्वनि आपल्या योग्यतेस आणला नाहीं, महत्त्वाचा केला नाहीं, ह्या जन्माचे जे रहस्य सौरस्य त्याचा तो केला नाहीं, तर त्याचे तें ध्वनीने असणें हे काय कामाचे ? म्हणून तेथे मुख हेच जसे श्रृंगारले व त्या नामासच आणलें, कमल मुखाचे किंवा मुख कमल हे रामभजनाकरिताच दिलेले असे जे ते रामनामच मुखीं येऊन आहे, तोंडीं येऊन आहे, तरच ससारसागर तरणारें असेच ते ह्या मनुष्याचे जीवित होय ! ह्या ध्वनीचा भेद करून त्या जीविताने नामासच येणे केले म्हणूनच म्हटले कीं, ह्या नादास जे ऐकवणें तें ह्या मायाजाळाचे जें तें बाजूस करून ह्या रामनामास ऐकः हेंच त्या नादाचे एक ऐकवणे केलें: तेथे हा भव दुस्तर जरी, तरी हा मनुष्यस्वभाव रम्यतेच्या भावास आल्याने, तेथे देवच जसा तो होऊन आलाः दिव्यतेचें लक्षणच देवपणाचे असेच ते पाहूं लागले !

ह्या जीवनकलेस कांहीं ह्या संवयींना विकण्याचें करणे म्हणजे जसे कांहीं स्वतःस उकडवून त्रेणें-तेथे प्राणच मुळीं आडविला गेलाः म्हणून त्या मनःकलांना देवदिव्यतेचें अंजन हे देण्याचे कर ! देवास जा ! संतसान्निध्यांत राहा-संतांच्या गांवाला जा-देवाच्या गावचा हा असाच एक इषारा देत असलेलें-बहिर्मुखत्व हेंच नको-मनाने जोंपर्यंत हा लळा आपलासा केला नाहीं-जोपर्यंत त्यास ती देवसोय ही समजली नाहीं-त्यास ती देवसोय ही समजावीच ! त्यानें ती समजून त्यातच बसून असावे; तरच ती गोडी म्हणजे ह्या विद्यानिधीची एक सोयच लावून घेतली. तेथे विद्याविद्यानीं, आपले स्वभावाचें म्हणा अगर मनाचें म्हणा, सौंदर्य हेंच पाहूं केलेः तेथे विद्याचे महत्त्व हें काय केवढे बरें! म्हणून येथे हें बोलणें खरेंच खरें होय ! (१०)

हा परिमळ म्हणजे सुगंध जो आहे-सुवास जो आहे-त्यानें काय बरें हुंगण्याचें करावें: ह्या सागरानें कोठे बरें आघोळ करावं : किंवा हे सर्वच्या सर्व गगनच ज्यामुळे आडवले जाईल असा काय कोठें स्थळविस्तारच ( नाहीं- ) कसचा !!

जसे काहीं सुवासरूपी शद्बच त्या भ्रमराच्या आलापाने दरवळून गेला आहे. तेव्हां तेथे त्या स्वरानें काय बरे हुंगण्याचें करावे असे जर कोणीहि विचारील, तर त्यास उत्तर ते काय द्यावे कोण जाणे ! भ्रमराने फुलानाच हुंगण्याचे होतें-, जेथे त्या स्वराचे-सुवासाचे-फुलाचे हें ऐक्य होणारे, तेथे काय कुणीं काय हुंगण्याचें केले ते सागताच येत नाहीं तेथे स्वभाव भावास आला : रम्यतेचा झाला: ऐकूं लागला : तेथीलच्या जीवदशेच्या प्रेमाची गोडी त्यास सापडल्यामुळे तो त्या प्रेमरसात बुडून गेला. म्हणून येथें दोन बाजू पुढे येतात त्या म्हणजे स्वभावरम्यता ही कशी आकळून असावे ते होय, का त रम्यपण हे नसल्याच रम्यपणाच्या पुढाचे करावं बरं ! तर त तसे रम्यपणाच्या बाहेरच्या अंगाचे अधिकतर नच होऊ देता, ते स्वभावानेंच आकळून असावें: येथेच रम्यता हीच जण ह्या देहासच आलेली जी एक परिमळवजा उमलणी-बाधणी-उभारणी तीच भ्रमरानेच आकळिली जाणारी होते. रचनाकौशल्य हे तुझे कुशल असो असा आशीर्वादच घेण्याचे कर असे म्हणं लागते. तेथे मग चित्त हे जसे जाग्यावर आले व त्याने आपलेपणच पाहू केले

ह्या सागराची विस्तीर्णता ही अफाट असल्याने तेथे ब्रम्हसागरच ह्या चित्तरूपी नदीस मिळून त्यानें अक्षरानें आघोळ केली-तेथे सरित् व सागर संगमच झाला-तेथे मग ह्या नामामध्येच-नामाप्रतच येऊन तो सागर सुखाचा होणारा ! एरव्हीं नाम नाहीं तर काय त्यास सुखाचे होणे हे समजेल: म्हणून सागराने अगोदर ह्या नामास येऊन मगच तेथे त्या अक्षरआलापनाने ह्या तटिनी अथवा सरितासग-माने आपल्या यथार्थतेसच येणे केले, एरव्हीं नाहीं.

ही बुद्धि ! हे जगत् ! हे ब्रम्हाड ! ह्या मायेचा विस्तार पाहिला असता मति अति कुंठित होणारी होते: परंतु ह्या सर्व गगनासहि आम्ही हात घालू असे त्या वेदाचे अथवा शास्त्राचे आपल्या गौरवाने अति मजेदार अशीच आपली कहाणी सागणारे असे त असत. तेथे तर ह्या शास्त्रानीं, अहो, एवढेसे हे गगन आम्हास पुरेल काय ! अहो ह्या गगनास उपमा ही पुरली नाहीं: उपमेने तीस गगनासारखे म्हणूं केले, तेव्हा आता हे कसले बरं वस्त्रच एक जसे पापनाशक असे. हे गगन ते काय ! ह्याहिपेक्षा जास्त ह्या विद्यानीं अथवा शास्त्रानीं आपली महती घेऊन असणें आहे तेव्हा कुठे काहीं पराक्रम अथवा गाजणे अथवा विस्तार अथवा पैसपण-हे सर्व आकाशच त्या विद्यानीं अडविल्यामुळे येथें आता त चित्त हे काहीं काय अडविले नच जाणारे. परंतु ते अनेक दिशाचे जरी झाले, तरी ते तेथे उचलून धरिलेलें होतेच होतें तेव्हा हे चित्त म्हणजे ह्या भ्रमराना आता आकळण्यास सुलभ अति सोपे असेच होऊन आहे, कारण त निष्कारण अथवा निरर्थकतेचे असे नाहींच नाहीं तेथे विद्याभारानीं त अडविले असल्यानें, आता आपल्या स्वभावमहिम्यास त्वरिततेनें येणारे होत त तेव्हाच ह्या भ्रमराच्या आलापास ऐकणारे होऊन, तेथील भाव हे समजणारे झाल्याने, आता काय ह्या विद्याचे गारव करावे तेवढे थोडेच! तेथे जसे काहीं एक एक नक्षत्रवती आपल्या नवलावण्यास येऊन तिने म्हणजे त्या जागेने, त्या स्थळाने आपलें सृष्टीमधील सर्व रम्य असे जे एक स्थळ त्यास पाहण्याचे करावेच करावे; व तच हे जे भ्रमराचे आलापणें हे स्वभावमहतीस महती देत असलेले होय.

अशी एकादी गोष्ट मन हरण करणारी नव्हे, तर आपणच आहोत-आपणच स्वतः का बरे असूं नये-अशी एकादी परम रमणीय गोष्ट सांगितली असता, तेथे तन मन धन हे सर्व एकवटून जात, अशी ही गोष्ट म्हणजे एका प्रेमाची होय-भक्तीची होय-पराक्रमाची होय-(परतु पराक्रम हा सुद्धा

येथें भक्तिच झालेला असतो) म्हणून तितक्या तऱ्हेची गोष्ट ही काय सहजपणेंच कुणाला सांगता येणें शक्य नाहीं काय अहो, जेथें प्रेम हें आंधळें म्हटलेलें, तेथे डोळ्याची गोष्ट कोणीं बोलावी- सागरासारखाच जो भगवान आहे, तेथें आंघोळीची गोष्ट ती कुणीं सांगावी-मनानें मोठें होऊन तें सर्व प्रेम आकळावें असे तें प्रेमपराक्रमाचें बोलणें तेंच मुळीं 'केलेले' असे जर, तरच तें बोलास येणारें, एरव्हीं काय तें न करतांच बोलास येईल, व आलेंच तर तें म्हणजे एक निरसतेचें असें-अंगच, तेथे नसणारें असे-असल्याने तेथें तितका उल्हास न येणारा! अहो, परतु तसे तें न बोलणेंच बरें, कारण नच करिता जर बोललें, तर आपल्या उत्साहावरच तें बोलणे टेकले असे झाल्यानें, तेथे आतां देवतादर्शन हेंच उच्चार करून घेतलेलें बरें! काय फूल हे वासानें खोंविलें जातें-सुवास हा कुठे राहणारा-सुवासानें काय बरे डोकींत खोवण्याचें करावे- येथें सुवास हा कसा बरे हुंगणारा होईल आघ्राणणें करणें तें काय सुवासानें कशास करावे बरे तेथें तें आघ्राणणें हें नंदनवनातील जर एखाद्या नवतारुण्याचें झालें, तर तेथे एक सहजतेनेच स्वर्गास पोहोचणें तें काय बोलास येऊं देत नाहीं-म्हणून येथें करावे तरच किंवा केलेलें जे तेंच बोलास पाहूं येणारे होय. (११)

नवी जागा ही काहीं नाविन्य देत नाहीं-परंतु जे काहीं आहे त्यासच "दीर्घ कालपर्यंत जगजें कर" असा आशीर्वाद देऊन त्याच्याच अगास लिगटून असतेः त्यासच सुशोभित करतेः त्यासच आयुष्य देतेः एखादी बाजू आपले अंतर स्थलानें आपलेंसे करावे असें इच्छिते-दुसरें एक विशेषशा पद्धतीनें आपलेंसे करावे म्हणते-तिसरे तें पाण्यानें (अंगात पाणी सळसळतें तसें) पुरतें करून असावें असे म्हणतेः तसें हें असून येथे तुमचे अवधान-सावधपण प्राणच जसा आतां श्वास घेऊं लागून त्या अक्षरास पाहूं लागला-आत डोकावूं लागला-हें म्हणणे म्हणजे जसा काहीं एक तुम्हास ढेकरच आला-धालेपणानें सुखास येणें हे जसें तसें तें सुखसमाधानाचे झाल्यानें, आपला आशीर्वादच येथें कीं हे व्हावें! तेथें वक्तृत्व हें काय कुठें सापडणारे बरे, ज्यायोगानें तुमचें पोट हें भरेल! तुम्ही अंतरात रिझवून असाल! अतर हें सर्व प्राणच प्रामाण्याच्या क्रमास येऊन पंचप्राणाचें असेंच एक जिव्हाळ्याचें! पोटच्या प्रेमाचें! सुखाचें-समाधानाचें! येथे अवधानच धालें! त्याचें पोटच धालें, पोटच भरलें! व त्यानें ढेकर हा दिला!!

हें जें काव्य आहे तेथीलचा जो हृदयाभिराम असलेला असा वक्तृत्वाचा ओघ हा कसेंहि करून यावाच! परतु तो यावा असे जरी घेतलें, तरी तें कुठें सापडेल! कोणास सापडेल! परतु असें वक्तृत्व नाहींच असेंच मी म्हणतो, कारण तुम्ही जो काहीं भाग घेऊन बोलत असलेले त्या तुम्हास हें पुरतें होऊन, तेथें तुम्हास धालेपणाची विश्रांतिच आलीः तेथें परम समाधान भेटणारें असे सरस्वतीहृदयानंदाचें जें काहीं हा अर्थप्रकार पाहाणें व त्या अनेक अर्थांनाहि जेव्हां हे पुरून उरावे, व तें तुमच्या हृदयींचें असेंच जेव्हा व्हावें, तेव्हांच तुमच्या ठिकाणीं तें रिझणें येईल! तेथे समाधानानें दिव्यता पाहिली असे तें तुमचें रिझणें म्हणजे एक दिव्यच आनंदास आलें असें होणारें! तेथें तुम्हीच जेव्हा आपल्या इच्छाशक्तीनें आपलेंपण हे त्यात ओतून तेथील आनदाचें दिव्यच जसें धालेपणास आलें, तेथें केव्हांहि तुम्ही आपल्या मनापासूनच आशीर्वचन हें देऊन हें तसें व्हावेंच व्हावे असेंच प्रसन्नपणास येणे कराल! म्हणून येथें असे तें वक्तृत्वाचें पुढे येणें व्हावे-सारस्वतें वोळावीं-व्याख्यान हें आपल्या उत्तमत्वास यावें. तेथें व्यवहारादींनीं हें मनुष्यपण कसें नटविलें-श्रृंगारिलें-जणूं एक बहुश्रुततेचा गृहस्थच आपल्या नागरिकत्वाचा बहुमूल्य असा वेषच करून, तेथें व्यक्तिव्यक्तीशीं व्यवहारतांना जसे आपलें गार्हस्थ्य स्थिर करून असतो, तसें येथें त्याच्याच तोडीनें हें जर उचलण्याचें केले, तरच आपलें लक्ष हें रमविलें जाईल : आपला लक्षभार हा रमणीयत्वच पाहूं लागून, तेथे देवांगनाच जणूं आपणांस एका पुष्पहारानें मंडित करावे असेंच म्हणतीलः इतकें तें आपल्या उमाळ्याचें जर झालें तरच बरें!! (१२)

आतां आपल्ले उमाळयास येणें झाल्याने तेथे वक्तृत्वास काय उणें ? जणूं हा सूर्योदय झाला: आतां सर्व विश्व हें प्रकटतेस आलें सर्व विश्वामध्ये प्रकाशच भरून आहे. तेथे एखाद्या काडवातीनें मुद्धा काय आरती होणारी जी ती होणारी नव्हे ? ब्रह्मसागरच जेथें तुडुंब भरलेला आहे, तेथें काय एकादी चूळ भरली-त्यात एक चूळभर उदक घातले-तर अर्घ्यच जस दिले असे का न व्हावे ? एक चूळ-एक ब्रह्मचूळच गोड पाण्याची!!-त्या अपापतीच्या पाण्याने जर भरली, तर काय ते अर्घ्य दिल्यासारखे होणारे नव्हे ? गभस्ती जो सूर्य त्याने हा सर्वच्या सर्व देह-विश्वदेह-प्रकाशमान झालेला आहे-सर्व विश्व हें चित्तामध्येच येऊन बसलें-तेथें समुद्राने आपल्या एका चूळभर पाण्याने जर चूळ भरली, तर तें काहीं अर्घ्य दिल्यासारखें नव्हे काय? कारण जेथें विश्व हे वर येऊन प्रकाशित आहे, तेथे ह्या ब्रह्मसागराने जसा काहीं तो सूर्यच ब्रम्ह करून तेथे सागरासारखे जे विस्तीर्ण त्यांतील पाण्याने-चूळभर पाणी घेऊन-जर चूळ भरली, तर त त्या ब्रम्हरूपी सूर्यास अर्घ्यच दिल्यासारखे होय: जसे 'हातिवन' म्हणजे काडवातीने काय आरती केली जात नाहीं?-ती केली जातेच. जणू काहीं ती वात म्हणजे त्या सर्व विश्वास प्रकाशित असलेल्या प्रकाशामधील प्रकाशास बाजूस करून थोडीशी एक ज्योतच लाविली व तिनेच तो सूर्य ओवाळिला: तेव्हा आता त जसे ह्या काडवातीचे, तसेच येथे ह्या अपापतीचे, जेथें सर्वच पाणी मुळीं खारेच आहे, तेथ एक चूळ भरणे-एक चूळ भरून त्यात टाकणे-म्हणजे अर्घ्यच जसे त्यास देणे होय-त्या सूर्यास देणे होय. अर्घ्यच जसा ह्या सूर्यास दिला, व तोहि पण समुद्राच्या सर्व खाऱ्या पाण्यात एक चूळभर गोड पाण्याने- जसे ह्या हातान केलेल्या काडवातीने आरती ही केली जाते-तेथें सूर्यास वातच लाविली व समुद्रास अर्घ्यच दिला ( त्या सूर्यास )! तेथे सर्व विश्व हें प्रकट होऊन आहे, उदय घेऊन आहे!! फलगत जशी, तशी येथें काडवात म्हणजे अति सूक्ष्म अशी असलेली, तेथे प्रकाशज्योत हीहि पण अतितर सूक्ष्म अशीच असणार! तेव्हा जेथें सर्व विश्व हेच प्रगट झाले आहे, प्रकाशले आहे, तेथे ही वात म्हणजे काय सहज दिसणारी अशीच होय परंतु अति बारीक असणे हेच विशेष होय परंतु जेथें सर्वच प्रकाश ह्या विश्वास उदित करून आहे, तेथें ह्या काडवातीने त्याची आरती होते, होणार, होईलच, होणारच!

अहो, ज्याप्रमाणे हा गभस्ति सूर्य हाच या विश्वास प्रकाशित करून आहे असे म्हटलेले, तेथ सर्व देह, सर्व विश्व हें उदयास आले आहे-चित्त हे प्रकाशून आहे-तेथें जसे ह्या सूर्याचे ह्या विश्वाचे होणे, तसे येथे ह्या काडवातीने आरतीचे करणे, तसेच ह्या चुळीने समुद्रास अर्घ्य देणे होय. एक चूळ पाणी समुद्रात टाकल्याने त्यास अर्घ्यच दिला असे होय थोडेसे जरी त - ते पण ह्या आभासाना नाहींसे करणारे - दारुण कर्मपाशास जेथें व्युत्पत्ति अथवा विद्वत्ता हीच जशी आपला भर घेऊनच बोलणारी होते - ती आता गप्पच व्हावी असे एक ह्या विकाराना दूर करणारे असे गोड पाणीच जसे त्या सागरात टाकिलें-मिथ्यात्वे करून असलेला हा जगदाभास नाहींसा झाला: म्हणून जेथें हे चेइलेले आहे, जेथें ज्ञानसूर्य हा उगवला आहे, तेथे आरती किंवा अर्घ्य हे जसे बुद्धीला डोळस करणे होय-व अधारासहि पण दारुण प्रकाशान ह्या कार्याचे किंवा वृत्तीचे जे चेपले जाणे त नच व्हावे असेच एक विनवणे असून, तेथे गुण म्हणजेच प्रकृति ही आपल्या उत्तमतेस-शहाणपणास- येवो असेच म्हणणे होय तेथें मी काय जसा काहीं एक काडवातच असाच जरी, तरी याच्याकडूनहि तुम्ही वक्तृत्व करविणे म्हणजे काडवातीने जसे आरती करणें तसेच हेहि पण माझ्या ह्या प्रकाशरूपी काडवातीने आपण जे ज्ञानसूर्य त्यांना ओवाळूनच घेतले असे आहे. येथे पाप धूनी जाते किंवा तम विध्वंसक असा एक अर्घ्यच तुम्ही आपल्यास घेतला:,ही उपमाकोटी आपल्याच एका आशीर्वादाचें अथवा क्रियाशक्तीचें किंवा इच्छाशक्तीचें फळच असल्याने, तेथें हें मजकडून आपण तें बुद्धीवर आलेले माय अथवा अज्ञानतम हेच बाजूस करण्याचे योजिले असेच म्हटले, तरच ते पुरते होऊन येत आहे, एरव्हीं नाहीं तसेच ह

विश्व जे तें जसे, तशी अति सूक्ष्मतर अगीहि जरी ती ज्योत असली, तरी तिनें हें सर्व विश्व ओंवाळिलें होऊन तेथे महत्त्व हेहि पण येणारें होईल–जसे काय सर्व विश्वच त्या सूर्यानें प्रकाशिलें–आत्मस्वरूपच तेथें प्रकटलें–ज्ञानज्योतच लागली, सत्व हेच उत्तरोत्तर आपल्या सत्वकोटीच्या प्रकारास आलेलें, आणलेले होऊन जर असलें, तर तेथें काय सूर्य हा सर्व विश्वास प्रकाश देऊन नाहीं असे म्हणणेंच नाहीं–सर्व विश्व म्हणजे हा जो मी तुजपुढे आहे असा तो जर सूर्यानें चित्सूर्यानें प्रकटतेस आणला–उदयच तेथें विश्वाचा झाला असेच होय; म्हणून येथें सत्व हेंच शुद्ध व्हावे–सत्व हेंच सात्विक व्हावें–असेंच जेव्हां तेव्हां ह्या ज्ञानानें जसा ज्ञानसूर्याचा उदय पाहिला–तेथें सत्वास पूर आला–सत्व हें सत्व शुद्ध झालें–तेथें काय जशी काहीं एका काडवातीनेच आरती केली व एका चूळभर गोड पाण्यानेच समुद्रास अर्घ्य दिला असेच नव्हे काय ? असे करूं नयें काय ?

दारुण, प्रखरतर असे बुद्धीवर येणारे तम–तें जसे काहीं अंधत्वच घेऊन आलेलें–तेथें ही चित्ताची शुद्धीच पुढे येईना, तेव्हा आता ह्या करण्यानें, जसे काहीं ह्या अर्घ्य देण्यानें तें विश्वच प्रकाशित झालें, तेथे बुद्धि ही शुद्ध झाली, व जरी ही एक काडवातच, तरी तिनें जणं ह्या सूर्यासच ओंवाळिलें–किंवा ज्ञानाची आरतीच केली–ज्ञानसूर्यास काडवातीनेंच सूर्य असेंच म्हणं केले–ज्ञान असें म्हणं केलें–तेथें ज्ञानसूर्य उदयास आला व त्यानें सत्वास पुरास आणिलें व आरती करून जशी काहीं एक दृष्टच काढिली, व आता वक्तृत्व हेच उठाव घेऊन आलें. ब्रम्हाची एक चूळच भरली–तेथें समुद्र जो तो काय एका चुळेनें पापनिवारणार्थ केलेला अर्घ्यच जसा सूर्यास दिला असे होय (१३)

हे प्रभु ! तुम्ही देवेशाचे रूपानें आहा तुम्ही महेशाच्या मूर्तिच आहात ! हे प्रभु ! हो, अहो ! मी जो दुबळा आहे–तो तुमच्या चित्तासारिखाच, परंतु येथें भक्तीची अर्चना–याचनाच जशी तुम्हास केली कीं, अहो प्रभु ! तुम्ही प्रत्यक्ष महेश जो महादेव त्याच्याच मूर्ति आहांत, आणि अशा तुम्हा प्रभूजवळ मी एक दुबळा भक्तीची याचना करीत आहे–येथें हे जे कांहीं माझें करणे तें म्हणजे तुम्हीच अहो, हे माझे बोल जशी निर्गुंडीचीं पानें–त्रिदळेच तीं–जशीं का बेलाचीं जीं श्रीशंकरास प्रिय–तशीं हीं येथें त्रिदळे जीं त्र्यंबकास प्रिय अशीं आहेत . व हें जर तुम्हास बरोबर रीतीनें पटलें तर, अहो प्रभु, तुम्हीं हे स्वीकारावें ! ह्याचा स्वीकार करून असावें ही माझी तुमच्याजवळ अर्चना आहे ! भक्तीचें जे नऊ प्रकारानीं असणें, त्यातील ही अर्चना हीच जणूं येथें केली : तेथें ह्या अर्चिरादि मार्गास अनुलक्षून ह्या मज दुबळ्यावर आपली कृपादृष्टि असावी आपण मजला अनुगृहीत करावे–आपण हें स्वीकारावें अशीच प्रार्थना–विनंति ही जशी त्या बोलानीं बोलासच घेऊन बोलिली अशी आहे ! तेव्हां तुम्ही, हे प्रभु, हें स्वीकारालच अशीच माझी एक अर्चना–भक्तीच जशी अर्चिली असे असून, तेथे माझें दुबळेपण हें भक्तीस यावे, त भक्तीचें व्हावे, तें बोलाचें व्हावे, अक्षराचें व्हावे–म्हणजेच आपण हे स्वीकारलें आहे असेच मी समजेन. निर्गुणासच सगुण करून असलेले ते बोल हे परम दिव्यच एक बरोबर घेऊन आले आहेत असे असल्यानें, तुम्ही ते स्वीकारण्याचे करालच यांत कसलीहि शंका नाहीं (१४)

लहान बालक ह बापाच्या ताटामध्यें जेवं लागून त्यासच म्हणजे बापासच जेवूं घालणारें जर झालें, तर तेथें त्या बापाचा–बाप्पाचा–केवढा बरे आनंद, जो तिन्ही लोकींहि पुरून उरतोच–व असे त त्याचें करणे हें बापानें जसे काहीं एका महोत्सवासच येणें केलें व त्यानें आपलें मुखच पुढें करून त्या बालकाचें जे कांहीं एक बालबुद्धीचें आनंदणें–प्रसादणें–अथवा महत्त्व घेऊन असणें–आपलेंपणाच जसें त्यानें पाहिलें व तेच नटविलें–तेंच पुरवून घेतलें–त्यानें आपलें तोंड पुढे करून तो त्याचा घास गोड करून घेतला–अति गोड असेच तें त्याचें म्हणणें होणारें हें जसें कांहीं संतोषणें हेंच तेथें संतोषलें व प्रसन्न झालें ! (१५)

त्याप्रमाणें येथे मीहि पण आपल्या बालबुद्धीनें जें कांहीं बोलण्याचें करीत आहे, तें तुम्हांसच जसें एक कसे बरें तोषास आणावे, असेच एक मातेचें जे अंग त्यानेंच हें असे बोलून दाखविण्याचें धाडस केलें: व येथें स्नहाची जाति जी ती प्रसन्न होणारी-प्रेमाची जी काहीं जाति ती नेहमीं असे तोषणेंच तुम्हांस देऊन असणारी ! तेथे तुम्ही आपल्या प्रसन्नतेस येऊन असावे व मग का जे काहीं पाहिजे तें सहज मिळणारें असेच होऊन असणारें

बापाचें जे मुलाच्या ठिकाणीं असणारें प्रेम तें आपली सर्व जाति घेऊन आल्यानें, तेथें जे ' पितेव पुत्रस्य,' बापाचें मुलावर असणारें प्रेम, तें सर्वच्या सर्व एकत्रित होऊन आल्याने, तेथे आता पाहावे तो ' बाप ' ' बाप ' असेच तें प्रेम त्या मुलासच म्हणूं करणारें होतें-तेथे सहजसिद्धतेचा एक भारच त्या विशेष प्रेमजातीनें पाहिल्यामुळे, तेथें प्रेम हें चढ झालें व त्याने आता 'बाप भाग्य' असे म्हणूं केलें: तेथें भाग्यच मूर्तिमंत होऊन आलें. (१६)

**आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्ही संत घेतलेसा बौहुवे ।**
**म्हणोनि केलिया सलगीचा नोहे । आभार तुम्हां ॥ १७ ॥**
**अहो तान्हयाचें लागतां झटें । तरी अधिकचि पान्हा फुटे ।**
**रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचें ॥ १८ ॥**
**म्हणोनि मज लेंकुराचेनि बोलें । तुमचें कृपाळुपण निदेलें ।**
**तें चेइलें ऐसें जाणवलें । यालागीं बोलिलों जी ॥ १९ ॥**
**येरवीं चान्दिणें पिकविजत आहे चेपणीं । कीं वारया घापत आहे वाहाणी ।**
**अहो गगनासी गवसणी । घालिजे कैंवी ॥ २० ॥**
**आईका पाणी वोथिजवें न लगे । नवनीतीं माथुला न रिघे ।**
**तेवीं लाजिलें व्याख्यान निघे । देखोनि अयातें ॥ २१ ॥**
**हें असो शद्वब्रह्म जिये बाजे । शद्ब मावळलिया निवांत निदैजे ।**
**जे गीनार्थ मन्हाठिया बोलिजे । हा पाडु कायी ॥ २२ ॥**
**परी ऐसियाहि मज जो धिंवसा । तो पुढती याचि एको आशा ।**
**जे धिटींव करूनि भवदशा । पढियंते होवो ॥ २३ ॥**
**तरी चंद्रापासूनि निववितें । जें अमृताहूनि जिववितें ।**
**तेणें अवधान कीजो वाढतें । मनोरथां माझिया ॥ २४ ॥**

(१७) घेतलेसा-घेतलासा. बौहुवे=बहुत प्रकारें केलिया-केलिये (१८) झटे=ढुसण्या तरी-तेणें. (१९) लेकुराचेनि-लेंकुरवाचेनि. जी-मी (२०) चेपणीं=आढींत घालून वाहाणी-वाणी=मार्ग, पद्धत. वाऱ्याला कोणीं मार्ग करून दिला आहे काय ? गवसणी = वेष्टन, आच्छादन. (२१) वोथिजावे-थिजवावें=पातळ करावें. नवनीतीं माथुला न रिघे=नवनीत रवीनें कोणी घुसळीत नाहीं (२२) बाजे= पलंगावर. जे-तो (२३) धिंवसा=धैर्य. धिटींव-धिटींवा=धीटपणा, बुद्धीला डोळस करून भवदशा-भवादशा=सर्व संसारभारास पाहाणारी दृष्टि ही मजला पढियते करील : धिटाईनें आपणासारख्याची ती दृष्टि मी शिकावी व शिकवावी (२४) अवधान कीजो-अवधानें कीजे.

अहो, येथें तुम्ही पढियंते जे त्यांचेजवळ माझें सर्वच्या सर्व चित्त आहे-तेथे तुम्ही आपल्या प्रसन्नते-करितां म्हणून मजला एक वागणें देऊन आहां येथें जो कांहीं आनंद हा आनंदाप्रत येणारा-तो तिसरी-कडूनच जेव्हां आपल्या योग्यतेचा झाला असा एक वागविणें करणारा अथवा वागविणें देणारा जो हात-तोच बाहेरून दुसरीकडूनच जेव्हां तें प्रसन्नपण ह्यास देऊन असतो, तेव्हां तेथें आभार दिले जाणारे

होतात : काय तुम्ही जे पढियंते त्या तुम्हास आभार हे केव्हांहि नव्हतच-कारण ह्या प्रकृतीचीं जीं अंगे-उपांगें तींच जशीं कांहीं आपण आपल्या योजनेस घेतलीं-त्यांना योजना देऊन तेथील योग्यता ही तुम्ही आपल्या उपयोगास घेतली असल्यानें, तेथे काय मी आपणास ' आभार आहेत ' म्हणणे म्हणजे तसे केव्हाहि नच होणारे-परंतु तेच ते उपयोजनेचे सौलभ्य हे योगासच जसे तिसरीकडे आणिलें-व त्या तिसरीकडून जे योग्यता योग्य करणे हें मजमध्ये जेव्हा उतरते, तेव्हाच त्या तिसरीकडेस मी ' आभार आहेत ' म्हणणारा होतो म्हणून येथे जी काहीं मी आपणाशीं सलगी करीत आहे, तेथे आभार हे नाहींतच-तेथे आभार ते कसचे ?

तुम्हीं संतानींच आपलें संतपण हेच जरे पुढे केले-संताचीं जीं प्रशात लक्षणे तीं लक्षणे त्यानीं अंगांत बाणविण्याचें करणें म्हणजे तेथीलच्या लक्षणाचे जे बहुत प्रकार त्या प्रकारानीं ते सतपण हें सत झालें-ते मोहून गेले-संतानीं संतपणास मोहियेलें-तेथे संत संत असेच अनेक प्रकारानीं त्यास तेच तें संतपण दिले : म्हणून येथे काय ह्या माझ्या सलगी करण्याने काय तुम्हावर आभार झाले असे नव्हेच !!

आपलेपणा हा सलगीचा झाला : तेथे प्रकारच अनेक त्या सलगीचे झाले : सलगी ही प्रकाराप्रकाराची झाली : तेथे आपलेपणाने आपले असेच पटविले गेल्याने, शोभविले गेल्याने, तेथे काय त्या प्रकारानीं सतपणच सत होऊन आले-असे ते शोभविलेले सतपण जे त्याने काय ते करणें हे ' आभार झाले ' असे म्हणावे ! अहो, ज्या संतपणाने देवच मूर्तिमंततेचा देवपणाचा केला-देवपणच देवास येऊ दिले, तर ते जे प्रकारानीं सलगी करून सजविलेले, नटविलेले अथवा शोभविलेले देवपण अथवा सतपण ह्याने काय ते करणे हें ' मजवर फार आपले ओझे झाले-मजवर फार आपले आभार झाले ' असे म्हणणे नव्हेच ! कारण स्वभाव-भाव-प्रकारणा-प्रचारणा ही परीपरीची अशी तुम्हा संताना आवडून असणारी-सतपण हेंच मुळीं अनेक ज्या संतपणाच्या बाजू त्या नटविताना संतपण हे संतपणास आणले जाताना तेथे ते प्रेमच एक प्रसन्नतेचे प्रसन्नपण असल्याने, तेथे ते करणे हे माझे नव्हेच ! आभार असे नव्हेच ! ते स्वतःचें सतपणच संत झाले-आभरणच एक स्वभावाचे, ते स्वभावाचे स्वभावपरिपूरित झालेले : ते स्वतःचे असे प्रसन्नमुद्र होय. (१७)

अहो, तान्हया मुलाने जे काहीं मातेच्या स्तनास झटावे, ते तर तिजला अधिकच पान्हा फुटणारे होते त्याप्रमाणे येथे तुमचा रोषच जसा चेवविला गेला, त्यामुळे काय प्रेमच तें दुणावले होणारे हे केव्हाहिः तेथे तुमचें जे काहीं पढविणे तेंच आता वाढत्या प्रमाणाचे झाले अहो, पढविणारा जो आहे, त्यास जर झटलें, त्याचें तें ज्ञान वरच येऊन त्यास अधिक हुरूप हा आला, असे जे करणे त्याने काय त्यास प्रेमाचा जसा एक आहेर पाहाणारा होतो

तान्हया बाळाकरितां सर्व उपचार केलेले, तेथे प्रेमजाति हीच आपलें द्विगुणित झालेले असे आवडतेंपणच एक : तेथें नवीन नवीन उत्साह हा येणारा-तेथे त्या आवडतत्याच्या प्रेमानेंच एक सर्व उत्साहाचा पोषाक केला-उत्साहाचा एक रगच त्या स्वभावास आणला-तेथे प्रेम हे अनेक श्रम अनेक काम करूनहि श्रमणारें होतच नाहीं-तें अधिक अधिक असे उत्साह घेऊन येतें व हंसणारें असेच ते तेथीलचे प्रेम हें आवडलें-आवडते-आवडच सर्व एकवटली व तिने तें रंगविलें, हास्यच मधुर असे केले-तेथे हास्य हें मुग्धच असणारें असे असून तेथें मात्र श्रमभार हा परम प्रसन्नतेचा निर्वाहच ! सोयच !! (१८)

पढविला जाणारा जो त्यानें तर आपलें बोलणेंच असे कांहीं केले कीं, त्यामुळे जशा कांहीं वत्सानें गाईस ढुसण्याच दिल्या, तेथें त्या वत्साच्या त्या ढुसण्यांनीं काय ती गाय रागावली तरच पान्हा देईल ? तसे मी जे कांहीं तुम्हांस बोलणें करीत आहे, त्यानें आपले जें कृपाळुपण म्हणजे

स्वस्थतेचें असेंच असलेलें जें स्वभावदर्शन, तेंच चेववलें गेलें, व त्यानें ह्या आत्मस्वरूपाची कहाणी मन लावून सांगण्याचें केलें, तर काय मग बहारच झाली, असे कोणीहि म्हणेलः ह्या आत्मरूपाचें जें दर्शन, तेथे लागणारे जे कांहीं साहित्य, सायास अथवा साहाय्य हेंच जसे आपल्या आंतच जें पडून राहिलेले तें वरतीं आलें, व त्याने आतां ती सत्ताच जशी पुढे केलीः तेथे सुगंध हाच जसा त्या पचम आलापाने सत्तेचा झाला व त्याने आता ह्या जीवदशेची गोष्ट मोठया प्रेमानें करण्याचें केलें.

मी आपलें संताचें लेंकरू आहे–परंतु ते कसें म्हणाल, तर लेंकुरवाळी अगी जी आपली कृपा, तेथे आता संत हे अनेक मुलाचें जसे एक प्रसवणेंच केलेलें: तेथे ही विद्या हिचीं मुलेच तीं जशीं तीर्थें, व्रते इत्यादिनीं जन्मच तेथे घेतलेला तेव्हा आपण संत कसे म्हणाल, तर लेकुरवाळे असे आहात तेथे आता मी जे आपलें लेकरू आहे, ते लेकरू पण एका कृपापरिणामास उपजवीत असल्याने, तेथे कृपा ही पीयूषधारा जशी अशी होऊन आलेली आहे. तेथे ही कृपाधारा ही जशी माजण घेऊन असलेली ती अति अर्थगंभीर, महान् बलवत्तर अशी कृपाच एक, प्रसादच एक, तेथे लेकुरवाळेपणाने तें कृपापीयूष हेच जें आतापर्यंत अगदीं गभीर असेच होऊन असलेलें, नच बोलणारें, ते आता निजलेंपण–निदसुरा–कामिनी-कटाक्षाचें जसे तें आता एक डोळाच घातला असे नेत्रकटाक्षाचे उत्तम पुरुषलक्षण–पुल्लिग–घेऊन आल्यानें तेथे ते चेद्ले, चेवास आले–काय मी काहीं सागू शकत नाहीं, बोलूं नच येणारा असा मी आहे! तेथे आता ती कृपाच मुळीं 'चेत् चेत्' असेच झालें! तें आपलें प्रेम, नुसते प्रेमच तें नव्हे तर तेथे पोटचे प्रेम! अहो, लेकुरवाळीचे प्रेमच ते!– तें काय सर्व भार, प्रेमभार, पीयूषभार घेऊन आल्याने, तेथे सर्व कृपाच उगवली–लेंकुरवाळे असे जें बोलिलें, तें परम दैदिप्यमान असे चित्तहरण करणारे झाल्याने, तेथे प्रेमभार मैत्रीभार, प्रियसवादन हेंच पुढें आलें व त्यानें आता आपणच मी झाल्यानें तेथे आदर घेऊन ते उचलिलें, बोलूं केले, बोलिले, बोलण्यात आले!

अहो, जे अमृत हे चद्रापासून उत्पन्न होणारे–तेथे आता काय मजा तरी पाहा कीं, ह्या स्वभावानें पाहूं केलें कीं, हें अमृत हें नेहमींच तेथे कसे बरे उगवेल? तेव्हां त्यानें म्हणूं आदरिले कीं, हें चांदणेच मुळीं आपल्या घरींच पिकवावे, तरच तेथे, अहो, मग काय घरचीच एक सन्निधान समाधान–कृपा–अमृत-धारा–पीयूषधारा ही सहजच! तेथें ती नेहमींच उगवून असलेली! तेथे आता त्यानें सांगूं केलेलें तें पिकविणे तरी कसे होणारे बरे? म्हणून तेथे ते एक गोष्ट बोलूं लागले कीं, तें जसे काहीं एक चेपणेंच ह्या हाताचे! परतु ते करावे कोणीं? तेथें प्रयत्न तरी करीत असा असेच तें जणूं वस्तु दाखविण्याकरिता केलेलें अगुलीने दर्शविणेच एक!!

देवाचा वारा सर्वांगावर वाहाणारा असा असणारा तो वाजतो कसा, किंवा तो वारा आपलासा करून घेणें ते काय तो पातळ असा करून घ्या कसे–हें काहीं सागण्याबोलण्याचें होणारें नाहीच! परतु एवढे मात्र खरे कीं, आपलें लेंकुरवाळेपण हेंच जसे येथे तो 'चातक चद्रातें चिंतीत' असणारा असल्याने तेथें ह्या चिंतनानें तें वाऱ्याचें जें–देवाचा वारा जो त्याचें–गूढ अथवा पातळ करणे तें कसे बरे!! तेथें एकविध–एकात्म–एकनिष्ठ–एकतानता हीच पुढें चालत असल्यानें तें मुळीं एक घटकाभर सुद्धां विसरण्याचें करू नये तरच बरें! अष्टौप्रहर तें नाम अथवा चिंतन हें करीत असावेंच असावे-तेथे चिद्गगन मग आपोआपच आदरिलें जाणारें असे कर्षणच एक ह्या एकनिष्ठेस आलेलें: तेथील बोलणें मग असेच कीं, तो देवाचा आपल्या अंगावर वाहणारा वारा हा आपल्या इच्छेप्रमाणेंच वाहविला जाणाराः देवाचें अंगच जसें तें सर्व आपल्या इच्छेप्रमाणें वाहाणारें-वाजणारें- असे देवागच एक रंगाचें असें झालें!! त्यानें गुणच रंगविले व आतां तें प्रसन्न झालें. (१९)

अहो, ज्या बालकास पाहून ह्या चंद्रप्रकाशानें आपल्या योग्यतेनें असावें-म्हणजे जेथें हा मस्तकाकार हाच निरनिराळ्या बुद्धिकौशल्याच्या जागा हुडकून तेथील जे कांहीं सौरस्य ह्या वेळेस अति जरूरीचें आहे, तेंच घेऊन आहे असेच व्हावे, परंतु जर तुम्ही येथे आढीच घालून बसलात, किंवा एक दडपणच घालून तें कौशल्य दडपून टाकिले, तर काय तें प्रकाशाचे शुभ्र असे आपोआपच वरती येणारे होईल ? तर तसे तें होणारें नव्हे ! म्हणून तेथे शहाणपणाची जी एक गोष्ट तीच पुढे घेऊन चालणे केले, तर येथे मग काय बहार होईल ! कळयाचा बहर, आता फुलेच उमललीं होऊन तेथे अनि आनदच उत्साहाचा झाला: असे ते करणे कशानें म्हणाल, तर तेथे अनुकार हाच जसा चित्ताची गोष्ट गोडच जी तीच आपण बोलत आहात: तेथे काय चादणे हेच जसे पिकविले ते प्रकाशले व ह्या बुद्धीस सर्व बहर आला.

अहो, ह्या वायूस काय गति देण्याचे होतें ? हा वारा जो वाहात आहे, त्यांत काय गति घातली जाते ? परंतु येथे अनुकूलतेचा असाच त्याचा म्हणजे वाऱ्याचा कल झाला तरच बरे अहो, जो काहीं स्वभाव आपल्या भाव्यतेचा व्हावा अशी गोष्ट जर बोलिली, तर तेथे ह्या वस्तुमात्रानीं प्रस्थापित असलेले जे हें जग, तें वस्तुमात्राचे भानच घेऊन असतं : तेथे ह्या चित्तवृत्तींनीं आपले एकपणास जर नच येणें केले, तर तेथे मुळीं एकतानता हीच पसरलेली ! ती काय उपयोगाची बरे ? येथे गति म्हणून जी आहे, ती एकपणास आणण्याकरिताच असल्याने, विरक्ति म्हणून जी आहे, तिनेच जर येथे येणे केले, तरच वायु हा सध्याच्या प्रश्नास अनुकूलतेचे रूप देऊन असणार हे केव्हाहि ! म्हणून येथे निवृत्तपणास जर पाहिले, विरक्तता हीच जर आपलीशी केली, तर मात्र अनुकूलतेची गतीच एक त्या वायूस दिली असें कां नव्हे बरे ! म्हणून येथे निस्पृहता हीच पुढे घेऊन असा, म्हणजेच ते अस्ताव्यस्त झालेलें चित्त हें उत्तम अशाच गतीचे म्हणजे लक्षणाचे होऊन येणारे होईल !!

अहो, त्याचप्रमाणे गगन हेंच आतां येथे कसे आकळावे म्हणाल, तर येथे अनेक ज्या व्युत्पत्ति, अनेक जीं शास्त्रे, त्याना येथे नच येऊं देण्याने होय-ह्या गगनास काय कोणी काहीं आकळण्याचे करील असे नाहींच : तें कसल्याहि प्रकारास पुरून उरणारे असतेच : परंतु येथे त्या ज्या अनेक गोष्टी त्यानींच जर हें चिद्गगन व्यापून घेतले, तर रगच मुळीं ह्या येथे येणारे नव्हत : म्हणून आता ह्या चिद् चिद् चिद् ग्रंथीसच पुढे घेऊन तेथे नासाग्र दृष्टि ही जर स्थिर केली, तरच ते गगन हें जसे आकळलें गेलें होय ! (२०)

अहो, ज्या सगुण शोभेचें पाहाणें केलें असतां लाजलेले बोलणें हेंच उठाव घेऊ लागतें-तें नच लाजतां त्या जीवभावाची अशी एक प्रेमाची गोष्ट बोलणारे होते, तेच जर पुढे घेऊन चाललों तरच बरे !

अहो, 'काय पाणीदार' असे जें बोलणे तेथील पाणी काय पातळ करण्याने तेथीलची शोभा ही विशेषशा अशा चमकेची-चमत्कृतीची-होते ? अहो, अंगात सळसळणारे पाणी त्यास त्याची प्रेमाची गोष्ट सांगितली तरच बरें ! काय तेथें पाण (उतारा) करून-मन हें विरमवून, हिरमोड करून-म्हणजे तेथीलचें पाणी हें पातळच ज्यायोगे होईल असे केलें, म्हणजे लाज ही नाहींशी होईल ? पाणी हें सर्व तेजासारखे-मूर्तिमंत तेजच-तें काय पाण्यासारखे पातळ करण्याची जरूर नाहीं. जसे शांतपण हें सर्व शांत असे, तें लज्जेस आणण्याचें कारणच नाहीं तर तसे नव्हे कारण लज्जा ही जीवदशेची वैरीण असून तिजला ह्या जीवदशेनें आपल्या प्रेमास येणें हें मुळीं आवडतच नाहीं-म्हणून ही लज्जा हीच बाजूस केली व आपण आपल्या हुरुपास येऊन आपल्या कर्तव्यास जागलों, तरच बरें ! येथे देवदिव्यता हीच पुढें घेतली व त्या दिव्यतेनें तें देवपण हेंच आपलेपणास येऊन आपलें हितगुज हेंच बोलूं लागले.

अहो, ताकच घुसळून नवनीत काढतात-काय कोणी लोण्यासच घुसळण हें केलें असे ऐकण्यांतच नाहीं नवनीतामध्यें काय ह्या मंथनदंडाचा-मथानकाचा-रिगावा करून तेथीलचें सार-गुह्य-हें म्हणजेहि पण नवनीतच असल्याने तें कोणी करीत नाहीं: मंथा हा ताकाचा किंवा दह्याचा का नवनीताचा जर केला, तर काय तेथे नवनीत हेच जसे घुसळले: परंतु तेथे तें लाजविणें केले, तर जी रंगदेवता व्याख्यानाने येणारी तीच जर लाजू लागली, तर बरे कसचें ? म्हणून येथे नवनीत म्हणजे जे सगुण स्वरूप त्याच्याच आश्रयानें केलेलें जे-होणारें जे-तेंच पुढे होऊन आपल्या परम पदास येऊन स्थिर झाल्यानें, तेथे आठवच जसा पुढे झाला व त्याने आपले मन हें 'राम' आठवण्याचे केले, 'देव' च पाहाणे केलें. असे तें पढियतयाचे-बालकाचे-जे काहीं एक आपल्यास बोलणें केलेलें ते प्रेमच ह्या विषयास दिलें-हा जो विषय सध्या पुढे आहे त्यासच प्रेमाचें केले, महत्त्वाचें केले, गुजगोष्टच जशी एक असेच केले.

अंतर्बाह्यच ते सर्व जसें आकाशावरच एक सगुण दंड उभा केला असें झाल्यानें, तेथे लाज ही परतली व तिनें बोलणे हे व्याख्यानच रंगास आलें असे केले-तेथे ती योगिनीच आपले डोळे पाणीदार असे करून असलेली-तेथे नवनीत हेंच मुळीं दुधापासूनच दहीं-ताक घुसळण्यानेंच वर आलें व आता तेथे स्वभावतःच तो दंड हा परिणाम करून असलेला असाच होऊन आहे तेव्हा आता ह्या नवनीतावर तो दंड-मंथनदंडा-हा योजण्याचे होतच मुळीं नाहीं-तेथे तो दंडच आपली सगुणतेची नवाई पाहून असल्यानें, तेथे आता लाजलेले जे मुख तेंच आपली पराकाष्ठा ही सलज्ज लज्जतच-सविनय आवडच-एक भाराची झाल्याने येथे श्री हीच जशी रंगास आली-व व्याख्यानास रंगच एक चढला अशी झाली: असा तो सगुण भार किंवा भर हा जसा काहीं तुम्हां संताच्या लकुरवाळेपणाचा बाणाच एक-प्रधानतेचा असा कृपापीयूषभारच ! ! (२१)

अहो, जेवढे म्हणून 'शब्दब्रह्म' आहे तेवढे ज्या एका पलंगावर आपले शब्दपणास येण्यानें शिणलें म्हणजे निवांतपणे निजून असते-आपलेपणाने असते, असा तो जो श्रीगीतेचा अर्थ हा मराठी भाषेमध्ये बोलावा हे सामर्थ्य खरोखरीं पाहता माझ्यामध्ये नाहीं

असंख्याक असलेले असे जे 'शब्दब्रह्म', वैखरी, बोलणे, उच्चार, उद्गार-तेथे ह्या शब्दब्रह्मास ओलांडून जाणे किंवा ह्या शब्दाचे मावळणे झाले म्हणजे जेथे तें ब्रह्म निवातपणे झोंपच घेत असते-निजगीतच होऊन असते-निवाततेने स्व म्हणजे निज म्हणजे आपलेपणाने असणे असा जो कांहीं ह्या श्रीगीताशास्त्राचा असणारा अर्थ तो मजला मराठी म्हणजे सरळ व सोपी व सहज समजण्यासारखी जी तिनेच स्पष्टपणे-स्पष्ट करून-सांगावा असे ते सामर्थ्य हें काय केवढे बरे ! तें अपाड असेच असल्याने ते मजकडून होईल किंवा नाहीं ही शंकाच मुळीं आहे: मी त्या श्रीगीतेचा अर्थ मराठीनें सांगावा असे मजमध्ये सामर्थ्यच मुळीं नाहीं, कारण तेथील अर्थ हा महा गहन असल्यानें, अपाड असा असल्याने, ते मजकडून बोलिले जाईल किंवा कसे-हें सामर्थ्य काय मजमध्ये आहे ?

शब्दब्रह्म हे जसे आतां खटविले मेले-तेथे ह्या त्या शब्दब्रह्माने आता श्रमल्यामुळे निवांतपणच घेतलें-ते निवात असे निजलेले आहे-तेथे ते जे ह्या मराठीचें झालेले खटविणे तें आता कसे बरे पुन्हा आपल्या हुरूपास येऊन बोलणारें होईल असे सामर्थ्यच मुळीं नाहीं. परंतु भव जो अदृश्य आहे तो जर दृश्यमान झाला, तर अनेक लोक हे प्रसन्नतेस येणारे होतील-जिकडे तिकडे प्रसन्नता नांदूं लागेल ! परंतु तेवढे सामर्थ्य हें कसे बरें येणारें होईल ते समजत नाहीं-कारण तें जे खटविलेले त्यांतील ओखटें-पण हें काढून टाकून ते शब्द हे ब्रह्मच असे करून घेतल्यानें तें आतां श्रमलेलें आहे व निवांततेची त्यास झोंपच लागली आहे. परंतु तेच ह्या भवस्वर्गास पाहाण्याची इच्छा करणाऱ्या लोकांनीं जर तें नवें

जागवून केलें, तर मात्र हें होणारें आहेच आहे: तेथें भवाचीं दिव्यें हीं दिसणारीं होतील-अनेक गोष्टी ह्यांना आपलें रायपण हें आठवूं लागेल व समुद्रतेचा असाच एक भार तेथें आल्यानें लोक हे आनंदानें डोलूं लागतील; असे तें तर मऱ्हाटीचे असल्यानें तेथें हरतऱ्हेचें तें बोलवण्याचें करावेच करावे-तेथे सामर्थ्य हें पवाडा गाणारें असेंच असावे, तरच ते ह्या परम स्वरूपासच एक जागणें देऊन करणारें होईलच ! तेथें काय ह्या लोकांना बहरच आला असे होणारें-देखणें, पाहाणें, आलोकणें हें तर तेथे प्रसन्नचित्त होऊन येणारें होईल-होतील-व मग काय बहारच तेथे ! तेथे हा संसार-हा भव-हा तर जसा कां स्वर्गच भूमंडळीं पाहाण्यास मिळतो, मिळणारा आहे असे एक नांदणेच नादू लागेल ! (२२)

परतु असाहि जरी मीं तेथीलच्या अपाडपणानें निरुत्साहाचा झालेलों, तरी पण ह्या 'धीवंत' धीचा, बुद्धीचा, किंवा प्रज्ञेचा जसा काहीं एक वरसाच घेतला आहे ज्यानें, तोच आपला सर्वच्या सर्व भार घेऊन पुढे झाला, व बोलणे करीत आहे कीं, फक्त एकाच आशेवर मी तो करूं शकेन कीं, जो हा जीवदशेचा संसार हा अति विलक्षण-जेथें अनेक वैचित्र्ये हीं घडोघडीं निरुत्साह करणाऱ्या इच्छेची जी एक दशा तीच मुळीं कशी आशा लागून राहिलेली अशी नच व्हावी व तेथे उत्साह हाच प्रेरून असावे-तेथे धैर्याची परम सीमा हीच करावी लागत असून-धिटीव, मर्दुमकी, कीर्ति, संपत्ति अशा पुरुषार्थाच्या ज्या जागा त्यानींच हे पुढे घेऊन सांगण्याचें केलें कीं, हा जो दुस्तर भवसागर आहे त्याजवद्दलची गोष्ट सांगण्याचें करावें-महादुस्तर असा भव म्हणजे संसारसागर हाच आम्हास पढवावा-आम्हांस स्पष्टपणें त्यांतील पढण्याचें जे काहीं एक असेल तें सांगावे-तो संसार आम्हास पढवावा-एवढीच एक आशा कीं, हा संसार स्पष्टपणें आम्हास समजविला जाईल-आमच्या वागणुकीस, आमच्या शहाणपणाच्या वर्तनास तो साहाय्यभूत होईल अशाच प्रकारानीं तो आम्हास समजून द्यावा-व ह्याच आशेवर मी ही धिटाई जी करीत आहे, ती धीटच अशी होऊन आली आहे-तेथे 'पढियंत होवो' असाच एक आशीर्वाद आपण जे श्रीशंकराच्या मूर्तीच जशा काहीं त्याजकडून एक मागणेच केलें-अशा आशीर्वादाचें मागणेंच मी करून आहे: 'अदश' असणारा जो हा 'भव' तो स्पष्टपणें सांगण्याचें करावे.

(याचा तव हाचि मोळा । देखिला डोळा उदंड ॥१॥ तुका०) तेथे सर्व नेत्र उदंडच जसा, रूपच तो, तेथे एक नेत्रच सर्व, तो उदडपणे पाहण्यास मिळाला होतो तेथें अगात अंग सचरून जीव जोड करीत आहे असे होतें लज्जा ही जवळ येत नाहीं, व दिव्याची वातच एक तेवत असलेली असे तें बोलणें हें घरचा सर्व कारभार पाहाणारें होतें. तेथे अबोला हाच चित्त दुश्चित न करता पाहावा व मगच तें गुज सापडणारें. अशा ह्या परमेश्वराची तऱ्हा ती काय खोड म्हणावी? तेथे सर्व संसार डोळयापुढे स्पष्ट उभा होतो.

(प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥१॥ तुका०) असा हा अवघ्या रंगारंगाचा जगास प्रसिद्ध आहे. तरी सुद्धा कोणीहि त्याच्या वाटेनें जात नाहीं त्यामुळें, अहो, तेथे 'नारायणी घरबुडीच' एक. बहुतांनीं असे पूर्वी केलेलें, पण लाभ काहीं लाभानें लाभाचा होईचना, तेथे आदरच सर्व एक, मग तें काय लहान असोत कां थोर असोत, नर असोत कां नारी असोत. तेथें वेगळें झालें तर तें लोकीं पुरतें, मग पण समूळपणें उरतच नाहीं. तो कसा आहे, कोणत्या त्या दिशेस आहे, तेथे थोडा कां बहुत हेंहि कळेना. दुसरेंपणाचा भाव, भावानें दुसरा असा, तर छाया ही तेथे देखवत नाहीं, नांवामुळे दिसत नाहीं, दुजा भाव तर छाया ही नांवाची सुद्धां पाहवत नाहीं. लौकिकापाठीं या पसाऱ्यानें तर आडवून धरलें असे होतें. ही आस पुरवावी असा हा माझा एकाचा अनुभव नाहीं, पण भाव जो धराल तो उद्धरील. शरणागताचें काज, तेथील हेतु हा उतावीळ आहे. हितचिंतनीं भरवसा, मग तेथे पुन्हां गर्भवासास येणें नाहीं.

असे तें जें श्रीगीतेने कोणता अर्थ दर्शित केला आहे किंवा कुणाचा अर्थ श्रीगीता ही दर्शविते, तें मजला मराठी बोलीनें बोलण्याचे करावे-परतु तेवढे हे सामर्थ्य मजमध्ये कुठून येणारें ? परंतु एवढयाच एका आशेवर तें मी सांगण्याचे धीटपण घेतो कीं, भवादृशा हें पढियंत होवोः हा जो संसारसागर तो मजला उत्तम तऱ्हेनें पढविला जावाः तो अर्थ हा मऱ्हाटीनें कसा बोलविला पाहिजे कीं मजला माझा संसार उत्तम तऱ्हेने शिकविला असेच तें होऊन असावे-एवढयाच आशेवर मी धैर्य धरून सांगण्याचें करतो. ( भवादृश-भवदृश=अदृश जो शंकर तो ह्या संसारपुराने दृश व्हावा-तेथे काय सर्व तऱ्हेचे साहित्य हें महादेवच होऊन आलेः सर्व सुखे हीं सुखरूप झालीं, तीं तन्मयता हीच घेऊन आलीं व तन्नाम असेच दर्शवूं लागलीं. )

भवादृशा=जें ह्या संसारास पाहून लपून बसतें, जे ह्या ससारास पाहू इच्छीत नाहीं, जे ह्या ईश्वरस्वरूपास बिलगूनच असतें, असे जे त्या ईश्वरस्वरूपास भिऊनच जसे असलेलें तें सर्वच्या सर्व मजला पढवावे-तें पढविणारे जे तुम्ही त्यानीं आपला आशय हाच पुढें ठेवून तो स्पष्ट करून सांगण्याचें धाडस करावे ः तरी आता तुम्ही मजवर एवढी एक कृपाच करावी कीं, तुम्हीं आपलें अवधान हे देण्याचें करून असावे-माझे मनोरथ हे ज्यायोगे उगवूंच लागतील-मनोरथाना सिद्धि हीच जशी पाहाण्यास आली असे तुमच्या अवधान देण्याने होणारे आहे-व मग काय तेथे प्रशांत असेच चंद्रकिरणच ह्या जीवदशेच्या तृप्ततेस निववण्यास आले-जे अमृतापेक्षाहि जीवन, जीवित हें अमृतच झालें, जीवितच जीवित्वास आलें असे जें अवधान तें मजला येथे माझ्या मनोरथाना सिद्धीच पुरविणारे असे होईल-तेथे मनोरथाना एक वाढते प्रमाण येऊन तेथे अनेक मनोरथ नृत्यच करूं लागून मन हे अनेक भाराना उचलून घेऊं लागले असेच झालेले होईल. (२३-२४)

**कां जे तुमचा दिठिवा वरिखे । तै सकलार्थु-सिद्धि-मति पिके ।**
**येऱ्हवीं कोंभेला उन्मेख सुके । जरी उदास तुम्ही ॥ २५ ॥**
**सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा ।**
**तरी दोंदें पेलिती अक्षरां । प्रमेयांसी ॥ २६ ॥**
**अर्थु बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रायचि अभिप्रायातें विये ।**
**भावाचा फुलौरा होतु जाये । मतिवरी ॥ २७ ॥**
**म्हणौनि संवादाचा सुवायो ढळे । तै हृदयाकाश सारस्वतें वोळे ।**
**श्रोता दुश्चिता तरी चितुळे । मांडला रसु ॥ २८ ॥**
**अहो चंद्रकांत द्रवता कीर होये । परी ते हतवटी चंद्रींचि कीं आहे ।**
**म्हणोनि तो वक्ताचि वक्ता नव्हे । श्रोतेविण ॥ २९ ॥**
**परि आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें ।**
**काय सायखडियानें प्रार्थावें । सूत्रधारातें ॥ ३० ॥**
**काई तो बाहुलयांचिया काजा नाचवी । कीं आपुलिये जाणिवेचि कळा वाढवी ।**
**म्हणोनी आम्हा या ठेवाठेवी । काई काज ॥ ३१ ॥**
**तंव श्रीगुरु म्हणती काय जाहालें । हें समस्तहि आम्हां पावलें ।**
**आतां सांगीं जें निरोपिलें । श्रीनारायणें ॥ ३२ ॥**
**तेथें संतोषोनि श्रीनिवृत्तिदासें । जी जी म्हणोनि उल्हासें ।**
**तरी अवधारा श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाले ॥ ३३ ॥**

(२५) जे-जैं. वरिखे-वरुषे कोंभेला उन्मेख-उन्मेष सुके=अकूर येऊन वाढीस लागलेली स्फूर्ति सुकेल (२६) दोंदे पेलिती-पेलती अक्षरा प्रमेयांसी-प्रमेयांचीं=शब्दाना अर्थाची पुष्टि येईल.

(२७) बोलाचीं-बोलाटी. फुलौरा=पुष्पवृष्टि. (२८) सुवायो-सुवावो ढळे=अनुकूल वारा वाहील. दुश्चिता-दुचिता. (२९) द्रवता-द्रवला श्रोतेविण-श्रोतेनिविण (३०) सायखडियानें-सायखेयानें= कळसूत्री बाहुलीनें सूत्रधारातें-सूत्रधरातें. (३१) जाणिवेची=चातुर्यज्ञानाची. ठेवाठेवी=उठाठेवी.शी. काई-काय (३२) काय-काई सार्गी-सागे. श्रीनारायणें-श्रीकृष्णदेवे.

तुमच्या कृपादृष्टीनें महत्व-प्रसाद हाच जर वर्षू लागला, तर तेथें ही बुद्धि ही सर्व अर्थच तेथे सिद्ध होऊन आले असे होईल-परंतु जर तुम्ही उदास झालां, तर उन्मेख जो काहीं एक कोंभ घेऊन आला आहे, तोच सुकण्यास लागेल. (२५)

तरी सहजपणेंच हें सागण्याचें करितों तें तुम्हीं नीटसें ऐकण्याचें करावे कीं, ह्या वक्तृत्वकलेस जर काहीं कोणी चारापाणी घालीत असेल, तर तें एकलें अवधानच होय. ह्या अवधानानें अंकुर येऊन वाढीस लागलेली स्फूर्ति ही सुकूं देऊं नये-व तसा तो स्फूर्तियुक्त झाला, म्हणजे शद्बाला अर्थाची पुष्टी येईल : प्रमेय म्हणजे जो अर्थ सिद्धतेनें असेल, तोच तेथे पुष्टी घेऊन येईल तेथें पेलणे जसें काहीं त्या अर्थाचें-सिद्ध अर्थच तेथे आव्हान देऊन झेलला जाणारा होतो किंवा तेथे तो पुढें होऊन येतो.

ह्या अक्षरांना आतां पोटेंच आलीं-तीं गर्भ घेऊन आहेत अशीं तीं अक्षरें झाल्यानें, तेथें तो जो सलगीचा बहर हाच आपला परम दिव्य असा भार घेऊन आल्यानें तेथे वक्तृत्व हें तर अवधानानें वरच उचलून धरिले : 'प्रमाणें' हींच जशा जेथल्या तेथे बसल्याने त्यानीं आपले अनेक प्रकार अथवा अंगें व उपांगे हीच झेलतीं करून-झेलून असल्यानें, तेथे आता काय वर्षावच आपल्या कृपादृष्टीचा झाला असे होय तेथे ह्या मतीचीं, जीं अनेक अशीं सिद्धाचीं सिद्धत्वाने असलेलीं लक्षणें, तींच येथें पीक होऊन आलेलीं आहेत अशीं झाल्यानें, तेथे तुदिल असेच ह्या तनूचें एक दोंदिल होणें हें म्हणजे काय तीं अक्षरेंच आपले भोगच झेपणें घेऊन आलेलीं अशींच !!

तेथे उन्मेषलोचन जो श्रीगणपति-अथवा मतिभार हा कोंभच एक ह्या बुद्धिभारास आलेला, तो तर ह्या मतिभारानीं सिद्धाच्या सिद्धत्वानें उचलिला व्हावाच व्हावा तरच बरें-त्या सिद्धभारास जर ती मतिगगा ही आली नाहीं, तर मग काय एक सुकणेंच त्या कोंभाचें, म्हणून तुम्ही उदास असू नका-मला काय त्याचें असे म्हणूं नका-तो करितो व मी करीत नाहीं म्हणून उदास होऊ नका-म्हणून तुम्हीच हें उन्मेखणें जें त्यास पाहूनच असा, तेंच व्हा-तेथे तो कोंभ हा काय मग तुम्हासहि पण एक आनंदाचें आरोगणे हें करणारा होईलच !! म्हणून हें एक गोडच आहे, एक पीकच आलें आहे असे समजून तेथेंच आपलें अंग हें देऊनच असा. (२६)

तेथें अर्थ जो आहे तो ह्या बोलांना बोल हे केव्हां येणारे होतील बरें, अशी एक वाटच पाहाणारा असल्याने, आटलेला बोल वाटेचा झाल्यानें, तेथे प्रियकृत असेच एक प्रियासानिध्याचें होऊन तेथें प्रियपणच प्रियपणास विलें, व मति म्हणजे बुद्धीवर जशी कांहीं पुष्पवृष्टीच झाली असा एक बहारच तेथे येऊन असतो; तेथे ह्या बोलाची वाट जशी कांहीं पाहिली असा अर्थ उगवून असतो: बोल हा वाट घेऊन चालू असला, तर तेथें प्रियपण हें केव्हांहि-त्या मतिरूप वेलीला फुलाचा बहर हा येईलच ! (२७)

म्हणून ह्या संवादाचा अनुकूल असाच वारा वाहूं लागला, तेथें डोलणेंच जसे ह्या संवादानें आलें, व हृदयाकाशामध्यें सारस्वतें हींच वळणारीं-येणारीं-आवडणारीं होऊन आलीं, तेथें वक्तृत्वरसाला जसा सारस्वतेरूपीं मेघच भरून आला ! परंतु श्रोता हा जर दुश्चित झाला, तर सिद्ध झालेला रसच वितळून जाऊं लागतो !

तेथें संवाद हा बोलणेंच एक घेऊन अनुकूल असाच त्या संवादाचा जर बोल झाला-तेथे वाटच सांपडली व आतां तेथे हास्यच एक उगवलें तेथे बोलणेच एक बोलाचें होऊन रसास आलें, तेथील हातवटी हीच सापडवून घेतली असता, ती वाटच-पायवाटच-आपलीशी झाली व बहरच तेथें मग ह्या नवनाविन्यास, व बहरच बहारीचा झाला अशी एक रजनाच!! (२८)

अहो, श्रोता नसेल, तर वक्त्याचें काय उपयोजन? येथे वक्ता हा वक्ताच म्हणविला जात नाहीं, जोंपर्यंत तेथें श्रोते नाहींत! कारण द्रवणें जे ह्या मनाचें, मनाच्या मनाचें, अथवा चंद्रमण्याचें आहे ते द्रवणें हें चंद्राच्या आपल्या हातोटीनें-हातवटीनेंच-साधणारें होतें, साधणारें होऊन असतें! (२९)

परंतु आतां आम्हाला गोड करावे असे तादुळानीं विनविण्याचें कारणच नाहीं; जो सूत्रधार आहे त्यास काय बाहुलियानीं प्रार्थण्याचें होतें?

अहो, पूजनच तेथें एक ह्या 'तादुळानीं-मुळानीं' होणारे, तेथे काय हें विनवणें हें नकोच असतें: परंतु अनुमोदनाने-किंवा बोलण्यानेंच ते बोलाचे होणारे-रगास येणारे-दंग असेच ते प्रेमभार हे सूत्रधारानें आपलेसे केले: तेथे मुखेच मुळीं डवरिलीं गेलेलीं अशीं 'तादुळेच'! (३०)

काय तो सूत्रधार हा त्या बाहुल्याच्या कामकाजाना करतो-बाहुल्याचें तें काम आहे असे समजून करितो! का, तो आपली स्वतःची जी जाणिवेची कळा तीच वाढविण्याचे करितो ती कळा उत्तमतेस आणून असतो! हें काहीं समजणारे तें कसे बरे!-परंतु येथे आम्हास ह्या उठाठेवीशीं काय करायचे आहे? (३१)

तेव्हां श्रीगुरु म्हणूं लागले कीं, अहो हें काय? असे काय तुम्ही म्हणूं लागला कीं, ज्याची त्यालाच ही गोष्ट रुचणारी होते-परंतु श्रीगुरु म्हणूं लागले कीं, बरे असो: हे सर्व जे काहीं तुम्ही स्तुतीचें बोलणें बोललांत, तें आम्हास पोहोचलें: तरी आता श्रीनारायणें जे काय निरूपण केलें ते सांगण्याचें करावे. (३२)

यावर श्रीनिवृत्तिदासांना संतोष झाला व ते म्हणूं लागले कीं, अहो! आहो! हो! हो! जी! श्री! असे एक त्यांनीं आल्हादानें उल्हासाप्रत येऊन म्हणूं केलें कीं, तरी अवधारावे, आता श्रीकृष्ण जे काय बोलले तें असे:— (३३)

**श्रीभगवानुवाच—**

**इदं ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥**

गुह्यतमम् = विशेष गुह्य. प्रवक्ष्यामि = एका शिक्षेचें आवर्तन देतों. अनसूयवे=वंद्य असेच मानणारा, निंदा किंवा राग न मानणारा. मोक्ष्यसे = मुक्त होशील. अशुभात् मोक्ष्यसे=कल्याणच पुढे घेऊन असशील; बुद्धीचें अवतरणच जसे कांहीं शुभ सकल्पाचें झालें असे काज कामविलें, वंद्य वंद्य असेच घेतलें, सर्व रम्य अशीच दृष्टि केली.

इदम् गुह्यतम् तु विज्ञानसहितम् ज्ञानम् अनसूयवे ते प्रवक्ष्यामि यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे।

**श्रीभगवान म्हणाले—**

तू भक्त कसा आहेस! तर मत्सर, निंदा किंवा दोषदृष्टिरहित असा आहेस; म्हणून गुह्याचे गुह्य असें ज्ञान विज्ञानासहित मी तुला सागतो: तें जाणल्यानें तुझे कल्याण होईल. तू अशुभापासून मुक्तच होशील. (१)

ना तरी अर्जुना हें बीज । पुढती सांगिजैल तुज ।
जें कां अंतःकरणींचें गुज । जीवाचिये ॥ ३४ ॥
येणें मनें जीवाचें हीं फोडावें । मग गुज कां पां मज सांगावें ।
ऐसें कांहीं स्वभावें । कल्पसी जरी ॥ ३५ ॥
तरी परियसी गा प्राज्ञा । तूं आस्थेची संज्ञा ।
बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥ ३६ ॥
म्हणोनि गूढपण आपुलें मोडो । वरी न बोलणें हें बोलणें घडो ।
परी आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं ॥ ३७ ॥
अगा थानीं दूध कीर गूढ । परी ते थानासीच नव्हे गोड ।
म्हणोनि सरो कां सेवितयाची चाड । जरी अनन्य मिळे ॥ ३८ ॥
मुडांहूनि बीज काढिलें । मग निरोळलिये भूमीं पेरिलें ।
तरी तें सांडीं विखुरीं गेलें । म्हणो ये कायी ॥ ३९ ॥

(३४) जें कां–जें हें. (३५) मने-मानें. ही-हिंये=हृदय फोडावे-फेडावे. (३६) आस्थेची संज्ञा=मूर्तिमंत आस्था (३८) गूढ=गुप्त निरोळलिये-निर्वाळलिये=साफ केलेल्या, सिद्ध अशा.

तरी अर्जुना, हें बीज येथूनच-' भाव-भव-भाव्य '-कसें उत्पन्न झालें तेच पुन्हां सागण्याचें करितों-कारण ह्या जीवदशेचे जे कांहीं आंतल्या-अगदीं आतल्या-अशा मनापासून-अंतःकरणापासून-घेतलेले जें कांहीं गुज तेच हें आहे. (३४)

अहो, असे जर आहे, तर येथें जसे कांहीं ह्या जीवदशेचें अंतरंग स्पष्टतेस आलेलें होईल, तेथें जसे का या मनोधर्मानें तृप्तीस येऊन त्या जीवदशेच्या गोडीचें व्हावे असे जे एक आयुष्यच द्विगुणित झालें, तेथे त्या अंतरंगात बसलेले बरे नव्हे का ? आणि एवढयाकरिताच हें सागत आहे. अंतरंग हें बीजच फुटणारें होईल, व तसें तें फुटलें जर तर मग ही जीवदशाच मुळीं संपणारी होईलः तेव्हा हे तुमचें बोलणें हें मला पटत नाहीं असेच तूं म्हणशील--व मग मुज किंवा ते एक गुजराज असे जरी होऊन आलें, तरी ते काय कामाचे मुळींच नव्हे, असे जर का तुझ्या मनाने कल्पण्याचें केलें, तर सांगतों ऐक. (३५)

तरी हे प्राज्ञा अर्जुना, तूं एकंदर जी कांहीं ह्या प्राण्याची आस्था म्हणून आहे-कीं हें मजला समजावे, मीं तें जाणून आपलें कल्याण करून घ्यावें, ह्या जीवदशेच्या गोडींत बसावे, अशी आस्था जी —तिचें मूर्तिमंत असे मूर्तच आहेस, तूंच तेथील देवताच जशी असा आहेसः तेथील सर्व आस्था ही देवत्व घेऊन आली व तेंच तूं आहेसः तुझ्यामध्यें विशेष असे जें कांहीं आहे, ते एक अतिप्रियपण रंगविणारें असे आहे. तें म्हणजे जें कांहीं मी येथें सागत आहे, तें तूं केव्हांहि अवज्ञेने वागविलेंसच नाहींः ज्याप्रमाणें बोलिलें, त्याप्रमाणें जी आज्ञा ! अहो आज्ञा ! आज्ञा आहो ! जी ! श्री ! असेंच घेऊन चालत असल्यानें, तेथें प्रज्ञा हीच बलवत्तर अशीच होऊन आहे, आणि म्हणूनच तुला ' हे प्राज्ञा ' असेच संबोधिलें ! (३६)

म्हणून येथें गूढ गूढ तें काय कामाचें बरें ! तेथे त्यांतील गूढत्व हें मोडूनच जसें जावो-व वर जें न बोलावें असें आहे, तेंहि जरी बोलणें झालें, तरी कांहीं बिघडत नाहीं. परंतु एवढेंच आम्ही इच्छितों कीं, जें कांहीं आमच्या जीवीं आहे, तेच तुझ्याहि पण जीवाभावाचें असेंच होऊन असो : माझ्या जीवींचें जें गुह्यच जसें तें तुझ्या जीवींचें होवो. (३७)

अगा हे ! दूध जरी स्तनामध्यें गूढपणानें असतें, तरी तें काय ह्या थानांच्या उपयोगीं बरें ! स्तनांनीं कधीं काय म्हटलें आहे कीं, तें दूध म्हणजे फार गोडीचें असे आहे ? असे नाहींच ! आणि म्हणून तर अनन्य असा जर एक सेविता भेटला, तर तें त्याची चाड पुरविणारें होवो असेच एक तेथील गूढपण हें बोलणारेंच जसे काहीं झालें : तें सेवन करण्याची जी चाड, इच्छा, समृद्धि, ही त्या त्या किंवा तशा तशा इच्छा पुरविणारी होऊन असावी : तेथीलची गोडी ही अनेक गोडींनीं जशी कांहीं अनन्यता पत्करिली अशीच एका महिम्याची !

अनन्य सेवन करणारा जो तू त्यानें स्तनामधील दूध हें–स्तनास कांहीं उपयोगाचें नाहीं म्हणून–सेवन करूं आदरिलें : तेथील गूढत्व हें मोडून काढिलें व तेथील वाणीचें जे एक गूढ अर्थानें तेच त्या अनन्यास देऊं करून तेथें तें स्तनींचें दूध हेंच–चाड ती कसली बरें पुरविणारी असेच तें–सेवन केलेलें, तेव्हा आता ती चाड एक पुरती झाली असेच लक्षण पाहू लागली व अनन्यपण हेंच तेथे दृढतर असे होऊन आलें व त्यानें जें काहीं हरवणें–साडणें–वगळणें–इच्छाच पुरविली असे करून पाहिलें, तों तेथे काय एक अनन्यपणच मातलेलें ! (३८)

मुडामधून बीं काढून तें साफ केलेल्या जमिनींत पेरलें, तर तें काय साडलें असे झालें ? किंवा, तें काय विखुरलें असेहि झालें नाहीं असेच. (३९)

यालागीं सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती ।
परी गौप्य तऱ्ही तयाप्रती । चावळिजे सुखें ॥ ४० ॥
तरी आतां प्रस्तुत गुणीं इहीं । तूंवांचूनि आणिक नाहीं ।
म्हणोनि गुज तरी तुझ्या ठायीं । लोपूं न ये ॥ ४१ ॥
आतां किती नांवानांवा गुज । म्हणतां कानडें वाटेल तुज ।
तरी ज्ञान सांगों सहज । विज्ञानेसीं ॥ ४२ ॥
परी तेंचि ऐसेनि मिवाडें । जें भेसळलें खरें कुडें ।
मग काढिजे फोडोवाडें । पारखोनियां ॥ ४३ ॥
कां चांचुचेनि सांडसें । खांडिजे पयपाणी राजहंसें ।
तुज ज्ञानविज्ञान तैसें । वांटूनि देवों ॥ ४४ ॥
मग वारियाचिया धारसां । पडिला कोंडा नुरेचि जैसा ।
आणि अवघा कणाचा आपैसा । राशिवा जोडे ॥ ४५ ॥
तैसें जें जाणितलियासाठीं । संसार संसाराचिये गांठीं ।
लावूनी बैसवी पाटीं । मोक्षश्रीच्या ॥ ४६ ॥

(४०) चावळिजे=सांगावे. (४१) लोपूं-लपवूं. (४२) नांवानांवा=पुनः पुनः. कानडें=अवघड, कठीण. विज्ञानेसीं=प्रपंचज्ञानासह. (४३) जें-जैसे. फोडोवाडें=स्पष्ट करून. (४४) चाचूचेनि साडसें=चोचीच्या चिमटयानें. खाडिजे=वेगळे करावें देवों-देऊं. (४५) धारसां-धरसा=प्रवाहांत. पडिला-पडिला. (४६) जाणितलियासाठीं = जें जाणल्यानें पांचभौतिक शरीर पंचभूतांना अर्पण करून मुमुक्षूंस जे मोक्षाच्या सिंहासनावर बसवितात. बैसवी–बैसवे.

म्हणून सुमनसा (मनाचा चांगला) असा आहे, शुद्धमतीचा असा आहे, जो वंदनभक्ति हीच महत्त्वाची करून आहे, जो अनन्य अशाच वेगाचा आहे, अशाच बाण्याचा आहे, त्यास जरी हें गौप्य असें असलें, तरी सांगावें : मांत सुखच साधणारें असेंच होऊन जातें. (४०)

आतां प्रस्तुतच्या प्रसंगीं हे जे गुण वर सांगितले, ते तुझ्या ठायीं इतके पूर्णपणानें आम्हांस पाहाण्यास मिळत आहेत कीं, त्यायोगे आम्हास सुखच जणूं झालें, आणि म्हणून तें गुज असे हिताचें एक तें तुझ्याठायीं उगवून असो. (४१)

येथें जें कांहीं विशेष असे असणारे तें म्हणजे ह्या नावानांवाच्या ठिकाणीं असलेलें जें काहीं एक गुजगुह्य तें किती तरी असणारे ! व तें म्हणूं केलें, तर तेथे काहीं बरें वाटणारें असें होतच नाहीं-तेथे ह्या मनास अवघड वाटेल, म्हणून आता ज्या ज्ञानावरच ही उभारणी केलेली तें प्रपंचज्ञानच तुजला सहज लीलेनेंच सांगण्याचे करितों. (४२)

प्रपचासहित ज्ञान असे जे काहीं आहे तेच, आतां सांगितल्याप्रमाणे, एक अवघड असे आहे असे वाटेल तेथे बोलणें हें काय अवघड !। कर्नाट-कन्नाड=नाट लागलेले 'आड' ने म्हणजे कन्नाडने दुरुस्त करून तेथील अवघड वाटणारे-काना कडू लागणारे जे तेंच ( 'आड' ने-कन्नाडने ) दुरुस्त केले व आता प्रेमच ते एक विशेषशा आनंदाचें झाले किंवा अवघडलेले असेच एक ह्या देहाचे होणे-जेथे नांवानांवाशीं-नांवानावाच्या पाठीमागे पळत असणारे असे किंवा नावालाच तेवढे चिकटून आहे असा स्वतःचा निवाडा देणारें असे-किंवा स्वतःस निवडणारें असे असून तेथेच खरे किंवा कुडे हें असे वारंवार ह्या अनेक नावाच्या पाठीमागे येणारें ' गुजच एक ' जसे कांहीं मिळून आहे असेच ! व मग यातूनच जे काहीं स्पष्ट करून काढावे लागतें, तंच जसे आतां पारखले गेले व आपल्या प्रपचज्ञानास आले असे होते (४३)

पय आहे कां पाणी आहे हे जसें त्या राजहसाकडून चोचीने-जसे कांहीं एक साडसच (चिमटा) करून निवडिलें ज़ाणे-( ह्या चोचीच्या रूपाने तो राजहंस साडस किंवा चिमटाच एक जसे वागवीत आहे )-तसे ज्ञान व विज्ञान जे आहे तें सुजाण सज्ञानतेस आलेः स्थितीस पाहूं लागलें: अनुशीलाचे असे झालेः चिमटूनच पाहूं लागले, तो त्यास शद्बाचे ज्ञान झाले व प्रकृतीचे जे कांहीं अनुष्ठानाप्रत येणे तें जसे विज्ञानतेस आलेः तेथे अनुकूलता हीच प्रकृतीनें पाहाणारी झालीः वेदन हें बोलूं लागले किंवा सवेदन हें बोलास अनुकूल झालें-तें तुजला वाटून देण्याचें करतो. (४४)

मग जसा वाऱ्याच्या प्रवाहांत कोंडा हा मुळींच न राहाता त्या वाऱ्याच्या धारेवर एक धान्याची राशीच जशी जोडलेली होते, (४५)

तसे 'जाणणें' जें-जें जाणल्यानें जाणलें म्हणून ज्ञानाचे उतराई होण्याकरितां ससाराला संसाराची गांठच बाधली असे होऊन तेथे मोक्षश्रीचें आसन शोभविले जाऊन मोक्षच पदरांत पडणारा होतोः जें जाणल्यानें पाचभौतिक शरीर पंचभूतांना अर्पण करून मुमुक्षूस जे मोक्षाच्या सिंहासनावर बसविते : येथे जाणणे हेंच एक ' ज्ञ ' असे! (४६)

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥**

*राज् = प्रकाशणें. ज्याची जी योग्यता तींत ते बसविणें – म्हणजे संपन्नता तेथे आली प्रत्यक्षावगमम् = ज्ञान हें प्रत्यक्ष असे झालें. धर्म्यम् = धर्मरहस्याचें अनुकूल. कर्तुं सुसुखम् = आचरण्यास सुखाचे असेच एक आनंदणेंच. अव्ययम् = नच संपणारें.*

राजविद्या राजगुह्यम् इदम् उत्तमम् पवित्रम् प्रत्यक्षावगमम् धर्म्यम् कर्तुम् सुसुखम् अव्ययम् ।

ही अध्यात्म विद्या जेथे प्रकाशगारी होते, सपन्नता घेऊन येते, जेथें सर्व गुह्ये ह्या विद्येनेच महत्त्वास आलीं, असे ते पवित्र आणि उत्तम, प्रत्यक्ष अनुभवास येणारे, ज्ञान देणारें, धर्मविहित असे धर्म्य म्हणजे धर्ममय ( श्रुतिस्मृतियुक्त ) असे आहे, आचरण्यास सोपे आणि अविनाशी म्हणजे अक्षय्य टिकणारे असें आहे. (२)

**जें जाणणिया विद्येच्या गांवीं । गुरुत्वाची आचार्य पदवी ।**
**जें सकळ गुह्यांचा गोसावी । पवित्र रावो ॥ ४७ ॥**
**आणि जें धर्माचें निजधाम । तेवींचि उत्तमाचें उत्तम ।**
**पैं जया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥ ४८ ॥**
**मोटकें गुरुमुखें उदेजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे ।**
**प्रत्यक्ष नांदों लागे तैसें । आपैसया ॥ ४९ ॥**
**तेवींचि पैं गा सुखाच्या पाउटीं । चढतां येइजे जयाच्या भेटी ।**
**मग भेटलियाहि कीर मिठी । भोगणेया पडे ॥ ५० ॥**
**पैं भोगाचिये ऐलीकडे मेरे । चित्त उभें ठेलें सुखभरें ।**
**ऐसें सुलभ आणि सोपारें । वरी परब्रम्ह ॥ ५१ ॥**
**पैं गा आणिकहि ययाचें । जें हातां आलें परी न वचे ।**
**आणि अनुभवितां कांहीं न वेंचे । वरी विटेहि ना ॥ ५२ ॥**
**येथेंही जरी तूं तार्किका । ऐसी हन घेसी शंका ।**
**ना एवढी वस्तु या लोकां । उरली केवीं पां ॥ ५३ ॥**
**कां येकोत्तराचिये वाढी । जे जळतिये आगी घालिती उडी ।**
**ते अनायासें स्वगोडी । सांडिती केवीं ॥ ५४ ॥**
**तेवींचि पवित्र आणि रम्य । वरी सुखोपायगम्य ।**
**आणि स्वसुखावरी धर्म्य । वरी आपणपां जोडे ॥ ५५ ॥**
**ऐसा अवघाचि सुरवाडु आहे । तरी जनाहातीं केवीं राहे ।**
**हा शंकेचा ठावो कीर होये । परी न धरावी तुवां ॥ ५६ ॥**

(४७) विद्येच्या – सुविद्येच्या आचार्य पदवी=सर्व ज्ञानात प्रमुख आचार्यांचे स्थान ज्या ज्ञानाला मिळते पवित्र – पवित्रा. (४८) मोटके = स्वल्प नादो-फावो लागे = प्रगटते आपैसया = आपोआप (५०) पाऊटीं = पायटीने भेटलिया कीर ' ·· ···· = ज्याच्या भेटींत भोगणाराहि उरत नाहीं (५१) मेरे = सीमेवर. सुखभरे – सुखा भरे वरी – यावर (५२) आले परी – आलिया तरी. (५३) तार्किका = चतुर. या – हे. (५४) येकोत्तराचिये वाढी = एकोत्र्याच्या व्याजाकरिता

संवेदन (जाणणे) हीच एक विद्या अथवा ज्ञान हेंच विद्येचे झालें–विद्या ही ज्ञानास आली आतां गुरुपण हें जसे श्रेष्ठपणाचे झाले ते आचार्य होऊन आले, जेथे ज्ञान हे सर्व गुह्याचा गोसावी, स्वामी असे झाले याहिवर ते म्हणजे पवित्रपणाचा असा एक महारावच!

गुरुत्व हें आकर्षण करणारें असे असते. तेथे जें गुरुत्व त्यानें तर आतां ते पिकलेलें फळ हें पृथ्वीकडेसच ओढून घेतले व आपली जी गुरुत्वाची सीमा तीसच ती पृथ्वी आली तेथे जाणणे म्हणून जें आहे, तें अनेक विद्यांचें गांवचेगाव असे असल्यानें, तेथे ती पदवी हीं आचरितेन आचार हा आचार्येच झाला–तेथे अनेक गुह्ये हीं भारतीनें पाहिलेलीं अशीं असून तेथे पावित्र्य जे आहे त्या पावित्र्या-

लाहि पण एक राव किंवा स्वामी पाहिजेच, म्हणून ह्या अनेक पाविञ्याचें जें गांव त्या गांवचें-पावित्र्याचें-आता एक रावपणच उगवलें असे होणारे ते आचार-आचार वागिव-वागविणाऱ्या त्या पवित्र चर्येस एक स्वयंभ अशी गुरुमुखानें उदय घेणारी, उदयास आलेली अशी उपभोगवस्तुच एक-तेथें सौलभ्यतेनें असलेलें परब्रम्हच-तेथें जन्मांतरें हींच वाढविलीं गेलीं व एक वस्तुच तें झालें: तेथें उदयच एक आचारास आला-वागणारा वागविणारा असा झाला. (४७)

जे धर्माचें आपलें स्वतःचे असे निजधामच एक! जे अनेकशः उत्तमामधूनच निवडिलेलें, विशेषशा अशा उत्तमत्वाचें म्हणजे उत्तमोत्तम, व जे अगीं बाणलें असता पुन्हा जन्मांतरें हीं बघावीं लागतच मुळीं नाहींत: तेथे जन्मणें (मरणे) नाहींच!! संसाराचें होणें म्हणजे मोक्षच एक!! (४८)

अति स्वल्प असें ते गुरुमुखाने उदय पावणारें असें, हृदयामध्ये तर जसे कांहीं 'स्वयंभ'च-स्वयंभत्वानें असणारे असे-तें प्रत्यक्षपणेंच सहजासहजीं, आपोआपच प्रगटतें. (४९)

त्याचप्रमाणें सुखाची पायरी चढता चढताच त्याची भेट होणारी होते, व एकदा का तें भेटलें, तर त्याच्या भेटीमध्ये भोगणाराहि उरत नाहीं. (५०)

तसेच भोगाच्या अलीकडल्या सीमेवर चित्त हें जसे कांहीं सुखानें आभरून जाऊन उभेंच राहिलें-जसा कां मोर हा मेघास पाहून आनंदानें नाचूं लागतो, त्याप्रमाणें चित्त हें आभरून येतें व उभेच जणूं झालें-उभेच तें चित्त राहिले असे होऊन जातें-असे तें सुलभ असेंच सुख होय त्याचप्रमाणें तें निळया रंगानें जसे सहजच पद्धतीचें असे होणारें असून वर तें परब्रह्म असेंच होऊन येतें. (५१)

अगा, हें जे सांगितलें त्याहिवर आणखी कांहीं सांगणें आहे, तें म्हणजे त्याच्याबाबत जें काय बोलणें तें म्हणजे ते जसे काय हातींच आलें असे वाटणारें, अगदीं आपल्या हातचें असे जरी होऊन आहे असे वाटलें, तरी ते सापडणारें होतच मुळीं नाहीं: त्याचप्रमाणें तें अनुभविण्याचें केलें, तर आपलें त्यामध्यें कांहींहि खर्च होत नाहीं-एवढेच नाहीं, तर त्याबद्दल मुळींसुद्धा ह्या मनानें वीट घेतला जाणारा नव्हे: तेथे मन हें विटतच मुळीं नाहीं. (५२)

हे चतुरा, तूं जर येथे अशी शंका घेशील कीं, ही अशी एवढी वस्तु या लोकांमध्ये कशी उरली बरें? हा मृत्यु लोक, त्याहिवर कार्यभूमि असे असूनसुद्धा, ही जी उत्तम अशी एक, देवलोकचा दर्जाच जिला येऊ शकतो अशी, ही वस्तु ह्या लोकीं कशी उरली असेल कोण जाणे? (५३)

चंद्राच्या कला ज्याप्रमाणें उत्तरोत्तर वाढतच जातात-तेथें अमावास्येस जसे कांहीं त्याच्या कला पूर्ण झाल्या व पूर्णिमेस तो मुळीच कला नाहींत असा: आयुष्यास तारुण्यानें सुशोभित असेच केलेलें. तेथें सुख हें काय एकच उत्तर देऊन असलेलें कीं, तें सुख हें उत्तरोत्तर आपलें वाढतें प्रमाण घेऊन असणार-ज्याप्रमाणें हा देह हाहि पण दिवसेंदिवस वाढच घेऊन असलेला: असे तें एकोत्तर एकाहून एक वरचढ किंवा एक उत्तरच जसे पाहून तें सुखच दिसूं लागलें व असे ते या देहमुद्दलावर उभारलेलें हें व्याजच ह्या सुखाचें असणें हें सहजत्वेंच प्राप्त होणारें असे पाहून ज्यांनीं "हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते" अशा त्या कामाग्नीमध्येच उडी टाकण्याचें केले, किंवा जे असे करितात, ते आपली जी स्वसुखाची गोडी ही केव्हांहि सांडणें करीतच नाहींत: अनायासेकरून प्राप्त होणारी, सहजसाध्य असणारी जी ही स्व-गोडी ही सांडीतच मुळीं नाहींत.

एकोत्र्याच्या व्याजाकरितां:-'दशसहस्र' असें उत्तमामधीलहि उत्तम, तेथें या अधिक उत्तम असें 'तर' अथवा उत्तर असे नसणारें-तेथें वाढच एक त्या त्या 'तर' अशा भावास-उत्तरोत्तर वाढतेंच आहे प्रमाण ज्याचें असें तें जें ह्या मुद्दलावर व्याजाचें उभारणें, तें घेऊन जसें तें एका स्वगोडीचें असें उभें राहण्यास मिळणारें, तें जसें इंद्रियानळ हेंच पेटविलेलें असें एक त्यामध्ये वहिवाटणारें असल्यानें, तेथें

ती गोडीच त्यांनीं घेतली व त्याच व्याजावर आपली सहज साधणारी ही गोडी अनायासेच पदरांत पडणारी झाल्यानें, तेथेच ते चिकटून राहून, जसे या कामविकाराचें-कामक्रोधादि रिपूचे-स्वभाराचें असे तें मनुष्यपण हें ह्या मनुष्यपण मुद्दलावर एक तें धर्म्य असे व्याजच उभविले, व तें व्याजच मुळीं परम रम्य असे पवित्रच एक-आपणांस सहजच जोडून घेणारे असल्यानें, तेथे इधन अथवा समिधा ह्या, ह्या मनुष्यजन्माचे जे मुद्दलासच तपाचे करणे-तप करणें-तपणे-सेवा करणे-सेवा करून असणें, इत्यादि जे व्रताचे अथवा नियमाचे भार घेऊनच हीं व्रतें आपलेपणास आलेलीं, तेथे ती सेवा ही केली नाहीं, तपणे झालें नाहीं, व्रत आचारिले नाहीं, तर जसे हें मुद्दलच लावून दिलेली रक्कमच एक हा स्वभाव व त्या 'स्व' भावावर उभे केलेलें ते व्याज. तें 'स्व' गोडीच एक आपल्यास जोडून घेणारी, आपला सर्व संसार करणारीः सर्व काहीं सुखें हीं आपणास मिळालीं-घरदार, बायकापोरे हींच उगवूं लागलीं, स्थिर झालीं, आपणास आपलेंपण सापडलें असें त 'स्व' हें गोडगोडच होऊन असणारें-तेथे आता त पवित्र, रम्य, सुखोपायगम्य, स्वसुख, परमधर्म्य आपणच झालें असें! देवलोकचे असे कसे ते! (५४)

याहिवर त्याजविषयीं बोलायचे झाले, तर ते जसे एक पावित्र्यच भेटले. रम्यताच त्या स्वभावाने वरीली, त्याचप्रमाणे सहजच तेथे उपाय हा जसा आपण होऊनच उपायाचा झाला, उपाय योजनेचा झाला, तें सुगम्य म्हणजे सहजतेने जाणलें जाणारे असेचः तें असे स्वसुखाचे असून त्यासच जणूं परम म्हणजे श्रेष्ठपणाचे असे एक धर्म्य आपण होऊनच वरणारें असेः शुद्ध आनदरूप सोप्या साधनानीं प्राप्त होण्याजोगे असे एक आत्मानद सुख मोक्षधर्मासबंधीं असून इहपरत्रीं सुख देण्यास योग्य असेच तेंः याहिवर ते म्हणजे जसे आत्मस्वरूपासच येऊन मिळाले असे असणारे (५५)

असा हा जसा कांहीं देवलोकचा एक 'आत्माराम' च सुखाचा होय, तरी तें सुख ह्या जनाकरिता कसे वरें चुकून राहिले असेल-ते कसे बरे ह्या लोकाकरिता उरलें असेल-ते ह्या लोकाकरिता उरलेलें असेल-उरेल-उरून असेल असे कसे बरे! अशी एक शका घेण्यास ज गा आहे हे केव्हांहिः परतु तशी शंका तुवा केव्हाहि घेऊं नये शंका घेण्यास झालेले स्थान ते तू केव्हाहि पाहूं नको. म्हणजे येथे शका ही मुळींच धरू नये हे जे सुख आहे तें तर ह्या जनानीं पारचे पार लुटूनच घेतले असेल, व असे जर झाले तर मग ते सुख सुख या संज्ञेचे असे कसे उरणारें होईल बरे अशी शकाच येते परतु ती तशी शका तूं काहीं घेऊं नको. सर्व सुख हें देवलोकाने नेले, म्हणून तें येथे चुकूनमुद्धा उरून असणे नाहीं देवलोकचे ते या भूलोकावर असणारे असे नाहींच-परंतु अशी शका घेऊ नको-ते ह्या लोकीं कसे भेटणारे ते सागतो (५६)

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

अश्रद्दधानाः = श्रद्धा न ठेवणारे पुरुषाः = (का) पुरुष धर्मस्य अस्य = ह्या तत्त्वज्ञानरूपी धर्मावर. परंतप = शत्रूंना ताप देणाऱ्या निवर्तन्ते = परिभ्रमण करीत असतात मृत्युसंसारवर्त्मनि = जन्म मरण-संसारचक्रांत : मरणे व पुन्हां संसारास येणें अशा भवतापामध्ये : मरणें व संसरणे म्हणजे पुन्हा जन्मणे हींच कोणीं कारणें व येथील जो वर्त्मा म्हणजे अव्यक्त (अग्नि) ह्यामध्ये वर्तन्ते-आवर्तन्ते-निवर्तन्ते च-विनिवर्तन्ते च.

परंतप, अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः माम् अप्राप्य मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तन्ते ।

हे शत्रुतापना अर्जुना, ह्या तत्वज्ञानरूप धर्मावर जे श्रद्धा ठेवीत नाहींत, ते पुरुष मजला नच प्राप्त होतां मरणे व जन्मणें रूपीं ससारात परिभ्रमण करीत असतात ( जसें तापाना भोगून असतात. ) (३)

**पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदराआड ।**
**परी तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धचि घेती पाहीं ॥ ५७ ॥**
**कां कमळकंदा आणि दर्दुरी । नांदणुक तरी एकेचि घरीं ।**
**परी पराग सेविजे भ्रमरीं । येरां चिखलचि उरे ॥ ५८ ॥**
**नातरी निदैवाच्या परिवारीं । लोहया रुतलिया आहाती सहस्रवरी ।**
**परी तेथें बैसोनि उपवास करी । कां दरिद्रीं जिये ॥ ५९ ॥**
**तैसा हृदयामध्यें मी राम । असतां सर्व सुखाचा आराम ।**
**कीं भ्रांतासि काम । विषयावरी ॥ ६० ॥**
**बहु मृगजळ देखोनि डोळां । थुंकिजे अमृताचा गिळिता गळाला ।**
**तोडिला परिसु बांधिला गळा । शुक्तिका लाभें ॥ ६१ ॥**
**तैसें अहंममतेचिये लवडसवडी । मातें न पवतीचि बापुडीं ।**
**म्हणोनि ते जन्ममरणाचिये दुथडीं । डहुळतीं ठेलीं ॥ ६२ ॥**
**येऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रती भानु जैसा ।**
**कहीं दिसे न दिसे ऐसा । वाणीचा नव्हे ॥ ६३ ॥**

(५७) अशुद्धचि = रक्त. घेती पाहीं – सेवी. (५८) दर्दुरी = बेडकाला. (५९) परिवारीं– परिवरीं = घरीं. लोहया–लोहा = कढया, मोहराचे हंडे. रुतलिया = पुरलेल्या. (६१) थुकिजे–थुकिला. शुक्तिका लाभें = शिंप हातीं लागतां लवडसवडी = गडबडींत. डहुळतीं ठेलीं = गटंगळ्या खात. (६३) कहीं दिसे – केहि नसे, वाणीचा = न्यूनाधिक होणारा.

अहो, हें पाहा कीं, दूध हे पवित्र असून गोडहि असतें, तसेंच तें त्वचेच्या पदराआड असणारे; परंतु तें अव्हेरूनच गोचिड जे आहेत ते अशुद्ध काय सेवन करीत नाहींत ? (५७)

कमल-कंद आणि बेडकी हीं दोन्ही एका सरोवरातच राहणारीं ,परंतु त्या कमलकदामधील पराग हे भ्रमरांनीं सेवन करावेत व त्या बेडकींना काय उरलें तर शुद्ध चिखलच !

भ्रमर व बेडकी ह्याना समोरासमोर बसवून तेथे त्या जिव्हेची व ह्या स्वरूपाची एक गाठच उपमेनें पडणारी होतेः तेथें स्वरूप हेंच एक उरलेलें तें ह्या शद्वानेंच स्पष्ट केलें व आतां तेथे परम दिव्य असेंच तें एक परागसेवन होऊन तेथे भ्रमरच तो मग आलाप करणारा होऊन असतो (५८)

दैवहीन मनुष्याच्या घरीं हजारों जरी ‘ लोहया ’ असल्या (मोहराचें हंडे पुरलेले), तरी तेथे बसून–निदैवच जसे–तो उपवासच करून असतो–जसा कांहीं एक ह्या जीविताचे सौख्यच कुठे आहे म्हणून विचारणारा असा दु.खीच !!

परवर, परिवर, परिवारः—काय ह्या शद्वाच्या संसारांत–घरांत–एक रुतलेंपणच ह्या मोहरांनीं भरलेल्या कढयाचें–लोहयाचे–तेथील रुतलेपण, खुपलेंपण, खुतलेंपण, खुबलेंपण हें त्या कढया रुतल्याच आहेत जमिनींत–घरात–परिवारात–परिवरात– परवरात–तेथे तो शद्वच मुळीं ओळखीचा, खुणेचा असा नच सांपडल्यानें, तेथे हा शद्वच मुळीं सुवर्णाचा–तो न सापडल्याने तेथे जरी अनेक सहस्र अशा मोहरानीं भरलेल्या कढया जरी त्या घरात असल्या, तरी तो शद्व जर पुरविता आला नाहीं, तर काय मग दैव हें तेथे लपलेलें तें न सांपडल्यानें, काय उपासच करणे असे होतें. दैवच नाहीं- शद्वच सांपडेना–काय मग उपयोग ह्या जमिनींत असलेल्या द्रव्याचाः म्हणून तो शद्व अगोदर जाण व मग तेथें दैव हेंच तें सर्व द्रव्य सांपडवून देणारें होईलच !! (५९)

ज्याप्रमाणें अंतःकरणाच्या ठिकाणीं मी-श्रीराम असा जो सर्व सुखांना आरामच देणारा असा-कल्पवृक्षाचा बागच जसा असा-असून जे भ्रांतचित्ताचे त्यांना काय हा विषयच गोड होऊन बसला आहे पाहा ! !

खाणेंपिणें, सहल करणें, मजाच एक ! चैनच जशी पदरांत पडली असें हास्यच एक पिकविलेलें-तेथें विषय हेच माज दिलेले झाल्यानें ह्या मनुष्यानें ते सोडण्याचें कां बरें करूं नये ? तेथे सहज, वक्तशीर, आपल्या हातचे असेच जेव्हां ते विषय करावेत, तेव्हांच ते उपयोगास येणारे ह्या हृदया-मधील जो स्व-आत्माराम हाच मुळीं ऐकविला जात नाहीं-त्यास ऐकणें होईना-त्याचें ऐक; तो सुखच तुझे पदरांत टाकील ! परंतु ह्या विषयापुढें त्यास पाहाणें हें होईच ना ! परंतु आता असे कर कीं, ही बुद्धि भ्रांत करून असूं नकोस. (६०)

डोळयानीं मृगजळच पाहिलें, परंतु ह्या कंठामध्यें उतरणारें जें कांहीं एक तेज तें जसे अमृतच, तें सेवावे कीं नाहीं ? परंतु ह्या मृगजळाच्या धावेनें ह्या थुकण्यावरच-कायम हांवच नाहीं असेच-परिणाम करून घेऊन तो कंठामधील अमृताचा गळाळा अथवा चूळ ही थुकूनच जशी टाकावी असे होतें : तसेंच परिस नांवाचा दगड हा तोडून हातीं घेतला, परंतु तो गळयात घातला-गळयात बांधून ठेवला-ह्या शिंपीचा लाभ झाला म्हणून : शिंप सांपडली म्हणून परिस हा तोडून गळयांत बांधला.

डोळयानीं मृगजळ पाहाणें हें जसे कांहीं ह्या (सर्व-तेज, सुवर्ण) कंठामधील अमृत हें अमृत होऊन आलें : तेथीलचा जर का गिळणारा जो भाव-म्हणजे गळाळाच गिळणें हेंच असणारें-तेथें अमृत हेंच अमृत होऊन आलें: तें काय थुंकावे असे नाहीं : का शिंप हातीं लागली, कीं तोडलेला जो परिस हा गळयातच बांधून ठेविला: लोहरूपीं चित्त हें परिसानें सुवर्णाचें होणारें, तेथें सगुणैश्वर्य हेंच कायासुंदर असें होणारें: परंतु परिसणें जे कानाकडून होणारें, तेथे शिंप हीच जशी का महत्व वागविणारी आहे असे समजणें केलेलें-जसे कांहीं सर्व ऐश्वर्य हें त्या कर्णामधूनच होणारें तें शिंपीनेंच जसे उचललें !

परंतु येथे चित्त हेंच लक्ष दिलें गेलें नाहीं, व चित्ताला जे सुवर्णाचें, नामाचें करणें, गुणैश्वर्याचें करणें, तें न करिता, नुसत्या ऐकण्यावरच भिस्त ठेवून कर्ण म्हणजे शिंपच पुढे करून घेतली व तींतच बसण्याचें केलें. आता परिसाचा तो उपयोग हा जसा गळयातच बांधून ठेवण्याचा असा : तो का बरें येथे कपाळ-भाल किंवा चित्ताच्या सगुणैश्वर्याचा केला नाहीं ? (६१)

त्याप्रमाणें अहंममतेच्या गडबडींत मला नच पोहोंचतांच हीं बापुडीं जीवें जन्ममरणाच्या दोन्ही थडींमध्यें गटंगळया खातच जगणारीं होतात.

अहंममताः—ह्या अहंममतेच्या मुळीं बसलेली जी एक सर्वांवर ही चढ करून असलेली जी ह्या देहबुद्धीची नाडीच धरून चालणारी, ती ह्या माथ्यावरच टेकलेली असल्यानें, तिनें माथाच मुळीं अडवून धरला : पायां पडणें किंवा माथा टेकणें ह्यानें तर ती वर असलेली बाहुली हीच नडवून धरली, व तिनें ह्या माथ्याचें घरंगळणेंच केलें-पायावर डोकें कां डोक्यावर पाय, कां माथा टेकणें हें टेकणें दिलें, कां टेकणें हेंच माथ्यास आलें हें कांहींच मुळीं समजत नाहीं : तेथें मुरडणें जे होते तें कशाचें-तें पायाचें, कां डोक्याचें, कां डोक्याचें-पायाचें, कां माथाच टेकतांना मुरडला ? टेकणें हेंच माथ्यास मुरडणें देणारें असें तें कसें समजेल कदाचितच येणारें ! !

लांकडासारखें ताठणें हें ह्या देहयष्टीस मिळालेलें तें गोष्टींना पुढें करून असलें-तें जातगोत, कुळशील, विद्या-अविद्या, व्युत्पत्ति, तारुण्यमद अशीं अनेक तेथें कारणें हीं ह्या स्वभावामधील स्वभाराचीं अशीं हुतक द्रव्येंच असून त्यांनीं त्या 'स्व' मध्येंच मुळीं जेव्हां 'जळत्या आगीमध्येंच जसें'

आपटून घ्यावें-विसर्जून घ्यावें-अहंभाव उतरून घ्यावा-सहज अथवा उदास अथवा सुख असेच जे ह्या सुखाचें होणें तें जेव्हा करविलें जातें अथवा होणे होतें, तेव्हाच ह्या अहममतेचीं तटातट तुटणारीं अशीं बधनेंच मुळीं नाहींशीं होऊन तेथे 'स्व ' जो तोच आपल्या भाराचा होऊन येतो.

म्हणून येथे अहंममता ही मोडून घे-चार घरें फीर-प्रार्थू आदर-विनीव-मुद्दाम असेच तें करावेच केलें-पाडिलेंच आपटिलें-ओढून पाहा-सोडून दे-आपट आपटून जसे तेथील अह असे ताठरपण हेंच आतां मोकळें झालें व त्यानें ' स्व ' च भावासहित पाहाणें केलें-असे तें काय सहज असे येणारें नव्हेच-तेथे तूं त्या ' स्व ' च्या गोडीचा हो व ह्या अहंममतेस मोडून काढः तेथे सुख हे सूर्यतेजाने प्रकाशित आहे असेच दिसणारें. (६२-६३)

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**

ततम् = व्यापिलें. अव्यक्त मूर्तिना मया = अव्यक्त स्वरूप परमेश्वर जो मी त्याने. सर्व भूतानि मत्स्थानि = हिरण्यगर्भापासून गवताच्या काडीपर्यंत सर्व भूतें माझ्यामध्ये आत्मरूप होऊन स्थित आहेत. अहम् तेषु न अवस्थितः = अवस्था घेऊन असत नाहीं. मी मात्र त्या भूतांमध्ये वास करीत नाहीं. मूर्ति = अव्यक्त (जड, मूर्ति).

मया अव्यक्त मूर्तिना इदम् सर्वम् जगत् ततम् , सर्व भूतानि मत्स्थानि च अहम् तेषु न अवस्थितः ।

मीं आपल्या अव्यक्त स्वरूपाने सर्व जग व्यापले आहे. माझ्या ठायीं सर्व भूते आहेत, परतु मी त्याच्या ठायीं नाहीं. (४)

**माझिया विस्तारलेपणाचेनि नांवें । तें काय जग नव्हे आघवें ।**
**जैसें दूध मुरालिया स्वभावें । तेंचि दहीं ॥ ६४ ॥**
**कां बीजचि झालें तरू । अथवा भांगार तेंचि अलंकारू ।**
**तैसा मज येकाचा विस्तारू । तें हें जग ॥ ६५ ॥**
**जें अव्यक्तपणें थिजलें । मग तेंचि विश्वाकारें वोतिलें ।**
**तैसें अमूर्त मूर्ती म्यां विस्तारलें । त्रैलोक्य जाण ॥ ६६ ॥**
**महदादि देहांतें । इये अशेषें भूतें ।**
**पै माझ्या ठायीं बिंबतें । जैसें जळीं फेण ॥ ६७ ॥**
**परी तया फेणाआंत पाहातां । जेवीं जळथेंब न दिसे पंडुसुता ।**
**ना तरी स्वप्नींची अनेकता । चेइलिया नोहिजे ॥ ६८ ॥**
**तैसीं जी ये भूतें माझ्या ठायीं । बिंबती परी त्यांत मी नाहीं ।**
**या उपपत्ती तुज पाहीं । सांगितलिया मागां ॥ ६९ ॥**
**म्हणौनि बोलिलिया बोलाचा अतिसो । न करी यालागीं हें असो ।**
**तऱ्ही मजआंत पैसो । दिठी तुझी ॥ ७० ॥**

(६५) मांगार – भंगार. (६६) वोतिलें – वोथिजलें = पातळ झालें. मूर्ती म्यां – मूर्तिमय. (६७) महदादि देहांतें = महत्तत्वापासून देहापर्यंत. फेण = फेंस. (६८) जळथेंब - जळ म. नोहिजे-नाहीं जे. (७०) अतिसो – पाल्हाळ. करी–कीजे. पैसो- पसरो.

माझा विस्तार पाहिला असतां, विकास पावण्याच्या गुणाच्या नांवानें सर्व विश्व विकास पावलें आहे असें हें सर्व जगच काय मी नव्हे-जसें दूध मुरलें असतां त्यास दह्याचे स्वभाव येऊन असतातः माझ्या विकास पावण्याच्या गुणाच्या नांवानें हें सर्व जगच तें त्या नांवामध्यें येत असणारें असेंचः येथें नांवानेंच जसें सर्व जग दर्शित केलें (६४)

किंवा बीज हेंच तरू किंवा वृक्ष झालें: अथवा मागार नांवाचें जें सुवर्ण तेंच मुळीं अलंकार होऊन आलें: त्याप्रमाणें मज एकाचा जो विस्तार आहे तेंच हें जग होय (६५)

जे अव्यक्त असेच आळून असलेलें, पडळाचें झालेलें, तेंच जेव्हां पातळपणास येतें, सपातळ होतें, तेव्हां त्यासच 'विश्वाकार' असे म्हटलें जातें: विश्वाकारानें पातळपणास आलें किंवा तेथीलच्या पातळपणानें जसा काहीं विश्वाकारच दिसूं लागला; त्याचप्रमाणें अमूर्त असे जे-मूर्तत्वाचें नच झालेलें जे-तें जेव्हा मूर्तिमय असे प्रत्यक्षाचें-सर्व काहीं मूर्तिमय होऊन आहे असे-होतें, तेंच जसे एक विस्तारलेले असे त्रैलोक्यच होय येथे जसा काय विकार हाच मूर्तिमततेचा असा झाला म्हणून मूर्ति हा शद्ब म्हणजे देहबुद्धीवर केलेला जो आरोप तोच विकारानें पाहिलेला

बुद्धीचें अव्यक्तपण हें थिजले-तें अव्यक्तात फसलें-तेथे आता विश्वाकारसभावना ही कर्मच एक योगास आलें व त्यानें तेथे ती योगिनी ही आहेच आहे अशी खात्री करून घेतली: तेथें जीवदशा हीच पातळपण घेऊन जशी काहीं आरशात पाहणारी अशी-तीस आता दिसूं लागलें व म्हणणें करूं लागली कीं, ती तर आहेच व मीहि पण आहेच: असें एक दूरतर असणारें असे बुद्धीस सहज उदिततेचें लक्षण हें घेऊन, ती तेथेच आतां आपला विश्वास हा स्थिर करूं लागून, आपण स्वतः तेथे कसे यावे हेंच करूं लागली: तेथें आतांच काय तो एक 'आहेपणास' 'मी आहेच आहे' असा रंगच आला: परंतु याहिवर जर तें पुढे झालें-तर तें जसे नुसतेंच टेकणें टेकणारें-त आता बुद्धिभारास येऊन तेथे एक अक्षरच हें बुद्धीच्या रगानें येऊं लागून, त योगभावन हे कसे त पुढे करून असतें

येथे ह्या विश्वाकाराने म्हणजे कर्मच योगास आल्यानें, तेथें अमूर्त लक्षण हें मर्तानि म्हणजे कर्तव्यच रंगलें म्हणजे जे कर्तव्य तें 'केले' असे म्हणणारे-समजणारें-त्या वृतीनें असणारे-तें असे म्हणत कीं, अमूर्त हें मूर्तीचें झालें, म्हणजे जेथें कांहींच दिसत नाहीं, तेथें कर्तव्य तरी निदान एक केलें, सभावन झाले, विश्वाकारणें केलें एवढेच एक तेथे उगवतें: व असेंच तें सर्वच असल्यानें, येथें हें सर्व त्रैलोक्य ह्यावरच उभें आहे असाच तो बुद्धीचा प्रवास हा स्थिरतेचा होऊन असतो: तेथे थिजलेलें म्हणजे नच वर येणारें तें धारण हें आता विश्वाकारास घेऊन मूर्तीचे म्हणजे 'केलेलें' एक तें आहे असे झालें. (६६)

महत्तत्वापासून तों ह्या देहापर्यंत-हिरण्यगर्भापासून तों गवताच्या काडीपर्यंत हीं सर्व भूतें मजमध्यें बिंबित अशींच आहेतः जसा काय पाण्यामध्ये फेस दिसणारा होतो, तशीं तीं मजमध्ये दिसणारीं असतात. (६७)

परंतु त्या फेंसाच्या आतमध्ये पाहिलें, तर तेथे पाणी हें दिसतच नाहीं-तेथे पाण्याचा थेब हा मुळींच दिसणारा नसतो-ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें पाहिलेली अनेकता, बहुविधता, ही जागृती आल्यावर किंवा जागें झाल्यावर दिसत नाहींच. (६८)

त्याप्रमाणें जीं हीं भूते माझ्या ठायीं बिंबून असतात परंतु त्यामध्यें मी असत नाहीं-अशा तऱ्हेची उपपत्ति तुजला पूर्वी सांगितली आहेच. (६९)

म्हणून सांगितलेलें पुन्हां सांगण्याचें केलें. हें एक ह्या विषयास अतिशयाच्या प्रसंगाचें केलेलें होय परंतु हें तसे अतिशयत्वाचें करणें नको, म्हणून हें आतां असो. करितां हेतु येथें जो एक पुढें

घेतला, तो म्हणजे तुझी दृष्टि ही मजमध्यें पाहाणारी होवो. ती दृष्टी कशी असावी म्हणशील तर तेथे तिनें पैसच-पैसपणच-ऐसपैसपण-असेच आतमध्ये करून आंतच पाहाणारी व्हावी तुझी दृष्टी ही मजमध्यें पाहाणारी होवोः ती पैस घेऊन असोः ती विस्तार पाहून असोः ती विस्तार घेऊन असोः ती सहज अशी आत पाहाणारी होवोः तेथे मी तुला सापडणारा होईल. (७०)

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

(मत्स्थानि) भूतानि न च मत्स्थानि=मजपासून अवस्थेस आलेलीं, मजपासूनच झालीं असेंच जवळ जवळ म्हटलें जातें. योगमैश्वरम् = योगयुक्ति, ईश्वरत्व हें योगयुक्तीचें-लीलेचें-सत्तेचें-कसे तें भूतभृत्=भूतभृत्यत्व, भूतांची सर्वथैव घटना-विघटना असे जें करणें तें एक भृत्यत्वच भूतांचें भूतस्थ=भूतांचें सर्वथैव असेच झालेलें. ममात्मा=माझा जो आत्मभाव तो भूतभावन=भूताना भूतत्वास ज्यायोगे आणिलें जातें असे भावन करणें तें जे (तेथे मग सहजच त्या भूतांचें जसे कांहीं धारण झालें किंवा पोषण केले असेच म्हटलें जाणारें )

भूतानि मत्स्थानि न च, मे ऐश्वरम् योगम् पश्य, भूतभृत् च भूतस्थः न, मम आत्मा भूतभावनः ।

भूते हीं प्रत्यक्ष माझ्या ठायीं आहेत असेंहि नाहीं, हेच माझें लीलासामर्थ्य हाच माझा ऐश्वर्ययोग: हा पाहून ऐस. येथे ईश्वरी लीला तू नीट पाहा. माझा आत्मा भूतभृत् म्हणजे भूते उत्पन्न करणारा व भूतभावन म्हणजे भूताचे धारणपोषण व वृद्धि करणारा असूनहि, ह्या भूतांच्यामध्यें मी कधींहि असत नाहीं. (५)

**आमुचिया प्रकृतीपैलीकडील भावो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों ।**
**तरी मजमाजीं भूतें हेंहि वावो । जें सर्व मी म्हणोनि ॥ ७१ ॥**
**येऱ्हवीं संकल्पाचे सांजवेळे । नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे ।**
**म्हणोनि अखंडितचि परी झांकलें । भूतभिन्न ऐसें देखे ॥ ७२ ॥**
**जैं संकल्पाची सांजवेळ लोपे । तैं अखंडितचि आहे स्वरूपें ।**
**जैसें शंका जातखेंवो लोपे । सापपण माळेचें ॥ ७३ ॥**
**येऱ्हवीं तरी भूमीआंतुनि स्वयंभ । काय निघती गाडगियांचे कोंभ ।**
**परी ते कुलालमतीचे गर्भ । उमटले कीं ॥ ७४ ॥**
**ना तरी सागरींच्या पाणीं । काय आहाती तरंगांचिया खाणी ।**
**परी ते अवांतर करणी । वारयाची ॥ ७५ ॥**
**पाहे पां कापुसाचे पोटीं । काय आहे कापडाची पेटी ।**
**तें वेढितयाचिये दिठीं । कापड जाहालें कीं ॥ ७६ ॥**

(७१) प्रकृति पैलीकडील भावो=मायेच्या पलीकडचें माझें स्वरूप. वावो=व्यर्थ बोलणें. (७२) सांजवेळे = संध्यासमयाला. नावेक = क्षणभर. तिमिरेजती = अंध होतात. झांकलें-झाबळे = अस्पष्ट प्रकाशाच्या योगानें. (७३) जातखेंवो=जातां क्षणींच. (७४) गाडगियांचे-घडेयागाडगेयांचे = घागर, मडकीं वगैरेचे. कुलालमतीचे गर्भ = कुंभाराच्या बुद्धीचें फळ. (७५) वारयाची - वारयाची नव्हे ? (७६) आहे - होती. तें - तो. जाहालें कीं - जाहाला.

तूं कांहीं ह्या पाण्डित्याची कांस घेऊन चालूं नको ! ह्या पंचीकरणानें जसें कांहीं तुला सांगून ठेवण्याचें केलें: तेथें जीं तत्वें आहेत, त्याबाबत जे म्हणून आहे, त्याचाहि तूं विचार करूं नको येथें कल्पना मात्र होणें म्हणजे हें जीवित्वच लपविणें होय. म्हणून येथे फक्त एक जो अनुष्ठानाचा असा जो अनुकार त्याचाच हो. जीवित्व जोडून घे इकडे तिकडे पाहून काय ते तुला मुळींच सांपडणारें नव्हे. येथें हीं भूतें मजमध्यें आहेत असे जे म्हणणें, तें कांहींच कामाचें नाहीं. म्हणून येथें भावच आपलासा कर. देवत्वच सर्व ठिकाणीं भरलेलें आहे असेच पाहा, व आपलेपणानें नटलेलें जें तेंच आतां तूं आपलें 'स्व'चें असे कर. तेथें तुझी नाम–रूप–व्यक्ति हिजवरच आरूढ हो म्हणजे बरें.

आमचा जो ह्या प्रकृतीच्याहि पलीकडील भाव तो जर कल्पना नच करितां तूं पाहण्याचें केलेंस, तर तुला असे आढळून येईल कीं, कार्यकारणादि विचार पुढे घेऊन असूं नये कल्पनेशिवाय जे कांहीं एक वृत्तीवर येण्याचें करणें होतें, तेथें जर तूं पाहाण्याचें केलेंस, तर मजमध्यें हीं भूतें आहेत–माझ्या मध्यें सर्व प्राणी आहेत, हेंहि मिथ्याच, फोलच ठरतें, कारण जे काहीं आहे तें सर्वच्यासर्व मीच आहे, आणि म्हणूनच तसे ते पाहिलें तर मजमध्ये हीं भूतें आहेत हेंहि वावच ठरतें म्हणजे व्यर्थच होऊन असतं. (७१)

ह्या संकल्पांनीं आपलाच एक मनाचा केलेला वीणा करुन त्यासच त्यानीं सकल्पाचे ध्वनीनें साजलें: ( साञ्जणे–संज:संजा.संजाफ:जाफणे:जप्फा:जपफी:जाफा साजणे = वीण्याला तारा लावणे: वीण्याला नुसतें तारा लावलेले, तेथे मग जे सूर-ताल-ध्वनीनें संगीततेस आणलें जाणें जे तें: (स)लग्नच एक कर्मकेरसुणीशीं तेथें गाणे कसचें ? गान्हाणेच एक व तेंहि पण रडणारे असे–नुसतें असमाधानच: तेथे सर्व संकल्पच ! ह्या ध्वनीमात्रानीं बुद्धिच मुळीं तिमिर घेऊन बसली, व तिचे डोळे त्यामुळे अंधारातच पाहूं लागले. म्हणून जरी हा 'देवच' एक, तरी भूतभिन्न म्हणजे बुद्धीचे जसे डोळेच झाकले गेले असे ( अखडिततेनें सिद्ध असे त्यासच ) भूतभिन्नतेचें भूतभिन्न जसें तसे देवत्व हेंहि पण भिन्न भूतांच्या ठिकाणीं भिन्न असे देवत्व पाहूं करूं लागले एरव्हीं भूतभिन्न हें कांहींच महत्त्वाचें तें नाहींच !

एरव्हीं पाहिलें तर जेथे सकल्पच लोप होऊन असतात म्हणजे अमूक एक काम करणें आहे किंवा मनाचें एका कामास करण्याचे आहे, व त्या कामाचा सर्वथैव तें संकल्पच करून राहिलें: व अशा संकल्पाचे जेव्हा संपुष्टात येणे होतें, जेव्हा ते संकल्प करणे बंद होतें, तेव्हा क्षणभर ह्या बुद्धीचे डोळे अंध होतात आणि म्हणूनच किंवा एवढयाचकरितां मी अखंडित असा असलेला तो (झाबळे) अस्पष्ट प्रकाशाच्या योगानें भूतांभूतांच्या भिन्नभिन्नत्वाने असणारा दिसतो–भूताहून निराळा दिसतो.

अनुभव नसोनियाहि मी ब्रह्म असें सर्वदाचि चिंतावे ।
नसतें पावे ध्यानें नित्य ब्रह्मीं कदा न शंकावे ॥

सर्वेहि साधनें=चित्तशुद्धि करणे जीव तो ब्रह्मपणे स्वत:सिद्ध ज्ञाता

यया मनाचे एक निकें । जे देखिलिया गोडिचिया ठाया सोके ।
तरी अनुभवसुखचि कौतुके । दावीत जाइजे ॥
"जीवा ब्रह्मत्व संकल्पलोपीं" (७२)

तीच ती संकल्पाची संध्यासमयाची जशी एक सांजच (गुंगी)–करकरित तिन्हीसांज-ती जेव्हा लोप पावते-संकल्पाचें येणें किंवा करणें हें बंद होतें, तेव्हां स्वरूपतेने असणें जे तर अखंड असेच–अखंडित असे आहे असे दिसतें, ज्याप्रमाणें शंका जातां क्षणींच, जे कांहीं माळेवर सापपणाचें आरोपणें झालेलें तें लोपून जातें; जसे कांहीं ह्या जीवितास धक्का बसून नुसते आकाशानेंच ( महत् ) ह्या बुद्धिमारास घेव दिला, व डोळयाचा सर्व ओपा झाच नुसता राहिला, त्यांतील सगुण ससपद हे ( अंधारच एक ) प्रसरण पावलें.

म्हणून ह्या संकल्पाचें संकल्पाशीं सांजणें-लग्न लावणें-गाणेंबजावणें-मनाचें राज्य करणें-मनाचे तारे तोडणें-ह्यांतच बुद्धिच बुद्धितत्त्वास पाहून नाचूं लागली-बुद्धिच मन झालें-व आंधळीच जशी झाली: अहो, मन हें काय तत्त्व आहे? - म्हणून हें जे बुद्धीचें गुणणें हें जर संपलें, तर आपलें स्वतःचें 'अखंडित असें जें देवपण' तेंच पुढे होऊन येतें: व मग ह्या मायेचा स्वभाव जो तोच दूर होतो व आपली माला आपल्याच गळ्यात आहे, मी पुष्पहारानें शोभित आहे असेच दिसूं लागतें. तेथें देवपणच एक सगुणैश्वर्याचें. म्हणून येथे नाम हेंच पुढे घेऊन अस येथे नामाने नमनच केलें व व्यक्तिरूपीं रूपानें आपलेंपण हें पाहूं लागून त्यानें आपली प्रियाच बोलणारी पाहिली व तेथ एक भेटणेंच.

कल्पनेचें देहधारण-जसें एक नुसतें संकल्पच करून असणें, मनानेंच नुसतें मनोराज्य करणें-नसत्या वाऱ्यावरच ज्यानें आपलें घर उभारलें आहे असें तें ह्या मनाचें करणें हेंच जसे काहीं सकल्प: ह्या संकल्पांना काय कुठे देहधारणा ही नाहींच, ते एक नुसतें नसतें असेच एका बुडबुड्याचें जसे असलेलें, तेथें प्राणश्वसनक्रिया हीच नुसती आकाशावरच टेकलेली-तेथे आकाशच आधार होऊन असलेलें तें गंधर्वनगराचें जसे-आकाशाचें (ख)पुष्प असे तें त्या आकाशावरीलच एक निराकारणें घेऊन येतें परंतु ह्या देहधारणेमधील जें जीवित तेंच मुळीं ह्या गंधर्व नगरांतील आकाशाने पार हादरून सोडले. तेथें घर नाहीं-दार नाहीं-नांव नाहीं-गांव नाहीं असें खपुष्पाचें जीवित नुसत्या कल्पनांनीं मढविलेलें तें जर संख्य-ह्या श्वासानें जसें कां ह्या प्राण्यास नाम दिले-प्राण हा अक्षराचा केला-जीविताचा केला, तरच तेथें जीवित हें जीविताच्या आधारानें जीवितातच बसलें-तेथे जीव-जीविता-पुरुष-प्रकृति-स्त्री-पुरुष अशा एकमेवतेचीं (एकं एव) झालेलीं तरच बरें हा गधर्व नगराचा भार म्हणजे सर्व काहीं आकाशच आत भरून घेतलें व ह्या देहास पार पोकळच करून सोडलें. तेथें सर्व संसार हा गंधर्व नगरानें आपलाच गांधर्वीय असा केला तेव्हां जे काय ह्या देहाचे हादरणें तें काय नुसता आकाशाचा असाच पोकळ भार ह्या चित्तावर घालून तें चित्तच मुळीं कोणत्या गावचें झालें कुणास ठाऊक ! म्हणून येथें ह्या मनुष्यजन्मास येऊन आपलें महत्त्व हें पाहूं केलें नाहीं, त्यास हें सर्व म्हणजे एका कारणावरून सर्व भिस्त टाकली असे होऊन जातें.

तेथें ह्या डोळ्यानाच मुळीं ह्या पातळीच्या दृष्टीचें केलें-तेथे तप नाहीं, मनुष्यभार नाहीं, जीवित हें नुसत्या बुडबुड्याचे असे, नाहींच !-तेथें मुळीं तें कारणच ह्या जीवितयात्रेचे तेच मुळीं लपवून ठेविलें: तेथे ह्या द्विजाचा कारभार हा महत् भाराचा होऊन अक्षर किंवा पुरुष लक्षण हेंच पाहिले जाऊन एक सर्व हा बुद्धीचा भारच आपलासा केला : अनेक बुद्ध्यांच्या पातळ्या ह्या जीवितावर चढल्यामुळे तेथे धनुर्वातासारखे आघात ह्या मनावर होऊन हे पाहाणे किंवा दिसणें हें नुसतें आधळ्याचें असे-तेथें जीवित हेंच दुसरीकडेच जोडलेलें झाल्यानें, ह्या व्यक्तीच्या ठिकाणीं काय हें व्यक्तित्व हें नाहींच-म्हणून येथें नाम हेंच रूपानें आपलेसें करून त्यावरच जेव्हा हा संसार पाहिलेला होतो, तेव्हाच तेथें जीवित हें जीवितयात्रेच्या उपयोगाचें असेंच होऊन असतें.

एरवीं जसें एक आपटणेंच ह्या मातीचें ! तेथें पायच नाहींत ! त्यानीं मुळीं ते डोळेच आपलेसे केल्यानें तेथें जीवितास असणारे असे जे देह-विश्व-स्वप्नकारण-महाकारणादि महत्तत्त्वे-हींच मुळीं लोप पावून असल्यानें तेथे काय हें गंधर्वाचें म्हणावें का संकल्पाचें कोण जाणे !

म्हणून येथें वृत्तिभार हा लोपूं नच द्यावा-तेथें मनुष्यानें मनुष्यास भेटावें-आर्जव करावें-गृहच जसें एक बांधणें, असेंच ज्याच्या त्याच्या त्या गृहाच्या बांधण्यास लागणारें सामानच चोहोंकडून गोळा करून तेथें आर्जव हीच संपत्ति मनुष्यसंपन्नतेस ये म्हणणारी !!

" कठिण आहे "!! ही जीवितयात्रा कंठणे अति कठिण आहे असे ह्या जीवितानें एक घाबरणेच केलें: तेथें हरघडी, घडोघडी ह्या जीवितावर दडपणच घातले–तं तुडविले असेच होऊन असते–तेव्हा आता हें कशामुळे होत आहे ते एकाद्या शहाण्यास, समंजसासहि कदाचितच समजणारे! तेथे हा जीवच लपविला गेला–खवला गेला–व त्या जीवदशेचे जेवढें अंग ह्या भरणपोषणादि व्हवहाराना मिळालेच पाहिजे तेच मुळीं आडविलें गेल्यानें, तेथें हा जीव हाच मुळीं ते जे त्यास होत असतें तं कुणी तरी तें दडपणें करीत आहे असा संशय घेऊन असल्यानें, तेथें जसे का हरघडी तावच दिला जाणारा होऊन, तेथे अनेक प्रकारचे जे काही एक ताडन अथवा प्रकाराच्या प्रयोगानीं तं जीवित हेंच मुळीं तो तेथीलचा भार हा टाकून दे म्हणणारा असतो–तो ज्यामधून तुटलेला, आडविलेला अथवा पडदाच एक आड केला असे असल्यानें–असे झाल्यानें, तेथे 'संशय' हाच एक पाठीस लागलेला होऊन, त्यानेच तें दंडजात हें प्रकाराचें करून तं जीवदशचें आरोग्य म्हण अथवा भोग–भाग्य म्हण हेंच भगणे करुन आहे असे ते सशयाचे एक महाभूतच लागलेले! आणि म्हणूनच येथे अनुभवी जे त्यानीं हा प्रकार पाहून 'अशा स्थितींत काळ कठणें हें कठिण आहे,' 'कठिण आहे असे जगणें' असे म्हणूं करून, तं संशयाचे असे कठिणपण दृढदृढतर असेच एकसारखे होऊन आहे व त्यामुळे हीं व्रतं जीं त्यांना एक परिणामाने 'कठिण आहे' असे म्हणूं लागून सशितव्रत म्हणजे कठिण आहे व्रत आचरणें जेथील तं म्हटले. ह्या मनुष्यस्वभावाचें जे एक परम दिव्य तेथे हे अति उच्च असे स्थान घेऊन असल्याने, तेथे त करणे जं एका देवदिव्यतेचें असे कर्म निपटण्यास लागणारे करणे असून, तेथे काय ह्या स्वभावास गोडीच आली: शिस्त न हीं–गैर शिस्त असे जे ह्या वृत्तीचे असणे, तेथे वृत्ति ही जशी का वोतीव अशीच व्हावी व आकारास आली असे करणे ते दिव्यताच ह्या स्वभावास आल्याने, तेथे हा जीव हाच मुळीं त्या मूळामधूनच जाणारा असल्याने, तेथे त्यास अनेक दिव्ये हीं दिसूं लागतात : परंतु तीं दिव्ये हीं जशीं आंधळयाची जीवनयात्रा अशीं असल्यानं, तेथे हा जीवच मुळीं अधतेचा असा! तेथे सर्व श्वास हाच रोकला गेल्यामुळे तेथील जे जीविताचे अंग हे पारचे पार त्या देवासच पाहविणारे असल्यानं, येथे ह्या जीवदशेस मुळीं काहींच नाहीं –तेथें अनेक जे वृत्तिभार–वोळभार–व्यवहारभार–पोषण–शोषणादिभार–भरणें, रिकामे करणें, इत्यादि सर्वच तेथीलचे जे मनुष्यप्राण्याचे सजीवनच एक, तें सर्वच्या सर्व पार रगडिले गेलेलं, तेथे हें असे जें संशयाचे प्रकार तेच मुळीं सर्व संशयात्मक करुन हा जीवच मुळीं आपल्या पाठीमागे एक भूतचेष्टा लावून घेणारा झाल्याने, तेथे शंकाजात जेवढें म्हणून तेंच वर आल्याने, तेथे हें पाहाणें हेंच मुळीं ताणलेले: एक संशयच प्रत्येक गोष्टींबद्दल येऊन असल्याने, तेथे हें जीवित हेंच मुळीं त्या एकाच संशयाच्या वृत्तीवर अथवा व्यक्तीवर बसविलें गेल्यानें, तेथे कठीण आहे हें जीवित कंठणे असेच ह्या स्वभावाचे एक पोरकेंपण हे ज्यास त्यास पाहूं लागून, कोणी तरी ह्यांतून बचाव करणारा होईल काय असेच एक गरीबसे–वृत्तिदैन्याचें कठीण लक्षण–हे पाहून असल्याने, तेथे ह्या स्वभावास एक परम दिव्यता आलेली असते. तेथे ह्या जीविताची मुळीं ददातच नाहीं–तेथे सौख्यच मुळीं सर्वच्या सर्व लोप घेऊन असल्याने तेथे काय हा म्हणजे एक विकाराचा असाच तो–विशेष वृत्तिच मुळीं लपविली झाल्यानें, तेथे आता जीवित हें काहींच मुळीं उपयोगाचे नाहीं असे समजून–तो स्वभावाचे महत् असे एक स्थान पाहू लागून त्यांतच बसून राहतो: तेथे जे काहीं दुसऱ्यास दोष देणे तें–दुसऱ्यास मूर्ख म्हणणे ते–दुसऱ्याची चूक आहे म्हणणे तें–अशीं अनेक दोषाचीं स्थानेच मुळीं ह्या संशयाचीं असल्याने, तेथे आता तं सव 'कठीण आहे' असे स्वभावाचें अंग हें संसारयात्रेचे एक अथवा श्रीगुरुसेवासंबंधाचे असे अंगच मुळीं असल्यानें, तेथेंच तें दडपण घालून असल्यानें–आता तेच अंग हें आपल्यास स्पष्ट करून ह्या व्रतांचे कठिणतर असेच जे दृढव्रताचें तें ह्या धर्मधारणेचें परिमाण अथवा प्रमाण हेंच पुढे करितें: तेथें आता संशयाचें राव नाहींसे झाल्यानें अनेक व्रतें–दृढपणानें तेथेच चिकटून असणे असे ते संशित परिणामानें

कठिणं असेंच काम जसें अंगावर घेऊन हया जीवितांचा हा यात्रा ही महत् भाराची-भाग्याची-दिव्य अशी होऊन तेथें अनेक सौभाग्यसंपदा हयाच आपलें हें स्थान व्हावें म्हणून आर्जवीतच जशा आहेत. (७३)

कुंभार हा म्हणजे हया कापुराच्या राशीचा सर्वथैव नाशच करून टाकणारा-तेथें बुद्धीचे अनेक तरंग हेच पुढें येणारे-ते म्हणजे जसें कांहीं नासणेंच एक हया सत्वाचें. तसेंच हया जौहराचा गर्भच लांबविला जाणारा-हया अनेक बुद्धयांनीं आपला गर्भवास पाहूं देऊन त्या बुद्धीसच आपल्यांत मिळवून घेण्याचें केल्यानें, तेथें ही ब्रह्मविद्या ही मौनच पत्करून असते, कारण शहाणपण हें काय शिकवून येणारें नव्हे. तेथें स्वतःचें जीवित हेंच वैष्णवाचें करून आपलें चित्तच देवत्वास आणावेः तेथे नामच भेटणारें.

एरवीं पाहिलें असतां काय हया जमिनींतूनच उगवणारीं अशीं हीं मातीचीं मडकीं किंवा गाडगीं आहेत ? कीं त्यांच्या स्वयभतेमुळेच जसे काहीं कोंभच वर येऊन आहेत ? परंतु येथें तें जे काहीं वर येणें केलेलें दिसूं लागणारें-तें म्हणजे हया कुंभाराच्या बुद्धीनें बुद्धीभार झेपण्यास केलेलें जसे एक फलच-बुद्धीचा गर्भ हाच वर येऊन उमटूं लागला, दिसूं लागला, स्पष्ट झाला असेच होय. (७४)

वारा किंवा वायु हा कांहीं ब्रह्मसागरावर तरंग उमटवूं शकत नाहीं-तेथें निराळेंच एक बोलणें होतेंः म्हणून जो कांहीं हया गतिवेगाचा हया नामास दिलेला अथवा देवत्वानें पाहिलेला भर्ग अथवा व्यास अथवा मार हाच तेथें स्थिर करावा म्हणजे तेंच ब्रह्मसागरांत दिसून असणें; व मग काय सर्वत्र देवत्वाचें होणें होय.

काय सागराच्या पाण्यामध्यें तरंगाच्या खाणीच्या खाणी आहेत ? परंतु ती एक करणीच वाऱ्याची नव्हे काय ? परतु तेथीलच्या करणीस मात्र एक अवांतरतेचें-सपातळ, निराळें, निराळाचें-असेच म्हटलें गेलें-तें वाऱ्याचें करणें नव्हे काय ? तर तें वाऱ्यामुळेच होणारें ! (७५)

हें पाहा, कापसाच्या पोटीं काय कापडाची पेटी होती (कापडाची केलेली वाजणारी बाजाची पेटी अथवा गड्डा), कीं तें कापसाचें उभे आडवें अशा धाग्यांनीं विणलेलें-वेढिल्याबरोबर त्या वेढितयाच्या दृष्टीला तें ' कापडच ' दिसूं लागलें. जसे नेसलेलें एक मनुष्यपणच आता उत्तम असेच दृष्टीला रमविणारें असे जे तेंच मनुष्यानें नेसलें व आपल्या स्वरूपभारास आलें.

मनुष्यानें संसार कसा करावा, काय संकल्याचें मागवें असे नकोच म्हणून तेथे जे कांहीं मनानें आपल्याभोंवतीं वेढून घेऊन त्या विजेनेंच हा नरदेह जसा कापडानें वेढला असे जीवित्वच-नुसतें नव्हे, अहो, तेथें देवत्वच असें कांहीं श्रृंगारलेलें कीं, त्यास धोतरच नेसविलें. किंवा स्त्रीजातीस साडीच पेहेनविली असें जें करणें तेंच खरें एक देवत्वास देवपणाचें करणें. मूर्तिमंत देवच तेथें पूजनानें-पूजेनें-देवत्वास आणिला व तेथें मग हया ब्रह्मांडासहि पण एक सहजच असें भावणें अथवा देहाचें करणें हें येऊन तेथें हा देह म्हणजे यथाधर्म, यथाशास्त्र, यथोपचार, यथापद्धति वागणारा असा मूर्तच-तेथें हीं लक्षणें हींच जनांना देवत्वच पाहविण्यास लावणारीं अशीं सिद्धपणाचीं होत-म्हणून अनुष्ठित असाच होऊन अस.

प्राणच पडला-प्राणासच बुडविलें-प्राणच मुळीं घरंगळविला गेला व त्यानें रजासच मिठी मारली-व आतां तेथें असा तो प्राणच रजानें पांघुरविला गेला-तेथें काय तें हया जीवदशेसच मुळीं त्याची ती गोडीच देऊं केली व आतां तो जो एक भार त्यानें या वृत्तीसच वृत्ति दिली व हया जीवदशेसच जसें आलिंगलें, आपलें असें म्हटलें-तेथें प्रेमच एक तें कां नव्हे बरें ? तेथें प्रेमच एक तें हंसलें-हंसणारें झालें-व आतां जसें का हया स्त्रीभारानें आपलें मातारूपी अंगच पाहूं केल्यानें, तेथें देवदिव्यच एक भार वाहूं लागून त्यानें वेर पाहिलें तों काय ती एक सौभाग्यसंपदाच ! काय आतां त्या मातीनेंच एक रूप

येऊन तेथें हार हाच अलंकार असावा असें समजून, तेथें ह्या लिंगप्रामाण्यानें जसें कां नाग म्हटलें कां इतिन् म्हटलें तें त्या एका श्रीगजाननासच म्हणूं केलें.

'तंतुकोटिपटन्याय'– येथें तंतु हा जो तो म्हणजे 'ओंकारं प्रथमतंतुं न्यसामि' असें जें यज्ञोपवीताचे प्रत्येक पदर हे जसे दश प्रकारानीं–दश प्रकारच्या 'ओंकार' रूपी तंतूंनीं न्यास दिले गेलेले, तेथें जें परिणात्मक जाणणें येणारें तें जसे का सर्व कांहीं एकसमयावच्छेदेंकरूनच आपल्या जाणणेंस आलें, जाणतं झालें, असे तें सूत्र!!

कापशीचें फूल हें तिरंगिंगीच्या फुलासारखे शुभ्र, परंतु कापसारख्या फुलाचें विशेष तें म्हणजे तें नेहमीं शुभ्रामधून गुलाबी गोडसामध्यें जातें, तें ताबूस होतें: तेथे पुसणारें, विचारणारें असेच एक लक्षण–तें म्हणजे का कार्पाटीचें का कर्पटीचे का (नंदाचा श्रीरंग) कपटाचें कां कौटिल्याचें!! (७६)

**जरी सोनें लेणें होऊनि घडे। तरी तयाचें सोनेंपण न मोडे।**
**येर अलंकार हे वरिचिलियेकडे। लेतयाचेनि भावें॥ ७७॥**
**सांगें पडिसादाचीं प्रत्युत्तरें। कां आरिसा जें आविष्करे।**
**तें आपुलें कीं सांचोकारें। तेथेंचि होतें॥ ७८॥**
**तैसिये माझ्या निजस्वरूपीं। जो भूतभावना आरोपी।**
**तयास तयाच्या संकल्पीं। भूतभास असे॥ ७९॥**
**तेचि कल्पिती प्रवृत्ति पुरे। आणि भूतभास आघींचि सरे।**
**मग स्वरूप येक उरे। निखळ माझें॥ ८०॥**
**हें असो अंगीं भरलिया भवंडी। भंवता दिसती दरडी।**
**तैसीं आपुलिया कल्पना अखंडीं। गमती भूतें॥ ८१॥**
**तेचि कल्पना सांडूनि पाहीं। तरी मी भूतीं भूतें माझिया ठायीं।**
**हें स्वप्नींहि परी नाहीं। कल्पावयाजोगें॥ ८२॥**

(७७) वरिचिलियेकडे = स्थूल दृष्टीनें पाहता लेतयाचेनि भावे = अंगावर घालणाऱ्याच्या दृष्टीनें. (७८) पडिसादाचीं = प्रतिध्वनीचीं. आविष्करे = प्रतिबिंबित होतें साचोकारें = खरोखर. आरिसा – अरिसा (७९) तैसिये माझ्या निजस्वरूपीं – तैसीं इये माझ्या निर्मळ स्वरूपीं भूतभास – भूताभास. (८०) कल्पिती पुरे = कल्पना संपली. प्रवृत्ति – प्रकृति. आणि भूतभास – तरी भूताभास येक उरे – एकसरे (८१) भवडी = भोंवळ दरडी – अरडीदरडी = गिरीकंदर. अखंडीं = अखंड ब्रह्मस्वरूपात.

जर सोनें हें लेणें होऊन आहे, तर तेंच वागविण्याचें कसे ते करीत जा. येथें सोनेंपण, अलंकार हे काय नुसते शब्दमात्र असे काय करायचे ? म्हणून ते शब्दच आत मुरवून घेऊन तेथें भावच देवत्वाचा कर: तेथे चित्त हें प्रसन्नता पाहाणारें व देवत्व हें ऐश्वर्याचें असेच एक सगुण ! (७७)

हीं जीं उत्तरें–प्रत्युत्तरें तीं आतमध्ये होतींच–तीं काय बाहेरचीं अशीं नव्हतच ! तीं आपल्याच मधून येणारीं अशीं असून तेथे शब्दोत्तर अथवा आरशाचें जे कांही भासमात्र करणें (आविष्करे म्हणजे प्रतिबिंबित करणे) हें त्यानें माझें सगुणत्व–सगुण स्वरूप–हेंच आकाशावर लपविलें, लांबविलें: त्याप्रमाणें तें जें भगवन्नाम हेंहि नामधारकाचें जें श्रीमंतीचें असें तेंच ह्या पडिसादांनीं व आरशानें लपवून ठेविलें –आकाशावर थापविण्याचें केलें: करितां येथें आपलें स्वरूप हेंच नामाचें कांहीं सगुणैश्वर्य तेथेच तूं असत जा: तरच बरें!! (७८)

निजस्वरूपास कांहीं भास हा नसणारच! भास म्हणजे देहच लपविला व नुसता आकाशाचा असा नसताच!! देहमनाचे नाहींपण, चित्ताचेहि पण तेंच पुढे करूं नको, तसला आरोप करणे हें त्या निज रूपास आवडत नाहीं. हें ज्याचे त्याचें त्यासच भेटणारें झाल्यानें तेथें काय ह्या निजरूपानें ह्या भूतान काय काहीं लिहूनच दिलें कीं, हें जे भूतमात्र त्याचेच जसे कांहीं भृत्यपणानें मी असावें असे केव्हांहि नाहींच! (७९)

म्हणून कल्पिती प्रकृति घेऊन चालूं नको: तेथें प्रकृति हीच पुरती करून घे व मग भूतभास हा कसचा न् काय: तेथे निखळतेचे एक स्वरूपच व तेच 'मी'!! (८०)

भोंवळ आली तर, अंगीं वारें भरलें तर, किंवा आपल्या भोवतीं आपण फिरूं लागलो तर, जसे सर्व एक भवंडणेंच होऊन असतें-गिरी व कंदरें हीं पण फिरणारीं अशीं दिसतात, तसे आपल्या कल्पनेमुळेच ह्या भूतांचे असणे हे अखंड (ब्रह्मस्वरूपातच) जसे असे भासते (आरडी=पडिसाद आकिकरे=दरडी.)

आपुलिया कल्पना अखंडीं गमती भूतः—अखंड कल्पना करीत बसणें म्हणजेच जसे काहीं ह्या भूताना केले गेले, रमविलें, समजणें दिले कीं, ह्या भूताना नाहींपण जसे एक अखंडित जे ब्रह्म त्याच्याच जोडींत बसविलें!! आपल्या कल्पनेप्रमाणे त्याना करण्याचे केलें. (८१)

म्हणून कल्पना सोडून देऊन जर पाहण्याचें केलेस, तर 'मी भूतीं व भूतं माझ्या ठायीं' ह काय कल्पना करण्यासारखें नव्हेच नव्हे. (८२)

आतां मी येकु भूतांतें धर्ता। अथवा भूतांमाजीं असता।
या संकल्पसंनिपाता-।-आंतील बोलिया॥ ८३॥
म्हणौनि परियेसीं गा प्रियोत्तमा। मी विश्वेंसी विश्वात्मा।
जो या लटकिया भूतग्रामा। भाव्यु सदा॥ ८४॥
रश्मीचेनि आधारें जैसें। नाहीं तेंचि मृगजळ भासे।
माझ्या ठायीं भूतजात तैसें। आणि मातें भावी॥ ८५॥
मी येपरीचा भूतभावनु। परी सर्व भूतीं अभिन्नु।
जैसें प्रभा आणि भानु। येकचि ते॥ ८६॥
हा ऐश्वर्य आमुचा योगु। तुवां देखिला ना चांगु।
आतां सांग पां काई लागु। भूतभेदाचा असे॥ ८७॥
यालागीं मजपासूनि भूतें। आनें नव्हती हें निरुतें।
आणि भूतांवेगळें मातें। कहींचि न मनीं हो॥ ८८॥

(८३) या संकल्पसंनिपाताआंतील बोलिया = संकल्परूपी ज्वर अंगीं भरल्यावरचें बडबडणें होय. (८४) मी विश्वेंसी – यापरी मी विश्वासी. (८६) भूतभावनु = भूताचा उत्पन्नकर्ता. भूतीं – भूतासी. जैसें – जैसी. (८७) ऐश्वर्य आमुचा – आमुचा ऐश्वर्य. लागु = संबंध. (८८) आनें = भिन्न. निरुतें = खरें. वेगळें – वेगळिया.

आतां असेंहि जर म्हटलें कीं, मीच ह्या भूतांना धारण करणारा आहे किंवा ह्या भूतांमध्ये असणारा अथवा रमणारा आहे, तर हें बोलणें म्हणजे जसें कांहीं संनिपात ज्वरामध्ये बरळणेंच केलेलें! (८३)

म्हणून हे प्रियोत्तमा ! ऐक ! तूं ऐकत आहेस ना ! ! याप्रमाणें मी ह्या विश्वाचा विश्वात्मा असाच आहे : जो ह्या लटिकेपणानें असलेल्या ह्या भूतग्रामास जसा भाव्य असा: भूतांचीं भाव्य करण्यास योग्य: भाव्य करण्यानेंच-भाव्यणें जें त्यानेंच-भूताना भूतत्व मिळणारें-व तो भाव आतां जसा प्रभुत्व घेऊन आला असा भूतभाव्य-भाव्य हेंच भूताना सापडणारें देवत्व : म्हणून भाव्य हेंच देवलक्षण भूतान्स येणारें : परंतु जर त्यानीं भाव्य केलं नाहीं, तर काहींच नाहीं असे भूताचें प्रभुत्व; म्हणून भाव्य हाच भूताचा देवपणा ! " म्हणोनि परियेंसी गा प्रियोत्तमा । यापरी मी विश्वेंसी विश्वात्मा । जो ह्या लटकिया भूतग्रामा । भाव्य सदा ॥ " (८४)

रश्मींचा आधार घेऊन नव्हेच असें जें तेंच भासमान होतें, तसे माझ्या ठिकाणीं हें सर्व भूतजात असून मलाहि पण व भूतजात भावपणच देत राहातें-' तें मातेंहि देवत्व भावी '-मजला जसे काहीं त्या भूतजातानें देवत्वास आणले, माझें देवपणच पुढें केलें, मजला देवच त्यांनीं केलें. (८५)

या प्रकारचा मी ' भतभाक्नु ' ( भूतांचा उत्पन्नकर्ता ) वरील प्रकारानेंच केलेला, याहिवर सर्व भूतीं अभिन्न असाच आहे. जसा भानु हा मुखास प्रभाच देणारा : तेथें मुख व प्रभा हीं निराळीं नसून मुख हेंच काय सुप्रभ असे, काय शोभिवंत असे ! ! (८६)

हाच आमचा ऐश्वर्ययोग आहे-योगाला (ईश्वरी सत्तेसंबंधीं योग-लीला) ऐश्वर्य येथूनच येणारे : हें तुवा पाहिलेंस ना नीटसे-अगोदर हे चागलें पाहून घे-म्हणजे तुला हेंच समजेल कीं, येथें भूतभेदाचा असा जो एक भाव, त्याचा शिरकावच कसा बरें होईल ? तेथें भूतभेदाचें होणेंच नाहीं-भूतभेदाचा सबंधच नाहीं. (८७)

आणि म्हणूनच मजपासूनच हीं भूते काहीं निराळीं आहेत असे मुळींच नाहीं: आणि 'भूतावेगळा, मी ' असेहि पण मजला मानण्याचें करू नको: हें खरेंच कीं हीं भूतें मजपासून ' आने ' आहेत असे नाहीं-त्याप्रमाणेंच भूतावेगळे मला पाहूंच नकोस: असे पाहाणें हें मात्र महत्त्व घेऊन असते-तेथें मान्यताच एक पुढे होऊन येते, करिता हे नीट वागविण्याचे कर, नीट समजून घे कीं, " भूतावेगळा मजला मानूं नको. " (८८)

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

आकाशस्थितः = आकाशस्थ, आकाशीं असलेला आकाशींच राहातो नित्यम् = नेहमीं सर्वत्रगः= सर्वत्र जाणारा, सचार करणारा. महान = आकाशामुळें वायूलाहि पण महत् हेंच पद आलें मत्स्थ - मत्स्थ भूतानि - मत्स्थानि = मजपासून झालेलीं, अवस्थेस आलेलीं. इति उपधारय = असे समजून घे, असें समज, जसे कांहीं 'संप्रधार' सामर्थ्यानें चरणास येणे केलें.

यथा सर्वत्रगः महान वायुः नित्यम् आकाशस्थितः, तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानि इति उपधारय ।

ज्याप्रमाणे आकाशापासून उत्पन्न झालेला — सर्वत्र संचार करणारा वायु — महान् वायु आकाशाच्या ठायींच असतो, त्याप्रमाणें भूते माझ्या ठायीं असतात असें समज. (६)

**पैं गगन जेवढें जैसें । पवनुहि गगनीं तेवढाचि असे ।**
**सहज हालविल्या वेगळा दिसे । एऱ्हवीं गगन तें तो ॥ ८९ ॥**
**तैसें भूतजात माझ्या ठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं ।**
**निर्विकल्पीं तरी नाहीं । तेथें मीचि आघवें ॥ ९० ॥**

म्हणूनि असे आणि नसे । हें कल्पनेचेनि सौरसें ।
कल्पना लोपे तरी भ्रंशे । आणि कल्पनेसवें होये ॥ ९१ ॥
तेथि कल्पितें मुद्दल जाये । तैं आथि आथि हें केवीं आहे ।
म्हणोनि पुढती पुढती पाहे । ऐश्वर्ययोगु ॥ ९२ ॥
ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणियातें कल्लोळु येक करीं ।
मग एक पाहासी चराचरीं । तय तूंचि असती ॥ ९३ ॥
या जाणणियाचा चेवो । तुज आला ना म्हणती देवो ।
तरी आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ॥ ९४ ॥
तरी पुढती विपायें । बुद्धिकल्पनेसी झोंप ये ।
तरी अभेदबोधु जाये । स्वप्न पडे जैं ॥ ९५ ॥
म्हणोनि इये निद्रेची वाट मोडे । निखळ उद्‌बोधचि आपणांपे घडे ।
ऐसें वर्म आहे फुडें । तें दाऊं आतां ॥ ९६ ॥

(९०) निर्विकल्पीं=कल्पनेचा लय झाला म्हणजे मीचि = मीचि मी. (९१) असे आणि नसे-नाहीं आणि असे कल्पनेचेनि सौरसे = कल्पना प्रसवणाऱ्या अज्ञानामुळे. (९२) आथि आथि – असे नाहीं केवीं – के. पुढती पुढती – पुढती तूं (९३) प्रतीतिबोध = अनुभव समुद्रात तूं स्वतः लाट बनून जा. एक-जंव असती – आहासी. (९४) जाणणियाचा चेवो = ज्ञानाचा प्रकाश. (९५) पुढती विपाये-जरी विपाये बुद्धिकल्पनेसी – बुद्धीसी कल्पनेची. स्वप्न पडे जै – जै स्वप्नीं पडिजे (९६) निखळ उद्‌बोधचि आपणापे – निखळ उद्‌बोधाचेचि आपणपे = आपण शुद्ध ज्ञानस्वरूप आहात.

अगा, हे अर्जुना, हें गगन जेवढे जसे असते, तसाच पवन म्हणजे वारा-वायूहि तेवढाच (असणारा) असतो सहज जरा हा पवन हालविला तर वेगळा दिसतो, परंतु एरव्हीं पाहिलें तर तोच त गगन होय किंवा गगन तेंच तो होय (८९)

त्याप्रमाणें भूतजात हीं माझ्या ठायीं (ठकलें-ठाडे) अशीं आहेत : कल्पना करण्याने फक्त तीं आभासानें भासमान होणारीं-परंतु आभासाचें भासमान होणेंच नाहीं: बरे, निर्विकल्प असे जे ते जर पाहिलेस, निर्विकल्प जे तेथेच जर राहाणे केलेस, तर तेथे मीच मी एकटा असतो . व तोच मी हें सर्व विश्व त्या आघवेपणास आलेः तेथे जे काहीं नामानें उगवणें तें जसे कांहीं सर्व विश्वच ते नाम होऊन आले. (९०)

म्हणून आहे नाहीं हें जे कांहीं बोलणें, तेथे कल्पनाच जशी आपल्या सुरसत्वानें गुगली : कल्पना प्रसवणाऱ्या या अज्ञानाने गुंग झालीः ही कल्पना जर लोप पावली, नाहींशी झाली, बद झाली, तर त जे हें कल्पनामय, बुद्धिच मन झालेलें व आहे नाहीं असे म्हणणारे, तेच भ्रंश पावतें, नाहींसे होते : व पुन्हां कल्पनेच्या बरोबरच वरती येतें, पुढें होतें व पुन्हां आहे आहे नाहीं नाहींचे होऊन असतें. (९१)

हें कल्पना करणारें जें मनाचें राज्यणे, अथवा मनानेंच नुसते मनाशीं लग्न लावणें, जसे त्याने काय तृप्तता ही होणारी नव्हेच : म्हणून हें कल्पना करणे जें-बुद्धिच मन झालें असे जें एक मुद्दलच-तें जर बाजूस झालें, तर तेथें 'आथि आथि' म्हणजे 'आहे हो आहे,' किंवा नाथि म्हणजे नाहीं असें होणारें नव्हेच. तसें तें मग केव्हांहि आहे-नाहींचें नाहींच : म्हणून तुजला एक जें कांहीं सांगण्याचें तेंच तूं पाहात अस म्हणजे 'निर्विकल्प असेंच' होऊन ऐस : व ह्यासच ऐश्वर्ययोग म्हणतात. योगयुक्तीचा उद्देश हाच कीं, 'निर्विकल्प' असेच होऊन असावें. येथें ईश्वरी सामर्थ्यच युक्तीचे असेच-अहो, युक्तीचें नव्हे, तें सत्तेचें असें आहे (९२)

अशा तऱ्हेची प्रतीति तुजला आली म्हणजे तो एक बोधच तुला झाला असे समज : ह्या बोधाचें अंग केवढें आहे म्हणशील, तर तें महान् अशा सामरासारखें आहे : बोध हा येथें सागरच जसा विस्तीर्णतेचा असा आहे : ह्या सागरामध्ये येणारे जे कल्लोळ (लाटा) त्यांशीं तूं आपलें ऐक्य करून ऐस-अनुभव समुद्रांत तूं एक लाट बनून जा, व मग सर्व चराचरामध्यें जर पाहण्याचें केलेंस तर तुजवांचून तेथे दुसरें कोणी आहे असे नाहीं: तूंच जेथें तेथें असलेला – आहेसच आहेस. (९३)

हें जें कांहीं ज्ञान आहे – जाणणें आहे, तेथें तुजला काहीं जागेपण आलें आहे ना ? बा रे अर्जुना, तुजला ह्या स्फूर्तीसबंधीं, ज्ञानाच्या प्रकाशासंबंधीं, कांहीं उल्हास आला आहे ना ? सांग बरे ! असे देव जे श्रीकृष्ण त्या अर्जुनास विचारूं लागले – व पुढे त्यानीं विचारणें केले कीं, आता सांग बरें कीं, हें जें द्वैत जे एक स्वप्नच असे – ते व्यर्थच – तें काय आहे असे नाहींच – द्वैत दृष्टीचे जे तुझे पाहाणे तेच आता बंद झालें . तेथें द्वैतस्वप्न हे सपलें : जे स्वप्नच एक पडत असलेलें, तें आता बोधजागृतीत वाव झाले " या जाणणेयाचा चेवो । तुज आला ना म्हणती देवो । तरी आता द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ॥ " (९४)

आता असा बोध होऊनहि जर विपाय हा पुढे झाला – जी एक अपायउपायांची मधली स्थिति – तेथें बुद्धी ही कल्पना करणारी अशी एक झोपच घेऊन असते : तेव्हां मात्र तो अभेद बोध हा नाहींसाच जणूं झाला व स्वप्नच पडूं लागलें असे होते आता स्वप्नांत पडूं नको : तेथें हा अभेद बोध हाच हरवतो – हरविलेला होतो. (९५)

म्हणून ह्या झोंपेची वाटच मोडून टाकण्याचें जर केलेंस, जर ही निद्राच संपली, तर काय मग काय बहारच होईल-नेहमींच त्या बोधामध्ये स्थिरतेनें बसता येईल ! ! तेथें बोधच नेहमीं वरती येऊन असेल-आपल्या सपन्नतेने असेल-व आपणच तेथें शुद्ध-ज्ञान-स्वरूपानें सपन्न आहोत असे जे तुझें होणे हें एक बोधप्रतीती नेहमींच असणे हेच तूं होऊन असशील. करिता ती निद्रा ज्यायोगे नाहींशी होईल, तेथीलचे वर्म हे एक महत्त्वाचें असे तच आता तुजला दाखविण्याचे (सांगण्याचें) करतो ते ऐक. (९६)

## सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।
## कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

प्रकृतिं यान्ति = जडरूप अव्यक्त प्रकृतिरूप होतात, जडाला सदा जन्ममरण आहे हीच प्रकृतीच एक अशीं होतात. मामिकाम् = माझ्या : मम – मामिका तव – ताविका. मम – मामक. तव – तावक कल्पक्षये = कल्पातीं. जसा चंद्राच्या कलाचा क्षय होतो त्याप्रमाणे, किंवा ओहटी जशी सागरास येते त्याप्रमाणें कल्पादौ = कल्पाचे आरंभीं (आदौ = आरंभीं). विसृजामि = सृज्+वि = उत्पन्न करितो. एक सारण करून त्याना उगवितो – उगवून आणतो – वरती आणतों, जन्मवितों, त्याना प्रतिष्ठाच दिली असे करतों. माया = आच्छादन.

कौन्तेय, कल्पक्षये सर्वभूतानि मामिकाम् प्रकृतिम् यान्ति, तानि कल्पादौ अहम् पुनः विसृजामि ।

**हे कौंतेया ! सर्व भूतें हीं कल्पांती (ब्रह्मदेवाच्या प्रळयकाळी) माझ्या प्रकृतीस येऊन मिळतात; ही जी महत् प्रकृति तिजमध्येंच लीन होऊन जातात, व पुन कल्पाला आरभ झाला ( सृष्टीच्या आरभी ) म्हणजे मीच त्यांना पुनः उत्पन्न करितो. (७)**

तरी धनुर्धरा धैर्या । निकें अवधान दीजे वा धनंजया ।
परि सर्व भूतांतें माया । करी हरी गा ॥ ९७ ॥
जिये नांव कां प्रकृति । जे द्विधा सांगितली तुजप्रती ।
येक अष्टधा भेदव्यक्ति । दुजी जीवरूपा ॥ ९८ ॥
हा प्रकृतिविषो आघवा । तुवां मागां परिसिला असे पांडवा ।
तरी असो काय सांगावा । पुढतपुढती ॥ ९९ ॥
तरी माझिये जालिये प्रकृति । महाकल्पाच्या अंतीं ।
सर्व भूतें अव्यक्तीं । ऐक्यासी येती ॥ १०० ॥
ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसीं ।
मागुती भूमीसी । सुलीन होती ॥ १०१ ॥
कां वारषिये ढेपे फिटे । शारदींचा अनघडु फुटे ।
ते वेळीं घनजात आटे । गगनींचे गगनीं ॥ १०२ ॥
ना तरी आकाशाचिये खोंपे । वायो निवांतचि लोपे ।
कां तरंगता हारपे । जळींचे जळीं ॥ १०३ ॥
अथवा जागिनलिये वेळे । स्वप्न मनींचे मनीं मावळे ।
तैसी प्रकृति मिळे । कल्पक्षयीं ॥ १०४ ॥
मग कल्पादीं पुढती । मी सृजी हे वदंती ।
तरी तियेविषयीं निरुती । उपपत्ति आईक ॥ १०५ ॥

(९७) दीजे – देई. परी-पैं (९८) का – गा द्विधा – द्विविध (९९) प्रकृतिविषो – विखो = मागेचा विषय तरी – म्हणोनि (१००) महाकल्पाच्या अंतीं = महाप्रळयाच्या शेवटीं (१०१) सुलीन – सुलीनें होतीं = गुप्त होतात (१०२) वारषिये – वार्षिये = वर्षाऋतूंत ढेपे-ढेंढें फिटे = अवडंबर संपलें कीं शारदींचा – शारदियेचा अनघडु फुटे = शरदऋतूचा गुप्तपणा प्रगटतो ते वेळीं – तेव्हां (१२३) खोंपे = पोकळींत. तरगता - तरंगाकार. जळींचे जळीं – जळीं जेवीं (१०४) तैसी प्रकृति – तैसे प्राकृत प्रकृतीं. प्राकृत = प्रकृतीपासून झालेलें सर्व (१०५) वदती = लोकवार्ता. आईक – आईका.

तरी आता, हे धनुर्धरा, तूं मूर्तिमंत धैर्यच होऊन अस, धैर्याचा हो व इकडे लक्ष असूं दे , येथें अवधान देऊन ऐस अगा हे ! बा हे ! धनजया ! ही माया जी आहे, तीच ह्या सर्वभूताना करते, माया ही त्याना घडविते–ही श्रीहरीची जी माया आहे तीच ह्या सर्वभूताना करते, घडते, आपल्या हरीचीं-आहारींचीं तीं भूतें आहेत असे करिते. माया हीच भूताना पचविते-स्वाधीनतेचें, आपल्या स्वाधीनतेचें, असे त्यांना करून असते. भूतांना आवरण्यानें ही माया भूताचा पराजय करिते-आपल्या अंगचीं तीं भूतें आहेत असे करून ती असते माया भूताना आपलीच धग देऊन आहारींच तीं भूतें पडलीं असे ती करिते (भूतांतें माया करी हरी गा). (९७)

जी 'प्रकृति' या नावाने आहे, जी तुजला दोन प्रकारची आहे म्हणन सांगितलें आहेः एक अष्टधा होय-तेथे भेदव्यक्तीनें किंवा व्यक्तीभेदानें असणे असतें व दुसरी जी ती जीवरूप होयः दुसरीस 'जीवरूपा' असे म्हणतात (९८)

हा प्रकृतीचा सर्वच्या सर्व विषय तुजला मागेंच सांगितला असून तो तूं ऐकलेला आहेचः म्हणून असो, तेंच तेंच पुनः पुनः काय सांगायचें ? तें सांगण्याचें नकोच; वरचेवर तेंच तें सांगणें नकोच ! (९९)

तरी माझ्या प्रकृतीचीं हीं झालेलीं–प्रकृतीनें प्रतिष्ठेस आलेलीं–अशीं हीं सर्व भूते ब्रह्मकल्पान्त्या शेवटीं अव्यक्तात जातात व ऐक्यास येतात–अव्यक्तात गेल्यानें त्याना ऐक्यता येते–सर्व भूतं हीं जेथं ऐक्य पावून असतात, तेथे त्या तत्त्वाला जड अव्यक्त प्रकृति असे म्हणतात

बुद्धेरात्मा महान् परः। महतः परमव्यक्तम्। अव्यक्तात् पुरुष. पर.। पुरुषान्न पर किंचित। सा काष्ठा सा परा गति। (१००)

ग्रीष्मऋतु हा जेव्हा आपल्या अवस्थेस येतो–तरुण होतो–ऋतुमान् होतो, तेव्हा सर्व तृणे जशीं काहीं सबीज अशीं होऊन ह्या भूमीमध्येच लीन होऊन जातात–सुलीनतेने सप्राण अशींच होऊन भूमींतच जशीं का उगवण्याकरिता लीन केलीं अशीं होऊन जातात–भूमीशीं एकजीव झालीं अशीं होतात–दिसत नाहींशीं होऊन गुप्त झाल्यासारखींच–येथे भूमीच जगी अतिरसास आली व तिने ह्या तृणाना आपल्या पोटीं धारण केले (१०१)

ह्या शारदियेचा गुप्तपणा–गुप्त ठेवा–हा जेव्हा वर येऊन–नाहींसा होऊन–शारदाच नेथे प्रगटती होते, तेव्हा समजावे कीं, वर्षाऋतूंत मेघाचें–वर्षाव करणारे जे मेघ त्याचे–अवडंबर संपतें, तेव्हा घनजात म्हणजे मेघ जे आहेत ते सर्वच्या सर्व गगनातच आटून जातातः जेव्हा शरदृऋतूचा गुप्त ठेवा उघडला जातो–ढगाच्या ढिगानीं वर्षणे संपविलेले होते–तेव्हा घनजात हें गगनींचे गगनींच–गगनामधून निघालेलं ते गगनामध्येच–आटून जाते.

वर्षाकाळातील मेघाचे ढीगाच्या ढीग हें जेव्हां मोकळे होऊन येतात–म्हणजे जसे काहीं ह्या शारदेचा गुप्त ठेवाच आपल्यास फोडतो, फुटवून घेणारा असा होतो–शरदऋतूमधील जी 'शारदा' तिचा गुप्त ठेवा हाच वर येऊन फुटतो–तेव्हा घनजात हें आटून जाते–ज्या गगनामधून ते निघालेलं तेथेच तें आटून जाते– तेथे घन व श्रृण अशा ज्या तरंगाचें होणे ह्या विद्युत्नें त्यापैकीं घनजात हेच आटून घनजाताचे गगनामधून निघालेले तें गगनातच आटणे होऊन होत (१०२)

किंवा आकाशाच्या पोकळींत वायु हा निवातपणेच मावळून जातो, लोपलेला होतोः किंवा तरंगानीं घेतलेला आकार पाण्यातच हारपून असतो (१०३)

अथवा जागे झाल्यावर स्वप्न हें संपत ते मनाचे मुळींच असेच असल्यानें ते मनातच मावळणारे होतेः तसे भूतजात म्हणजे प्राकृत हे प्रकृतीमध्येच कल्पाच्या शेवटीं मिळून जाते (१०४)

मग कल्पास पुन्हा आरंभ होऊं लागला म्हणजे मीच तेथं 'सृजतो', उत्पत्ति करितो, अशी लोकवार्ता होऊन असते. तरी हिजबद्दल म्हणजे ह्या लोकवार्तेविषयींची उपपत्ति सागतो ती ऐक. (१०५)

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

स्वाम् प्रकृतिम् = आपल्या ( अविद्यारूप ) प्रकृतीला अवष्टभ्य = माझ्या सत्तखालीं ठेवून ( किंवा, तिच्या साहाय्याने ). प्रकृतेः वशात = प्रकृतीच्या – प्रकृतितंत्राच्या – स्वाधीन असलेल्या अवशम् = परतंत्र झालेल्या कृत्स्नम् = सर्व. इमं कृत्स्नं भूतग्रामम् = ह्या संपूर्ण भूतसमुदायाला पुनः पुनः विसृजामि = पुनः पुनः उत्पन्न करितो (प्रकृतेः वशात प्राकृतः = मायेने केलेले भूतमात्र : त्यांना जड म्हठलें जातें : सत् – चित् – आनंद : असत् – जड – दुःख. )

स्वाम् प्रकृतिम् अवष्टभ्य प्रकृतेः वशात् अवशम् इमम् कृत्स्नम् भूतग्रामम् पुनः पुनः विसृजामि।

मी आपल्या अविद्यारूप प्रकृतीला माझ्या सत्तेखालीं घेऊन, तिच्या साहाय्यानें, प्रकृतीच्या स्वाधीन असलेल्या व त्यामुळेच परतंत्र झालेल्या, ह्या संपूर्ण भूतसमुदायाला पुनः पुनः उत्पन्न करितो. (८)

तरी हेचि प्रकृति किरीटी। मी स्वकीया सहजें अधिष्ठीं।
तेथें तंतुसमवायें पटीं। जैसी विणावणी दिसे॥ १०६॥
मग तिये विणावणीचेनि आधारें। लाहाणा चौकडिया पटत्व भरे।
तैसें पंचात्मक आकारें। प्रकृति होये॥ १०७॥
जैसें विरजणियाचेनि संगें। दूधचि आटेंजो लागे।
तैसी प्रकृति अंग रिगे। सृष्टीपणाचिया॥ १०८॥
बीज जळाची अवळिक लाहे। तेंचि शाखोपशाखीं होये।
तैसें करणें मज राहे। भूतांचें हें॥ १०९॥
अगा नगर हें रायें केलें। या म्हणणया सांच कीर आलें।
परी निरुतें पाहातां काई सिणले। रायाचे हात॥ ११०॥
आणि मी तरी प्रकृतीसी अधिष्ठी कैसें। जैसा स्वप्नीं जो असे।
तोचि कां प्रवेशे। जागृति अवस्थे॥ १११॥
परी स्वप्नींहुनि जागृति येतां। काय पाय दुखती पांडुसुता।
कीं स्वप्नामाजीं असतां। प्रवासु होये॥ ११२॥
या अवघियाचा अभिप्रायो काई। जे भूतसृष्टीचें कांहीं।
मज एकहि करणें नाहीं। ऐसाचि अर्थ॥ ११३॥

(१०६) अधिष्ठी = अंगिकारतो. ततुसमवाये पटीं = वस्त्र विणताना पटात तंतु समवायी म्हणजे उपादान कारण (मूळ कारण, पदार्थाचें घटक द्रव्य) होतो विणावणी – जैसी विणावणी. (१०७) लाहाणा – लहाना चौकडिया = प्रथम लहान लहान चौकडया होत होत वस्त्र तयार होते. तैसे – तैसी. पंचात्मक – पंचात्मकें = पंचमहाभूताची. प्रकृति – प्रकृतिच. (१०८) अंग – अंगा (१०९) राहे – आहे (११०) सांच – सांचपण परी – तरी. (१११) मी तरी – मी.

तरी हीच प्रकृति, हे किरिटी, मी-ती स्वकीयतेची-माझी आपली स्वतंत्र अशी असल्यानें-सहजच अधिष्ठित करतो, आपलीशी करतों, अंगिकारितों, तेव्हां तेथें कसें दिसतें म्हणशील, तर जेव्हां वस्त्र विणताना पटात जेव्हा तंतु समवायी म्हणजे उपादान कारण होतो, तसतशी ती विणावणी अथवा वीण ही दिसूं लागते, दिसते-बाहुलीमध्यें सूत्र जसे कारण असतें तसें. (१०६)

पण त्या विणावणीच्या आधारानें लहान लहान अशा चौकड्यांनीं तें वस्त्रच किंवा पटत्वच भरलेलें दिसतें, तसे पंचभूतांचीं आकारमानें – आकारनामें – आकारमात्रता – आकारता ही प्रकृतीस येऊं लागते. (१०७)

ज्याप्रमाणें विरजणामुळे दूध हें आटूं लागतें, तसें प्रकृति ही सृष्टिपणाच्या अंगाची होऊन जाते, सृष्टिपणाची होते. (१०८)

बीज हें जळाजवळची जवळीकच घेऊन असल्यानें तेंच शाखोपशाखीं होऊन जातें-तसेंच माझें ह्या भूतांचें करणें आहे. (१०९)

हे अर्जुना, नगर हें रायानें केलें ह्या म्हणण्यास सांचपण म्हणजे खरेंपण हें कसे बरें! तें खरेंच असे! परंतु काय तेथे रायाचे हात शिणले? (११०)

आणि मी प्रकृतीस जे अंगीकारतों तें कसे म्हणशील, तर जो स्वप्नामध्ये असतो, तोच जागृतावस्थेमध्येहि प्रवेश करून असतो. (१११)

तसेच, एक विचारणें आहे तें हें कीं, स्वप्नामधून जागृतीस येतांना काय पाय दुखतात, कां स्वप्नामध्ये असता काय प्रवास हा होतो? तसे, हे अर्जुना, हें आहे. (११२)

हे सर्व विचारास घेतले, तर असें दिसून येईल कीं, ह्या भूतसृष्टीचें कांहीं एकहि मजला करणें नाहीं-असाच ह्याचा अर्थ होय. ।( ह्या भूतसृष्टीचे प्रियपण घेऊन मी काय तेथीलचे एकादे काम करीत आहे असे नाहीं : तेथे प्रियपण हें मजला जडत नाहीं, असाच तेथीलचा 'अर्थ' होय. ) (११३)

**जैसी रायें अधिष्ठिलिया प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा ।**
**तैसा प्रकृतेसंग माझा । येर करणे तें इयेचें ॥ ११४ ॥**
**पाहे पां पूर्ण चंद्राचिये भेटीं । समुद्रीं अपार भरतें दाटी ।**
**तेथ चंद्रासी किरीटी । काय उपखा पडला ॥ ११५ ॥**
**जड परी जवळिका । लोह चाले तरी चालो कां ।**
**तरी कवण सिणु भ्रामका । सन्निधानाचा ॥ ११६ ॥**
**किंबहुना यापरी । मी निजप्रकृतीतें अंगिकारीं ।**
**आणि भूतसृष्टी येकसरी । वाढोचि लागे ॥ ११७ ॥**
**जो हा भूतग्राम आघवा । असे प्रकृतिआधीन पांडवा ।**
**जैसी बीजाचिया वेलपालवा । समर्थ भूमि ॥ ११८ ॥**
**ना तरी बालादिका वयसा । गोसावी देहसंगु जैसा ।**
**अथवा घनावळी या आकाशा । वार्षिये जेवीं ॥ ११९ ॥**
**कां स्वप्नासी कारण निद्रा । तैसी प्रकृति हे नरेंद्रा ।**
**या अशेषाहि भूतसमुद्रा । गोसावीण गा ॥ १२० ॥**
**स्थावरा जंगमा । स्थूळा आणि सूक्ष्मा ।**
**हे असो भूतग्रामा । प्रकृतीचि मूळ ॥ १२१ ॥**
**म्हणौनि भूतें हन सृजावीं । कां सृजिलीं प्रतिपाळावीं ।**
**इयें करणें न येती आघवीं । आमुचिया आंगा ॥ १२२ ॥**

(११४) व्यापारे=व्यवहार करते (११५) समुद्रीं – सिंधु उपखा=श्रम पडला – पडे (११६) कवण शीण भ्रामका सन्निधानाचा = लोहचुंबकाला जवळ असण्याचे कांहीं श्रम आहेत का? (११८) भूतग्राम = सर्व प्राणी वेलपालवा = वेलींना व पल्लवाना. (११९) गोसावी देहसगु जैसा = बाल्यादि अवस्थाना देहसंग जसा गोसावी (प्रभु, मुख्य कारण) आहे घनावळी या आकाशा = आकाशात मेघाची पंक्ति वर्षाऋतूस कारण आहे (१२०) गोसावीण – स्वामिनी (१२१) आणि – अथवा (१२२) म्हणौनि भूतें हन सृजावीं – कां भूतें हन न म्हणौनि सृजावीं. करणे = कामे.

रायाने अधिष्ठित (जेथे रायपण हे स्थापित झालेलें आहे) केलेली आहे जी प्रजा ( कंदर्पाचे जे प्रजनन भार-कारभार ) ती जशी आपआपले व्यवहार करीत राहाते, त्याप्रमाणें माझा ह्या प्रकृतीशीं जो संग तो सत्तेचा, साहाय्याचा असतो. याहून निराळे जे कांहीं करणें तें सर्व हिचें असते.

(प्रकृतिसग=प्रकृतीनें, मायेनें केलेला भूतमात्र जे त्यांचा सग हा कसा म्हणशील तर 'स्वाम्' असाः अवष्टभ्य असाः सत्तेचा असाः साहाय्याचा असाः असा जो प्रकृतीचा संग तो ) (११४)

पूर्ण चंद्राची, कलारहित चंद्राची भेट ही जव्हा समुद्राशीं होते, तेव्हा सिधूस किंवा समुद्रास अपार अशी, दाट अशी, भरती येऊन असतेः तेथे चंद्राला काय चंद्राचे चंद्रपणच कोणीं उपसून नेले असे होतें ? तेव्हा काय चंद्र येथे श्रमतो ? तेव्हा काय चंद्राला श्रम होतात ? (साम्य) आधळया गरुडाचे जे पंख आहेत, ते कोणाच्या उपयोगाचे होतात ? काय ते व्यर्थच नव्हत ! तसे येथे यथार्थ ज्ञानावाचून सत् कर्म जरी करीत राहिलें, तर तें सत कर्म केल्याचे श्रम व्यर्थ होतात (उपखा=श्रम, उपास, उपवास) (११५)

जरी जड तरी जवळिकतेचे असे जरी चळणारे झाले, व्यापारले, श्रमले, तरी ते होईना का असे जे लोह होते, तेथे काय त्या लोहचुबकाला आपल्या सान्निध्याने असण्याचे श्रम झाले ? (११६)

किंबहुना, असेच मी आपल्या निजप्रकृतीचा अंगीकार करून असतो तेथे भूतसृष्टी ही एकसारखी वाढतच राहाते, ती प्रसव घेऊनच असते (११७)

जो हा सर्व भूतग्राम हा प्रकृतीच्या स्वाधीनतेचा असाच आहे-प्रकृतीस वश होणारा असाच आहे-प्रकृतितंत्राचा असाच आहे. ज्याप्रमाणे बीज हें उगवू लागले - म्हणजे भूमीचे जे काहीं सामर्थ्य तेच वेलीवृक्षाना त्याच्या वेलवृक्षपणास अथवा पालवीचे जे होणे त्यास वळण देत . आपल्याच समर्थतेचे करणें-सामर्थ्यानें जे त्या बीजाकुरास वळविणे-ते होत असतेः येथे भूमि हीच समर्थ-आपलाच अर्थ पुढे करणारी-किंवा श्रीमत्-माझे जे काहीं-ज्याचे जे त्याचे त्यास किंवा माझे असेच-माझेपणाचे संपन्नतेनें माझेपण करण्याचे जे काहीं माझेपण तेच-तेथे त्यात उतरविले असे (११८)

अथवा बाळाच्या-मुलाबाळाच्या-वयाचे होणे तेथे देहसग हाच गोसावी-तेथें त त्या बाळास वयाप्रमाणे वागविण्याचे करणे हें माझेच प्रभुपण अथवा मी मुख्य कारण असतो; अथवा ह्या वर्षाऋतूमध्ये जे काहीं मेघाचे भार हे आकाशाप्रमाणे जेथील जसे आकाश तसे तेथीलच्या आकाशाने आवळलेले असे घनत्व त्या मेघास येणारे होते (११९)

किंवा, स्वप्नास कारण हें ती निद्रा होतेः स्वप्नामध्ये येणारे जे प्रसंग ते स्वरूपनिद्राच जशी कारणावर परिणमते ! त्याप्रमाणे ही प्रकृति ही गोसाविणीच जशी-आपण अलिप्त राहून तेथे जे कार्य -संचित-क्रियमाण-प्रारब्धादिनीं वळविले जाणारे ते सर्व भूतसमुदाय असेचः प्रकृति ही तेथे स्वामीण जशी कारण घेऊन असते. (१२०)

काय स्थावर, काय जंगम ! काय स्थूल, काय सूक्ष्म ! कसेही असो, ह्या सर्व भूतग्रामास प्रकृतिच मूळ कारण होऊन असते. (१२१)

म्हणून कां हीं भूतें मीं सृजावीं-उत्पन्न करावीं-का जीं उत्पन्न केलीं त्याचे प्रतिपाळण, पालन, पोषणादि करावे, हीं कामे माझ्या अंगचीं-मीं अंगीकारलेलीं-जशी काहीं संलनग्नता हीच मुलग्नवेळा लग्नघटकादिनीं मींच तीं केलीं पाहिजेत अशीं माझ्या अंगाचीं-मुळींच असत नाहींत येथे कर्म असेच म्हटलेंः करणीं जीं कर्में तीं कामें होतच नाहींतः परंतु तीं कर्में हीं ज्याचीं त्यानेच-श्रीगुरुसेवेने म्हणा अगर निवृत्तिमार्गावर आरूढ होऊन म्हणा-कामाचीं करणें हेंच धर्मलक्षणाचें अग होय

कारण मुळीं काढावें असे होतच नाहीं-तेथें कारण हेंच मुळीं भूतग्रामावर व प्रकृतीवर उभे असल्यानें, तेथें सृजणें हेंच करून असावे असे होणारें कदाचितच-मुळीं कारण हेंच जर भूतग्राम व प्रकृतीचें धर्मग्राह्य असे केले, तरच तेथे सृजणें हें येऊं शकतेंः एरव्हीं भूतग्रामच जसा प्रकृतीस वश होऊन, किंवा प्रकृतीच मुळीं भूतग्रामाची जर झाली, तर येथे सृजणे हें जें प्रकृतीनें प्रकृति-

धर्मास नव येणे केल्याने, किंवा नुसत्या भूतग्रामाचें असेच होणें केल्यानें तेथें सृजणें हें कदाचित् असेंच (१२२)

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

निबध्नन्ति=बध्न+नि धनजय=अर्जुना उदासीनवत्=उदासीनाप्रमाणे आसीनम्=तटस्थ असलेल्यास मला असक्तम् = निरिच्छ अशा मला,(येथे आसक्त व असक्त ह्या शद्बामधील ' अ ' चे जे प्रकारणें तें अकारण व प्रकारण असेंच ) तेषु कर्मसु=त्या कर्मांमध्यें, (कुमारीनें आपल्या बांगडयांचा आवाज होऊं नये म्हणून एक काढून ठेविली, तरी पण आवाज कांहीं थाबला नाहीं: असे एक एक काढीत काढीत तिने शेवटीं एकच बागडी हातात ठेविली व मग आवाज होण्याचे बद झालें असे एक तें 'वत'-उदासीनवत ह्या शद्बाचें रहस्य येथे )

धनञ्जय, तेषु कर्मसु असक्तम उदासीनवत आसीनम माम तानि कर्माणि न निबध्नन्ति ।

हे अर्जुना, पुन पुन घडणाऱ्या या कर्मांनीं मजला बंधन हे होतच नाहीं कारण त्या कर्मामध्ये मी उदासीनाप्रमाणे असक्त होऊन असतो, निरिच्छ असतो. (९)

**जळीं चंद्रिकेच्या पसरती वेली । ते वाढी चद्रें नाहीं केली ।**
**तेवीं मातें पावोनि ठेलीं । दूरी कर्में ॥ १२३ ॥**
**आणि सुटलिया सिंधुजळाचा लोट । न धरूं सके सैंधवाचा घाट ।**
**तैसा सकळ कर्मासी मी सेवट । काय बांधिती मातें ॥ १२४ ॥**
**धूम्ररजाची पिंजरी । वाजतया वायूतें जरी होकारी ।**
**कीं सूर्यबिंबामाझारीं । आंधार रिघे ॥ १२५ ॥**
**हें असो पर्वताचिये हृदयींचें । जेवीं पर्जन्यधारास्तव न खोंचे ।**
**तेवीं कार्यजात प्रकृतीचें । न लगे मज ॥ १२६ ॥**
**येऱ्हवीं इये प्रकृतिविकारीं । येकु मीचि आहे अवधारीं ।**
**परी उदासीनाचिया परी । करा ना करवी ॥ १२७ ॥**
**दीप ठेविला परिवारीं । कवणातें नेमी ना निवारी ।**
**कवण कवणे व्यापारीं । राहाटतांहि नेणे ॥ १२८ ॥**
**तो जैसा कां साक्षीभूत । गृहव्यापारीं प्रवृत्तिहेत ।**
**तैसा भूतीं मी अनासक्त । मी भूतीं वसे ॥ १२९ ॥**
**हा येकचि अभिप्रावो पुढती । काय सांगो या बहु उपपत्ति ।**
**येथ येकहेळा सुभद्रापति । ऐसें जाण पां ॥ १३० ॥**

(१२४) सैधवाचा घाट = मिठाचा बाध. न शके धरू = आवरूं शकत नाहीं तैसा - तेवीं. काय - तीं काय (१२५) धूम्ररजाची पिजरी = धुराच्या कणाचा विस्तार होकारी - होकरी = हांक मारून थाबवी आंधार रिघे - आधारे शिरे, आधारें उरे (१२६) न खोंचे=भोंसकले जात नाहीं.(१२७) प्रकृतिविकारीं=प्रकृतिकार्यांत आहे - असे उदासिनाचिया - उदासिनासिया. (१२८) दीप - जैसा दीप. परिवारीं-परिवरीं=घरांत कवणे=कवणिये. राहटतांहि - राहाटे तेंहि (१२९) व्यापारीं - व्यापार. भूतीं मी - भूतकर्मीं. वसे - असे. (१३०) पुढती - पुढती पुढती. बहु - बहुता. येकहेळा=एकवार. ऐसें=इतुकें.

जळामध्यें चंद्राच्या चांदण्याच्या वेलीच पसरल्या आहेत असे जे काय तें काय त्या चंद्राचें करणे असतें ? त्याप्रमाणें मजप्रत येणे केले म्हणजे कर्में जीं आहेत तीं दूरच होतात : तीं कर्में दुरितबाधा करूंच मुळीं शकत नाहींत. (१२३)

सिंधूच्या पाण्याचा लोट जर कां सुटला, तर काय तो भिठाचा डोंगर-घाट किंवा बाध-त्यास अडवं शकेल ? त्याप्रमाणे सर्व कर्मांना मी 'शेवट' असा आहे, मी अखेर असा आहे: तेव्हा तीं कर्में काय मला बद्ध करणारीं होतील असे नाहींच, कारण तींच मुळीं आपल्या अखेरीस आली, मजमध्यें मिळालीं (१२४)

रजाची पिंजरीच एक जो धूम-धुराच्या कणांचा विस्तार किंवा लोट-तो जगी वाजणाऱ्या वायूसच होकार देऊन असेल ( काय हाक मारून थाबवी ? )-जसे काहीं त्यासच मुळीं वल्हवीत आहे असे होणारेच नाहीं: काय सूर्यबिबामध्ये अंधार हा रिघाव करूं शकतो ? केव्हाहि करूं शकत नाहीं असेच (१२५)

पर्जन्यधारा ह्या पृथ्वीवर पडणाऱ्या, त्यानीं पर्वताच्या हृदयींचें जे काहीं एक गगोत्रीसारखें पवित्र, तें जे फक्त श्रीशंकराच्या पिडीवरच पडणारे जोपर्यंत, तोपर्यंतच त्यास गगोत्री असे अभिधनाचे केलेलें-तेथे ती जर का ह्या पर्जन्यधारांनीं खोचण्याची केली, तर यथे जसे काहीं ते महादेवाच्या पिडीवर पडण्याकरिताच गंगोत्री असे तेथे कसा परिणाम करील-पिडीवर पडल्यानतर जथे गगा असे म्हटलें जातं तेथे कसे-व नंतर पृथ्वीवर आल्यावर तेथे कसा परिणाम-येथे तीन तऱ्हाचें त्या गंगेचे झाल्याने-तेथे प्रकृतीचे जे काहीं कर्मजात-तेथे वरीलच्या प्रकारानीं कसे बरे वर्णिले जाणारे त ( खोसणे-खोंचणे-खचणें )

पर्वतावरूनच खालीं आलेले तं काय पर्जन्यधारामुळे खचलेलें होत ? होत नाहीं त्याप्रमाणें कर्मजात हें जे प्रकृतीचे सर्वथैव तं मजला लागतच मुळीं नाहीं : पर्वताच्या हृदयीचें काय पर्जन्यधारामुळे खोसले जाते-खोंचलेले होत खचलेले होते ? (१२६)

एरव्हीं पाहिले असता ह्या प्रकृतिविकारामध्यें-अविद्यारूप (जड = जे चितने उचलिले नाहीं त ) प्रकृतीस वश झालेले जे भूतमात्र-ज्याना प्राकृत प्रकृतींचें तंत्राने चालणारे अस म्हणतात-तेथे परतत्र झालेल्या ह्या अविद्येचे जे अंग तेंहि मीच होऊन असतो. परंतु तेथे मी उदासीन असाच होऊन असल्याने तेथे काहीं काय करणं किवा करविणे हे मी करीतच नाहीं: (प्रकृतीस विकार हा जो पोहोचतो तो तेथीलच्या जीवदशेचें जे काहीं ह्या प्रारब्ध कर्मास जोड देऊन असणारे जे निवृत्त लक्षण तेंच मुळीं जरब पोहोचल्यानें शिथिल होतं: येथें तेंच जे काहीं अनुष्ठित असे होणे हेच पुन्हा त्या अविद्येचे म्हणजे शिथिलतेचें झालेले जे मन तेंच आपले स्वरूप-अनुसधान पाहात नाहीं-करिता ते पुन्हा आपले स्वरूप-अनुसधान ज्यायोगे करील असेच मनप्रसन्नतेचें एक त्यास अगच देणं करावं लागणारे, तेंच जर त्यानें आपण होऊन केले तरच बरे-नाहीं तर ह्या व्याधींचें जसे काय वर येऊन ते ह्या प्रकृतीस जर्जर करितें ) (१२७)

ज्याप्रमाणे घरामध्यें ठेविलेला दिवा हा कुणाचे काहीं कर्म जाणणारा होत नसतो : त्यास काय चोर काय जार हे सारखेच : काय ज्ञान, काय अज्ञान-काय प्रवृत्ति, का निवृत्ति-नियमाने चालणें कां नेहमींच अनियमितपणाने जडत्वच पाहूं केले-असेहि तो दिवा जाणत नाहीं : किंवा कोणी काही कर्म करण्यास प्रवृत्त झाला, तरी तो दिवा काय त्याचे निवारण करावे असेहि करीत नाहीं : तसेच कोणी कसल्या कामांत आहे किंवा अमक्या तमक्यानें विशिष्ट अशाच कामात असावे असे जे एकाद्या व्यक्तीकडून करवून घेणें तेंहि तो दिवा जाणत नाहीं : तसे घरामध्ये जें काय वागणे केले ते चागले का वाईट, नियमित कां अनियमित हें मुळींच पाहाणारा नसून तो उदासीनच जसा, स्वस्थ असा. (१२८)

तो जसा काय साक्षीच होऊन असतो-गृहामधील जे जे काही हालचालमात्र व्यापार झालेले ते जसे का प्रवृत्ति एक वर्तणारी-तेथें हेतु म्हणजे प्रवृत्तीचा होय : येथे प्रवृत्ति हीच साक्षीभूत अशी असून ती आपले महत्त्वानें असते.

त्याप्रमाणें ऊर्मीमध्ये ( कशा प्रकारचे त्या प्राण्यानें उमाळा-वृत्ति-घेण्याचे करणे वगैरे ) मी असतच नाहीं-भूतकर्मामध्येहि पण अनासक्त असाच-तसेच त्या भूतमध्ये मी आसक्त झालेला आहे असेहि नाहीं-असा अनासक्त मी भूतीं असून असतो (१२९)

" असा जो एक प्रीतीचा असा वागण्याचा अंदाज हाच तेथे मी वागवून असतो," हेच पुनः पुनः सांगणे आहे : अनेक अशा अनेक तऱ्हेच्या उपपत्ति सांगून काय बरे करायचे आहे ? वरऱ्या वाक्यांनं सर्व काहीं एकदमच सांगून टाकले. (१३०)

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥१०॥**

मयाऽध्यक्षेण=माझ्या अध्यक्षपणाने सूयते=वीते, उत्पन्न करिते. सचराचर=सर्व चराचर. जगद् हेतुना=अनेक व्हावे ह्याच हेतूमुळे जगत=हे जग परिवर्तते=विपरिवर्तते=चक्रगतीन फिरणारे फिरत असते, फिरत राहावे, हा जगद्रूपी संसार ह्याला कधीं थांबणेच नाहीं-ते एकसारखे फिरतच असत. (वि-विपरि-विकारवश होऊन, उलट-सुलट)

मया अध्यक्षेण प्रकृति. सचराचरम सूयते कौन्तेय, अनेन हेतुना जगत विपरिवर्त्तते ।

माझ्या साक्षीभूतत्वाने किंवा अध्यक्षत्वानें--अध्यक्षतेनें--आश्रयानें--ही प्रकृति सचराचरास वीते, उत्पन्न करते. व हीच जग उत्पन्न करण्याची जी तिची वीण, हे अर्जुना, हाच एक हेतु पुढे होऊन असल्याने हे जगत्-चक्र नेहमी फिरतच आहे असे असते. (रज्जूसर्पन्याय हा येथेच उगवतो.) (१०)

**लोकचेष्टा समस्तां । जैसा निमित्तमात्र सविता ।**
**तैसा जगप्रभवीं पंडुसुता । मी हेतु होये ॥ १३१ ॥**
**कां जे मियां अधिष्ठिलिया प्रकृति । होती चराचराची संभूति ।**
**म्हणौनि मी हेतु हे उपपत्ति । घडे यया ॥ १३२ ॥**
**आतां येणें उजियेडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें ।**
**जे माझ्या ठायीं भूतें । परी मी भूतीं नसे ॥ १३३ ॥**
**अथवा भूतें माझ्या ठायीं । आणि भूतांमाजीं मी नाहीं ।**
**या खुणा तूं कंहीं । चुकों नको ॥ १३४ ॥**
**हें सर्वस्व आमुचें गूढ । परी दाविलें तुज उघड ।**
**आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगी ॥ १३५ ॥**
**हा वोंशु जंव न ये हाता । तंव माझें सांचोकारपण पार्था ।**
**न सांपडे गा सर्वथा । जेवीं भूसीं कण ॥ १३६ ॥**
**येऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें । आवडे कीर कळलें ऐसें ।**
**परी मृगजळाचेनि वोल्हासें । काई भूमि तिंबे ॥ १३७ ॥**
**जैसें जाळें अळीं पांगिलें । तेथें चंद्रबिंब दिसे आतुडलें ।**
**परी थडिये काढूनि झाडिलें । तेव्हां कें बिंब ॥ १३८ ॥**

**तसें बोलवरी वाचाबळें । वायां झकवीजती प्रतीतीचे डोळे ।**
**मग सांचोकारीं या बोधावेगळे । आथी ना होईजे ॥ १३९ ॥**

(१३१) जगत्प्रभवीं = विश्वाच्या उत्पत्तीला होये – जाण (१३२) संभूति = उत्पत्ति, संयोग. (१३३) माझ्या – ना माझ्या (१३५) सर्वस्व – सर्वस्वे दाविलें – दाखविले देऊनि कवाड=दार बंद करून (१३६) डौंगु–दंगु=धर्म, रहस्य : साचोकारपण=खरें स्वरूप भूतीं–तूर्षी=कोंडयात. (१३७) पैसे = जोरावर बोल्हासे – बोलाशें तिंबे-तिमे = चिंब भिजते. (१३८) जाळें-जाळ=माशाचें जाळें. आतुडलें=सापडले के बिंब - बिंब के सागे (१०९) साचोकारीं – साचोकारें. वेगळे – वेळे. आथी ना होईजे=आहे असे होत नाहीं.

ह्या लोकांचे जे व्यवहार, व्यापारमात्र, चेष्टामात्र जे होणारे तेथें सविता हा निमित्तमात्रच : त्याच्या प्रकाशानें ते व्यापारमात्र होणारे : त्याप्रमाणे जग हें प्रभव-भव जो आहे त्यासच जणं दर्शवीत असलेलें, किंवा भव हाच भव कसा तें जसे काय 'प्र'नें गति दर्शविणारे ! जग हेंच भवप्रद, तेथें तें प्रद असे हे भावण्यानेच आपल्या महत्त्वास आलें : म्हणून तेथें जो हेतु, हे पाण्डवा, तो हेतु हा एक प्रभावच होऊन आला व तोच 'मी'(प्रभू) होऊन असतो (प्रभू, प्रभव प्रभवन. प्रभावन)(१३१)

मींच ती प्रकृति अधिष्ठित केलेली असल्यानें, तेथें हें सर्व चराचर उत्पन्न होऊं लागतें : अनेक तऱ्हाच्या ज्या उत्पत्ति म्हणून आहेत, तेथें 'संभूतिं' असेच म्हटले गेलें : चराचरापासूनच चराचर हे उत्पन्न होणार, जसे काहीं एकाचे अनेक होणे तेंच येथें होत असल्यानें 'एकोऽहम बहु स्याम्' असाच तेथीलचा हेतु अथवा एक तऱ्हेची प्रीतिच त्या उत्पत्तीच्या ठिकाणींच येऊन असते : म्हणून ' मी हेतु ' याचा अर्थच असा कीं, तेथे मजमुळेच हें घडणें एक जसे अनेक होऊन आले : म्हणून एकाच वाक्यात बोलण्याचे, तें कसे म्हणशील तर, "मी कारणहेतूमुळें ही प्रकृति 'उत्पत्तीची' होते : " येथें उपपत्तीचीं जीं कांहीं ह्या अनेक बुद्धयाचीं लक्षणे, त्यानीं ह्याच उपपत्तीवर टेकणें केलें. (१३२)

बुद्धिवैचित्र्याचें लक्षण हे कोठेहिं स्थिर म्हणून होत नाहीं येथे बुद्धि हे 'आदि' तत्त्व पहिले कां 'अनादि' तत्त्व पहिलें, हेंच एक या बुद्धीनें नेहमीं वादच करण्याचे केल्यानें तेथें 'प्रवदताम्' हे कुणीच पाहात नाहीं कीं, 'वद' म्हणजे बोलणें हेंच मुळीं अगोदर कोठून आले, तें कसे पुढे आले तें नच पाहाता असे चर्चेचे अंगच नुसत्या बुद्धिवादाचे : तेथें कोणताच एक निश्चित सिद्धात स्थिर न झाल्यामुळे नेहमीं या बुद्धीनें काय वादच घालीत बसावे ? म्हणून वर जे काहीं सागणें केले तें अनेक दृष्टात घेऊन पटवून दिलेले कीं, परमात्मा हाच हेतु होऊन ह्या प्रकृतीस वश झालेलीं जीं भूतं तीं प्राकृत होऊन आलेलीं, तेथे 'जड' असेच : : म्हणजे चित्त जें आहे तें तेथे स्थिर नच झालेलें : म्हणून चित् हे स्थिर करणें हाच तो माझा हेतु होय व मग प्रीति ही सहजच एक स्वस्थतेची अथवा आनंदाचे शात लक्षण हें स्थिर असेच झाले : ज्योत ही जेव्हां अति प्रखर असते, तेव्हा महागभीरतेची शातता घेऊन असते–तेथं शातपणच एक ! परंतु तें कसे म्हणशील, तर महाप्रखरतेचे असे-तेच आतां 'सत्' असे उच्चारानें 'सत' प्रत येऊं लागून, 'वर सागितलेले जे म्हणणें कीं, भूतें माझ्या ठायीं आणि भूतामाजीं मी नाहीं' हें ईश्वरी सत्तेचे ह्या शरीरावर, मनुष्यदेहावर, परिणमन होणारे ते : नुसतेच शब्द झेलीत बसण्याने तेथे काहींच जन्मत नाहीं, काहींच निष्पन्न होत नाहीं: परतु जेव्हा का ह्या ईश्वरी सत्तेच्या योगानें हें जड अथवा प्राकृत–जें प्रकृतीचे सर्वथैव–त चित्प्रत आणून प्रीतीच्या हेतूचें होते, तेव्हां सर्व काहीं आनंदणें जसे काहीं ह्या मनुष्यजन्मानें जन्मास आलें असें असलेलें !

असा हा प्रकाश-बुद्धीला शुद्ध चित्तामध्ये बसवून पाहिले असतां, न्याहाळून असण्यानें, तें सहज समजणारें जे–मनुष्याने मनुष्य कसा व्यवहारीं वागविला जातो–जेथें कसे उच्चारानें सत्तेच्या शहाण-

पणाचे होतें तं म्हणजे हया देहावर जे काहीं हया अंगीं अंग अथवा बोलण्यात बोलणे हे पाहिले म्हणजे सहज समजणारें असें आणि म्हणूनच तर 'माझ्याठायीं भूतें' याचा अर्थच असा कीं, मी अधिष्ठून आहे भूताते, परंतु तेथें जडत्व हेंच तर चित्ताचें नच झाल्यानं, जडत्वच एक प्रकृतीनं आपल्या सत्तेचें वशतेचें केलेलें असे प्राकृत : तेथे प्रकृतीस वश करून घेऊनच सृजण जे तं माझ्या ठायीं आहे असें म्हटलें, कारण व्यापक धर्माप्रमाणे तेथे मी अधिष्ठून आहे हे केव्हाहि

आता मी भूतीं नसे याचा अर्थ जे काहीं अनुमोदनानं होणारे-जथे सत्ता हीच अक्षराप्रत येऊन तेथे जर ते वागविण्याचे केलेलें, तर तें केव्हाहि बरोबरच : परंतु तेथें तं सत्तेचें अग हेंच जसे काहीं चित्-ते नच वागविण्यानें नुसते एक जडत्वच ! नच त्या चितच्या प्रकाशानें असले, तर 'तेथे मी नाहीं' हें केव्हांहि खरेच होयः कारण नुसत प्रकृतीच्या तत्राने केलेले चालणे हं जसे काहीं जडच ! !

एवढयाचकरिता हं जे व्यापकपणाने असलेले ईश्वराचे ईश्वरत्व हे सर्व अधिष्ठून आहे, व्यापून आहे, हे केव्हाहि : परतु तेथे माझें जे काहीं सत्तेचे लक्षण-चित्चे लक्षण-त्यानेच माझे व्यवस्थितपण ह यथार्थ असे म्हणणारे होते

म्हणून व्यापकत्वानं 'माझ्या ठायीं भूतं' व सच्चिदानदत्वें करून जे काहीं सत्तेनें असणे ते जर नाहीं, तर तेथे 'मी भूतीं नसे' हे केव्हाहि ! येथे 'आनंद' हा प्रथमतेचा असून 'चित्' हे नतर 'सत' पदास उभारणारे होत. (१३३)

हया ईश्वरी तत्त्वाचे लक्षण ह सहजव्यापकत्व जें ते सहज एकपणास आले-सत्तेस आले-तेथें प्रकाश हाच हया बुद्धीला सहज उज्जीवन देणारे जीवितच जेथें जीवडा हाच जीवन घेऊन प्रकाशास आला व खालींच त्याने आपली मान करून अथवा दृष्टि हीच खालावली करून किंवा पाठीमोरी करून हे प्रकृतीचे व्यापकत्व जाणले . व उच्चार जर नाहीं, तर तेथे मी नाहीं असे 'भूतामाजीं मी नाहीं' हयाने सिद्ध केले : तेथे जीवित हे श्वसन करणारे जे तेच आपल्या आपणच स्वत स पाहाणारे झाल्यान, तेथे बुद्धि हीच शुद्ध अशी चित्ताची कलाच एक निवृत्तिच तिनें पाहिली व आता दिवस उगवला.

आपल्या सत्तेवर एकत्रित झालेलें जे मन तें एक आता चित्ताचे झाल्यानं मनुष्य हा मनुष्य प्राण्यातच बसला व त्याशीं बोलूं लागला : येथे सहजता हीच एक प्रीतिलक्षणास आलेली : तेथे अनेक हया मुक्तिमार्गांनीं त देवलक्षणच देवपणास आले-आकाराचे झाले-असे त्या मुक्तींना मिळून गेल्याने तेथे सलोकता, समीपता इत्यादिनीं ते कर्मच मुळीं निष्कर्म असे करून तेथे दिव्यतेचे देवपणच 'दिव्य' असे प्रकाशणारे ! !

[ निरुते : : आता यावर काहीं आणखी एकादे तत्त्व पाहाण्याचे राहिले असे नाहीं असे एक निरुत्तरच करणारें असे आहे : त्यामुळे सर्व महत्त्व येथेंच येऊन स्थिर झाले : व तेंच आता निश्चित' असे एक हया बुद्धीने घेणे होय येथे सर्वमान्य, सर्वश्रेष्ठ, सर्वोत्तम, एकोत्तर असेच हया प्रकारास म्हटले गेल्यानें, तेथें निश्चित असे हय। बुद्धिवादाने पाहाणे करणें म्हणजे एक दिवसच जणं उगवला-आतमध्ये प्रकाशच झाला दिवसाचे उजेडणेच झाले-उजेडलंय म्हणजे रात्र संपून आता दिवस वर येऊ लागला आहे असे रहस्याचें एक निश्चित असे : आतां यावर चिंता म्हणून करण्याचे काही उरले नाहीं ( येथे दृष्टि हीच खालीं म्हणजे पाठीमोरी जी तीसच आपले महत्त्वास आणून आधाराचा आरसाच हया बुद्धीनें पाहिला असे. ) ]

म्हणून येथे हा योग म्हणजे ईश्वराचे आपले स्वतःचे ऐश्वर्यच नटलेलें जे तं कसे हया मनुष्यप्राण्याच्या बुद्धीनें हया ईश्वराच्या योगलीलेचे एक परम कौतुक अति आनंद देणारे असें आहेः हें काय हया मनुष्याचेंहि पण जसे ऐश्वर्यच ! तेथें मनुष्याचें जे एक देवपण अथवा सिद्धलक्षण त्यानं ह ईश्वरत्वच् ईश्वरत्वाचें स्वतःत पाहू केले व आता हया मनुष्यप्राण्याचें जे काहीं एक देवलोकच जसा

नटविला-देवलोकास देवत्व दिलें-तेथीलचें ऐश्वर्य पाहूं केलें-असा एक दिव्यतेचा आनंदच असून तेथे तो ह्या ईश्वरचरणीं परम स्नेह वागवून असतो : तेथें शांतता-मनाचें स्निग्ध, परम पूज्यतेचें लक्षण-हीच तो स्वतःच्या अंगानें वागवीत असला व तेथे स्थिर स्थिर असाच तो होऊन असला, तर काय देवलक्षण हें दुसरीकडे जगात घडण्याचें कारणच नाहीं : तेथे एक घडाच दिलेला कीं, हें जें देवदिव्य तें कसे वागविलें जाणारें तें जसे काहीं जगामधील मनुष्यांना त्याच्या व्यवहारास एक आधार भूततेचा असा आश्रयच, आधारच, गुरुत्वच जसे तेथें उगवलेले हें पाहाण्यास मिळणारे ! ! (१३४)

हेंच आमचें सर्वस्व ! हेच आमचें सर्वस्वीं गुह्यपणाचे असे गूढत्व घेऊन असलेले : परंतु आतां तें तुजला उघड उघड असेच बोलणें करून सांगितलें

आता असे कर कीं, जे हे असे उघडतेचें तें आता अंतःकरणींचे असे- जेथें सर्व ब्रह्मांडाची जी ह्या अंतःकरणाची देवता तीच उजळेली गेली-तिजमध्ये मिळूनच असणे असे जे काहीं एक ह्या इंद्रियांना नच समज देता करणे तेंच आता कर. ह्या इंद्रियांना आपलें प्रसरण घेणें हाच ह्यांचा स्वभाव असल्यानें तेथे त्याचे तें मायाच नेहमीं पाहाणे-किंवा मायेचें सर्वथैव असे होणें तें काय जडत्वच एक-परंतु ह्या इंद्रियांचा स्वभावच मुळीं ह्या प्रकृतीस वश होणारा असाच असणार हें केव्हांहि ! म्हणून येथे सत्ताच आपलीशी कर, ज्यायोगे तें ईश्वरत्व हेच केव्हांहि पुढेच होऊन असेल : तेथें असत असे ह्या इंद्रियांनीं होणे अथवा जड असे असणें व नेहमीं ह्या बुद्धिरूपीं अकिंचनतेस पत्करणारें किंवा पाहाणारे तेंच आता बाजूस कर-तेथील आपलें ज्ञानलक्षण हे त्यांना केव्हाहि नच समजणारे असल्याने, तेथे ज्ञानदरवाजा हा, अथवा आपल्या अंतःकरणाचा जो ज्ञानदिवा हाच आतां सर्वथैव त्या देवतेचा ईश्वरत्वाचा करून अस : व हे ज्ञानाचे ऐश्वर्य हे पाहा कसे रमणीय ! सहज प्रेमाचे ! लीलावैचित्र्याचे ; सत्तेनें नटलेले असे आहे ! ! तें पाहात राहा व आनंदानें ऐस : तेथे तुजला आपल्या अंतःकरणींची तल्लीनता ही परम प्रेमानें महत् आनंदातच स्थिर करणारी होईल ! ! (१३५)

म्हणून असे जें न्याहाळून पाहाणें अगदीं सूक्ष्मतर असेहि जे काहीं, तेंहि पण सहज दिसणारें असे केले असतां, तेथील जो ह्या जिव्हावाणीनें केलेला दंश हाच आता आपल्या हातचा असा सहज वागविला जाणारा : येथेच मुळीं जे काहीं निश्चितपणाचे अंग तें सर्वथैव आळस करणारे होतें. म्हणून निश्चितपणानें हेच एक करण्याचें कर कीं, तो दंश हाच सापडला : आपल्या हातचा झाला : म्हणून जोपर्यंत तो सापडणारा होत नाहीं, तोपर्यंत माझें यथार्थपण- खरेपणानें असणें-हेच मुळीं तुजला सांपडेल असे नाहीं : ज्याप्रमाणें कोंडा वाऱ्यानें उडून गेला म्हणजे पाठीमागे राहणारे कणच ! तसे येथें मायेचे जे सर्वथा असे असलेले बोलणें ते जिकडच्या तिकडे गेले, म्हणजे शुद्धतेचे काहीं एक जे तेच सापडते : येथें जिव्हेनें किंवा वाणीनें हा मनुष्यभारच हाणला जाऊन-म्हणजे प्रकृतीचें मायिक-तेचें वाढविले जाऊन, हटविले जाऊन, जे एक शुद्ध असे शक्तीवर परिणाम करून असत, तेच तो दंश-तेंच हातीं आले तर ' तोच मी ' : यावर आता काहीं जाणण्याचे उरले नाहीं : परंतु हे खरेपणानें आपल्या पदरात पडणारे होण्यास तेथेंच निश्चितपणानें लिगटून असणे, तेथेच न्याहाळीत असणे हेंच एक योगच जसा साधला असे आहे. (१३६)

एरव्हीं वरवरच पाहिले असता-अथवा तर्कच करीत बसले असता-तेथीलचे काहींच हातीं लागणें नाहीं. तर्क हाच महत्त्व घेऊन आला, तर तेथे गोडीच जशी काहीं आली असे वाटतें व आतां त्यात आणखी कांहीं कळण्यासारखे असे नाहीं असेच एक कळणें (न आकळणे !) म्हणून जे आहे तेच त्यात काय ! अति सोपे असे हें आहे ! असें तो तर्क नुसता अनुमानाचा धेंडाच होऊन असल्याने तेथे कांहींच निश्चितपणानें समजले असे होतच नाहीं : हे पाहा ! कीं वरवर मायिकतेचें जे काहीं ह्या मनासच खुलविणारें असे तें जर ह्या मनाचें एक खुशीसच येणे होणारे : तेथें मस्करीच जशी काहीं एक हास्यच

देऊन हया मनाचें रंजनच केलें अशी झाल्यानें, तेथे चित्तच मुळीं हया मनाचें झाले, व आता काय हें रंजन म्हणजे एक सहज हसविणारें असे एक जागा न सापडणारें : तेथे जागेपण हें क्वचीतच् असे झाल्याने, हया चित्तास काहींच मिळालें नाहीं. किंवा हया वृत्तीस चित्तच न सांपडणारे झाल्यानें तेथे हया देहाचें म्हणा अगर वृत्तीचें म्हणा अगर प्रेमाचें म्हणा कांहीं अगच सापडणारें होतच नाहीं : म्हणून तेथे हया मनाच्या मागे न जाता हया चित्तासच आपलें करून हया देहभूमीवर आपल्या प्रेमाची ओलच नेथे हया वृत्तीस देऊन मग वे काय करण्याचें तें केलेस, तर तेथे ही भूमि-वृत्ति-देह-चित्त-आपलेपण--स्वात्म-असे एक प्रेमच-प्रीतिच तेथे उगवती-प्रीतीनें हें चित्त रंगच शिंपडल्यासारखे झाल्याने तेथे मग हा जीवनवृत्तात हाच गालातल्या गालात हसणारा असा होतो तेथे मग प्रेमच एक सापडलें असे होते : तेथे हा चित्ताकार हा जसा काहीं एक हया मनुष्यदेहाचा प्रवासच असून तो देशांतरें फिरणे आता नच करिता हया एकाच वृत्तींत राहून आपले जीवन हेंच संसाररहस्याचें करून तेथे मग ज्ञानच एक ते असे सहजतेस येणें. (१३७)

चित्तचकोरानें चंद्रकणच पिण्याचें केले ते कण अगदीं हळूपणाने निवडले व सौम्यता हीच हया वाणीनें पाहिली : जीवित हें हादरणारें असेच किंवा हादरवूनच आपलेपणास येऊ पाहाणारें असे तें मनःकलेचे सामर्थ्यच आपलेसे करणे होय

हा जगन्चिताने असलेला ससारश्रम हाच चोहोंकडे पसरलेला, तेथ हया ससारामध्ये गोडीच एक पेरलेली आहे-तेथीलच गुज आपण हस्तगत करावें असे हया मनानें घेणें, तेथें जसे काहीं हया पाण्यामध्ये पडलेले चद्रबिंब तच हया जाळयाने (देहरूपी) आपलेसे करावे-मन हेच माशासारखे-म्हणून ते जाळेच हया चद्रबिबास आत घेऊन येईल असे जर का काहीं हया बुद्धीनें घेण्याचें केले, व ते जाळे हया पाण्यात पडलेल्या चद्रबिंबावर टाकलें,— ते सर्व गोळा करून, पाण्याच्या बाहेर येऊन, ते जाळे झाडून पाहिलें, तों तेथें कांहीं चद्र हा नच सापडणारा ! तेथे बिंब जें होते त कुठे होत ? व ते काय झाले ते साग पाहू ! (१३८)

तसे हया बोलण्याची जशी काय एक हातोटीच साधली काय हें बोलणें अनेक तऱ्हांनीं नटविले गेले व हयानेच मात्र त प्रेम आपलेसे करिता येईल असे जर एकाद्याने मनात आणिलें, तर-जेथें प्रतीति म्हणून आहे तेथें पाहाण्याचें जेव्हा करावें, तेव्हा हे डोळेच मुळीं (प्रतीति कदाचित्) झकविले गेले-व आता एव्हा मात्र ती प्रतीति जी ती जशी आधळेपणानें-बुद्धियोगानें नच पाहिलेली अशी झाल्याने ती प्रतीति ही दुसराच घेऊन जातो. म्हणून येथें जर का तुजला खरेपणाचें अगानें चालणे-तें खरेच खरें या प्रतीतीचा अनुभव घेणे हे जर पाहाण्याचे आहे, तें खरेंच असे पूर्वीच्या प्रतीतीवरच उभें राहून पाहाण्याचें केले, तर तेथे ती प्रतीति हाच एक खरेपणाचा बोधच जसा तेव्हा या बुद्धिबोधाने जे काहीं बुद्धीयोगाचें जे अक्षर-अंग तेंच पुढे करून अस : व मग हया बोधाच्या वेळेस तेथे खरेपणच एक, त्यासच तूं चिकटून राहा-त्यावेगळा मुळींच होऊ नको म्हणजे येथीलचें जे कांहीं आहे आहे, कदाचित् नाहीं नाहीं, असे म्हणणेंच मुळीं बंद झाले : तेथें आहे ? अशा अनिश्चितपणाचा होऊ नको : हया बुद्धीच्या डोळयाना खरेंपण पाहाण्यास दे बोधावेगळा होऊं नको : हया बोधाच्या आधीनतेचा असाच होऊन अस : तरच तेथीलच्या बुद्धीच्या बोधरूपी डोळयानीं खरेंपणानें स्वतःस पाहिलें-स्वरूपास पाहिले, व तें जे नाम तेंच हया बुद्धिरहस्याचें ऐश्वर्यच एक तेंच आतां नामरूपाने आपले आपणासच मिळून तेथें सर्वथैव बोधच एक बोधास आला तो प्रतीतीचा झाला. तो खरेपणाचा असाच होऊन आला. (१३९)

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

अवजानन्ति = जाणून महत्त्व नच देणे जे, अवज्ञा करणे, आज्ञेप्रमाणें नच चालणे मूढाः = विवेकशून्य मानुषीं तनुमाश्रितम् = साधारण माणसाप्रमाणे हाहि एक मनुष्य अस समजून, परतंत्र व जडदेही मनुष्य असे समजून, त्यांत कांहीं महत्त्व नाहीं असे आपल्याच मनानें करून परम् = श्रेष्ठ, प्रकृतीच्या पलीकडील भावम् = प्रकृति ही भूताची वशता घेऊन असलेली ती भाव्य करण्याने तिचे खरे धर्म हे योग्यतेचे होणारे – तेथे जे कांहीं अनुकारणें – तें जेव्हा बुद्धीने पाहिल जातें, तेव्हा ' भाव ' भावासच येणें होणारे भूतमहेश्वर = भूताचा प्रभु, स्वामी, प्रभवन चरित्राचा असा, विचित्रता ही जसे एक चित्रच भिंतीवर काढलें आहे असें तें जेव्हां ह्या चिदाकाशानें आपल्या भावनेस येणारें होऊन तेथे भाव्य असेच एक जे ह्या भूताना देणें तेंच जेथे दिलेले

मम भूतमहेश्वरम् परम् भावम् अजानन्तः मूढाः माम् मानुषीम् तनुम आश्रितम अवजानन्ति ।

विवेकशून्याने बुद्धीस मूढपण येणारे जे त्याने त्याना आपलेसे केले आहे, ते मी मनुष्यदेह धारण करणारा आहे असे समजून मजला जाणत नाहीत ( माझी अवज्ञा करितात, माझी अवहेलना करितात ), माझा श्रेष्ठ भाव–माझें स्वरूप–न जाणून, त्याचप्रमाणे मी सर्वभूताचा महेश्वर ( स्वामी ) आहे हेहि पण नच समजून, माझी अवज्ञा करितात–मजला जाणीत नाहीत, म्हणजे माझे आहेपण पाहात नाहींत जाणून पुन्हा त्या जाणण्यास काय जाणायचे आहे ' असे म्हणून ते ते महत्त्वानें वागवीत नाहींत. (११)

**किंबहुना भवभया । साचें चाड आथी जरी भियां ।**
**तरी तूं गा उपपत्ति इया । जतन कीजे ॥ १४० ॥**
**येऱ्हवीं वेधली दिठी कवळें । तैं चांदणियातें म्हणे पिवळें ।**
**तेवीं माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखाल दोष ॥ १४१ ॥**
**ना तरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे विख ।**
**तेवीं अमानुषा मानुष । मानाल मातें ॥ १४२ ॥**
**म्हणोनि पुढती तूं धनंजया । झणें विसंबिसी या अभिप्राया ।**
**येऱ्हवीं स्थूलदृष्टी वायां । जाइजैल गा ॥ १४३ ॥**
**पैं स्थूलदृष्टी देखिजे मातें । तेंचि न देखणे जाण निरुतें ।**
**जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमर न होइजे ॥ १४४ ॥**
**तऱ्ही स्थूलदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ ।**
**परी तें जाणणेंचि जाणणेयाआड । रिघौनि ठाके ॥ १४५ ॥**
**जैसा नक्षत्राचिया आभासा-।-साठीं घात जाला तया राजहंसा ।**
**मार्जी रत्नबुद्धीचिया आशा । रिगौनि ठेला ॥ १४६ ॥**
**सांगे गंगा या बुद्धी मृगजळ । ठाकूनि आलिया कवण फळ ।**
**काय सुरतरु म्हणोनि बाभुळ । सेविली करी ॥ १४७ ॥**

( १४० ) भवभया – भवा बिहाया भवा=संसारास. तूं गा – तुम्ही कीजे – कीजा चाड – आवड. (१४१) देखाल – देखिती. (१४२) मानाल – मानिती. (१४३) पुढती – पुढतपुढती येऱ्हवीं – जे यया. (१४४) देखिजे – देखती. स्थूलदृष्टी = नुसत्या स्थूलदृष्टीनें पाहाशील तर फसशील (१४५) तऱ्ही – येऱ्हवी. (१४६) नक्षत्राचिया = नक्षत्रांचें प्रतिबिंब पाण्यांत पाहून ते मोतीं समजून हंस उडी घालून फसतो. जाला – केला. राजहंसा – हंसा. रिगौनि ठेला – रिगोनिया. (१४६) काय – का

किंबहुना, हे अर्जुना, हा भव म्हणजे खरोखरीच ह्या मनास जर्जर करणारा आहे असे पक्के समजून मजविषयींचें प्रेम-माझ्या प्रेमाची आवड-ह्या ईश्वराची चाड वाहाणें- देवत्वाची चाड म्हणजे आवड आपलीशी करणें, हें खरोखरीनें तुझ्या मनामध्ये असेल तर तुवा ह्या उपपत्ति ज्या सागितल्या त्या जीवाप्राणापेक्षाहि जास्त काळजी घेऊन वागविण्याचें करावे　　(१४०)

ह्या उपपत्तींना-म्हणजे जे अगदीं जवळ आहे-जेथून एक आरंभच जसा ह्या वाक्सृष्टीला झाला-जे मुखाजवळच आहे-रथोपस्थ असेच म्हटले गेलें-तेथे शब्द कसा रूपांतर, अर्थांतर, इत्यादि अनेक अंतरे घेऊन असलेला-तेथें हा भव भाव्यच झाला-ह्या भूताना भाव्य केल्यानें हेंच नीटसे समजून घेतलें, तर ह्या उपपत्तीच जशा तेथील कारण व कार्य दाखवून असलेल्या अशा-आस्थापूर्वक, प्रेमपूर्वक, कधींहि नच विसरता तेंच मूळ, तेंच जीवित, तेंच जीवन, तेंच प्रेम, तेंच प्रीति, तेंच सर्व काहीं ह्या देहसंसाराचें महत्त्वच एक-तेथीलचें मापच घेऊन असत जा : हें केव्हाहि विसरू नका : परंतु येथे विसरणे जे होतें, तें कशा प्रकारचें आहे तें आता सागण्याचे करितो कीं, तें विसरणें हें जसे काहीं प्रकृतींतच असा काहीं चमत्कार विकारवान जसा असा, म्हणजे तेथे आपण होऊनच, आपोआपच, कोणी काहीं नच चेवणे दिलें, तरी माझ्या निर्मळ अशा स्वरूपामध्ये दोषच आहेत असे म्हणू लागाल : दोषच तेथे पाहाल असेच एक दुरिततेचें त पाहाणें : एरवीं कामिन झाली म्हणजे डोळे पिवळे होतात-नेव्हा चादण्यासहि पण पिवळे न आहे असे म्हणणे होते-हा जसा दोषच एक त्या चादण्यास पिवळे म्हणण्यानें येऊ केलेला-परंतु तेथे काय ते चादणं हे पिवळें ? काविळीनें पिवळेच सर्व काहीं दिसतें, तसे येथे माझ्या निर्मळशा स्वरूपामध्ये पाहाणं जेव्हा, तेव्हा वरीलप्रमाणे तेथे तें दोषदृष्टीनेच बोलणें केलेलें होतें : दृष्टी ही ते स्वरूप सदोष आहे असेच म्हणूं लागते . तुम्ही या एवढयाचकरिता नीट जपूनच हें तत्त्व वागविण्याचे करा . तेथे दोष हे तुम्ही पाहाल, नव्हे पाहाताच ! म्हणून असेच वरचेवर सागणे करून सागूनच ठेवितों कीं, असे असे ते होणारे होतं, असतं अथवा होईल, असेल असेच त्या स्वरूपाविषयीं-जसे स्वच्छ जे पाणी त्यासच गढूळ अथवा अस्वच्छ असे म्हणूं करणारे.　　(१४१)

तापानें विटाळलेले वाळिलेले मुख हे दुधास कडू विख असे म्हणतं-तेथे चवच मुळीं तापानें लपविली . त्याप्रमाणे साधारण मनुष्याप्रमाणेच मीहि एक असे मानणे करून असतोस, असता, असशील किंवा जर असाल, तर तं बरे नाहीं . म्हणून पुन्हा तेंच सागतो कीं, ह्या उपपत्ति प्राणापेक्षाहि जास्त साभाळून ऐस　　(१४२)

पुन्हा हेंच सागणे कीं, पुन्हः पुनः तीच ती चूक तूं करून असशील हा तो आस्थेचा अभिप्राय तुजपुढे केला आहे. केवळ स्थूळ दृष्टीनें पाहू नको एरवींच्या स्थूळ दृष्टीनें तें वाया जाणारे होतें. हें अभिप्रायाचे, आस्थायुक्त, प्रीतियुक्त, अति काळजीपूर्वक असे वागविण्याचे कर. स्थूळ दृष्टी एरवींची घेतली, तर ते मग समूळीं वायाच जसे गेले-व्यर्थतेचे असे. जेथे ह्या दर्शनाचा उल्हास-उत्साह हा सर्व वरच येऊन असतो, अशाच वेळेस तूं ह्या प्रकृतीची काळजी घेत राहा मग तेथे तें अभिप्रायाचे वाया जाणे हें केव्हांहि होणारेच नव्हे. कारण तेथे दर्शनच हेच पुढें होऊन येणारे होईल, व अनेक श्रम सायास हे वाया नच जाता आपल्या युक्ततेचे असेच होऊन असतील.　　(१४३)

स्थूल दृष्टीनें मला पाहाणें हे पाहाणेंच नव्हे. जसे स्वप्नामध्यें प्यालेल्या अमृताने कधीं कोणी अमर झाला आहे ( असे काहीं आमच्या ऐकण्यात नाहीं ) ? अमरा अमर करणे, जसे देवांना देवत्व देणे किंवा देव करणे, तसे अमृतानें अमरत्व.　　(१४४)

करितां स्थूळ दृष्टीनें पाहिलेला मी, हा जसा कांहीं हातून नच निसटणारा असा पक्काच तो परमात्मा बांधूनच ठेविला आहे असे त्याचें मूढपणच तर काय ! परंतु तेथें जाणणें जें आहे, तें जाणणें

किंवा ज्ञान हे जाणण्याच्या आडच लपून असतेः तेथे अवहेलना हीच ' ज्ञान जाणून त्यात काहीं जाणणे आहे असे नाहीं ' असेच म्हणून असत : असे हे स्थूल दृष्टीचे ज्ञानच ते लपविणें !

स्थूल दृष्टीच्या आड लपूनच ' जाणणे ' जें तं अवज्ञा पाहूं लागून-किंवा तेथीलचें लक्षच मुळीं लक्षाचे आड आड असेच झालेः तेथे आभासच एक नुसता राहिला. समक्षतेचें पाहाणेंच नाहीं, ऐकणे नाहीं व बोलणे हेहि नाहीं-ते फक्त आश्चर्याच्या आभासावरच टेकलें असेच नेहमी होणारे होतंः म्हणून नुसता आभास घेऊन असणे हेच नसणे होयः तच पाहाणे हें नच पाहाणें होय व जाणणें हेंहि पण प्रत्ययाने नच जाणणे हेहि आपोआपच तेथे आलेः म्हणून समक्ष दर्शन-प्रत्यक्ष दर्शन-हें ह्या स्थूल दृष्टीच्या आडच लपलेले (१४५)

पाहा, कसे तें राजहंसानीं शोभविलेले ते मोत्यांचें चरणे ! आकाशामधील नक्षत्रांचीं प्रतिबिंबें हीं आभासच ! पाण्यामध्ये दिसणारीं तीं मोत्ये-रत्नेंच ! तेव्हा आता काय यापेक्षा आणखी उत्तम खाद्य किंवा चारा हा नाहींच व हींच मोत्ये होत असे समजून त्या राजहंसानीं पाण्यात उडीच घतली परतु पाहातात तो काय तीं मोत्ये नव्हतच ! तीं नुसतीं आभासणारीं अशीं जलामधील प्रतिबिंबेच ! तेथे त्याच्या चोंचीच अडकल्यामुळें त्याना निर्मळ जे ईशस्वरूप ते मिळालेच नाहीं, वर त्याना ती मागील कर्मेंच आठवूं लागलीं व त्या (स्फटिकासारख्या) आभासानीं त्याना ते दर्शन अगदीं जवळच किंवा स्वरूप हें अगदीं जवळच-पोहोचलोंच तेथे असे आभासाचे ! येथे श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, अशीं हीं कर्में हींच का बरे त्याना आठव लागलीं ? फक्त कर्मच घेऊन ते जे त्यात फसले, ते निश्चतच नाः येथे हेंच खरे कीं, भगवान जे श्रीकृष्ण त्याची ती ज्ञानमुद्रा हीच त्यानीं पाहाणे केले नाहीं असे नव्हे, तर त्या राजहंसानीं भगवान श्रीकृष्णाना विसरण्याचें केल्यामुळे होय : येथे श्रीकृष्ण भगवान हेच कां बरे विसरले गेले हें काहीं का तेथील भक्ति कमी पडली, का श्रद्धा त्याना नव्हती, का ज्ञानडोळे त्यांना नव्हते असे नाहीं, तर फक्त एकच कारण तेथे पुढे आलें, व त म्हणजे मूर्खांची सगती हीच त्या शहाण्याना नडली ! ! (१४६)

गंगा समजून मृगजळाकडे धाव घेणे किंवा देववृक्ष म्हणून बाभळीची सेवा केली, तर तेथे काय बरे फळ येणारे ? (१४७)

हा निळयाचा दुसरा । म्हणौनि हात घापे विखारा ।
कां रत्नें म्हणोनि गारा । वेंची जेवीं ॥ १४८ ॥
अथवा हें निधान प्रगटलें । म्हणोनि खदिरांगार खोळे भरिले ।
कां साऊली नेणता घातलें । कुहां सिंहें ॥ १४९ ॥
तेवीं मी म्हणोनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची ।
तेहीं चंद्रासाठीं जळींची । प्रभा धरिली ॥ १५० ॥
तो कृतनिश्चयो वायां गेला । जैसा कोणी एक कांजी प्याला ।
मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ॥ १५१ ॥
तैसें स्थूलाकारीं नाशिवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें ।
पाहाती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसे ॥ १५२ ॥
काई पश्चिमसमुद्राचिया तटा । निघिजे पूर्वीलियां वाटां ।
कां कोंडा सांडिनां सुभटा । कणु आंतुडे ॥ १५३ ॥
तैसें विकारलें स्थूळ । जाणितलिया मी जाणें केवळ ।
काय फेन पितां जळ । सेविलें होये ॥ १५४ ॥

**म्हणौनि मोहावलेनि मनोधर्मे । हें मीचि मानूनि संभ्रमें ।**
**मग तेथींचीं यें जन्मकर्मे । तियें मजचि म्हणति ॥ १५५ ॥**

(१४८) हा – हार निळयाचा दुसरा = नीळमण्याचा दोन सराचा हार (वीस सराचा हार जो त्यास माणवक म्हणतात) म्हणौनि – या बुद्धि घापे – घातला. हात घापे विखारा = कवड्या साप हातीं धरला (१४९) खदिरांगार = खैराचे निखारे खोळे = पदरात कुहा = विहिरींत (१५१) तो – तैसा (१५२) पाहाती – जंव पाहाती (१५३) काई – अगा काई निधिजे – निधिजेत आहे साडिता – काडिता आतुडे – जोडे. (१५४) जाण – जाणनसे, जाण (१५५) मोहावलेनि – मोहिलेनि. तेथींचीं – येथींचीं जिये

निळथा रत्नाचा हारच हा म्हणून विखारासच हात घातला: का रत्नेच हीं म्हणून गारा वेचल्या, तर काय हातीं येणार ?

'हार निळयाचा दुसरा'. : दुसरा = दोन सराचा. दोन सराचा हार त्यास गोपुच्छ किंवा वानर-विशेष असेहि म्हटले आहे : (चार सराचा हार यास गोस्तन, पुष्पगुच्छ, सड (अंचळ) म्हटले : द्राक्ष वनस्पतिहि म्हटले आहे !)

पूर्वजन्मीं केलेले पापच पुढे येऊन आहे असे ते एका सर्वथैव विषयसुखाचे होणे हे आपली दृष्टीच मुळीं आधळी अशी करुन ठेवणे–तेथे समजूनहि समजत नाहीं कीं, कल्याण कशात ? का काय केले असता हे पूर्वजन्मींचे तिमिर कमी होऊन तेथे ज्ञानदृष्टी ही येणारी होईल. अहो, कामक्रोधादि 'शत्रू' च जसे पाठीस लागलीं आहेत असे म्हणून आता शरण जाणे हे व्हावेच तेथे कुणाचा बरे मी आसरा करु ! कोण मजला निर्मळ दृष्टी देईल असे ते ह्या ससार–दु:ख–मूळाने आपल्या आधीन करुन घेतलेला प्राणी त्यास मनावर येणे होणे हे व्हावेच व्हावे, आहेच आहे त्यातील इंगळच जसे तापविणारे, ते पोळवणे जसे दु:खाचे असे, तेथे विश्रांतीच नाहीं ! रात्रंदिवस तळमळच ! श्रीगुरुना शरण जावेच जावे असे ते एक ह्या बुद्धीने सदैवतेचे लक्षण पाहाणे हे व्हावेच : येथे दुसरे कोणीहि माझ्या उपयोगाचे होतच नाहीं, फक्त एका श्रीगुरुवाचून ! ती भ्रांति हीं निघणारी व्हावी म्हणून 'परब्रह्म' जे 'ब्रह्म' जे श्रीगुरु त्याना शरण जाणे हे बरे !! (इंगळ–प्रकृति ही अभावाची झाली–तेथे शद्वास व्यास हा नुसता अग्नीचा, धगीचा, तापाचा, त्रितापाचा, तापतिमिराचा, तेथे ते शद्वसौष्ठव नाहीं–शद्व शद्वास आला नाहीं–उच्चार हा प्रकृतिधर्मास पुरुषाचे अग दिसू देईना असे ते ओसपण हे ह्या जीवित्वास पार पिळूनच काढणारे असत) (ज्ञा गा)

ह्या कामधेनूचे निळे असेच सर्व काहीं पुढे घेऊन त्यातच ती घुमू लागली–गोष्ट सागू लागली व आता विरहिणीच ती होऊन त्या कृष्णचरणीं चरणास क्षेम देऊ लागली–भेट देऊ लागली–सुखरुप अशी ती होऊन गेली, एवढेच नव्हे तर तिने कृष्णच जसा क्षेम क्षेम म्हणत आपल्या हृदयात मोहरविला ती निळेनिळेपणे सुदरीच ती रातली, रमली, भोग भोगू लागली–तेथे हरि आणि विरहिणीच–विरह हाच क्षेमाचा झाला, तेथे श्रीगुरुच भेटला ! ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, निळियेचे बागे बागडण्याने निळाबरोबर निळयामध्येच वोळले, येणे केले, प्रेमाने प्रेमास येणे केले. (ज्ञा गा)

[ प्रेम–वेध–दिशा = भूल ( रूप भूलीं वसे ) ]

**निळियेच्या निशेनें हीं विरहिणी जशी का पिशीच म्हणजे वेडीच एक ! तेथील शेज कशी वाजते बरें ! तेथे प्रेमकलहच ! कृष्णसंग व्हावा म्हणून तिनें आपला जीव जसा त्या चरणाकरिता त्या चरणावर बळीच दिला : अशी ती विव्हळ, विव्हळ अंतःकरणाची झाल्याने आता निळीच ती आहे अशी ती दिसूं लागली–ती निळी झाली : तेथीलचा विरहज्वर कसा, ह्या चंदनाचा स्पर्श झाला तर**

अग पोळतच आहे असे तें चंदन अंगीं लागलें, तर अंग पोळतच जणुं ( त्या विरहज्वरानें ) आहे–ती प्रेमनीला, काय तेथे रूपस सोहळा, कृष्णवेधानें ती रूपबाला भुलीमध्येच जणूं अद्याप आहे अशी : अशा त्या निळियेच्या मडळामध्ये ती नीलवर्ण सावळीच अशी ती बाला ध्यानातच निमग्न होऊन आहे : तेथील 'घननीळ' जो वैकुंठीं वास करणारा त्याचा वेधच तिला–अशी ती नीलवर्ण, अंभनीलवर्ण स्वयंभ जरी, जरी निळी, तरी तिला तो वैकुंठींचा वेधच लाभला नाहीं, आणि म्हणूनच तर ती एक विरहिणी–वैकुंठींच्या वेधाकरिता विरहिणीच–तेथे श्रीज्ञानश्वरमहाराज हे त्या निळीमध्ये-निळीचे होऊन तेथील प्रमरसातच बुडी देऊन आहेत–तेथे हृदयींची सावळी मूर्तिच तींतच ते बुडून आहेत ( ज्ञा. गा. ) (१४८)

हे एक निधानच म्हणजे द्रव्यच असे समजून कोणी काय धगधगीत इंगळ पदरीं बाधून घेईल काय ? किंवा आपलीच सावली पाण्यात पाहून आपल्यावरच सिंहानें उडी घातली, तर त्यास काय बरें मिळेल ?

भावच जेथे थडावन असलेला–थिजलेला–गारठलेल्या वृत्तिच, जेथें प्रेम हेंच उगवलेलें लुटविलें गेलें ! लुटलें गेले ! असे जें वृत्तीचे एक गारठलेलें बोलणे तें काय रत्न म्हणावे ? तें काय अंगावर लेणें करण्याच्या योग्यतेचे होतच नसतें, म्हणून हा देवच ह्या भावानें देखणा होतो–दिसणारा असाच असला पाहिजे तेथे मनाच्या वृत्तीचें काय उल्हास नाहीं, आर्जव नाहीं, असे कोणी घेण्याचें करीतच नाहीं तेथे काय गृहस्थधर्माचें कौटुंबीय असे पुरुन उरणारें असेच असलें पाहिजे

गारठलेल्या भावाच्या दुसऱ्या बाजूस–देवाचें देखणें ( होणे ) जें, ह्या भावार्थानें होणारें–त्याच्या दुसऱ्या बाजूस कदाचित् विकाराचा असलेला तो जसा विकारवश होणारा एकदमच्या एकदम–तेथे पुढे चालणे तें काय निधान–देवच–एक थोपटविला गेला व तेथे निधान दिसूं लागलें–ह्या डोळ्यांचें जें एक भरणें ते जसे ओसपणाच्या भावामुळे नुसतें आगीचें ( खैराच्या अंगारा–इंगळा–सारखें ) असेच, असे तेच मुळीं ह्या देहामधोल जे धर्मधारणेचें केलेलें तं पार मोकळेच झालें–नाहींसे झालें–व आता पाहावें तो काय, एक फरकानें असणारें, एक रसाचें असणारें, तें आता खदिरांगारासारखेच भडक, तेथे काहींच नाहीं, असे तेथे केवढ्या बरें अंतरानें असणें हे ह्या शातरसाचें व ह्या विकारवश होणेचें बरें ! म्हणून तेथें जसा एक मत्सर अथवा दुसरा विकार–रिपूच भरून घेतला व त्यातच जसे का राहाणे : म्हणन हें डाव धरणारें मत्सराचें किंवा रिपूचें होणें नको–तेथे देव–भाव–लक्षण देखणें देखणारें सूर्यास नमस्कारच एक करणें होय–शारीर तपच एक !! (१४९)

त्याप्रमाणे प्रपंच हाच देवानें दिलेला देव होय असे समजून ज्यानीं तेथेच तेवढ्यास पुरतें व्हावें, पुरतें होऊन असावें, तितक्या पुरतेच जर निश्चय करून असण्याचें केलें, तर त्यानीं जसे का चंद्रासच हातीं धरावे म्हणून पाण्यातील चद्राची जी प्रभा–प्रतिमा तीच धरण्याचे केलें : तेथेच श्रम केले

अहो, हा प्रपंच–संसार–म्हणजे काय स्वर्गच ह्या भूलोकावर उतरला आहे. तेथे जे कांहीं ह्या मनानें घेणें व तेथेच रात्रंदिवस एका निश्चयानेंच जसे त्यातच मुरुन असणें केलें, तर तेथे जे कांहीं प्रकार–ह्या दुःखमूळ अशा संसारानें पुढे केले जातात, ते पाहिले म्हणजे मनुष्याचें मन हें लटपटू लागून तो त्याचा निश्चय तेथें चंद्र हाच एक साध्य करावा असाच जो–तो वायाच जाणारा होतो. साधुहृदयाचे जे ते ह्या भूलोकावरील चंद्रच जसे, तेथें कसचे पोहोंचणे ! तें होतच नाहीं आणि म्हणून तर तसे तेथें पोहोंचणें नच झाल्यानें, ह्या संसाराची धग लागून तेथें कदाचित् सावली किंवा छाया ही कृपादृष्टीची करून घ्यावी तरच बरें–एरवीं तर ह्या देहबुद्धीनें एकंदर ह्या देहाएवढ्यावरच असण्याचें केलें, तर मग केवढी बरें तेथें सोसावी लागणारी 'रत्न म्हणून गारच घेतली' अशी एक आशा–

निराशाच : चंद्राच्याऐवजीं तेथे प्रतिभास-प्रतिमा किंवा प्रभा-प्रतिमा हीच तेथे बुद्धीमध्ये प्रतिबिंबित झाल्यानें नुसते भासमात्र असेच जें तेंच तो होऊन राहिल्यामुळें, त्यास तो चंद्रहि मिळाला नाहीं व ती प्रतिमाहि पण भासमात्रच जे बुद्धींत उतरलेलें त्याने अडवून धरिली

काहीं मनुष्यामध्ये एक जो रंग त्याच्या वृत्तीस आलेला, तो जसा काहीं ह्या विशेष अशा रगान तेथे आथलेपणच येणारे, तेथे बुद्धीच मुळीं तो लाजणारा ताबूसच पाहून तेथे एक ब्रह्म जे तेथेच त रमू लागले : परतु येथे एक गोष्ट जी कोठेहि नच ऐकूं येणारी ती पुढे येते व ती म्हणजे ह्या डोळ्यामधील बाहुलीनें त्या दोहनासच एक विशेष रंग आणला-तेथे नील अगीच जी सरस्वती म्हणा तीच येथे ह्या वर चम्प्याचे जे अग तेंच येथे काय जे एक घाबरण्याने धक्काच दिला व वृत्ति ही उतरली असे जे रगावरणमाहात्म्य ते ह्या लाजणाऱ्या लज्जेस पछाडून असत किंवा काबूच करून ठेवितें, म्हणजेच शातरसाचे जे पुरुष लक्षण तच येथे हरवलें गेले व आता सर्व बाजूंनीं हताश असाच एक ह्या प्रकृतीवर परिणाम होऊन भूताच्या आहारींच ती प्रकृति जशी गेली-तेथे प्रकृति हीच मुळीं भूतभाव्य हरवल्यामुळे भूताच्या हारीं जाऊन एक लाजच पदरीं बाधून आहे, तेथे सुटकाच मुळीं नाहीं : म्हणून येथे चार घरे फिर-परगावास जा- ब्राह्मणाला नमस्कार तरी करून ये-बाजूस हो-थोडेबहुत दूर जा : परतु ते दूर जाणे हे गावींचे असेच असलेले बरे, कारण हा वाक पुरुष जो तोच मुळीं पुन्हा भूताच्या आहारीं गेलेलेपण हे सोडवून आपण स्वत चे पायावर उभा राहणारा होऊं शकेल : ही गोष्ट अति विचित्र अशा रंगाची असून तेथे जपून असत जा-स्वतःस हार जाऊं देऊं नको-दुसऱ्याचे आहारीं पडूं नको-तरच बरें: तेथे पुन्हा त अंग ज निकोपी असे न सापडूं लागून तेथे मग प्रतिमा ही स्पष्ट सापड लागून जशी ती चद्रिका-ज्योत्स्नाच-एक ह्या प्रकृतीच्या पोषणाची कला हीच उजवली गेली-जशी मनोधर्माची एक रचनाच आपल्या नाविन्यास येऊन, ती पोषण, समाधान, तृप्ति हीच पाहू करणारी-पाहाणारी-तथेच ती राहणारी अशी बोलाव्याची-जिव्हयाळाची-एक जागाच होय ! (१५०)

तसा तो कृतनिश्चय हा वायाच जसा ! कसा म्हणशील तर कोणी काजी पिऊन आरशात पाहू लागला कीं, त म्हणजे एक अमृतच प्याल्यासारखे होत व अमृत पिण्याने जसा एक अमरपणाचा सौंदर्यसागर येणारा तो अद्याप आला कीं नाहीं ? का बरे येईना ? (१५१)

त्याचप्रमाणे स्थूल आकारामध्ये-जे आकार नाशिवंत आहेत-त्याच्या ठिकाणींच भरवसा ठेविला व तीं नाशिवंते हींच मज अविनाशात पाहविणारीं आहेत असे केले, तर तेथ काय काहींच दिसणारे नव्हे (१५२)

अहो, पश्चिम समुद्रास जायचे ते काय पूर्वेकडे जाण्याने ? का कोंडा काढून कुठे कण मिळणार?

' साडिता '--नासधूस करिता कदाचित काहीं एकादा कण त्यास सापडणारा होईलच, म्हणून नासधूस करूं नये असे म्हणणे दुसरे पक्षी, कोंडा काढून काय कण हा आतुडणारा होतच नाहीं-तेथे मूळ धान्यच काडावे-सडावे-भरडावे-लागणारे काय तेथे कोंडा भरडून-कोंड्याचा नासधूस करून कण हातीं येणारा ? (१५३)

त्याप्रमाणे हें स्थूळ हेच एक विकारलेले असेंच जें तच जाणल्याने मी सापडणारा होईन असे ज्यानीं घेतलें, त्याना जसे फेस पिण्याने पाणी प्यायल्यासारखे समाधान होणारे ! (१५४)

करिता मोहित झालेलें आहे मन ज्याचे-मोहविलेले आहे-मोहातच फसलेले आहे ज्याचे मन, तेथें त्या मनाचे धर्म हे सभ्रमाचे नुसते : मोहनिरास हा संभ्रमाने नच होणारा . तथे जन्मणे-मरणे-कर्में दिव्यतेचों जशीं पाहिलेलीं-ऐकलेलीं, तीं एकून तेथे मीच तीं (मनाचीं समाधान) होत, असेच ह्या मोहामुळे मानणे होते. (१५५)

इतुलेनि अनामा नाम । मज अक्रियासी कर्म ।
विदेहासी देहधर्म । आरोपिती ॥ १५६ ॥
मज शून्याकारा आकार । निरुपाधिका उपचार ।
विधिवर्जिता व्यवहार । आचारादिक ॥ १५७ ॥
मज वर्णहीनासी वर्ण । गुणातीतासी गुण ।
अचरणा चरण । अपाणिया पाणी ॥ १५८ ॥
मज आमेया मानु । सर्वगतासी स्थान ।
जैसा सेजेमाजीं वनु । निदैला देखे ॥ १५९ ॥
तैसे अश्रवणा श्रोत्र । अचक्षुषा नेत्र ।
अगोत्रासी गोत्र । अरूपा रूप ॥ १६० ॥
मज अव्यक्तासी व्यक्ति । अनार्तासी आर्ति ।
स्वयंतृप्तासी तृप्ति । भाविती गा ॥ १६१ ॥
मज अनावरणा प्रावरण । अभूषणा भूषण ।
सकळकारणा कारण । देखती ते ॥ १६२ ॥
मज सहजातें करिती । स्वयंभातें प्रतिष्ठिती ।
निरंतरातें आव्हानिती । विसर्जिती गा ॥ १६३ ॥
मी सर्वदा स्वतःसिद्ध । तो कीं बाळ तरुण वृद्ध ।
मज एकरूपा संबंध । जाणती ऐसे ॥ १६४ ॥
मज अद्वैतासी दुजें । मज अकर्तयासी काजें ।
मी अभोक्ता कीं भुंजे । ऐसें म्हणती ॥ १६५ ॥
मज अकुळाचें कुळ वर्णिती । मज नित्याचें निधनें सिणती ।
मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ॥ १६६ ॥
मी स्वानंदाभिरामु । तया मज अनेक सुखाचा कामु ।
मी अवघाचि असे समु । कीं एकदेशी म्हणती ॥ १६७ ॥
मी आत्मा येकु सचराचरीं । कीं म्हणती येकाचा पक्ष धरी ।
आणि कोपूनि येकातें मारी । हेंचि वाढविती ॥ १६८ ॥
किंबहुना ऐसे समस्त । जे हे मानुषधर्म प्राकृत ।
तयाचि नांव हें विपरित । ज्ञान तयांचें ॥ १६९ ॥
जंव आकारु पुढां येक देखती । तंव हा देव येणें भावें भजती ।
मग तोचि विघडलिया टाकिती । नाहीं म्हणौनि ॥ १७० ॥
मातें येणें प्रकारें । जाणती मनुष्याचेनि आकारें ।
म्हणोनि ज्ञानच त्यांचें आंधारें । ज्ञानासी करी ॥ १७१ ॥

(१५६) अनामा नाम – अनाम नाम. (१५७) शून्याकारा – आकारशून्या. विधिवर्जिता – विवर्जिता. (१५८) अपाणिया = हस्तरहिताला. आमेया मानु – अमेया मान. (१५९) मान = परिमाण, माप जैसा – जैसे. निदैला देखे = निजलेला स्वप्नात पाहातो. (१६१) आर्ति = पीडा, इच्छा. (१६२) प्रावरण = वस्त्र. अभूषणा – भूषणातीतासी. देखती – देखते. (१६३) आव्हानिती विसर्जिती = आवाहन, विसर्जन करतात (१५६) अकर्तयासी – अतर्कयासी. भुजे = भोगतो. (१६६) नित्याचे निधने–

नित्याचेनि ध्यानें (१६८) पक्ष – कैपक्ष = कैवार याढविती – रूढविती = प्रसिद्ध करतात. (१६९) मानुष – मनुष्य (१७१) मनुष्याचेनि – मनुष्य ऐसेनि. ज्ञानच " ... ... करी = असें त्याचें त विपरीत ज्ञानच सत्य ज्ञानाला प्रतिबंधक होतें.

अपाणिपादौ जवानो गृहीता । स श्रृणोत्यकर्ण. पुरुषः पुराणः ॥

अ = अ, अक्कि, नि, शून्य, निर, विवर्जित, हीन, अतीत, आ, अन (स्वयम्) क + अ = क अ + अ = अ सर्वगत (स्थाणु), श्रवण (श्रोत्र), चक्षु (नेत्र), अव्यक्त (व्यक्ति); स्वयंतृप्त (तृप्ति), अनावरणा (प्रावरण), सकळकारणा (कारण), सहजातें (करिती), स्वयभ (प्रतिष्ठ), निरतर (आव्हान), सर्वदा, स्वतःसिद्ध, एकरूप (संबध), अकर्ता (काज), अभोक्ता (भुंजे), नित्य (निदान), सर्वांतर (कल्प), स्वानंदाभिरामु, समु (एकदेशी), सचराचरी (कैपक्ष).

आ – आपादमस्तक, आब्रह्मस्तंभपर्यंतम्, आहारी (हारी), आमेय

'अ' (व्यजन क् + स्वर अ = अक्षर क) हें उपपदच एक देहामधील विशेष स्थळानें, प्रातानें, व्यापून धरलेले असल्यानें तेथे ती वृत्ति, स्थळ, इद्रिय, कृति, धर्म, निदान, पक्ष किंवा पाहाणें हं किंवा आरगात पाहाणें हें तेथेच तें भावाचे होऊन असल्याने सहजतेनें आपल्या हुरुपास येणारे असत, म्हणून येथें 'भाव्य' हीच एक अनुष्ठानाची अशी अनुकारणा हीच मोठे महत्त्व घेऊन असल्यानें, तेथं ती जशी का एका देवाची अशीच 'भाव' बळाची-तेथें भावच बळास आला व आता तो देवच एक जसा असाच 'पावलेला' होऊन असतो

एवढ्यानेंहि पण काय काहीं तुझ्या बुद्धींत उतरणारे होईल किंवा नाहीं कीं, जेथं मजला नाम नाहीं त्या मला नाव देतातः ज्या मला क्रियाकर्म नाहीं तो मी क्रियाकर्म करणारा आहे असें म्हणतातः विदेह जो मी ज्याला देहधर्मच मुळीं नाहींत-त्या मजवर देहधर्माचे आरोप करितात. (१५६)

मज निराकारास आकाराचा आहे म्हणतातः उपाधिरहित असा जो मी त्यास उपचार करितात. विधिविहितादि जे काहीं व्यवहार-आचार त्याचाच केलेला मी आहे असें म्हणतात (१५७)

मज वर्णहीना वर्ण : गुणातीतासी गुण : अचरणा चरण : अपाणिया पाणी : मज आमेया मानु : सर्वगतासी स्थानु : ज्याप्रमाणें मेजेमध्ये वनच जो झोपी गेला आहे त्यानें पाहिले. (१५८, १५९)

अश्रवणा श्रोत्र : अचक्षुषा नेत्र : अगोत्रासी गोत्र : अरूपा रूप : : मज अव्यक्तासी व्यक्ति : अनआर्त जो मी त्यास आर्ताचा आहे असें म्हणतात : स्वयंतेची तृप्तीच जो मी त्यास तृप्ति भावितात : : अनावरणा प्रावरण : अभूषणा भूषण . 'सकळकारणा' हेचि जे कारण ते मी, त्यास मी कारणाचा आहे असे म्हणतात . . मज सहजातें करिती : स्वयभ जो मी त्याची प्रतिष्ठा करितात. निरंतरचा असा जो मी त्याचें आवाहन-विसर्जन करितात (१६०, १६१, १६२, १६३)

मी सर्वदा स्वतः सिद्ध असा, त्यास बाळ-तरुण-वृद्ध असें संबंध लावून, एकरूप जो तोच असा संबंध लावून सबंधाचा करितात (१६४)

मज अद्वैतासी दुजे अकर्त्यास काजाचा आहे म्हणातात. अभोक्ता असून भुंजतो असें म्हणतात (१६५)

मज अकुळाचें कुळ वर्णितीः मी जो नित्य त्याचे निदान करीत बसतातः सर्वांच्या अतरामध्यें असणारा जो मी त्याचे ठिकाणीं अरि, मित्र इत्यादि कल्पना करितात. (१६६)

मी स्वानंद अभिरामु त्या मजला अनेक सुखोपभोग भोगावेत असे वाटतें असें म्हणतात. सर्वांच्या ठायीं सदा सम असा मी त्यास एकदेशी असे म्हणतात. (१६७)

सचराचरीं मी आत्मा व्यापकतेनें असा त्यास म्हणतात कीं, हा कुणाचा पक्ष घेतो, तर कुणास मारतो, व हेंच जेथे तेथे जेव्हां तेव्हां विचारांत घेत असलेले. (१६८)

किंबहुना हे समस्त साधारण मनुष्याचे जे प्राकृत धर्म आहेत त्यास ' मी ' असे विपरीतच त्याचें ज्ञान. (१६९)

पुढे एकादा आकार आला म्हणजे म्हणतात कीं हा देव आला व त्यास नमस्कारितात, म्हणजे तसा मात्र ठेवून भजतातः परंतु तोच जर का बाजूस झाला, तर नाहीं म्हणून टाकून देतात (१७०)

अशा अनेक तऱ्हांनीं मजला माणसासारख्याच आकाराचा देव असतो-देव आहे-असे समजतात म्हणून हें जे त्यांचें ज्ञान तेच ज्ञानास अधारे करितें. (१७१)

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥**

मोघ = (ओमोमोम् - नमः अघ = नमोऽघ) मनुष्यप्राण्याचा आकार हाच देव असे जे ज्ञान ते अंधारेंच ज्ञानास करणारें, तेथे अमोघ असें तें वृत्तीचें - तेथे व्यर्थ आशा केली - स्थूल दृष्टीने मनुष्य आकारच पाहिला, तेथे भावच नाहीं, म्हणून आशा केली तों तेथे व्यर्थतेची गेली मोघकर्माण = कर्मांचे व्यर्थ मोघज्ञानाः = व्यर्थज्ञान विचेतसः = स्थूल बुद्धीचे पाहाणें - उदास : दुःखी - तेथे चित्तच नाहीं - ते पसरलेलें असे - तेथे अंतरदृष्टी नाहीं - भाव नाहीं - विवेक नाहीं : ' राक्षसीम = आडदाड क्रियाच अवलबिली असे तें आसुरीम् = मोहाने अधच होणें, जेथे देहभाव हाच लपटेला प्रकृतिं मोहिनीम् = पाडणारी प्रकृतिच सर्वथैव, जेथे हरएक गोष्ट ही मोठ्या प्रेमानें बोलून स्वत.स मोहवून घेतले अशी, तेवढीच एक प्रकृति कीं जेथे मोहिनीच हरएक गोष्टीनें घातली व असा आश्रित जो - जो श्रित झाला आहे, तेथे सर्वच्या सर्व बोलणेंच मुळीं ह्या देहास विचेतसाचा करून नासणेंच एक केलेले अशा बोलण्याचा करणारा - मोहवून घेणारा असा कृपेचा एक - करुणेचा एक - दयेचा एक : व्यर्थच जन्मला असे - हिंसणेच जसे ह्या देहधारणेचे - जेथे प्रकृति आकळिली नाहीं - धर्म उपासिला नाहीं - साधुसेवा केली नाहीं, इ चा

प्रमाद - निद्रा - आलस्याचा असा - प्रयत्नास नेट नाहीं - निद्रेचें बोजडपण काढलें नाहीं - प्रमादाचा मोहच - मोठेपणच - तेथे नमन जाणलें नाहीं - नमन एक ते कसे तें केलें नाहीं

मोघाशाः मोघकर्माणः मोघज्ञानाः विचेतसः राक्षसीम् आसुरीम् मोहिनीम् च प्रकृतिम एव श्रिता ।

व्यर्थ आशा, व्यर्थ कर्मे व व्यर्थ ज्ञान व विवेकशून्य पुरुष मोह पाडणाऱ्या ( ज्यायोगे मोहिनीच परिणाम करणारी ) अशा आसुरी स्वभावाचा म्हणजे राक्षसी ( क्रूर व घातकी ) स्वभावाचा आश्रय करितात. (१२)

**यालागीं जन्मलेंचि तें मोघ । जैसे वार्षियेवीण मेघ ।**
**कां मृगजळाचे तरंग । दुरूनिच पाहावे ॥ १७२ ॥**
**अथवा कोल्हेरीचे असिवार । ना तरी बोडंबरीचे अलंकार ।**
**कीं गंधर्व नगरीचे आवार । आभासती गा ॥ १७३ ॥**
**सावरी वाढिन्नलीया सरळा । परी फळ ना आंतु पोकळा ।**
**कां स्तन जाले गळां । सेळिये जैसे ॥ १७४ ॥**

**तैसें या मूर्खांचें जियालें। आणि धिक् तें कर्म निपजलें।**
**अैसें साबरी फूल आलें। घेपे ना दीजे ॥ १७५ ॥**
**मग जें जें कांहीं पढिन्नलें। तें मर्कटें नारेळ तोडलें।**
**कां जात्यंधा हातीं सुढाळें। रत्नें पडिलीं ॥ १७६ ॥**
**किंबहुना तयांचीं शास्त्रें। जेसीं कुमारीहातींचीं शस्त्रें ।**
**का अशौच्या मंत्रें। बीजें कथिलीं ॥ १७७ ॥**
**तैसें ज्ञानजात तया। आणि जें कांहीं आचारले गा धनंजया।**
**तें अवघेंचि गेलें वायां। चित्तहीन ॥ १७८ ॥**
**पैं तमोगुणाची राक्षसी। जे सद्बुद्धीतें ग्रासी ।**
**विवेकाचा ठावो पुसी। निशाचरी जे ॥ १७९ ॥**

( १७२ ) वाषियेवीण – वर्षांवेवीण = वर्षाकाळावाचून ( १७३ ) कोल्हेरीचे – कोल्होरीचे= मातीच्या चित्राचे कोल्हेरी = कुलालधर्म. असिवार = स्वार वोडबरीचे = मत्रविद्येनें दाखविलेले, जादूगिरीचे गधर्वनगरीचे आवार – आकार = आकाशात नगराप्रमाणे दिसणारा मेघाचा आकार ( १७४ ) साबरी = शेर. फळ ना – फूल नाहीं. ( १७५ ) जियालें = जन्म तें कर्म – कर्म तयांचें (१७६) जात्यंधा – आधळ्या. सुढाळे रत्नें पडिलीं – पडिले मोतीं जैसे (१७७) हातींचीं – हातीं दिधलीं. अशौच्या ... " कथिलीं = अपवित्र मनुष्यास बीजासह शिकविलेल्या मंत्राप्रमाणें ( १७९ ) सद्बुद्धीतें – सुबद्धीतें

या कारणामुळ जे जन्मले ते व्यर्थच जन्मले असे-वर्षाॠतूशिवाय मधेच येणारे जे अभ्र ते जसे आले कीं नाहीं तसे होणारे–मुळींच महत्त्वाचे नसणारे किंवा मृगजळामधील पाण्याचे तरंग जसे दुरूनच पाहिले जाणारे किंवा दुरूनच पाहिले तरच दिसणारे–एरवीं जवळ गेलें तर तेथे कांहींच नाहीं (१७२)

भितीवर काढलेल्या चित्रींचे-कोल्हाटाच्या खेळातील मातीच्या चित्राचे केलेले-घोडेस्वार जसे अवडंबर असे (अगापेक्षा बोंगाच जास्त)–मोठ्याहूनहि मोठ्या अवडंबराचे, जादूचे, मंत्रविद्येनें दाखविलेले, जादूगिरीचे जसे अलकारच एक ते तसे, किंवा आकाशामध्ये आलेल्या ढगानीं लुटुपुटीचीं नगरे उत्पन्न केलेलीं, आकारास आलेलीं जीं, तेथील घराचीं अथवा नगराचीं आवारेंच जशीं भासणारीं अशीं तीं ज्याचीं जन्मे हीं व्यर्थतेचीं होऊन असलेलीं (१७३)

शेराची ताटी किंवा शेळीचे स्तनच जसे गळ्यास आलेलें तें: साबरीचे वाढलेले लांब सरळ झाड, तेथे काय फळ नाहीं तें नाहीं, परंतु आत पाहावे तो सर्व पोकळच. (१७४)

शेणाचीं केलेलीं फळे काय सुदर अशीं बाहेरून रंगविलेलीं–हुबेहुबतेचें अंग, परंतु तेथे पाहावे तों काय तें कांहींच उपयोगाचे नाहीं असे–देण्याचे उपयोगीं नाहीं व घेण्याचेहि : तसे त्या मूर्खांचें जन्मलेलें जियालेपण व त्यांच्यापासून निपजलेले जे कर्म तेंहि पण धिग् धिग् असेच (१७५)

असे असल्यामुळे तेथें त्यांनीं जो काहीं अभ्यास केला किंवा जें कांहीं त्यांनीं पढण्याचें केलें, तें म्हणजे जसे काय माकडानें एक नारळाचें फळ तोडल्यासारखे किंवा जो जात्याच अंधच आहे त्याच्या हातीं जशीं काय पाणीदार अशीं सुढाळे रत्नेंच–मोत्येच–आलीं, तीं त्यास काय दिसणारीं, कां तीं काय आहेत हेहि नच समजून असणारीं अशींच : जेव्हां म्हणून ते कांहीं शिकण्याचे करितात, तेव्हां तें जसे काय माकडानें नारळफळेंच तोडल्यासारखें किंवा आंधळ्याच्या हातांत रत्न जसे (१७६)

अथवा, किंवा याहिवर बोलणे जें, ते म्हणजे त्यांची शास्त्रे हीं जशीं काहीं कुमारीच्या हातात शस्त्रे दिलीं अशीं, किंवा अपवित्र मनुष्यासच बीजमंत्र शिकविला तो असा वायाच जाणारा (१७७)

तसे ज्ञानजात जेवढे म्हणून आहे, तें जसें कांहीं त्यांच्या उपयोगाचे होणारें मुळींच नाही : तसेच ते जे काहीं आचरले, तेंहि वायाच गेले : कारण, हे धनजया, त्याचे जे कांहीं असणें-शिकणे-तेथे त चित्तच त्याचे नाहीं (१७८)

परतु तमोगुणाची राक्षसी बुद्धि-जे सद्बुद्धीते ग्रासी-ती निशाचरीच एक, ती विवेक म्हणून जो आहे त्याचा समूळच्या समूळ नायनाटच करून टाकते. (१७९)

**तिये प्रकृति वरिपडे जाले । म्हणोनि चित्ताचे कपाळें गेले ।**
**वरी तामसियेचे पडिले । मुखामाजीं ॥ १८० ॥**
**तेथें आशेचिये लाळे । आंत हिंसाजीभ लोळे ।**
**तेर्वीचि असंतोषाचे चाकळे । असंड चघळी ॥ १८१ ॥**
**अनर्थाचे कान्हवरी । आवाळी चाटीत निघे बाहेरी ।**
**जे प्रमादपर्वताची दरी । सदा मातली ॥ १८२ ॥**
**जेथें द्वेषाचिया दाढा । खसखसा ज्ञानाचा करिती रगडा ।**
**जे अगस्ति गवसणी मूढा । स्थूळ बुद्धि ॥ १८३ ॥**
**ऐसे आसुरिये प्रकृतीचे तोंडीं । ते जाले गा भुतोंडी ।**
**जे बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाचे ॥ १८४ ॥**
**एवं तमाचिये पडिले गर्ते । न पवती विचाराचेनि हातें ।**
**हें असो ते गले जेथें । ते शुद्धीचि नाहीं ॥ १८५ ॥**
**म्हणोनि असतु हे वायाणीं । कायसीं मूर्खाचीं बोलणी ।**
**वायां वाढती वाणी । सिणैल हन ॥ १८६ ॥**
**ऐसें बोलिलें देवें । तेथ म्हणितलें जी जी पांडवें ।**
**तरी ऐकें जेथ वाचा विसांवे । ते साधुकथा ॥ १८७ ॥**

(१८०) वरिपडे जाले – वरपडे जाहले = ग्रस्त झाले म्हणोनि – म्हणऊनि चित्ताचे – चिंतेचे. कपाळे – कपाटे = दरींत (१८१) तेथे – जेथ असतोषाचे – संतोषाचे चाकळे – कवळे (१८२) कान्हवरी – कानवेरी = कानापर्यंत आवाळी – आवाळुवे = ओठाचे भाग पर्वताची – पर्वतीची. सदा – सदाचि (१८३) करिती – करी. अगस्ति – त्वगस्थि गवसणी – गवसन त्वगस्थि गवसणी मूढा = ज्या मूढांना, स्थूलबुद्धि पुरुषाना, त्वचा व अस्थि यांच्या पलीकडची दृष्टि नाहीं. (१८४) ऐसे आसुरिये – ऐसिया आसुरी भुतोंडी = भूतांचा बळी व्यामोहाचे = मोहभ्रांतीचे. (१८५) पवती-पविजती. शुद्धीचि नाहीं = पत्ताच नाहीं. (१८६) असतु - असोत वायाणीं = निष्फळ. बोलणीं – काहणी वाढती-वाढविता (१८७) विसांवे – विसंवे = विश्रांति मिळते

ते प्रकृतीनेच असे झाल्यानें चिंतेच्या दरीनेंच वाहविले गेले; आणखी काय, तर ते त्या तामसी प्रकृतीच्या मुखामध्येंच जसे जाऊन पडले.

प्रकृतीची ओळखच नाहीं असे तें आरोग्य तें कसे असत, कसे राखलें जातें-आरोग्य म्हणजे काय हे कांहींच परिणमलें गेलें नाहीं-तेथें प्रकृतीचें अंगच समजेना म्हणून प्रकृतीस ओळखी देतच नाहीं असे ते बिनचित्तानें असणें हें कांहीं का माणुसकीचें अंगच नसणारें-तेथें नुसतेंच देहधारण

हें कांहीं अर्थ पाहाणारे नाहींच असें झाल्यानें तेथें एक कारणावर टेकलेले-तेथें लिंगप्रामाण्यानें असणे नाहीं-आरोग्याचा विचार माहीत नाहीं-गृहस्थधर्म किंवा धर्म हाच कशाचा केलेला आहे तें कोण जाणे असे एक निराकारणच एक कारण होऊन असण्यानें तेथें चित्त हें नाहींच-तें लपलें, लपविले गेलेले-हरविलेले असे असल्यानें, तेथें कपाळ म्हणजे दैव हेच कुणास माळ घालीत आहे हे कांहीं समाजणारे नाहींच-असे मनुष्यपण काय कामाचें बरें ! परंतु तें तसें होऊन असतेंच व त्यासच तमोगुणाधिक्य असें म्हटलें: तेथें मुखच पाहावे तो नाहींच-तेथें मुख हेच कारणावर फिरणारे असल्यानें, तेथें तें कोणी बरें हुडकण्याचें करावें ! (१८०)

जेथें आशा हीच लाळ आलेली अशी उठावणीसच पाहूं करणारी : वर हिंसा हीच त्याची बोलण्याची धाटी : त्याचप्रमाणे असंतोषाचा कवळे हेंच ते अखंड चघळीत राहाणारे असे

तेथें आशा हीच निराशेस मध्यस्थ घेऊन असल्यानें, तेथें आशा ही पण जशी एक आपल्या युक्ततेची अशी होणारी नाहींच, म्हणून तेथें आशाहि नाहीं-निराशाहि ही पण एक कदाचित् आशेची होईल न होईल अशी संभ्रमाची झाल्यानें, तेथ नुसतं चघळणच एक ह्या आशेमध्ये व निराशेमध्ये वास्तव्य करून असलेले : तेथ आता तेथील धग ही ब्रह्मांडासहि पोहाचणारी असल्यानें, तेथें काय हरएक गोष्टीमध्ये दुसऱ्यास हार देणेंच होत राहिल्यानें, तेथें स्वतःचा फायदा हा कधीं पाहिला आहे असें नसल्यानें, तेथें एकच ह्या हिंसेची जी जिव्हा तीसच एक मध्यवर्तीची सीमाच पाहविणारी अशी लाळ गीच-जठरार्थ चार नाना ह्याच जशा . ह्या जिव्हेनं केलेली भूतमात्राना हिंस करू नको म्हणजे त्याना तुच्छ लेख नको-वाचा ही कशी केलेली आहेस-तर ह्या वाचेपुढं जगतामधील भूतमात्रें ही अतितुच्छ कोटींत बसविलीं गेल्यामुळे, तेथें आता जे कांहीं एक सहज, सूक्ष्म, हलके, कोठे कांहीं कुणाच्याहि मनास धक्का न लागेल असें वर्तन तेंच न सापडल्यामुळे, तेथें हरघडीं तें दुसऱ्याच्या मनास एक डिवचणें दिलेलें-तेथें सर्व भूतमात्राना एक नव्हे जुमानणें-आत्मसामर्थ्य हें भूतमात्रांनीं कसें नटविलें आहे तें आपल्याच एका जिव्हेनें प्रतीतीस आणून आहे असें समजून, इतर ज्या कांहीं बाजू त्याना क्षणोक्षणीं डावच देत गेल्यानें, तेथ जे कांहीं 'अहिंसा सत्यमस्तेय' इत्यादिचें जें अनुवादन तें पाहूंच आलें नाहीं : तेथें हा जो संतोष तोच आता भूतमात्रावर झालेला जो तुच्छतेचा उपक्रम त्यानेंच ती हिंसा ही पुढं झाली व तिनें क्षणोक्षणीं तडातोडीचे केलेले जे चाकळे म्हणजे तुकडे हेच चघळण्याचें करून तेथें आता ती जशी एक आत्मसामर्थ्यासच लेखण जे दिलें तें मुळीं उल्लेखच तेथें त्या अहिंसातत्त्वाचा होईना ! तेथ जिव्हा ही अशीच रंगविली गेली कीं, तिनें तें आत्मसामर्थ्यच एक जसें ह्या बोलण्याचें करून तेथे सर्व बोलणे जेवढें तेंच एक हिंसेवर लोटणी करणारें-लोळणी घालणारें-झाल्यानें, तेथें आता तें तत्त्व कुणाच्या घरास शोभविणारें झाले कोण जाणे ! जिव्हेचें सूत्रच मुळीं असें असल्याचें झाल्यानें, तेथें आशापान हेच होत राहून त्यानें तर आता जडत्वच एक ह्या वृद्धीस दिलें-तेथें लाळच आली-देह उठवणीस आला : आशा आशा हीच निराशा ! फिरफिरून निराशाच एक झाल्यानें, तेथें आशा ती मुळीं राहिलीच नाहीं. तिनें सर्वथैव एक लाळेचें असेंच जीवित करून ठेविलें व आता ह्या जीवधर्माचें जें अंग तें पार प्रकृतीच्या अनाळखीचें झाल्यानें, तेथें आता चित्तच नाहीं-कोणत्याहि गोष्टीवर चित्त लागेना : तेथे नसत्या आकाशाच्या घडलेल्या अशाच अभ्राच्या चाली त्यानीं तर हे मनच पार वितळून टाकिलें-ह्या जीवदशेचा चंद्रमा हाच नाहींसा झाल्यानें, तो क्षणोक्षणीं विरल विरल असाच होत गेल्यानें, तेथें जीवितास किंमतच राहिली नाहीं-मग तेथे प्रेम तें काय किंवा जीवित कसें जगत तें कुणीं जाणण्याचें करावें असेंच एक स्वतःचें हित हेच बिनहिताचें असें मचूळतेचें तें मुळीं एक जख्ख म्हातारपणच वाटलें गेलें असे होय. (१८१)

त्याचें काम कसे तर, जेथें अर्थ हा पाहूं केला तर तो अनर्थाचा असाच : व अशाच गोष्टी ऐकण्यानें त्याचे ओठाचे मागच मुळीं ह्याच गोष्टीचे केलेले-ह्या गोष्टींमध्येच त्याची मर्जी चालणारी-जेथे प्रमादच सर्व ! अशी एक दरीच नेहमीं माजणें करूनच आहे अशी.

कानावर घेतला तो अर्थ हा अनर्थच करणारा कसा बरे होईल ? तेथे अर्थ हा अनर्थ कसा हीच भावना पुढें घेऊन चालत असल्यानें, तेथे ती गोष्ट ही कानास गोड वाटविली जाऊन, तेथें आतां ही हिंसारूपी सर्व भूतमात्राची जशी काहीं योग्यता, तीं काय ती जशी अंः तुच्छतेची अशी करून ठेवल्यानें, तेथे ती जिव्हा हिनें तर आवाळू उगविलेली जी-ह्या देहावर-तेथें विशिष्ट ठिकाणच्या ज्या काहीं ह्या अनर्थासच उपयुक्ततेने पाहा म्हणणारी अशी वाढलेलीं जीं आवाळं तींच तीं पुन पुनः कानावर घेऊन ऐकण्याचें करून तिजवरच तें जीवित हें टेकविलें व आतां बोलणेंहि पण तेथींचें असेंच झाल्यानें, आता मात्र त्या ' हिंस ' हिंसेस जरा रंगच आला : तिनें तें भूतमात्राना आपल्या सामर्थ्यास आणणें हें कसचें बरें ! तेथे एकच गोष्ट, ती म्हणजे तेथें अनर्थ हा कसा पोहोंचता होईल एवढेंच तिनें कानावर घेतल्याने-कानावर घेऊन तेंच एक वागविण्याचें केल्यानें, प्रमादच हा जेथे तेथे आपलाच गाजा करू लागल्यानें, आतां ती हिंसा म्हणजे एक पर्वताची दरीच जशी माजून असलेली अशी-तिनें मातलेंपण घेतले-रंग-रूप-मोहिनी, भाव-डाव-पेंच, कर्म-दिव्य-देव, असे तें ती आपणच झाल्याने, तेथें काय अहो, तिचें तें मातलेंपण हें कसे ते बोलण्यास पाहाणारें नव्हेच !

तेथे जिव्हा ही सूत्रधारकच एक ती जशी का ह्या नटीनें-विश्वनटीने-ह्या प्रेक्षक जनाना एक दिव्यच पाहू देणारी अशी जर केली, तर तेथें प्रसन्नता ही जशी काहीं ह्या भूतजाताना दिली-तेथ अखंडता हीच एक रसतेची अशी धार जर ओतली गेली, तर ही जिव्हा आपले सूत्र हें सर्व प्राणीमात्राना जशी का झेलून धरणारी अशी झालेली-अशी केलेली-बरी नव्हे का ? तेथें मग ती जी विश्वमोहिनी ही जशी का माताच एक ह्या प्राणीजाताना पोषण देणारी तीच मुळीं आता आपलेपणास आल्याने, तिचें तें प्रत्येक प्राण्यास कुरवाळणेच होऊन येऊन तेथें मग दया अथवा प्रेम हें तें आपल्याच जीविताचें असे तें केलेलें-तेथे प्राणीगण हे का बरे त्या सुखसमाधानास किंवा विश्रांतीस आणले जाणारे न होतील ? ते तसे त्या मातेनेंच जसे पोटीशीं धरून त्या त्या एक अर्थ पुरुषाच्या चाडीचे झाल्यानें, तेथे तेथे पुरुष प्रकार हाच जसा श्रद्धाळु होऊन, त्यानें तसे तसे त्याचें तें चिंतणें हें हिताकरिताच केलेलें असे झाल्यानें, प्रेमास कधीं काहीं उणेपण हें नच येणारें ! (१८२)

जेथें द्वेष हा कसा तर दाढाच जेथे करकरा दातच खाऊन त्या ज्ञानासच पार दूर लोटून दिले अशा-ज्या मूढाना स्थूल बुद्धि पुरुषाना-त्वचा व अस्थि याच्या पलीकडची दृष्टि नाहीं.

प्रमाद हाच मातल्यानें तेथे ' तम ' हेंच कारणाचें झालें, त्यानें आता जसे काहीं इंद्राचे आयुध ज वज्र त्याचेंच जेव्हा येणें, तेव्हाच तें मागे हटणारें असें असल्यानें, तेथे ' दरीच ' जशी एक ह्या महा व्याघ्राची, म्हणून तेथे आता पाहावे तो काय (राग व) द्वेष हाच पुढे झाल्याने, त्याने दाढाच आपल्या असा हा द्वेष पुढे घेऊन, तथें ज्ञान हें जें रगडून टाकिले, त्यानें तर आतां ते ज्ञान हें कुठें गेलें कोण जाणे-असे तें स्थूलबुद्धीचें अगच एक जसे-' वरि कातडे अंतरीं हाडे ' असे त्वगस्थि मात्र पाहाणें जें एक स्थूलबुद्धीचें तेंच पुढे झाले-त्याचेंच नेहमीं होऊन असल्याने, तेथें ज्ञान हें कोणत्या गावीं राहातें-ते कशाचें केलेलें आहे-तें कुणाच्या स्वप्नीं तरी निदान येणारें होते कीं नाहीं अशी एक शंकाच पुढे घेतल्यानें, तेथे नुसत्या स्थूलबुद्धीचे जे भूतोंडीं पडलेले-ह्या पंचमहाभूताच्या तोंडींच दिलेली अशी ती देहबुद्धीच ही मात्र हरएक प्राणीमात्रास हिशोब मागणारी होते (१८३)

अशा आसुरी प्रकृतीच्या तोंडींच ते एक भूतांचा बळीच दिला असे होऊन असतात-ते मोहरातीच्या होमकुंडातच मुळीं सर्वस्वीं बुडून गेले असेच होत

आतां मात्र हे कांहीं एक नवीनतेचें जगच मुळीं आहे असा एक किंचित् भास ह्या बुद्धीस येऊ लागल्यानें, तेथे तें शिखासूत्राचें जें ह्या भूतानीं मागणें केले-त्यानें तर पार हादरूनच गेलेली जी ही भूतोंडी, त्यानीं आता मोह हाच अथपासूनचा असाच एक जसा ह्या देहधारणेचा पायाच मुळीं खणून न्यावा असे केल्याने, तेथे आता मात्र विचाराचें मुळीं काहीं चालणेच होईना-विचाराचा हातच मुळीं तो सापडेना (१८४)

असे तमाच्या दरीमध्ये पडलेले ते विचाराच्या हातासच न येणारे असे होऊन असलेले ते-असो, ते जेथे गेले-कुठे ते गेले त्याची शुद्धिच मुळीं त्याना नसणारी-त्याचा पत्ताच त्याना मुळीं नाहीं

ह्या द्वेषाच्या धगीने ते ज्ञान जे लपले किंवा लोपलें गेलें, तें मुळीं वरच येईनासे झालें-त्याचा लोपच जसा झाला व त्याच्या जोडीचा जो प्रेमधागा हाहि पण मुळीं शुद्धीवर असा जो हरवला तो कोणत्या गावीं गेला ती शुद्धीच नाहीं

तेथे अनुकम्पा-प्रेमधागा हा आपली शुद्धि हरवल्यामुळे ज्ञानासच विसरला-आता ते ज्ञान हे जसे मागेच ढकलले गेले, नव्हे, ते तर रगडलेच गेले, खाऊनच टाकिलें असे झाले-खसखसा चावूनच ते खाल्ले व पचविलेहि पण-तेव्हा आता ह्या ज्ञानाच्या गोष्टी कोणीं बोलाव्यात बरे-तेथें गोष्ट मुळीं नाहीं-तेथे जीव लागणारी अशी एखादी गोष्टच नाहीं, तर मग काय ते ज्ञान, काय ते प्रेम, तेथे प्रीति ती कशाची, पुरुष तो कसला-ह्या गोष्टीच मुळीं कोणत्या जगाच्या कोण जाणे ! येथे साधुदर्शनाने महापुण्यच पदरीं बाधणं केलेले बरे (१८५)

म्हणून असो हीं व्यर्थ बोलणीं-कायसीं अशीं तीं मूर्खांविषयीं केलेलीं बोलणीं बरे ! हीं बोलणींच जर वाढवून सागण्याचें केले, तर आपली वाणी मात्र व्यर्थ शीण पावेल (१८६)

असे श्रीदेवानीं सागितले-तेव्हा पाडव जो अर्जुन त्याने जी जी असेच म्हटले आता जेथे ह्या वाचेस विसावा मिळेल अशी ती साधुकथा ऐकण्याचे करा (१८७)

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**यजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

महात्मानः = पुण्यशील, उदार बुद्धीचे भगवद्भक्त महान् आत्मानः आत्मनः महत्-महात्म्य ब्रम्ह दैवीम = दैवी स्वभाव अनन्यमनसः = अनन्यभक्ति अंतःकरणाने ज्ञात्वा = जाणून. भूत + आदिम् + अव्ययम् + माम् = मी सर्व भूताचे आदि असे अव्ययत्वच अगा मला ते, भूतमात्राचे आदि-कारण व अव्ययत्वाचा असा जो मी आदि = पहिला, मुख्य. भूतादि = साख्यशास्त्रात भूतादि म्हणजे अहकार तत्त्व आदिम-आद्यस्थान – मनुष्यजन्म-नरदेह शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् असे जे ते असेहि ते आदि

पार्थ, दैवीम् प्रकृतिम आश्रिताः महात्मान. तु भूतादिम अव्ययम् माम ज्ञात्वा अनन्यमनसः भजन्ति ।

परतु, अर्जुना, दैवी स्वभावाचा आश्रय केलेले ( पुण्यशील ) मी ( परमात्मा ) सर्व भूताचे आदिकारण ( आद्यस्थान ) व अव्ययत्व आहे असे जाणून अनन्यभक्तियुक्त अत करणाने माझी ( परमात्म्याची ) उपासना करितात. (१३)

**तरी जयाचे चोखटे मानसीं । मी हूनि असे क्षेत्रसंन्यासी ।**
**जया निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ १८८ ॥**

जयाचिया आस्थेचिया सद्‌भावा । आंतु धर्म करी राणिवा ।
जयाचे मनीं ओलावा । विवेकाचा ॥ १८९ ॥
जे ज्ञानगंगे न्हाले । पूर्णता जेऊनि धाले ।
शांतीसी निघाले । पल्लव नवे ॥ १९० ॥
जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपांचे स्तंभ ।
आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकुळुनि ठेले ॥ १९१ ॥
जया भक्तीची इतुली प्राप्ति । जे कैवल्यातें परौते सर म्हणती ।
जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ १९२ ॥
जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं लेणीं ।
जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥ १९३ ॥
जे ऐसे महानुभाव । दैविये प्रकृतीचे दैव ।
जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥ १९४ ॥
मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती महात्मे ।
परी दुजेन मनोधर्में । सिवंतले नाहीं ॥ १९५ ॥
ऐसें मीचि होऊनि पांडवा । जे करिती माझी सेवा ।
तरी नवलाव तो सांगावा । ऐसें आईके ॥ १९६ ॥

(१८८) चोखटें=निर्मळ. हूनि – होऊनि क्षेत्रसन्यासी=एकाच क्षेत्रात निरंतर राहाण्याचा निर्धार केलेला पुरुष निजेलियातें – निदैलयातें (१८९) राणिवा=राज्य मनीं – मन (१९०) न्हाले – नहाले. निघाले – झाले (१९१) परिणामा कोंभ=पूर्णावस्थेचे अंकुर अथवा पूर्णस्थिति, ब्रह्मरूपता मंडपांचे – मंडपाचे चुबकुळुनि ठेले – चुबकळोनि भरिले=बुडवून भरले (१९२) जया – जयाची परौते – परते ज्याना भक्तीचें परम सुख एवढे मिळाले असत कीं, ते मोक्षाला दूर सारतात. जियाली= जावत. (१९३) जयाचे – ज्याचे करणीं = सर्व इद्रियात. गवसणी=साठवण. (१९४) महानुभाव= महात्मे. दैव=भाग्य (१९५) दुजेन – दुजेपण सिवतले=ज्याचे चित्त द्वैताला नुसता स्पर्शहि करीत नाहीं. (१९६) तरी – परी नवलाव=नवल, आश्चर्य ऐसें आईके – असे आईक.

ज्याच्या निर्मळ अंतःकरणात मी निरतर राहाणारा आहे : जो असा निजलेला जरी, तरी दैवाचा असाच असल्याने, तो वैराग्यानेच असणारा सदा असतो निजज्ञान जे त्याची एक उपासनाच ते वैराग्य पुढे घेऊन असतें (१८८)

ज्याच्या आस्थारूप सद्‌भावामध्ये धर्मच जसा राबणारा होऊन असतो व ज्याच्या मनामध्ये विवेक हाच सर्व ज्ञानाचा ओलावा घेऊन आहे–असे ते असतात (१८९)

ते कसे म्हणशील, तर ज्ञानगगा हिजमध्ये त्यानीं स्नान केले–त्या गगतच ते न्हाऊन आले–पूर्णपणाने बोधच तेथे ठरला व आता पाहावे तो ते धालेपणानें ढेकरच देत असलेले : ते कसे दिसू लागले म्हणशील, तर जशी काहीं शाती वेलीस आली व तेथे सकोमल नवे पल्लवच उगवले : ज्ञानरूपी गंगेचें स्नान झालें–पूर्णावस्थेनें प्रसन्न अशाच धालेपणाचे–व शांतीच येथें नव्या नवाईस आली ! काय कोमल व मृदु तेथीलचे पल्लव–कोवळीं लुसलुशीत पानें !! हस्तकमलच ! कमलाप्रमाणे सुदर व शोभिवंत दिसणारे दानच ! देवतेचे !! (१९०)

परिणाम हा जसा शब्दाचा स्थूल हस्व जाऊन तेथें एक भाव प्राधान्यतेस आला–सुखाच योग झाला अथवा योग हा सुखाचा होऊन आहे असे जे परिणमणें, तेथें नाविन्य हें रसाळपणाचें असे, सौम्य अशा

वाक्सृष्टीचें जसें लावण्यासच आलें-तेथे तरुणतर असा जो एक परिणाम ह्या प्रकृतीवर होऊं लागला कीं, तेथे तारुण्य कसे तर लावण्यबहारीनें आपले सर्वांगांनीं पुरतें केलेलें रूप हें स्वरूपवान असा परिणाम चित्त मोहून टाकणारा झालाः तेथें रसामुळें रस, बोलण्यामुळें अबोलणें (प्रशात लक्षण) अथवा बोलणें गगनरगावर एक नवीनच कोंभ उगवला आहे असें तें ज्ञानदशेचें एक परिणमणें, हें जसे हास्यच करू लागणारें असे सुसलग्नतेनें उदित झालेलें भावप्राधान्य : अनेक विद्यानीं आपलें घातलेलें जे दिव्य आसन तेथे आता ह्या परिणामास आलेल्या ज्ञानदशेनें तेथे कांहीं सुचेनासे होऊन, ती पक्व दशा हीच आपलीशी करावी अशी एक इच्छा सर्वथैव त्या धैर्याची होऊन आल्यानें, तेथे जणूं ह्या प्रकृतिधर्मास आनदाची उकळी येऊं लागून, तेथे मोठ्याहूनहि मोठा असा आधारच ह्या ज्ञानास पाहात राहिल्यानें, तेथे आता ते म्हणजे ह्या धृतीस आपले म्हणविणारे असे आधाराचे स्तंभच जणूं ह्या आकाशास दिलेले : तेथे केवढेहि जरी विस्तीर्ण स्वरूप ह्या विद्याच्या नटनाट्यानें घेतलेलें असले, तरी हें म्हणजे त्याहिवर मात करणारें असे सर्व धैर्यच, जसे एक मडपच उभारला आहे असा, त्या प्रकृतीच्या मायावैचित्र्याचे झेपलेलें असे स्वभावसौजन्य : तेथे परम रमणीय अशीच ह्या चित्ताची सहजसिद्ध अशी योजनाच (घोषणाच !) योगास आली-मधुर असें हास्यच करू लागलेली !

तेथे आनद हा मुळीं वर नच येणारा असल्याने त्यानीं त्या आनदाच्या मुळीं आतच बुडी देऊन असण्याचे केले-कुभच जसे : चोहोंबाजूंनीं आनद आनंद असा समुद्रच ! तेथे अतःकरण हें महत् प्रसन्नतेच्या रसभरिततेने एका आनदासच पाहू लागल्यानें, तेथें स(सा)मुद्रासारखे गाभीर्य हेंच ह्या स्वभावास पाहू केल्यानें, तेथं सुखाचा सागर जसा काहीं एका विशिष्टतेनें आपलेपणाचा झाला व आता ह्या प्रकृतीनं ज काहीं ह्या अर्थास योगाचे केलें किंवा योगानें अर्थास पाहू केले तें म्हणजे जसे काहीं तेथे तें परमात्मरूप दर्शनच-सहज आनंदच-ह्या अंतःकरणानें आपलासा केल्यानें, तेथें आनंद हाच आपल्या पाहाण्यास आला-आपल्यास पाहूं लागला-ते प्रत्यक्षत्वच जसे काहीं समक्षतेने असणारें असे स्वरूपच तें होऊन आले (१९१)

तेथं भक्ति ही प्राप्तीची झाली : प्राप्ति ही भक्तिप्राप्त अशीच झाली : तेथे कैवल्य हेंहि पण फिक्केच होय, असें त म्हणूं लागलें : तेथे नीति ही जशी काहीं लीला ही देवीचे दैविक असेच एक नीतितत्त्वाचे दिव्यच देखण्यास मिळाले-पाहू आले तेथील ' सजणें ' हे तर इतके साधलेलें कीं, त्यानें केवल्य हें तर स्पष्टपणें दर्शवून दिलेच : त त्याहिवर जसे त्याहिपुढे गेल्याने ह्या देहधारी मनुष्य प्राण्याकडून हें जे ज्ञानदृष्टीचें लेणें त कसे लेवविलें जातें-वागविलें जातें-तें पाहून-त्यांत राहून-तें अनुभवून-तेथे जसें काहीं एका आनंदाची आठवणच घेऊन-सर्वथैव त्या आनदाचे असे झाल्यानें, येथे भक्ति ही ' प्राप्त ' अशी सर्व लक्षणांनीं एक सुलभ ऐश्वर्यच-तेथे भक्तिच नटलेली अशी. (१९२)

त्याचीं सर्व कर्में-कर्मांनीं शातीच जशी आपल्या अलंकारानीं नटलेली अशी अलंकारसपन्न होऊन, तिने ह्या ' व्यापका मज ' व्याप्यव्यापकत्वानें-सर्व व्यापक जो मी त्या माझ्या चित्तासच गवसणी घालून तेथे सर्व चित्तच आकळून ठेविले-आकाशाप्रमाणे व्यापकत्वानें असणारा जो मी परमात्मा तोच मी त्यास सापडला-त्यानीं मजला चित्तरूपीं चित्स्वरूपास गवसणी घालून आकळूनच घेतलें, बांधूनच जसे ठेविलें, अशीं सहज ज्ञानप्राधान्यतेचीं तीं कर्मेंहि करणींच जरीं अनेक, अनेकत्वानें बहु बहु अशींच होऊन आलेलीं तरी (१९३)

अर्से तें दैविये प्रकृतीने आपलें दैवच जसे आपलें अजमाविले-ते म्हणजे ह्या दैवीप्रकृतीचे देवभावाचे असे मीच नव्हत काय ? तेथें प्रकृतीचें जे पारतंत्र्याचे असें प्राकृत तेंच भव-अनु-अनु-माव भाव्य असेच एक क्षणहि वाया नच जाऊं देतां तेथेच त्या श्वसनक्रियेसच जणूं पळपळ स्मरणानें आपलेसे केलें-

त्यानीं माझे सर्व स्वरूप जाणून त्या दैवीनें आपलें दैव हेंच होय असे म्हणूं करून तेथेंच ती रमं लागली, विसांवून राहिली, स्थिर झाली : आपलेपणानें थटून बसली : अनुकार जसा ह्या सौजन्यानें आपला म्हणविला : तसे हे ' महानुभावी ' जे त्यांनीं अनु-अनु-भव-भाव हाच सूक्ष्माहूनहि सूक्ष्मतर असाच करून पाहाण्याचें केल्यानें, त्यांना तो अनु म्हणजे प्रकृतीचें जें तंत्रतर्य त्याचें केले गेलेलें जे त्यासच भव्य देऊ केल्यानें, तेथें आता भाव्य हेंच प्रकृतीला (भूताना) सापडणारें देवत्व : भाव्य हेच देवलक्षण भूताना येणारें : परंतु जर त्यांनीं (महा-अनुभावांनीं) अनुभावांनीं भाव्य केले नाहीं, काहींच नाहीं असे भूताचें अभूतत्व (अद्‌भूतत्व) किंवा दैवीचें दैवी कसचें ? असे होणारें म्हणून भाव्य हाच भूताचा ' देवपणा ' दैवास आलेला, किंवा प्रकृतीच जशी आपल्या इच्छेनेच तें स्वतःचें असे एक सदैव नियंतृत्व पत्करून असणारी : तेव्हा येथें प्रकृतीचें जसे काहीं सर्वसार असेच ते भावणे-जें ' केव्हाहि मानणें कर ह्या भावाना ' (करी मान भावा। तुका विनंति करी देवा ॥) असे म्हणणें करून असतं

येथूनच भूत : भव : भाव : भाव्य . दैवी . दैविकी : प्रकृति . आत्मा : देव : इत्यादिनीं आपले मूळच एक पाहूं केलें अथवा त्याना पाहाण्यास मिळाले असें होऊन, मग प्रसन्नत्वच ह्या जीवदर्शनें पाहाण्याचें करून सर्व विश्वास हा विश्वाएवढा झाला, व आता विश्वविभावन व भूतभाव्य हेंच परस्पर समजुतीस येण्याचें करूं लागले : (अनु अनु कृ) : तेथे सर्व स्वरूप हें तीर्थीचे पाहाण्यास आले

(महत्+अनु अनु+भव+भाव+भाव्य+भावितात्म् : महत्तत्व जे बुद्धीच्या पलीकडे-आत्मा महान् पर असा : तेथे अव्यक्ताचे अलीकडे असणारें जे महत् : ह्या अव्यक्ताहिपलीकडे पुरुष व त्याच्या नंतर किंचित्हि काहीं नाहीं : तीस काष्ठा गति म्हटले ) (१९४)

तेथे प्रेमच वाढीस लागलें, वाढून आलें मला जे महात्मे भजतात त्याना दुजें अस भासलेंच नाहीं—त्यानीं दुजेपण हें मनोधर्माचें केले नाहीं : त्याचे मनोधर्म हे त्यानीं दुजेपणाचे केले नाहींत मन हेंच जेव्हा तेव्हा केव्हा ' दुजे दुजे ' असेच करणे ते त्यानीं केले नाहीं : त्यानीं अभिन्नतस पाहिलें . अभिन्नतेच्या मनोधर्माचे ते झाले : त्यानीं दुजे भावणें केलें नाहीं : एकाचे असेच-आपले अंगच-त्यानीं एकोप्याचें केलें : एकत्रपणाचें केले : एकाच घराचा संसार जसा ! तेथे दुजाभाव नाहीं तसे त्यानीं केलें व दुजेंपणास पाहिलेंच नाहीं

ह्या 'अणु अणु' ना पाहिले म्हणजे ती सताची उक्ति हीच पुढ होऊन बोलू लागते कीं, "अणुरेणुहि थोकडा। तुका ब्रम्हांडाएवढा॥" "कोण दुजे हरि शिव ?" "दुजयाचा छंद।" "ज्ञानदेव म्हणे नामया तोच तो ' दू ' माझा।" (१९५)

येथें ह्या अनुभावितात्म्-अनु : अनु : भव . भावः भाव्य-जो तोच जे करीत असलेले असे महानुभाव ते म्हणजे दैवच जसे ह्या दैवियी प्रकृतीस आलेले असे आहेत : त्यानीं माझे हें सर्व स्वरूप जाणून जे कर्मदिव्य तेंच जसे दैवाचें केले तेथें दैविये प्रकृतीसच पाहू केल्यानें तेथे त्यानीं कर्मासच आपल्या सत्तेखालीं आणून ठेविलें, एरवीं ह्या कर्माच्या बोचणीं कोणास बरे लागत नाहींत ? येथे ह्यानीं तर दैवच एक त्यांतून काढण्याचें केले : कसच पाहिला, नव्हे कसच घेऊन त्यानीं त्यामधून एक दिव्यतेस येणारें असे कर्मदिव्य निवृत्ततेनें आपलेसें केले. येथे निवृत्तता म्हणण्याऐवजीं असेच म्हण केले कीं, अनुभवज्ञान म्हणजेच तें विज्ञान होय येथें महत् भार ह्या विज्ञानाने पाहिला असून, त्यानेच मुळीं ह्या पंचभूताचा संभार भार नीटसा अभ्यासिलेला करून, तें जे अद्‌भूततेनें असणारें महद्‌भूत त्यासच पाहू केलें : म्हणून कर्मभूमींतच मुळीं जन्मून कर्माशीं माझा काय सबंध असे म्हणणेंच कुठे काहीं लागूं पडणारें होतें तें कसें बरें सांगणार ! म्हणून येथें ज्या आळस्यादि विकारांनीं ही (गृहेंच) मातीच मुळीं आता उलथिलीच पाहिजे अशीच ह्या दैविकीची एक सहजतेस सजविणारी अगी ह्या मनुष्य-देह-धारणेसच

दिलेली सहजसिद्धता ही कधीं कुणास त्याबाबत विचार करावा अशी होतच नाहीं तेथें एकच गोष्ट पुढे घेतलेली असते, ती ही कीं, कर्म हेंच मुळीं सत्प्रत येणें हेंच अवघडाहूनहि महान् अवघड असलेला एक विषयच अभ्यासास दिला जर, तर तें सत् व तें कर्म ह्याचीच मुळीं एक जी जुपी लागते, त्या झटापटींत दोघांपैकीं कुणीच हार खात नाहीं : कर्म हें धर्माचें झालेंच पाहिजे व सत् हें मुद्राक्षराचें· येथें ती कर्मव्यवस्था जर नच निवृत्तपणास आणलेली असेल, तर ह्या मुद्राक्षरानें असलेल्या सत्लाच मुळीं तें कर्म आपली पातळी घ्यावयास लावून हार देतें: म्हणून येथें कर्म हे नच पाहाता, तेथें निवृत्ततेनें मुद्राभारच पाहाण्याचें केलें, तर ही जी राहिलेली कर्तव्यसमाप्ति हीच जेथें तेथे नडविणारी होऊन-तीं का बरें समाप्तीची निवृत्तीची केली नाहीं मुद्राभार देऊन-असेच ते ' अपूर्णतेचें का बरें कर्तव्य केलें? ' असेच विचारणें होतें सर्व ज्ञान जाणून ही ' निवृत्ति ही पूर्णतेची अशीच महत् भाराची असते ' तेथील कर्तव्य जर पूर्ण केलें नाहीं, तर तें जें महत ब्रह्म तें काय आपला व्यय करून अव्ययत्वाचें झालें आहे असे प्रश्न करणारें होतें: ह्याच एक प्रश्न त्या ब्रह्माबाबत, काय तें व्यापक नाहीं ! काय तें पूर्ण नाहीं ! काय तें सहजसिद्ध नाहीं ! काय तें सिद्धतेचा अतच जेथे आहे असे नाहीं ! काय तें जें राहिलेलें कर्तव्य तें दुसऱ्यावर ढकलून देऊन मजला स्वतःला त्या ब्रह्मतेची ओळख ती कशी काय असे विचारून ह्या ज्ञानास पारुसवून घेतें-तेथे पुन्हां तें जेव्हा पुरतें करावे, तेव्हाच त्या मागच्या कर्माचा भर हा मोडून टाकून पुन्हा त्या पहिल्या घडीवर उभे राहाण्याचें तें केले जाणारें ! म्हणून ह्या विज्ञानतेचें तें एक विचित्र अग ह्या दैवीस, दैविकीस, दैवियीस किंवा प्रकृतीस, प्राकृतीस विचारून, तेथें प्रकृतितंत्र व दैवियीतंत्र हीं काय कसल्या फरकाने वागणारीं आहेत बरें ? असे विचारून, तेथे तो प्रश्नच मुळीं ह्या संतानींच सोडविला जाणारा होय येथे मला तर असेंच वाटतें कीं, येथें दुजेपण हेंच मोठ्या महत्त्वाचा मनोधर्म असेंच कदाचित वाटणें केलेलें होय.

मनाचा धर्म हा ' चंचळ ' असणारा, परंतु जेव्हा तो धर्म देवपणाचा होतो, तेव्हा तेथें धाडसच एक पुढे होतें परंतु विद्या ही काय धाडस पुढें करून शिकायची असते ! तेथें जे भार दिव्यतेचे ते निरनिराळे असल्याने, एकाने दुसऱ्या भारासच चेव देणें तें काय उगीचच्या उगीचचें असें एक दुर्जेपण मनोधर्मानें पाहिले असे ? काय तेथें मन मित्र का तसेच तें दावेदार का हें काहींच अजमावून नसल्यानें, तेथें तें दुजेपण हेंच जसे रानच ह्या वाक्सृष्टीचें : म्हणून तेथे एकोप्यानें वागणारे महात्मे हे आपला संसार हा निराळा किंवा वेगळा करावा-वेगळवावा-किंवा वेगळविला असावा-असे नच करणारे असून तेथें प्रेमच वाढतें होणारें माझी भक्ति ही माहात्म्यच जसे भक्तीस आले किंवा भक्तिच माहात्म्याची झाली. असे त्याचें मजबद्दलचें प्रेम हे लोकोत्तरतेचे-अद्वितीयतेचे-महत्च्या अनुभावास आलेले-बुद्धि, आत्मा, महत् मधील जे काहीं घट, घटी, घोट, घटितव्य कसे-तेथे भावास केवढे महत्त्व बरें ! असे जरी, तरी त्यानीं वेगळेपणाचें होणे केले नाहीं त्यानीं आपला संसार निराळा नच करून-मजमध्येच ते मुरून गेले-हें एक विशेषशा अशाच महत्त्वाचें होय (१९५)

असे मीच ते झाले – व मीच होऊन माझीच सेवा ते करितात. असें हें, अर्जुना, आहे याहिवर तेथे एक नवलाव आश्चर्याचा तो सागण्यासारखा आहे तो ऐक (१९६)

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

**सततम् = नित्य. कीर्तयन्तः =** चित्तच गुणनामामध्ये बुडवून ठेविलें असे एक कीर्तीचें त्यांचें जिणे **यतन्तः =** प्रयत्नांची सीमाच झाली – माझ्या प्राप्तीसाठीं व प्राप्तीची जी कांहीं टिकाव धरून असणारी

प्राप्ति तीच स्थिर करण्यास प्रयत्नांची एक कसोटीच. दृढव्रताः = कठिणतर व्रत, गंसितव्रत व्रत हे आहे, परंतु तें जेव्हां ह्या प्रकृतीवर जय मिळविण्याची एकतानता पाहाण्याचें करतें, तेव्हा दुसऱ्या अनेक व्यापांनीं तेथे जे कांहीं द्वंद्व उगवणारें तें महत् असे एक व्रताचें लक्षण ते आपल्या माहात्म्य – महत्त्वा-सच येतें : म्हणून येथे अनेक बाजू झाडल्या जातात – व तेथें त दृढपण अथवा व्रताचे काठिण्य हे दोन्ही पक्षांस आपलें महत्त्व ' मान्य ' असेंच करून घेणारें होतें – असें तें व्रत – ते मुळींच असे तसे किंवा लहान-सहान नव्हे ! नमस्यन्तः च = मीं कसे नमस्कार करून असावे असे एक लाजिरवाणें जिणें ! तेथे नमः याने अंतच पाहिला, आपले नमःचें प्राकारणे प्रकृतीचें झालेलें ते कसे एकत्वास आणून, तेथे अंतच जसा ह्या नमस्करणानें पाहिला : आता यापेक्षा अधिक कांहीं तेथें ह्या नमःमध्ये अर्थ आहे असा अंतच त्याचा पाहाणे केलें असे नमस्करण भक्त्या = भक्तीने, विभक्ततेने नव्हे, तर भक्तिच एक जशी आपल्या बीजास आली : ती भक्ति भक्तीची झाली : भक्ति ही भजभाव पाहाणारी-तेथें सरस्वतीबीजच तिने पाहिले व अक्षरास आली व आता ती भक्ति स्वतःस भक्ति म्हणवूं लागली नित्ययुक्ता. = नित्य असे योगयुक्ताचें जें लक्षण तसे ते होऊन योगयुक्ताः नित्याः अथवा नित्यतेचा झाला आहे योग ज्यांचाः तेथे योगानें युक्त असेच तं वियोगाचें नव्हे किंवा विरहाचे नव्हे, असे संयोगाचे एक योगमापन हेच युक्त म्हणजे योजलेले असेच होऊन आहे असें जें नित्य, तेथे नित्य (योग) युक्त असेच म्हटले गेले उपासते = उपास्य देवतेशीं ऐक्य हे साधणें हेंच योगलक्षणाचे मुख्य अंग असून तेथे भक्ति ही देवता झाली. तेथे उपास्य हेच भक्ति, युक्ति, शक्ति, सरस्वती ही नित्यत्वच तेथे पाहूं करणारी असी.

माम् सततम् कीर्तयन्तः दृढव्रताः यतन्तः च माम् च भक्त्या नमस्यन्तः नित्ययुक्ताः उपासते ।

सर्वकाळ माझे गुणकीर्तन करीत असणारे—नेहमींच दृढ व्रत हेच त्यांनीं आपलेंसे केले नित्य माझी प्राप्तीच व्हावी तोच एक प्रयत्न हेच त्याचे व्रत, नेहमीं कीर्तन (गुणनामसंकीर्तन) व गुणानुवाद हेच त्याचे नित्ययुक्ततेचे असे, मजला नमस्कार करूनच असणारे असे त भक्तियुक्त अंतःकरणाचे नित्य मजला उपासणारे असे ते होत. (१४)

**तरी कीर्तनाचेनि नडनाचें । नासिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे ।**
**जें नांवचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ १९७ ॥**
**यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरुनि उठविलीं ।**
**यमलोकींची खुंटिली । राहाटी आघवी ॥ १९८ ॥**
**यम म्हणे काय यमावें । दम म्हणे काय दमावें ।**
**तीर्थें म्हणती काय खावें । दोष वोखदासी नाहीं ॥ १९९ ॥**
**ऐसें माझेनि नामघोषें । नाहीं करिती विश्वाचीं दुःखें ।**
**अघवें जग महासुखें । दुमदुमित भरलें ॥ २०० ॥**
**ते पाहातेंविण पाहावित । अमृतेंविण जिववित ।**
**योगेंविण दावित । कैवल्य डोळां ॥ २०१ ॥**
**परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेया थोरा कडसणी करूं ।**
**येकसरें आनंदाचें आवारूं । होत जगा ॥ २०२ ॥**
**कहीं एकादेन वैकुंठा जावें । तीं तेंहीं वैकुंठचि केलें आघवें ।**
**ऐसें नामघोषगौरवें । ढवळलें विश्व ॥ २०३ ॥**
**सूर्य तेजें सोज्वळ । परी तो अस्तुसवें किडाळ ।**
**चंद्र संपूर्ण एकादे वेळ । हे सदा पुरते ॥ २०४ ॥**

(१९७) नडनाचे - नटनाचें=नाचण्याउडण्याने नावचि - नामचि नासिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे = पापक्षाळनाचे सर्व प्रकार नाहींसे केले (१९८) खुंटिली - योटिली (१९९) यम = मनाचें संयमन दम = इंद्रियांना विषयापासून आवरणे वोखदासी - औषधासी. (२००) अघवे - अवघे. (२०१) पाहातेविण पाहावीत=आत्मज्ञानाचा प्रकाश देतात (२०२) पाड = समानता. वेणती = लहान थोर हा विचार त्याचे मनात येत नाहीं आवारू - आवरूं. होत - होय. (२०३) कहीं = एकादे वेळीं तो तेहीं - ते तिहीं ढवळले - धवळलें = पावन केले. (२०४) तेजे - तेजे तेंस. अस्तुसवे - अस्तवे हे किडाळ = कर्मीपणा.

तरी कीर्तन हेंच त्याचे 'नटणें-नाचणे'-हेच तेथे नाट लागणारे ते नाडणें, न - अड - नार - णे, आड घेऊन पढियते असेच कीर्तन हेच एक गुणनाम गाणारे : तेथे प्रायश्चित्ताची आता जरूरच उरली नाहीं - तेथे पापाचे नावच त्यानीं पुसून टाकले - व असे केल्यामुळे तेथे त्या कीर्तनासच एक सर्व रग ह्या ईशगुणानुवादाचा

नटणे-नाचणे = नटणे हच नाच, तेथे जें नटणे त हावभावानीं ही वाचा जगी नाचविली-चित्त व्यर्थतेचे असे पाहिले व काय तेथे रस कसचा काय-म्हणून येथे अडविले गेलेले त 'कडू वाटण्याने' वाटविण्यान दुरुस्तीस घेतले-व एक मनच आपल्या उफाटीचे करून कसे तरी ह्या जीविलास शोभेचे आहे असे म्हणून त्या रजनातच बसले.

कीर्ति-कीर्ति तन - कीर्तन = येथे कीर्ति हीच ह्या तनूंत सर्व मुग्व अर्थी होऊन गायिली जाणारी (गुण-कीर्तन, नामसकीर्तन) (१९७)

ह्या दमरूपी अंगानीं सर्व काहीं उत्तमतेस आणिले ह्या योगान्या अष्टागानीं आपलीं सर्व अंगे हींच-सर्व योग हाच सर्वत्र वागणारा झाल्याने, तेथे आता योग हा कुणावर चालवावा किंवा आता दमावे त काय, कारण जेथे तेथे सर्व काहीं सुव्यवस्थित असेच करून आहे सर्व तीर्थानीं आता ह्या येथेच येऊ केल्याने, तेथें आता तीर्थरूप किंवा तीर्थस्वरूप हे काहीं दुसरीकडे पाहाण्याचे कारणच नाहीं कारण ह्या येथेच त्यानीं येऊ केल्याने, तीर्थे हीं माहेरघरच होऊन आलीं सर्व तीर्थांनीं आपला ठावच पाहिला तीर्थांना यथातीर्थ असेच रूप येऊन राहिले त्यानीं आपला ठाव पाहिल्याने त्याचा तो प्रधान-ब्रह्मतेचा अथवा प्रधानतत्त्वावर जयच झाल्यान, तीं तीर्थे जिकडे तिकडे आपल्या दिव्यतेने दिपवूनच सोडं लागलीं आता येथे यमलोक म्हणून जो त्याने ह्या मरणाबाबत आता येथे दंड कुणास करावा, म्हणून विनवणीच एक केली कीं, पाप हे तर तेथे नावास सुद्धा नाहीं: तेथे रिपु अथवा दुजाभाव जो तोच एकपणास आला, एकार्थाचा झाला: आता यमलोक हा कुठे काहीं नावालाहि राहिला नाहीं: कारण हे राग द्वेष हे रिपु तेच येथे विसरलेच गेले, त्याचे येथे नावच नाहीं (१९८)

दण्डधर जो आहे तो म्हणूं लागला कीं, आता सर्व काहीं आपल्या योग्यतेन असल्याने येथे दण्डावे किंवा दमावे त काय? काहींच नाहीं दम म्हणूं लागला कीं षट्सपत्ति ह्या आपापल्या योग्यतेप्रमाणे स्थिर होऊन दैवतच झाल्या तेव्हा आता संपत्तिच येथे पाहाण्यास येत असल्याने आता जो तो आपापल्या योग्यतेप्रमाणे वागत आहे तीर्थे हीं स्वरूपसिद्ध अशाच लक्षणांचीं झाल्याने तेथे रूपसिद्धि अथवा स्वरूपतीर्थसिद्धीच त्या तीर्थांनीं पाहाण्याचे केले : येथे दोष हा तर औषधाकरिता सुद्धा मिळणे नाहीं (१९९)

अशाच तऱ्हेनें माझा नामघोष करून सर्व विश्वाचीं दुःखेंच त्यानीं नाहींशीं केलीं: सर्व जग हे महासुखाने दुमदुमूनच भेले आहे-भरून राहिले आहे. (२००)

येथे महानुभाव ( महत् + अनु + भव + भाव + भाव्य = महानुभावताम् ! ) व महात्मे (महात्म्य) ह्यांनीं ईश्वरी सूत्रामध्ये वागणें करीत राहाणें जें केलें जाणारें त्याबद्दल अति गौरवानें सांगण्याचें केलें: तें जसें कांहीं भक्तिच एक प्राप्ति होऊन आली असे-कैवल्य म्हणून जें कांहीं वाखाणिलेलें त्यासहि पण मागेच टाकलें-त्याहूनहि परम असे सुखधाम चें जें तें त्या कैवल्यासच खालीं पाहावयास लावणारे असल्यानें, तेथे जीवतपण घेऊन आलेली अशी नीतिच एक, लीलाच ! सहज लीला ! तेथें भगवंताची महल्लीला हीच अति विनोदाचें एक ठिकाणच तें होऊन आलेलें माझे महत् 'व्यापकपण'-त्या व्यापकपणामुळे ही शांती हीच जगास कुठे काहीं नच पाहाण्यास मिळणारी-व तसे तें व्यापकत्वच ह्या स्वरूपानें आपलेसे केल्यामुळे त्याचें चित्त म्हणजे शांतिच मूर्तिमंत ! परंतु, हे अर्जुना, हें असे जरी असले, तरी याहिपेक्षा एक अधिकोत्तर असा नवलावाचा अभिप्राय आहे तो सागतों ! ते म्हणजे माझे कीर्तन हेंच विश्वनटाचें जसे एक गढणें, रंगणें, प्रायश्चित्तच घेतलेले असे स्वरूप होय भक्तीमध्येच रगून गेलेले-आनदाचें नाचणे त्याचें तें, तेथें सर्व आनंदच !! तेथे पाप नाहींच-जिकडे तिकडे तीर्थेंच सचरून आहेत असे होऊन गेलें-व आतां त्या तीर्थांना असा पेच येऊन पडला कीं, आता स्वरूपतीर्थच एक असे होऊन आल्यानें, तेथें काय स्वरूपच रूपानें खावे काय ?-तेथे पावन तें आतां काय करावे ?-किंवा रूप खाण्यानेंच स्वरूप तीर्थ होणारे असे-असे नव्हेच ! अहो, सर्वच स्वरूपाने जर राहूं लागले, तर मग तीं काय तीर्थें नव्हत ? म्हणून तीर्थ म्हणजे रूप व रूप हें जर रूपासच चोहोंकडे आले आहे, तर मग आता स्वरूपच सर्व होऊन गेलें-तेथे मग रूपच जर सर्व, तर तेथे दोषच मुळीं नाहींतसे झाले-येथे पावन करण्यास काहींच नाहीं-अगीं मळच नाहीं (एरव्हीं कर्माच्या धारा ह्या रुपणाऱ्या खुपणाऱ्या अशाच जरी होऊन असल्या, तरी समुद्र जो आहे त्यास काय त्या रुपणाऱ्या होतात ? नाहीं ) नामघोष जिकडे तिकडे होत राहिल्याने हें सर्व विश्व पाहावे तों अति प्रसन्न होऊन आनदाने नाचत आहे: आनंदात बुडून आहे : ह्या सर्व देशामध्ये तें दुमदुमून गेले आहे असे तें सुख तें ह्या जगात-विश्वात-देशात-महासुखाचें होऊन आहे

आणखी तें कसं म्हणाल तर, पाहणारा जो (डोळा) त्या पाहाणाऱ्याशिवायच-विश्वचक्षू सर्व त्याच्या उदयाशिवायच-ते पाहवितात असे ते आहेत त्याच्या ठिकाणीं 'आता कर्माची पाहाट झाली आहे-म्हणजे ज्ञान उदय होऊन आहे,' असे बोलणेच नाहीं : उदयाशिवाय ते प्रकाश देतात-अमृताशिवायच अमर करणारे, जीवविणारे-व योगाशिवायच त्यांनीं कैवल्य स्पष्टपणे डोळ्याना दाखवून दिलें (तेथें आनद हा नाचूं लागला). केवळ ज्ञान (ज्ञानच फक्त तेथे कैवल्य) म्हणजे नामच एक आपला महत् भार घेऊन आल्यानें, तेथे योग-अभ्यासानेंच फक्त तें दिसणारें असे आता ते नसून, येथें आतां पाहावे तो भक्तलीलेचा आनदच ! तें तर योगाशिवायच स्पष्ट दिसूं लागलें, डोळ्याना उघड दिसूं लागलें : असे त्याचें करणें हें म्हणजे तें तसे त्याचें नवलावाचें होणें हें ज्ञानदृष्टि देणारें असे आनंदानें नाचूं लागणारें, जीवित्वास अमर केलें (जीवविलें) तें अमृतच तें अमरपदाचें होऊन असणारे असे, होऊन येणारें असे.

मुहूर्त गेला, घटका गेली, तास वाजे सणाणा ।
आयुष्याचा नाश होतो राम कांहो म्हणाना ॥

असं जें प्रकृतिमातेचें-शक्तीचें-जें वैभव तेंच मुहूर्त होऊन असलेलें-तेथे उदयच ह्या देहदिवसाचा : तोच ते संत होऊन असलेले ! तेव्हां त्यांना त्या मुहूर्ताचें होणें हें सहजच असे : बोटावरतीच लेख करून ह्या वेळाना मोजणेंच देणें होत असणारें, तेथें जी ब्रह्मवेळा ती जर सांपडली, तर मग काय ब्रह्मच हातीं लागलें असे होणारें-हेंच ते संत होऊन असल्यानें त्यांनीं आंत ज्ञानदिवसच ज्ञान-उदयाशिवाय प्रकाशित केला. (२०१)

तेथे काय राय काय रंक, काय थोर काय सान, सर्व जगच सर्वत्र सारखेपणानें त्यांच्यामधील आनंदानें पाहू केलें व तेहि पण आनदासच आले-आनंदाचा आवारच ते होऊन आनद हाच जसा जेथे कुठे काहीं थोडा बहुत फार थोडका असा ( प्रेम, भक्ति ) सापडला कीं, लगेच त्यानीं तो आपलासा करून सर्व जगास तो पुरविता, पुरता केला-सर्व जगासच त्या आनदात बसविलें : असा श्रेष्ठपणाचा एक आनदकदच ते झाले . काय मोठे आहेत म्हणून त्याना ' राय राय ' असे सर्व महत्त्वच त्यानीं देऊन टाकणें असे नाहीं : किंवा रक झाला म्हणून तेथं सर्व काहीं हळहळणेच एक केलें असेहि नाहीं : काय थोर आहेत म्हणून त्याची ती जी त्याना थोरपणास आणणारी तपश्चर्या हीच पुन्हा ताव देऊन पाहू, कस लावून पाहू, कीं पुन्हा तीच तपश्चर्या आपल्या कसोटीची झाली पाहिजे असेहि नाहीं . का लहान आहे म्हणून त्यास एक तपश्चर्येचें कडकपण हें देऊ असेहि नाहीं : तेथे तपश्चर्या हीच आपले महत्त्व वागवून असणारी, तेथं सानपणाचा किंवा थोरपणाचा तो काय ताव देऊन पुनः पाहाणे करणे तें जर, मग तेथे तपश्चर्या ती काय ? म्हणून सर्व आनदाचा व्यासच ते झाले-आनदच ते आनंदास पाहाणारे-कोणीहि तर्थे आले तरी आनदान्या आवाराचा तो होणारा !! आनदासच आवार करून असणारा !! आनद हाच केव्हाहि पुढेच त्यानीं घेऊन असणें केल्यामुळे आता सर्व जग हे पाहावे तो आनदाचें एक हास्यच-आनदाचे एक रम्य असेच जग ह मुखबिंबावर चमकणारी जी मुद्रा तिने दाखव केलें : असे ते भक्तिरसाचे आवारच-दिव्य आनंदच एक नेहमींच आपलासा ते करून असलेले-आनदाचे आवारूच त्याचे मन झाले, तें तल्लीन झालें-त्याचेजवळ सर्व आनदाचे असेच एक लेणें, एक आवारू, त्यानीं सर्व जगास देऊन त्यातच ते वावरून असणारे असे-सर्व जगास आनद देणारे असे : आनदाचे आवारच ते, आता कोणीहि आले तरी त्यास आनंदाची प्राप्तिच : जगच त्यानीं आनदाच्या पाठीवर वाहून घेतलें . आवारूच ते आनदाचे असे ह्या जगास मिळणारे !! जेथे सर्व आनदच आहे असे एक आवार त्यानीं जगास दिले-आनद म्हणून जो आहे तेथीलच्या व्यासाचे ( क्षेत्र ) फळच त्यानीं जगास दिले पाठीवर बसण्यास त्यानीं आनदरूप असा घोडाच एक जगास दिला (२०२)

एकादाअर्धाच स्वर्गास जावा-किंवा एकाद्यानच वैकुठ पाहिले-तों काय चमत्कार पाहा कीं, आनदाचें आवारच ते होऊन असल्याने, तेथे आता पाहावे तो तेथे सर्व वैकुठच गाज लागले सर्व विश्वच तेथे धवळारलें-शुभ्र कीर्तिच तेथ कीर्तनाचे आसन घालन बसली : व आता काय तेथे गौरव हा परोपरीनें नामघोषच पुढे घेऊन सर्वच्या सर्व तेथीलचे जे आघवेपण हे वैकुठच होऊन गेले · तेथे विद्यानीं आपली सीमा पाहावी असेच एक त्या अनेक विद्याचे जे चमत्कृतिजनकत्व-तेथे निरनिराळीं अशीं डोकींच आपल्या डोक्यामधून निरनिराळ्या कल्पना तरंगाना उचलून घेऊन पाहू लागल्याने, आता पाहावे तो तेथे नवींनवीं अशींच हीं मनुष्ये दिसू लागून त्याना त्या त्या अनेक शास्त्रजातानींच हार घेऊ लागून, तीं शास्त्रेच आता गौरवास येऊ लागलीं : असे त बुद्धिभारानें हे देहयत्र हेच सर्व प्रकाशमय झाले : विश्व हें नामाचे झाले-घोषाचे झालें-गौरवाचे झाले : नव्हे, तेथे विश्व हेच ह्या मतिवतानीं अथवा श्रीमंतानीं, बुद्धिमततेची एक खाणीच पाहूं करून, तेथे तीं तीं विश्वे-शास्त्रज्ञाताचीं विश्वे-हींच ह्या डोक्यास ज्ञानबीजास पुरतेपण कसे ते द्यावे हेच त्या त्या डोक्याना डोकेच डोक्यास टेकवून तेथें एक उचलणेच-झेपणेंच-पुरतें करणेच तेथीलचे होणेच : असे शास्त्रजाताना तो वैकुठींचा भारच पोहोंचता केला असे त्या एकाद्याचें आवारूच तो ह्या आनंदव्यासाचा किवा व्यास हाच एक आनंदाचा एक परीव सर्व तेथील जे दिव्यानदाचे जे देवलक्षण ते देवत्वच होऊन तेथे प्रकृतीचा परम लय हाच दिव्य झाला-दिव्यतेस आला-प्रकाशूं लागला (२०३)

असें ते ह्या संताचें जे ' महानुभावतम् ! ' सारखे मानणेच एक भावाचे झाले-विनति हीच तेथे होऊं लागली कीं. अहो, हे जे कांहीं ' भाव भाव ' असें बोलणे आहे, त्यास तुम्ही माना-महत्त्व

ग्रा-ते मानून असा : तेथें त्या त्या महात्म्यांचें जें म्हणणें तें कसे बरें ' दुजेपण मनोधर्मे सिवतलें नाहीं ' असे मीच मी आपली सेवा करीत आहे असे तें देवाचे बोलणें हें काय बोलण्यासच मुळीं येणारे नव्हे !! दुजेपण हे काय कसे सांगावे बरे : दुजाभाव-बधुभाव-परकेपण-माझें तुझें-असे तें नच पाहाणारे जे तेच महात्मे म्हटले जाणारे असून, तेथे प्रेमाची जाति हीच एका प्रेमाची सर्वथैव होऊन असलेली : येथें ते चद्रासारखे म्हणावेत, तर चंद्र हा केव्हा तरीच एखादे वेळींच पूर्ण असतो, एरवीं तो कलेमुळे उतरविला जाणारा असल्याने तेथे तोहि त्याच्या उपमेस पुरता होत नाहीं : बरें, ते सूर्यासारखे म्हणावेत, तर कदाचित् ती उपमा पुरती होणारी ! परतु सकाळीं उदय झाल्यानंतर दोन प्रहर टळल्यावर त्यास साजवेळ ही पाहातेच, व तो अस्तास जाणारा ज्या अर्थी, त्या अर्थी तोहि अस्तवे हें एक मिश्रपणच त्याच्या पदरीं येत असल्यानें, तोहि त्याच्या तुलनेस येऊं शकत नाहीं. परंतु हे महात्मे कसे म्हणावेत तर ते नेहमीं पुरते असेच आहेत : तें दुजे भावणें हें त्यांच्या मनास शिवलेच नाहीं : त्याना ' दुजा ' भाव हा पीडा करणारा झाला नाहीं : ते स्वरूपाच्या प्रेमाचे सर्वथैव असे-त्यानीं स्वरूपच एक पाहू केलें : तेथें दुजेपण नाहीं-एक स्वरूपच ते होऊन असल्याने, त्याना ' भाव दुजा ' असे मनाचे हीनबळानें आपलेसे केले नाहीं-असे जे ते धन्य होत हें केव्हाहि ! तेथें धन्यता ही ' त्रिवार'तेची अशी परम सीमाच धन्य धन्य धन्य अशी ! ' दुजेपण मनोधर्मे सिवतले नाहीं ' असे माझे स्वरूपाचें निखळ ओतलेलें प्रेमच तें दिवसेंदिवस आपला चढच घेऊन असलेलें !! (२०४)

मेघ उदार परी वोसरे । म्हणोनि उपमे न पुरे ।
हे निःशंकपणें सपांखरे । पंचानन ॥ २०५ ॥
जयांचे वाचेपुढें भोजें । पैं नाम नाचे माझें ।
जें जन्मसहस्रवरी वोळगिजे । येक वेळ यावया ॥ २०६ ॥
तो मी वैकुंठीं नसे । येक वेळ भानुबिंबींहि न दिसे ।
वरी योगियांचीं मानसें । सांडूनि जाये ॥ २०७ ॥
परी तयांपासीं पांडवा । मी हारपला गिंवसावा ।
जेथ नामघोष बरवा । करिती माझे ॥ २०८ ॥
कैसें माझ्या गुणीं धाले । देशकाळातें विसरले ।
कीर्तनें सुखिये जाले । आपणयांचि ॥ २०९ ॥
कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध ।
माजीं आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥
हें बहु असो यापरी । कीर्तित मातें अवधारी ।
येक विचरती चराचरीं । पांडुकुमरा ॥ २११ ॥
मग आणिखी येक ते अर्जुना । सावियाचि बहु जतना ।
पंच प्राण मना । पाढाऊ घेऊनि ॥ २१२ ॥

(२०५) म्हणौनि – म्हणऊनि उपमे – उपमेस. सपांखरे पंचानन = सदय असून सिंहासारखे, दयेच्या कामीं सिंह (२०६) जयाचे – तयाचे. पुढे – पुढा भोजे = प्रेमानें, आवडीनें पैं – अखंड. नाचे – नाचत असे. सहस्रवरी – सहस्रीं. वोळगिजे = सेवा करावी. (२०७) साडूनि – उमरडोनि = उल्लंघून जाये – जाय (२०८) माझे – माझा (२०९) कीर्तनें सुखिये जाले – कीर्तनसुखे सुखावले. (२१०) निखळ – निखिल = सर्व प्रबंध = कविता. माजी आत्मचर्चा विशद = ज्यांत आत्मबोध स्पष्ट आहे. (२११) कीर्तित = माझे गुणानुवाद गात. (२१२) आणखी येक – आणिक सावियाचि – सवियाचि – सात्रिया = सर्वथा. जतना = रक्षण. पाढाऊ घेऊनी – घेती = मनाला पंच प्राण आटाड्या घेऊन.

अहो अशा त्या ! अहो अशा ह्या ! महात्म्याना काय उपमा ही जो परम उदार असा मेघ त्याची द्यावी म्हटले, तर तो मेघराजा हाहि पण ओसरून जाणारा होतो-आभाळ हें ओसरून गेलें-ढग हे पार नाहींसे झाले-असे एक त्याचे उपमेस पुरते करणारे असे मेघहि पण नव्हत : म्हणून मेघ हा त्याच्या उपमेस पुरता होऊन असत नाहींच, कारण हे पाहावे तो निःशंक असे, निश्चळ असे, निःसंशय असेः कृपादृष्टीचें पांघरूण घालणाऱ्या अशा आपल्या बाजूच त्यानीं अशा कृपेच्या केलेल्या कीं, तेथें सौंदर्य हे कृपा होऊन आलें-त्यांच्या बाजू ह्याच कोणी एक 'रे' सिह, 'रे' मदन : तेथे काय त्या एडक्याने आपल्या धडकांनीं कृपा प्रसवूं केली-जसा काहीं तो एडकाच पंखास प्रसवला व आतां तो कसा दिसूं लागला म्हणाल, तर एक मदनाचा वेष-साज-घातलेला : वर त्याच्या बाजू ह्या कृपेची पाखर घालावी म्हणून पाखास आलेल्या : पंखाच जसा सौम्य वायूच्या लहरी उत्पन्न करितो, तसा तो सगुण गर्भच त्या स्वरूपास आला-प्रेम हा असलाच एक गर्भ घेऊन आलें, व ते पंचानन असे कसल्याहि इंद्रियभाराच्या ओझ्यास पार फस्त करून टाकणारे, वितळवून सोडणारे असे : इंद्रियांची विषयरूपी सेना ही पार त्यानीं उध्वस्त करून टाकली व आपणच ते कृपापीयूषाचे असे एक ससार-गजकेसरीप्रमाणें पचाननः पंच पच उषःकाल असेच एक : पंचभूतानीं पचप्राण आत्म्याला जीवनलहरीस आणून तेथेच ते रमूं लागले, प्रसन्न झालेः असे एक स्वल्प बळच आत्म्याचें झालें : तेथे सौंदर्य हें काय सुंदर म्हणून नेबळे होणारे नव्हे-आपले अंग टाकून देणारे नव्हे : तेथें त्या सौंदर्यानें सौंदर्यावरहि मात करून तेंहि पण सुंदर असे जे सौंदर्याचें सौंदर्य त्यासच आले, व अति प्रेमळ, कठिण, अतिसुंदर, मजबूत, अतिप्रेमळ लावण्य, 'स्वरूपरम्य ( एक जीवितच ) एकजीव असे, कसल्याहि हवामानास तोंड देणारे असे, तें वनात संचरणारे असें एक ( वनराज जो सिंह त्याचें ) सिंहाचे सौंदर्यच सीमा होऊन आलें-परम सीमेचे तें झाले त्याने आपलीच वेळा साधली असे. (२०५)

ज्याने तोड उघडण्याचे अगोदरच माझे नावच असे काहीं करून ठेविलेले कीं, त नाम हेच पुढं पळणारे असे-ते नामच मुळीं भिऊं लागून हा कदाचित् तोड उघडील-किंवा ह्याचे तोड उघडणे न उघडणे होतें तोच त्यानें अगोदरच जसे लागोपाठ त्या तोंड उघडण्याच्या क्रियेसच लिगटून असणारे असे माझे नाम हेच एक मनोरथाचे नृत्यच असे होऊन, तेथे ते नामच मुळीं असे कांहीं आकर्षिलेले कीं, मीच तेथे आपण होऊन पुढे होणारा झालों. असें तेथीलचे जे बोलणें ते काय एक रसच रसाळ झाला-अनुगीतच तें-मनास आनंद देणारें असे गीत-नृत्यच जणूं शोभिवंत असेच ह्या मनास करून असणारें झाल्यानें, तेथें आता हजारों जन्म झालेले जें ह्या मनुष्य-नर-जन्मानें जन्मणें तेथें हें नामच एक वेळ तरी 'पी', तेथे येऊनच असावे-यावेच यावें ! ! असे त्या नामानें घेतलेले एक हृदयरंजन हें आतां पाहावे तों तें अहो ! एक वेळ तरी ह्या हृन्मंदिरामध्ये प्रस्थापून आलें असेः 'यावे यावे' अशा स्वागतानेंच जणूं ते नामाचें येणे हें आता ते हजारो जन्मच मुळीं ह्या एका नामानें तें हजारदां आता ह्या एक जन्मांतच आपले स्वसंबोधनाच जशी 'ओळगे ! ओळगे ! ' असे-' येई वो ! येई ! ' असे आपल्या मैत्रिणीसखीचें, जीवाच्या जीवलगीचें एक परम स्वागतच जणूं मनास परम उल्हास देत असून तें आतां मुखावर चमकूं लागल्यानें, ह्या हृदयाच्या ठिकाणीं परम दिव्यच एक विलसूं लागलें. तेथे ह्या जन्माची दिव्यताच जिकडे तिकडे दिव्य अशी एका प्रकाशासच प्रसवणारी होऊन, ही वेळ परम रमणीय अशी कल्याणकारणच होय : तेथे मन हें अति प्रसन्न असेच होऊन आहे-एवढेच नव्हे, तर जिकडे तिकडे कल्याणच जणूं आपलें प्रस्थापितपण करणारे असेच एक दिव्य ह्या प्रकृतीच्या प्रसन्नते-मुळें भासमान झालें तें प्रत्यक्षाच्या अनुभवाचें असेच अतिरमणीयतेची एक वेळाच साधणें होऊन, ती स्वतःसच मुळीं प्रसन्नतेमुळें धन्यवादच देत आहे : अशी ह्या नरजन्माची योग्यता ही आपल्या आपले-

पणासच येऊन ठेपली : असे परमरमणीयतेने ह्या मनासच तिनें प्रसन्नपणानें पाहिलें व ती हास्यच जणूं सर्व हास्यच ती-हंसतमुखाची अशी प्रसन्नच!!

ह्या जीवदशेने अहंतेचे नादीं लागून स्वतःचें सर्वस्वीं नुकसान करुन घेतले ह्या मायेने त्यास भलत्याच नादीं लावून हा मनुष्यजन्म म्हणजे नुसते मातेरें करण्याकरितांच आहे असे हे ह्या मायेच्या लपंडावाच्या फसवणुकीमध्येच ह्या मनुष्यानें स्वतःस फसवूनच घेतलें आहे, असे ह्या जीवदशेचे ग्राहि होणें हें काय नुसते कल्पनेचे असे नव्हेच! अहो! तेथें केवढे तरी ह्याचें विदीर्णत्व, काय ते लिहिण्याच्या आटोक्यातच मुळीं येत नाहीं, ह्या विविध तापांनीं पार ह्याचें जीवित म्हणजे नुसती आगच, नुसता भडभडा अग्निच पोटांत भरणें असे ह्यानें ह्या जीवितास पार-अहो, जीवितास म्हणजे स्वतःसच नागवून सोडलें : येथे बहिर्मुखत्व काय केवढा बरे आपला प्रभाव दाखवून आहे : ह्या ज्ञानाची गोष्टच मुळीं ह्यास आवडेना: ज्ञानाचे नाव सुद्धा कानीं पडलें तर तें नकोच असे होणारे· अशा तऱ्हेचें हें जीविताचे पार रगडलें जाणें, येथे श्रद्धा किंवा निष्ठा हे शब्द काय कोणत्या गावचे कोण जाणे-तेव्हां अशाचे पुढे हें माडणें म्हणजे महत् कठिण प्रसंग! येथे बुद्धिवादाचें कांहींच चालत नाहीं-फक्त एक गोष्ट मात्र येथे पटूं लागने, व ती म्हणजे कुल होय ज्या कुलात जन्म घेतलेला तेथीलची जी कुळस्वामी देवता तिनें आपलें ब्राह्मण्यच जन्मास आणलें-अहो! नसत जन्मास नव्हे, तर तेथे पैसच जशी काहीं कीं, ह्या ब्राम्हणासच काय तो एक सन्मान आहे-परतु त्या सन्मानाची गोष्ट जर बोलूं लागलों, तर काय निष्ठुरतेचें असेच ते बोलणे-किंवा काय पोट धरधरून हसणेच एक! अहो, काय तें हंसणें म्हणावे-तें तर जसा एकादा गडी पडला असता त्यास हातभार देऊन उभे करण्याचे तर राहिलें बाजूसच, उलट त्याच्या त्या पडण्यावरच आणखी शेला पागोटयाचे देणें म्हणजे खदखद हसणें-हंसणें कसचे-उपहासणें! तें काय बरें असे नव्हेच! काय ह्या गोष्टी समजत नाहींत? तसे ह्या जन्माचे जे एक जन्मणें म्हणजे स्वतःसच उपहासणे हेच थट्टेचे असेच बोलणे-तेथे बोलण्यास महत्त्व नाहीं-स्वतःस महत्त्व नाहीं-मी कोण हें समजत नाहीं-वडिलांच्या शब्दास मान नाहीं दौलत नाहीं-दानसन्मानादि गोष्टी तर कुणाच्या गावच्या बरे होणाऱ्या! तेव्हा अशा ह्या जन्मास काय जाणलें जाणारे तें कोण जाणे

एरवींच्या गोष्टी म्हणजे व्यर्थतेच्या सर्वथा! म्हणून हे जे श्रवण तें फार थोडें तरी पण करीत जा! ज्यायोगें ह्या प्रकृतीच्या अंगची अशी जी एक जीवन कला ती तरी निदान केव्हा तरी उफाळून वाढ घेणारी होईल अशी आशा तरी निदान करून असलेली-ती आपलें ब्राह्मण्य हे अफाटतेचें करूनच दुसऱ्यानीं वागविले जाणारें ते केव्हां तरी आपल्याजवळ येण्यास बुजणारे होणार नाहीं-त्याचे जे झालेलें बुजणे ते केव्हा तरी प्रेमास पाहील असे ह्या जीविताचे जे श्रमणे-कळवळणे हळहळणे-हे महत् कष्टतर असेच जीवित होय.

एखाद्या गोष्टीची इच्छा करावी-अनेक देवदेवतांनीं त्या गोष्टीची प्राप्ति व्हावी म्हणून विनवणेच करावे-त्याच गोष्टीची एक तळमळच मनाला लागून राहिली आहे अशी जी ह्या जीवदशेची मुद्रा, तीच सर्वांत महत्त्वाची अशी असून तेथेच, हे मना, तूं रमत ऐस, म्हणजे केव्हा तरी तुजला तेथीलच्या प्रीतीची लज्जत ही पाहाणारी होईलच!

असे तें देवतांना आठवणें हें जसें कांहीं ते दैवत, ती इच्छा व आपलें मन हे अति उताबीळ असे होऊन जात असल्यानें, तेथे ह्या जीवितास जन्म मिळाला असें एक सहृदयतेचें अंगच मिळूं लागणारे होतें-तेथें मग जी काय ह्या जीविताच्या जीवदशेची अथवा जगण्याची गोडी ही आपल्या पाहाण्यास थोड्याबहुत प्रमाणानें येऊं लागणारी होते.

तेव्हां असे तें प्रेम हें काय आपलें बल घेऊन जर आलें-आपले महत्वानें जर येऊं लागलें-तर ह्या जन्माची, ह्या जगण्याची, एक मोठी मजा आहे, एक मोठी रम्यतेची गोष्ट मनास प्रसन्न करणारी असतें -असा अनुभव हा मनुष्यास खरोखरीच्या एक खऱ्याच अशा आनंदाच्या स्थानावर उभेंच करून ठेवितो.

आणि म्हणून जर तूं, तसे त्या प्रेमाचा, तसेच त्या प्रीतीचा जर होऊन असलास, तर तेथीलच प्रेम काय अवर्णनीय असेंच होऊन असणार हें केव्हाहि : म्हणून हेंच वरचेवर एक बजावणेंच असे, तें म्हणजे ह्या प्रेमाच्या गोष्टीची वेळोवेळा आठवण तरी करीत राहा : त्या गोष्टीस विसरूं नको-तेथे असा प्रश्न पुढेच मुळीं घडूं नये कीं, ज्यायोगें तें प्रेम हें विसरणारें होईल

अहो ! कळवळा-आदर-आर्जव-आपलेपण हें पाहिजेच पाहिजे-तरच परस्पर प्रेमभावना हीच मुळीं आपणच तेथें उगवूं लागून, तेथे मग केव्हा ? अहो, केव्हा कसचे ? केव्हाहि ती जीवितकळा ही उफाड्याची होऊन सोईची अगी होणारच ! अहो, ह्या इंद्रियभाराचें सर्वथा होणें व जणूं काहीं तें इंद्रियाचें होणें हेंच स्वर्ग दाखवील असे मानणेंच बरें नाहीं परंतु तें तसे तितक्या महत्त्वाचें होऊन असतें-परंतु काय सिंह हा वनामध्यें असतां ह्या गजरूपी विषयानीं मदभारच हा का बरे घेऊन असावा? तो तसा घेऊन असणे हें केव्हाहि बरें असे नव्हेंच-म्हणून श्रवण हेंच वरचेवर करीत राहिलें, तर तें हरवलेली वस्तु सापडवून देणारें होतेंच : म्हणून असे हजार वेळा चुकणें तें आपलें सर्व चुकणें हें गोळा करून एक वेळ तरी तें आपले महत्त्वास येण्याचें करीलच करील : नेहमीं डोळ्यापुढें असून ते डोळेच मुळीं लाजलेले झाल्यानें, तें नेहमीं हरवतेंच, विसरतेंच, ऐन वेळेस हजर होतच नाहीं असे तें चुकणें, जरी हजारों वेळा त्यानें हरवल्या, व आता तरी निदान अशी एक वेळ येते कीं, त्या हजारदां आप-आपल्या चुकींना सोयीचें करून आता भाराच्या झाल्या व जिंकणेच एक त्या प्रेमास अगाच झाल्या-तेथें ही वेळ एकच का होईना पण काय महत् प्रकाराची अशी होऊन आल्यानें तेथे मागील सर्व चुका भरून निघाल्या-मागील गोष्टींना विसरून गेल्या व आता ह्या प्रेमासच एका पाहूं लागल्या व ह्या जन्माचें एक कृतकृत्यपणच जसे आंत डोकावीत जणूं आहे असे तें प्रेमच एक असे झालें : तेथे मागील गोष्टींची आठवणच मुळीं पारची पार बुजली, व एक हें प्रेमच तेथे पुढें होऊन बोलूं लागले-तें ओठावरच अगदीं बोल उमटण्याचे अगोदरच जसे तेथे हजरच होऊन आहे असे ओठाचें सर्वथा होऊन आलें : व आता बोलणे हेंच ह्या जीवदशेच्या प्रेमाचें सर्वस्वीं असेच सर्वच्या सर्व कामकाजांनीं पाहून त्याना आनंदच होऊं लागला ! गाणेच एक प्रेमळतेचें हृदय घेऊन आले असे तें बोलणें प्रेमच एक !! (२०६)

असा जो मी, अगदीं ओठावरच टेकून असलेला-अगदीं ओठावरच आलें, परंतु बोललें नाहीं असे तें जे उत्कंठितपण, तेंच येथे आपल्या वेळेचें होऊन आहे.

तो मी कदाचित् वैकुंठींहि नसणारा होऊन असतो-सूर्यबिंबाचे ठिकाणींहि एकादे वेळेस नच दिसणारा-जेथें भानच नाहीं, आपल्या भानावरच तो नाहीं असे जे, तेथेंहि पण एकादे वेळेस तें नाम नच भेटणारें-व याहिपेक्षा महत्त्वाची जी जागा ती म्हणजे योग्याची-जेथे नाम हें म्हणजे कधींहि नच विसंबलें जाणारें, किंवा ती म्हणजे ह्या योगाची श्रीच जशी अशी ती नामघोषणा हीहि पण त्या योग्याचे ठिकाणीं असलेली, तेथूनहि पण मुरडून टाकिली गेली अशीहि होऊन असते-हरवलेली होते-सांडिली जाते (२०७)

परंतु असे ते हरवलेले हें कोठें सापडणारें होतें असें विचारशील, तर जेथे माझा नामघोषच आपल्या महत्त्वानें आहे-बरवेपणानें असलेलें हें नाम हें घोषाचें होऊन आहे-तेथें घोषणा ही व्यवहारास आली, व्यावहारिक झाली, प्रकारास आली, आपल्या प्रामाण्याची झाली : या कारणामुळे जेथे ती मुद्रा ही मान्यतेची होऊन आपलें महत्त्वच पाहात आहे-व्यवहारिली जात आहे-तेथे मात्र मी अगदीं निःसंशय

सापडतोच सांपडतों, तेथे नामाचे पाठ हेच सामुदायिकतेच्या अशा घोषानेंच होत असलेले, तेथे मात्र मी (जरी हरवलेला असलों तरी) अगदीं असणाराच असणारा, सांपडणारा असाच असतो. (२०८)

चित्तानें कासच घातली–तेथें भाव किंवा भक्ति ही एकमेकात मिळून गेली व प्रेमच प्रसवली–प्रेमास आली, प्रीतीची झाली–व आता काय तेथे काळवेळ ही पण सर्व काळ एकच त्या प्रीतीचा झाल्यानें तेथे (कर्मच्छेदाने काय देशदोषांचे नव्हेच) दोषदेशाचे असे प्रश्न करणेच नाहीं–तेथे नाम हेच वंद्य झालें–देशदोषानें निंदिलेले असे शास्त्राचे तें ह्या नामाने वंद्य असे होऊन आले व आपणच एक सुख असे आपणासीच आपण पाहूं लागल्याने, तेथे चित्तावें आसन हें काय कीर्तनामध्येच गुग झाल्यानें तेथे त्यात बुडून जाणेंच ! त्यात रमून गेले–आनंदले–रगले–बुडले–प्रसन्नतेस आले व नाचं लागले तेथे आपणच सर्व विश्व होऊन आपल्या सुखासच आलें असे (२०९)

उच्चार हा तेथे रामकृष्णादिकांचा घोषच करून आहे–काय कृष्ण, काय विष्णु. काय हरि, काय गोविंद अशा नामाचे ओतलेले पाठच संबंधतेच्या पाठाचे झाले–छंदास आले–त्या त्या नामाचा छंदच आपलें स्वच्छ असे असणे त्या चित्तासच उचलून घेऊन तेथीलच्या छदात मुरून गेला : तेथे ह्या जीवदशेच्या प्रेमाची जी लहर तीच मुळीं आटविली जाणारी ह्या भवानें, तीच आता आपल्या भाराची होऊन आली आपल्या स्वतःसच ती आत्मकला ही पाहूं लागल्यानें, तिने आता आटणेच मुळीं जें झालेलें तें सर्वच्या सर्व वरती येऊं लागून–लावून–तेंच एक विशदतेचे असे स्पष्टपणाचे जे महत्त्व त्यासच त आत्मरूप पाहूं लागल्याने, तेंच एक बोलणे हें अनेक तऱ्हांनीं त्या एका आत्मरूपाचे असेच होऊन आलें: तेथील गायन हेंच गोडी घेऊन त्या चितातच बसलें व तें सर्व आता आपल्या विश्वासाचे झाल्यानं भूतमात्राना परम आनद होऊं लागला व त्यांनीं आपले हृद्‌गत हेच सागण्याचे केले–तेथं ह्या देहबुद्धीचे जे अंग तेंच त्यांनीं विशेषेकरून नटविले : भूताना काय शिखाहि नाहीं व सूत्रहि पण ! असे तें भूताचे तें त्यांनीं स्पष्ट करून त्याना एक तऱ्हेचे विटंबणेच दिले कीं, ह्या देहामधील जी प्राणकला तीच मुळीं पुढे होऊन चालणारी असल्यानें, तेथें का बरे ह्या पंचभूताचे आपलें सामावून असणें नाहीं, प्राणाचे नाहीं, प्रेमाचें नाहीं, जीवचैतन्याचे नाहीं, प्रकाशाचे नाहीं, असेच एक विचारणे तेंच चालणारे असेच होऊन, तेथे जीवनकला हीच महत्त्व घेऊन आल्याने, तेथे नाम हेच पुढे झाले व आता तेंच एक स्पष्टतेच्या तऱ्हानीं दाखवूनच दिले–चित्ताचे प्रकाशनच झाले–आनंदास आले–सर्व काळ तेंच एक गायन जिकडे तिकडे होऊन आहे (२१०)

असो याप्रमाणें त्यानीं चित्त हेच पक्के करून त्यावरच ते आरूढ झाले–आसनच तें–तेंच त्यानीं पक्के करून त्यावरच ते उभे झाले असे माझे कीर्तन करीत करीत एकानीं तर तेंच एक पतकरून असणे हे चराचरामध्येहि विचरण्याचे केले : त्यांनीं आता विचरणे करून ही जी सृष्टि हींतच त्यानीं तें आसन प्रस्थापित केलें. तेथे चर म्हणजे अचल किंवा स्थिर म्हणजे स्थावर ह्या सृष्टींनाहि आपलेसे केलेले असे ते, पंडुकुमार अर्जुना, कीर्तन करीत करीतच विचरत असतात. (२११)

तसेच, दुसरे कोणी, हे अर्जुना, हें जे कांहीं ज्ञान तेंच जतन कसे बरे होईल अशीच एक मान्यता घेऊन त्यांनीं ह्या मनासच पंचप्राण आत्म्याने आकळून घेऊन तेच एक आपले शेजारी असेच त्यांना मोठे महत्त्वाचे करून तेथे प्राणापेक्षाहि–प्राणापलीकडेहि–ह्या चित्ताच्या आसनासच स्थिर करून तें तसेच जतनेचें व्हावे असाच एक पाढाच दिला–धडाच देऊन ठेविला–कीं ह्या मनासच आकळणे हें ह्या पंचप्राणांनीं करून तेथे चित्ताचें आसन हें जतन व्हावेंच व्हावे; व असें एक सहज संवयीचे असेंच त्यांनीं तें करून तेथे जसा कांहीं शेजारधर्मच पढविला–पाढाऊ झाला–पढविला गेला–पाठ देऊन ठेविला–मनाच्या ओढीचा केला–प्रेमाचा केला. (२१२)

बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंतु वज्रासनाची पौळी
दाटिली । वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाहातीं यंत्रें ॥ २१३ ॥
तेथें उल्हाटशक्तीचेनि उजेडें । मनपवनाचेनि सुरवाडें ।
सतरावियेचें पाणियाडें । बळकाविलें ॥ २१४ ॥
तेव्हां प्रत्याहारें ख्याति केली । विकारांची संपली बोहली ।
इंद्रियें बांधोनि आणिलीं । हृदयाआंतु ॥ २१५ ॥
मग धारणावारू दाटिले । पंचभूतातें एकवटिलें ।
चतुरंग सैन्य निवटिलें । संकल्पाचें ॥ २१६ ॥
तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचें निशाण वाजत ।
दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ॥ २१७ ॥
पाठीं समाधिश्रियेच्या अशेखा । आत्मानुभव राज्यसुखा ।
पट्टाभिषेको देखा । समरसें जाला ॥ २१८ ॥
ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन ।
आतां ऐक सांगो आन । जे करिती येक ॥ २१९ ॥

(२१३) काटी=कुपण वज्रासन=मूळबंध पौळी=कोट. दाटिली - पन्नासिली=श्रृंगारिली, तयार केली वाहातीं यंत्रें=प्राणायामरूपी योगक्रियेमध्ये होणारे आवाज, कडाकड नाद (२१४) उल्हाट शक्तीचेनि उजेडे - उजिवडे=कुंडलिनीच्या प्रकाशाने. सुरवाडे = साहाय्यानें सतरावियेचे पाणियाडे बळकाविले – बळावले=सतराव्या कलेचे चंद्रामृताचे तळे स्वाधीन करतात. (२१५) प्रत्याहार = इंद्रियाची अन्तर्मुखता. सपली – सपिली बोहली – बोहेरिली=बोली (२१६) धारणावारू=धारणारूप घोडेस्वार एकवटिले – एकवाटिले. चतुरंग=मन, बुद्धि, चित्त, अहंकार (२१७) जैत रे जैत=जिंकले रे जिंकले वाजत – फडकत (२१८) पाठीं – पाटीं=सिंहासनावर पट्टाभिषेको – पट्टाभिषेक.

त्यानीं बहिर्मुख होणेंच नाहीं-योगाचीं सर्व अंग हीच त्यानीं आपलीशीं केलेलीं-योगाचे सर्वथैव झालेले असे ह्या देहाचे नियमन ! आतमध्ये पाहावे तों वज्रासनच ठोकून ते बसले-ह्या आसनामुळे त्याना जठराग्नि म्हणा किंवा काय योगाग्नि म्हणा हाच जसा तेथीलची जी पौळी म्हणजे सर्व आवारच हे खाणेपिणे इत्यादि ज्या क्रिया त्यानाच आपले स्वाधीन करून ठेविले-व ह्या अशा आसनावर प्राणायामाचा जोरच चढवून हीं जीं देहयंत्रे हींच आवरून धरिलीं (२१३)

आता तेथे ज्या काहीं उसळ्या होणाऱ्या, उलटणें हे होणारे, तेथें उजेड अपरिमितच ! ती शक्तिच एक ! अशी तेजाची प्रखर तेजस्वी-तेजवान लखलखित स्वच्छ दिव्य प्रकाशच-मन पवन हेच आता एका भीमतेचे असे झाल्यानें तेथे सतरावी जी जीवनकळा तेथीलचें जें चंद्राचे तळे-जेथे अमृतच निखळ तेच त्यानीं आपलेसें केलें.

श्रीहाट हा संपन्नतेची निष्पत्ति पाहाणारा, गोल्हाट हा इंद्रियांचे जे मध्यबिंदू त्यानाच आपल्या शक्तीनें दाबून धरणारा व स्थिर करणारा व उल्हाट हा पुन्हा त्या दाबण्याने जें उलटणे ह्या इंद्रियाचे तेच वज्रासनाने आपल्या ताब्यात ठेवलेले असे (२१४)

आतां पाहावों तों अनेक ज्या वासना त्या जशा काहीं एकमेकींना चढ होणाऱ्या अथवा अडविणाऱ्या अशा असल्याने तेथें प्रत्याहार हाच एक विशेषशा-अशा महत्त्वाचा होऊन त्यानें ह्या विषयत्यागाबद्दल एक सीमाच करून आपली महतीच गाजविण्यार्थं केले-तेथें इंद्रियांचे समूहभार हेच लोप घेऊं लागले-लोपाचे झाले-विकारानीं जे काहीं पशुतुल्य होणें हेच ह्या मनुष्यप्राण्यास नेहमीं अडविणारे असे

विकारवशतेचें जें प्रमाण तें आतां संपलें-तेथें इंद्रियविकारांचें नांवच नाहीं-बहिर्मुखत्व अथवा नुसत्या जड बुद्धीचें असें देहाचें ते विकारलें जाणें-ह्या देहदृष्टीनें विषयविकारासच पाहूं देणें-हे आतां पार नाहींसें झालें [तेथें विकाराचें नुसतें असे होणें नाहीं : तेथें नामानेच तें व्यवस्थिततेचें असे करून आता तीं इंद्रिये हींच बाधलीं गेलीं व हृदयाकडूनच मुळीं त्यांना मोकळीकेचें होणें हें बंद झालें-हृदयाचे सर्वथा असेच तें होऊन आलें-करून ठेविलें. (२१५)

असे जे हृदयाचें सर्वथैव आधीन असे त्यास धारणा किंवा प्राणधारणा म्हणतात तेथं चरण हाच त्या उड्डाण चक्रासच आकळून असणारा असून योगधारणा हीच तेथे आता योगाची झाली अशी ती धारणा ही पंचप्राणांनीं जेव्हा आकळलेली, तेव्हा पंचमहाभूते हीं एकवट होऊन आलीं व त्यानीं आता ह्या संकल्याचे जे चतुरंग सैन्य तेंच नाहींसे केलें. (२१६)

असे तें संकल्पाचे निवटणे झालें म्हणजे 'जिंकले हे जिंकलें' असेच तें ध्यान हें सिद्ध झालें असे होऊन, तेथे स्वरूपतन्मयता हीच एकसारखी झाल्याने, तेथें समाधीच जणूं एकसारखी होऊन असणारी तेथें ध्यान हेच आपल्या स्वरूपतन्मयास आल्यानें आता एक छत्र म्हणजे एकमेव स्वरूपाचें निखळ असे 'तन्मय'. (२१७)

आत्मानुभव हाच सर्वच्या सर्व-समाधीश्री हीच सुखास येऊन राज्य करूं लागली-नांदू लागली : आपलेंच तत्रतेचें 'स्व' असे तिचें देवच होऊन असणें हें जसे कांहीं प्रकृतिलयामुळे अभिषेकच होऊन, तेथें श्रीगुरुच एकटे असे कांहीं आपल्या समरसतेमुळे शिष्य-गुरु गुरु-शिष्य असे दोन न होतां, तेथे पट्ट म्हणजे मुख्य असेच एक अनेक सहस्रामधून निवडले जाणारे असे शिष्याचें रूप म्हणा पट्टतेचे म्हणजे राज्यसुख भोगण्यास जी योग्यता तिचें झाल्याने, आता श्रीगुरुच तेथे आपल्या सामर्थ्यानें-ज्ञानानें, वैभवानें-झळकणारे असे : असे हे गहनतेचें, हे अर्जुना, माझे भजन आहे. आता यावर दुसरे कोणी जसे ते करितात तें सांगतों ऐक. (२१८,२१९)

**तरी दोन्ही पालववेरी । जैसा तंतु येक अंबरीं ।**
**तैसा मीवांचूनि चराचरीं । जाणती ना ॥ २२० ॥**
**आदि ब्रह्मा करूनि । शेवटीं मशक वरूनि ।**
**माझीं समस्त हें जाणूनि । स्वरूप माझें ॥ २२१ ॥**
**मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नोळखती ।**
**देखिली वस्तु उजू लोटती । मीचि म्हणोनि ॥ २२२ ॥**
**आपलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।**
**येकसरें व्यक्तीमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥ २२३ ॥**
**जैसें उंचीं उदक पडियेलें । तें तळवटवरी येऊं गेलें ।**
**तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा सद्भाव जयांचा ॥ २२४ ॥**
**कां फळतया तरूच्या शाखा । सहजें भूमी उतरती देखा ।**
**तैसें जीवमात्रें अशेखां । खालवती ते ॥ २२५ ॥**
**अखंड अगर्वता होऊनि असती । तयांसी विनय हेचि संपत्ति ।**
**जय जय मंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥ २२६ ॥**
**नमितां मानाभिमान गळाले । म्हणोनि अवचितें मीचि जाले ।**
**ऐसें निरंतर मिसळले । उपासिती गा ॥ २२७ ॥**

**अर्जुना हे गुरूची भक्ति । सांगितली तुजप्रति ।**
**आतां ज्ञानयज्ञें यजिती । ते भक्ति आईका ॥ २२८ ॥**

(२२०) पालववेरी=पदरापर्यंत अवरीं=वस्त्रात (२२१) आदि ब्रह्मा धरूनी = ब्रह्मदेवापासून चिलटापर्यंत. (२२२) वाड धाकुटे = वडील धाकटा. नोळखती - नेणती. देखिली - देखिलिये॰ उजू = सरळ. लोटती-लुटिती-लुटतीं = लोटांगण घालतात. (२२३) नेणवे - न मनवे. व्यक्तिमात्राचेनि नावें = भूतमात्राला (२२४) उंचीं - उंचीहूनि. येऊं गेलें - ये उगले, येऊं लागले. (२२५) फळतया - फळतिया भूनी उतरती - भूमीसी उतरे. जीवमात्रे - जीवमात्रा अशेखा - अशेषा खालवती - खाला-वती = नम्र होतात (२२६) तयात - तयाची (२२७) मानाभिमान - मानापमान अवचिते - अवचिता. निरतर मिसळले=मजशीं तन्मय होऊन. (२२८) गुरूची-गुरुवी= श्रेष्ठपणाची. भक्ति आईका - भक्त आईके

येथे एक विचित्र गोष्ट ही पुढे झाली व ती म्हणजे ह्या ध्यानासंबंधीं होय. येथे जरी अनेक तऱ्हेच्या व्युत्पत्ति पुढे झालेल्या, तरी 'व्यापकत्व'-' दुजेन मिसे ' असे ज वरचेवर डवचणारे बुद्धीचे रण हे ह्याबाबत आणखी कांहीं बोलावे असेच म्हणते-वर दिलेले जे त अति शुद्ध अशा स्वरूपाचे असून त्याजवर कांहीं दुसरे आणखी बोलण्यासारखे जरी नाहीं, तरी पण येथे ते बोलावेसे वाटतेच

त म्हणजे उपमाकोटींनीं पाहविले जात असल्याने, येथे त अप्रासगिक असे होणारे नव्हेच, आणि म्हणूनच त्याजविषयीं जरासे बोलं

तेथे विनंति कीं, नुसतीं कोरडीं उत्तरे देऊन ह्या वैखरीचा नुसता गौरवच केला असे नको-कोरडे उत्तर देऊन-जेथे प्रेमरसाची ओल नाहीं तेथील बोलणे हें कोरडेच तर काय-म्हणून असल्या ह्या प्रेमाशिवाय असणाऱ्या उत्तरांनीं तें बोलणे केलेले असावे असे कोणासहि आवडणारे नाहीं प्रेम हच एक भाग्यसीमाच पाहाणारे असल्यानें, तेथे भक्तिभाग्य हें प्रेमाचे जोडण्यान उरवणारे असेच-म्हणून तेथे त्या ध्यानाबाबत त्यानीं बोलणें करूं आदरिले कीं, आपल्या डोक्यावर घागर व कळशी याची जोडी घेऊन-डोक्यावर घागर व कळशी अशी जोड भरलेली आहे-तेथे ती गुजरी कसल्या ध्यानामध्ये बरे गर्क ! ! तिचें सर्व लक्ष त्या जोडीवर असून तेथे तिने यत्किंचितहि दुर्लक्ष करणे हे नाहीं-व असे ते ध्यानच तर काय साधल्याने तिचा बाकीचा देह अगदीं मोकळा असाच-मोकळेपणान वागविला जाणारा असा-मोकळेपण हे बाकीच्या देहास वागण्यास दिलेले तें कसे बरे याचा अंदाज म्हणजे स्वतःच त करून पाहाणे होय-किंवा स्वतःच तेथे असणे जर केले, तर तेथीलची नड ही किती लक्ष्याची त लक्षात येऊ शकत : असे ह ध्यानाचे एक उदाहरण हे फारच विचार करण्यासारखे आहे : : सर्व लक्ष त्या जोडीवर राहिल्यान तेथे तन्मयता हीच साधली गेली-दिवा लावल्यावर त्या काडीने जी वात लाविली, तेथेहि पण असाच एक ध्यानाचा प्रकार हा म्हणजे त्या काडीने बोटच मुळीं भाजूं लागले तरी पत्ताच नाहीं-असे त्या गोपीचे प्रेम हे खरोखरीच अवर्णनीयच !

एकदा काशी क्षेत्रामध्ये फारच बोलबाला अथवा वाहवा ह्या संत कबीर ह्याची झाली व त्याच्या भक्तिसौरसाचें जो तो वर्णन करूं लागला कीं, काय अहो त्याचे प्रेम सागावे, त म्हणजे लोकोत्तर असेच होऊन आहे. यावर संत कबीरानीं रागावूनच बोलणे केले कीं, अहो, कबीर कबीर काय करीत आहात ? ह्या कबीराचें प्रेम म्हणजे कांहींच नाहीं. अहो, यमुनातीरावर जाऊन पाहा ! काय त्या गोपींचें प्रेम सागावे ! तेथे एकएका गोपीचे प्रेम पाहिले, तर त्यामध्ये असे कोटच्या कोट कबीर वाहून जाणारे असे ! तेव्हां त्या गोपींच्या प्रेमाची नवलाई हीच खरे पाहिले असता अवर्णनीय अशी आहे असे ते ह्या मोकळेपणाने चालणाऱ्या गुजरींचें डोक्यावर घागर व कळशी ही जोडीने असलेली, तेथे ध्यान

हें केवढे बरें आरोग्यतेचें असें, निरोगी असें, शुद्ध असें-तसें ध्यान हें ईशचरणीं असावें, तेथें सगुण स्वरूप हें क्षणभरहि नच विसरणारें

एकादा गरीब मनुष्य जेवणाच्या आमंत्रणाची इच्छा धरुन आहे, तेथे त्यास जेवणाबद्दल जे आमंत्रण येणारे त्याचीच तो एकसारखी आसच घेऊन आहे-वाट पाहूनच आहे : तेथें त्याचें तें दुर्बळपण अथवा गरिबीचें जिणें हे जसें काहीं सर्वच्या सर्व तेथे त्या आमंत्रणातच गढून गेले-आमत्रणासच पाहूं लागलें-एक ओढाच मनास लागलेला कीं, त्याचे तें गरिबीचें जिणे हें काय कोणीं आठवण करणारें-त्याच्या दुर्बलतेस आठवणारें असे आहे नाहीचे-तसे त्या मनाने एकसारखी इच्छाच करुन असणें त्या जेवणाच्या निमंत्रणाची-तेथें जसे त्याचे मन हें जसे काहीं निरासाचें असे आसच घेऊन आहे तेथे त्यानें ती इच्छा ही सर्वतोपरी काय आर्जवाची, काय प्रेमाची, काय सौजन्याची, अथवा मी काय गरीब-मजवर केवढे उपकार झाले-तेथें महत् उपकारच जसे केले अगा एका आपल्या दुर्बळपणाच्या दुबळानें मुजनतेचे होंणे हें जसे

काय येथे ह्या धनलोभी मनुष्याचा दृष्टांत घ्यावा किंवा नाहीं हें कांहीं समजत नाहीं : तेथें आपणांस बाकीच्या गोष्टींसबधीं नच विचार करणे असून येथे एक त्याची जी वृत्ति एवढीच पाहाणें आहे तेथें व्याजाने दिलेली रक्कम ही तर मुळींच पुढे नच घेतलेली, परतु तें व्याज मात्र काय अगदीं जीव कीं प्राण समजून त्या व्याजामधील पै पै ही बोटावर मोजून घेऊन पोगीत असणें : तेथें इतक्या दिवसाचें इतके व्याज, अर्ध्या पाव दिवसाचें सुद्धा तें दिवसाचे तसे महिन्याचें करून, तेथें सर्वच्या सर्व जीव हाच लावून आहे-असे ते त्याचे पै पैचे पाहाणे हे मोठीच आस घेऊन असणारें : तेथील जे काहीं एका पैबद्दलहि व्याजमहत्त्वानें असणें हें त्यानें दिवसाचे केले, महिन्याचे केले-बोटेच मोजून तेथील अमुक एक दिवस-अमुक एक व्याज असे तेथेच त्यानें ते रगून असणें-त्यास दुसरे तिसरे काहींच न सुचणारें असें तें केवढया तरी ह्या ध्यानाबद्दल एका एका कळातराची आसच धरुन आहे-मोठयाहूनहि मोठी आस धरुन आहे असे ते ध्यान-काय येथे तेथीलचा गुण हा कसा पाहावा बरें ? ते जसे एका उपमेने असेच म्हणणारें कीं, येथे हे देवा श्रीहरि, मजला दुसरी कोणतीहि व्यथा नकोच नको

ही वैखरी भक्तिभाग्यसीमा पाहून असावी-तेथें प्रेम हें जोडलेलें असावे. कोरडें उत्तर हे न द्यावे व नसल्याच गौरवानें ही वैखरी गौरवू नये : येथे प्रेम हे जोडून घ्यावेच, तरच तेथें भक्ति ही भाग्य पाहणारी सीमाच एक !

येथे ह्या परम अर्थाच्या गोष्टी (ह्या व्यवहारास) काय विचित्रच अगा तऱ्हा घेऊन आहेत पाहा !!

दुसरीकडे वरील तऱ्हा ही पाहा कशा निराळयाच रीतीनें बोलिली आहे तेथीलचें म्हणणे म्हणजे टोलें साहून सारच तेथे उरावें आणि मगच खऱ्या मोलानें अंगीकार होणारा.

भोगाचा साभाळ परिपूर्णतेचा करणें, भोगभाराचा करणें, रमविणारा करणें, करमणे, करमणारा करणें-भोगाचा सांभाळ करण्याकडेच हें कलेवर द्यावे-तेथे संचित कर्माचे थरारणें हे मोडून टाकावें महत्त्व पावून असण्याने जेथें महत्वाचे होऊन असणें हें म्हणजे जसे देहबुद्धीसच पाहा म्हणणारें, तेथे अप्रतिष्ठा हीच पावबून असावे-अप्रतिष्ठेसच भोगावे-जेथें म्हणून महत्त्व हें द्यावयाचें असतें तेथें दुसऱ्याचे लक्षच जाऊ देऊं नये ह्या पंचमहाभूतांचा केलेला हा देह ह्यावर केव्हांच विसंबूं नये तेथे आळस अथवा देह हा नेहमीं वागवावा-देहाचें वागवणें हेंच पुढें करून-महत्व जें तेथील त्याचें होऊन ह्या देहासंबंधींचें जें जडत्व त्यास विटवावेंच ह्या इंद्रियांचें जें ओझें त्यास मुळींच महत्त्व देऊं नये. मग तुला तेथे कसचा बरें ससार (ह्या इंद्रियांचा) ? तेथे जें आदरणीय आहे त्याचा तूं होऊन ऐस-ज्याचा आदर होतो तेच तं होऊन राहा. (नागिवंतासाठीं कां रे बाबा देवासवें तुटी पाडून आहेस ?)

महिमा हा जो ह्या संतांना पाहाणारा तेथें शाद्बिकांचें काम नाहीं. दुपाड जरी म्हैस गाय झाली, तरी कामधेनूची तिला सरी म्हणजे बरोबरी येणें नाहीं म्हणून तेथे तेंच संताच्या महिम्याचें आपण व्हावें, तरच तेथील महिमान हें कळणारें

तसेच येथें ह्या संतानीं काय म्हणूं केलेले कीं, आम्ही राजे त्रैलोक्याचे परी, नाहीं कोणाचें उणें पुरें : अहो, ज्याच्या घरीं ऋद्धिसिद्धी ह्या दासी आहेत-घरीं कामधेनु ही आहे-त्याचे घरीं पाहावे तो भाकरीसुद्धा (भक्षावया) नाहीं नेहमीं लोड, तक्के, पलग, उशा, गाद्या ह्या असणाऱ्या-त्यास पाहावे तो नेसण्यास लंगोटीहि नाहीं पाहावे तो ह्या संताना नेहमीं वैकुठींचा वास असणारा-नेहमीं वैकुठीं वास्तव्य असणाऱ्या ह्या संताना (पाहावे तों) राहण्यास कोठेंच ठाव हा नाहीं-असे हें बोलणें कसें बरें तोलावे !

भूताचें सतर्पण केले-अवघी भूमी (देहभूमिका) ही दान दिली दिनरात्र शुद्धि घेऊन हा काळ आहे-पर्वकाळ विधि सर्वच्या सर्व साधून घेतला आहे-सर्व तीर्थें, व्रतें, याग हे केले-कर्म हे यथा सागतेचें झालें आहे. तेव्हा आता बोलणें हे ' अ ' म्हणजे ' नच ' बोलणे झाले, व कायेनें, वाचेनें, मनानें मी उरलोच मुळीं नाहीं.

देहदेहसंबधे निंदावीं-मीमाझ्याचा झाडा झाला-स्वदेह, गृहवित्त यास विटावेच इतर जे श्वापद व झाडे आहेत त्याना भेटावे मी माझें असे ह्या वाचेस येऊच नये असे वागणारे ते फक्त साधुजनच.

अशीं हीं बोलणीं कशीं बरें अजमावून घ्यावींत ते पाहावे तरच बरे.

तरी दोन्ही बाजूंच्या पदराना वस्त्राचा एकच तनू करून असतो-तसा मीच एक चराचरीं आहे असेच ते जाणून असतात. वस्त्रामध्यें एकच तनू जसा दोन्ही पदराना धरुन असतो-तसे मी वाचून ह्या चराचरामध्ये काहींच नाहीं

बाहुलीचें सूत्र ( तंतू ) सूत्रधाराचे आधीन : पक्ष्यामधील जीवन हें सूत्रच जणूं

जीवनलहर ही त्यातील जीवितसूत्राने परिणमविली जाणारी-परिणाम करणारी-अजमाविली जाणारी-हालचाल करणारी-बाहुलीच्या दोन्ही बाजू घेतल्या तरी जसे एकच सूत्र तेथे सत्ता करणारे व तें म्हणजे सूत्रधार हालवील त्याप्रमाणे होणारे. वस्त्र हें जरी १६-१२ हाती असले, तरी तेथें तंतू हा ( एकच तंतू) दोन्ही पदरामध्ये एकच जसा-दोन्ही पदराना व्यापून असणारा जसा एकच तंतू असतो-तेथीलचें ठाणपण झेपणारा असतो, तेथीलचे भरीवपण, भरदारपण हें करून असतो, दाटपण हें होऊन असतो-तसे येथें सूत्र हे ह्या जीवितावर सत्ता करणारे असते. चराचर भूतसृष्टीमध्ये भूताना पचप्राणानीं आत्म्याचे केलेले, तेथे ते आत्मसूत्र हें सर्वच्या सर्व व्यापून असणारें असेच असून, तेथे ते एकत्वच घेऊन असलेले-तसे तेथे ते सूत्र मीच आहे हें ज्यानीं जाणितले-तशा त्या मलाच ते जाणून असतात. तेथें भाडेच जसे ध्वनिनादास आलेले, तेथीलचा नाद धरून जेव्हा ते अक्षरसूत्राचें होणारे, तेव्हां कसे बरे त्या सूत्राचें चालणें, वल्हवणें इ. (२२०)

' शूर, धीर, उदार, स्वामीकार्जी सादर '-हें काय बोलणें तरी : तेथें तुम्ही आपलें नांवच जाणत नाहीं-तुमचें नांवच तुम्हांस ठाऊक नाहीं; परंतु आम्हीच तेथचें तें प्रेमसुख हें जाणतों. परिमळसुवास हा कुमुदिनीस नच येणारा, तेथे भ्रमर हाच सुख भोगणारा. ज्याची जी जोड ती त्याच्चे कामास येत नाहीं हें नीट समजून घे. मातेनें तृण खावें व बाळास गोडी ही दुधाची लागते. शिंपल्याच्या पोटीं मोत्यें जन्मलीं, परंतु त्या मोत्यांची व शिंपीची भेटीच नाहीं.' नाहीं त्यासी भेटी भोगतियें.'

असा तेथीलच्या सूत्राचा एक विचित्रपणा हा काय जन्मानें जन्मली जी जोडी ती काय त्याचे (माझे) कामासच येत नाहीं, असे जे सूत्राचे लक्षण ते समजून घे.

आदिब्रह्मापासून मशकपावेतों हें सूत्राचे जसे तसे-ततूचें जसे तसे-अक्षराचे किंवा नामाचे हे स्वरूप माझें कसे आहे तें ते मजलाच जाणून असतात-सूत्ररूपच मी किंवा तनूप्रमाणेच माझे स्वरूप आहे हे ते जाणून असतात. (२२१)

तें जें सूत्रमात्र तें माझेच होय असे जाणून ते वावरतात ते मग धाकटे अथवा नच काहीं तेथें असणारे-जीविल्वास आणून जीवित पाहाणारे-असे म्हणतच नाहींत. ते सजीव ( अथवा साजीव ) निर्जीव, अमुक एक साजीव आहे, सजीव आहे व दुसरे एक निर्जीव आहे असे ते म्हणतच नाहींत-असे ते ओळखतच मुळीं नाहींत जी वस्तु ते पाहातात किंवा जी वस्तु त्याच्या दिसण्यात आली तिजला ते उजविण्याचे करून पाहातात तेथे जसे काहीं त माझे स्वरूप त्यानीं उजविण्यात आणिले व तं मी जे तेथेच ते बोलून चालून असतात जे काहीं नको आहे किंवा प्रकृतिमंताचे जसे एक देहबुद्धी तेथचे त्यानीं त्यांचें देहबुद्धीचे होणे हेंच बाजूस करुन त जं माझे सूत्र तेच त्यानीं पाहू केले-उजूच करुन घेतले-वस्तु उजवून पाहिली : तेथे काय जे आपटणे म्हणा अथवा लोटणें म्हणा, अथवा नको असणाऱ्या ज्या बाजू त्या त्यानीं काढन टाकिल्या व एका शुद्ध अशाच माझ्या स्वरूपावर ते उभे राहिले-तेथेंच रमूं लागले-तेंच मी असेच त्यानीं करून घेतले-अगलोटच त्यानीं उजवून घेतला-तेथे नमन हेच करवून घेतलें (२२२)

आपले उत्तमपण हे नच आठवता असणे-जेव्हां का व्यक्तिमात्राशीं गाठ पडते तेव्हा-तेथे म्हणजे एक नमणेच उत्तमत्व, योग्य, अयोग्य, व्यक्तित्व असे 'व्यक्तिमात्र' जेव्हा होणारे, तेव्हा तेथे नमूनच असणें हें ह्या उजू लोट म्हटलेल्याना 'मीच' करून जसे काय अंग मिळवून घेणे अथवा त्यास जोडून घेणें हें होतें : तसे येथे म्हणण्यासारखे महत्त्वाचे असे बोलणे पाहा तरी कसे : आवर्डाचे असे हे जीवित ह्या सर्वांना म्हणजे उत्तमाना, योग्याना, अयोग्याना व्यक्तिमात्राना जेव्हा येतें, तेव्हा कमें ते नमः अथवा नमन घेऊन असतें तें त्यांनीं अति स्पष्ट करून सांगितले-व्यक्तित्व हेच जेव्हा व्यक्ति-मात्र (एकले, एकटे), तेव्हा तेथें नमूं केले असेच ते जे तेच माझे रूप होय : मीच तो होय. (२२३)

उंच जागेवरून जर पाणी पडलें, तर तें तळाच्याहि तळीं पोहोचतें-येतें, येऊन असतें, तसे महत्त्व हे जगी मोठ्याहूनहि मोठे असे होऊन असलें, तरी भूतजात जें जे म्हणून देखीं आलें, पाहाणें झालें, तेथे ह्या महत्त्वानें-सद्भाव हाच ज्याचा महत्त्वानें असलेला भाव-तेथे तो सत्-भाव हाच त्याचा तो सत् स्वरूपीं भाव हाच भूतजाताना नमन हेंच देऊन असतो-सहजपणे ह्या भूतजाताना-प्राणीमात्राना-तो नमन हेंच देऊन असतो.

एवढ्यावरून असे कोणी म्हणेल कीं, मग काय हें तर फारच उत्तम झालें : तेथे जर लहानमोठे, उच्चनीच असा भेदच नाहीं-परंतु ते तसे नव्हे, कारण येथील जो सत् समागम, सत्-मार्ग, सत् तत्त्व, सत्-वस्तु ही अबोली घेऊन असल्यानें तेथे मुग्धता हीच परिणमलेली अशीच असते : तेथे 'सत्' हें 'सत्' मध्ये घेऊच नये, कारण जेव्हां का तें तसे बोलले जातें, तेव्हा तें 'अहो ! मी असूनसुद्धा मी आहे आणि तरी सुद्धां असे मोठ्यादा बोलणे होणारें जर झालें, तर तेथीलचा तो 'सत्' प्रभाव हाच मोडूं लागून नुसता 'सत्' मध्ये जाऊन पडतो : : 'सत्' म्हणजे 'असूनसुद्धां' तेथे ते रूप उगवत नाहीं असे म्हणणारे होतें. म्हणून तेथे भान हाच एक आपला प्रभाव दाखविणारा असा विलक्षणतेचा असा (बाह्यभाव) तो कदाचित्च, त्या आपल्या योग्य योग्य अशा महतीचा : म्हणून हें जे कांहीं व्यवस्थितपण हेंच तेथें देऊन असणे हें एक मौन्यच जसें परिणमलें असें सौजन्याचे अंग होय.

सत् सत् : तत् तत् : म्हणून 'सत्' हें 'तत्' नेंच दर्शविलें जाणारें-एरव्हीं या 'सत्' ला महत्त्व तें कसें अस्तित्वाचें फक्त ? 'भूतानामीश्वरोऽपि सन्' ह्या भूताचा (मतप्रकृतीचा) स्वामी (ईश्वर) असूनसुद्धा असे जें म्हटलें गेलेलें, तेथें अस्तित्वाचे जे 'सत्' हें काय आपोआपच उगवेल, महत्त्व पावेल ? म्हणून तेथें 'सत्' हेंच महत्त्व घेऊन आहे : त्याचप्रमाणें 'प्रलपन् विसृजन गृह्णन्' इत्यादिमध्येहि-करीत असतांनासुद्धा-'वर्तन्त इति धारयन'-असे धारण करूनच तें मग त्या क्रियेस पदाचे केले-आधाराचें केलें-जोड दिला-जोडून घेतलें-असे देहादेहाचें-अथवा दुसऱ्या देहान्या आधाराने जे उभे केलें जाणारें-तेथे जसे तें बोलले, तसे येथें सत्त हेच मुळीं असूनसुद्धा जरी असले, तरी तें 'तत्' नेंच दर्शित केलें जाऊन ह्या लिंगदेहानें जसे तें 'ब्रम्ह' च आकारास आले-साकारता पाहूं लागले-आधाराच्या आकाराचे झाले-व विनियोग तो कसा उभा राहूनच स्थिरतेस आलेला असतो तें समजण्यास येत : येथे सखी किंवा मैत्रीण हीच ती होय

उंची वस्त्रामधून वागलें जाणे तें कसे-उंच मनुष्यानें लहानास जसे पाहाणे केले : उच्च प्रतीचा जो भाव तो कसा चोहोकडे-म्हणजे हलका सलका जो त्यास-पाहून असतो : मोठा मनुष्य अथवा श्रीमंत मनुष्य गरिबास कसे पाठीवर वाहण्याचे करतो, का गरिबाच्या मुळीं पाठीवर बसतो : तें कसे 'नमणें' ह्याने तोलले जाऊन, तेथे भाव हाच 'सत्' अथवा 'सत्ता' हीच ह्या प्रकृतीचा गौरव करणारी अशी तीच मुळीं आनंदाची असल्यानें, तेथे मनाचे मोकळेपण-स्वभावाचे शांत असे हवाशीर जागींच बसणें असून, तेथें एक जे नैसर्गीय सृष्टीचें रंजन-तेथें अंतराचे आपलेंपण हें ह्या स्वभावासच रमणीयतेचीं पुढे दिल्यानें तेथे काय अक्षर हेच मनाचा स्वभावच जसा रतीचा केला : मनाचे जे धर्म-मन हेच आपल्या धर्मास आले म्हणजे तें प्रतिष्ठाच एक दिली, पाहिली असे होऊन असतं-तेथे प्राणच प्रतिष्ठित नव्हे, तर प्रतिष्ठा हीच प्राणात स्थिर हो म्हणणारी होऊन, तेथें मग ह्या मनाचे जे ह्या ब्रम्हापासूनच उदयास आलेले तें त्याचें जिणें हें ब्रम्हच जसे प्रतिष्ठा घेऊन आलें-तेथे आता त्यास जे 'ब्रम्ह' धर्म त्यानींच पाहिल्यामुळे तेथे ( आत्म ) रति, तृप्ति व संतोष ( तुष्टि ) हेच ह्या प्रकृतीचें अंग ते पुरुषधर्मानें पाहिले गेल्यानें तेथें ऐक्यच ह्या विश्वाचे व ईशाचे होय.

आत्म—आप्त / रत—तृप्त : जीवधर्मासच धारण केल असे-धर्म हाच जीविताचा केला

प्रेमच, प्राणच, प्रीतिच एक तेथे स्वभावभजनास आल्याने, तेथे स्वतःचा आत्मा-स्वतःच आपण-स्वभावच-स्वमहिमा-स्वधर्म-हाच ह्या प्रकृतीस रंजनास घेऊन, तेथें पुरुष हाच श्रद्धेचा असा असलेला जो तो-'श्रद्धामयोऽयं पुरुषः'—असा तो ह्या मनासच-मनोधर्मास-(जीवधर्माचे जे दुसरे तेच जसे ह्या मनोधर्मावरच उभे राहाणारे) त्यास ती रति ही घेऊन-तेथें तृप्ति हीच जीवदशेची जी पाळणा ही पोहोचती केली : मग काय संतोषच एक : तेथे मन हें संतुष्ट झालें व त्यानें 'दुजेपणास' मुळींच शिवणें केलें नाहीं. तेथे अति उत्तम असा मोकळाच असा स्वभाव ह्या मनाचा होऊन त्यानें आतां चरणीं किंवा पायीं लोळणे घेतलें-लोळणच घातली-असे ह्या मनाचे अतिरंजन हें प्रकृतिधर्मास पुरून उरणारें असे. (२२४)

येथे ह्या आत्मरतीविषयीं एक दोन विचार नमूद करावेसे वाटतात. हें पूर्वीच तृतीयाध्यायीं विस्तृतपणे सांगितले आहेच, तरी पण पुन्हां तेंच एकवार बोलले तर बरेच.

(३-१७) परंतु जो केवळ आत्म्यातच रत असतो, आत्म्यांतच जो तृप्त आणि आत्म्याच्याच ठायीं संतुष्ट असतो, त्यास मात्र कांहीं कर्तव्य उरत नाहीं.

(४-१८) कर्म करण्यांत अगर न करण्यात त्याचा कांहींच हेतु म्हणजे लाभ किंवा हानी नसते तसेंच कोणत्याहि वस्तूकडून त्याला कांहीं प्रयोजन साधावयाचें नसतें.

(५-१९) म्हणून तूं आसक्तिरहित होऊन आपलें कर्तव्यकर्म करीत जा आसक्ति सोडून कर्म करणाऱ्या पुरुषाला परम पद प्राप्त होत असतें. लोकहिताकडेसच लक्ष देऊन तुला कर्म करणेंच उचित आहे.

ह्या 'आत्म आत्म परम आत्म' ह्याविषयीं बोलणेच मुळीं घात करणारे होतें. कारण तेथें प्राण हाच जसा का त्या मुद्रेंतच बसला पाहिजे-मुद्रेनेच वागविला गेला पाहिजे-असेच एक निक्षून सांगणें असल्यानें तेथे आत्म्याविषयीं गोष्टच मुळीं नच करिता तेथीलच्या कर्तव्यांतच मुरुन जा-तें 'माझ्या व्यापाचा सर्वथैव हो' असे स्वतःच्या नादीं लावून घेतलेल्या मायेचें लक्षण हें परिणाम करणारें होणार नाहीं

म्हणून ह्या आत्मरतीविषयीं-आत्म्याच्या गोष्टीविषयीं वोलणें-तें केव्हांच पुरते होत नसल्यानें, तेथें एक ती जी मुद्रा तिनेच असावे म्हणजेच बरे : तेथे मग (आत्म) रति हीच मनुष्याची (आत्म) तृप्ति होय : असे तें संतुष्टतेचें बीजच सांपडल्यावर तेथे मग ह्या कार्याविषयीं (देहाविषयीं) कोणतेच कर्म उरत नाहीं. मूळ ज्या कारणानें जन्म आला तेथेच पोहोंचणें झाल्यानें, आतां कारण उरलेंच नाहीं. फक्त जी काहीं विद्यमान वस्तु तिच्या आधारानें फक्त ती रति, ती तृप्ति व ती संतुष्टता ह्यानाच पुढे करून असणें होणारें, त्याच्या कृतकृत्यतेने अर्थ सिद्ध झाला असेहि नाहीं किंवा त्याच्या कांहीं करण्यानें अर्थाची हानी झाली असेहि होत नाहीं. किंवा एखाद्याकडून त्याला अर्थ हा व्यापक कसा अशा आश्रयाचा किंवा गृहाचा एखादा लाभ किंवा प्रयोजन साधावयाचें आहे असेहि नाहीं. अर्थ हा पुरुषाचा जो तो पुरुष व्यापक असून चराचरामध्यें असतो, व त्या पुरुषाचा अर्थ हा साधावा व तेथें त्या आश्रयास शरण जाणे अथवा आश्रयास आश्रयाचा करणें हे किंवा गृहासारख्या सौख्याचें करणें हेंहि तेथे हेतु करून नसतें व्यप, व्याप, व्यापकत्व-हालचाल मात्र, व्यापार मात्र, असे जे गृहाचें करणें तें शरण असेच अग्निस्थानाचे का नव्हे ? म्हणून अनासक्त होऊन 'कार्यं कर्म समाचर' कार्य कारण-कर्तव्य कर्म-समाचर समाचरच-तेथे घेत राहाणें हे जसे तसे : अनासक्त आचरण हे परम प्राप्तीचे करते : तेथे पुरुषच हा श्रद्धेचा तो, तें पदच होऊन असतो.

'भूतदया, जीवनजीवभूतदया'-ज्याप्रमाणे पाणी हे उंचीवरून पडलेले तळीवरी पोहोचतें, तसे तेथे निरालंब जे रूप तें तळीवरील दीपच सतेज करणे होय, येथे भूतबाधा ही होतच नाहीं, कारण भूतदया जी तीसच जीवभूत अशी जीवनानें करून, तेथे दीपच एक तळीवरी पोहोंचता केला-जीव-जीवन हेंच भूतमात्रांस पोहोचल्याने तेथे दया हीच सदयतेनें पाहविली जाणारी झाली

वृक्षांना फळे येऊं लागलीं म्हणजे त्या फळभारानें त्या वृक्षाच्या 'शाखा ह्या भूमीवरच उतरल्या' अशा झाल्या त्याप्रमाणें ते महात्मे हे सर्व जीवमात्रांना आधारभूत होऊन असतात, जसा, तो जीवमात्राचा भार हा एक फळभारच त्यांना आला आहे व त्या फळभाराने ते लवून गेले. (२२५)

अखंड अगर्वता हीच त्यांची विनयसंपत्ति होय-ते त्यांनीं 'जय हो ! जय हो !' असे मंत्रच माझ्याठायीं उच्चारिलेले ! ! (२२६)

त्यांच्या त्या नमण्यानें-खालावून असल्यानें-सद्‌भावाचें असें त्यांचें तें नमणें हें, त्यांना काहीं मानमान्यता, सन्मान्यतेनेंच असावे असें मुळीं करीतच नाहीं. मानापमान हेच त्यांना सोडून गेले, आणि म्हणून सहजच ते 'मीच' झाले : असे निरंतर त्याचें मिसळणे होत असल्यानें, तेथे जणूं केवळ एक उपासनाच उपासिली गेली. (२२७)

हे अर्जुना, ही जी भक्ति सांगितली, ती उच्च अशी आहे-ती 'गुरुवी' अथवा गुरूची अशी आहे : तेथे वर्णच जन्मास आला-ब्राम्हणवर्णाचें असेच तें होणें असून, तेथीलच्या भक्तीची जी तऱ्हा ती तुजला सांगितली. ती उच्च प्रतीची असून तेथे ह्या जीवमात्राना आपलें उत्तमत्वच पाहूं करा असे आव्हानच एक देणारी !! अति शोभनाढ्या अशी चित्तवृत्ति हीच उत्तमा, आपले उत्तमत्व घेऊन असलेली ' कान्तिस्वरूपा '

**गुरुवी : गुण-गरुवी भक्ति** : जीवदशेच्या कल्याणास उपयोगीं पडतील असे उत्तम गुण ज्याच्या ठिकाणीं आहेत अशा भगवान् श्रीहरि म्हणा ( गुण गरुवा म्हणा ), गोविंद म्हणा किंवा गोपाळ म्हणा, अशीं हजारो नावे त्याला आहेत तोच श्रीहरि सर्वोत्तम आहे हो ! तो सावळ्या वर्णाचा असून गाई राखतो खरा; परतु तो मदनालाहि मोह उत्पन्न करणारा आहे काय सांगावे ! त्या हरीला पाहाताच माझे चित्ताला ध्यान लागून गेले हो ! तोच श्रीहरि मनाला वारवार आवडतो हो ! असे त्या श्रीहरीचें रूप आहे ( ज्ञा. गा )

आता ज्ञानयज्ञाने जे भक्त यजन करतात, ते भक्त कसे असतात, ते ऐक; तें सांगण्याचें करतों (२२८)

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥**

ज्ञानयज्ञेन = ज्ञानयज्ञानें च अपि अन्ये = आणखी देखील, दुसरे काहीं भक्त. यजन्तः = पूजन करून माम् उपासते = मला भजतात. एकत्वेन = एकच तत्व पुढे घेऊन, एकत्वाने पाहून, सर्वव्यापी परब्रम्ह एकच आहे अशी भावना ठेवून. पृथक्त्वेन = निरनिराळे कल्पून (सूर्य, चंद्र अशा भिन्न देवता कल्पून) मला भजतात बहुधा = विविध प्रकारांनीं विश्वतोमुखम् = विश्वात्म्याला, विश्वव्यापी जो मी त्या मला, ह्या विश्वापासूनच जन्मलेले जे मुख त्या मला, म्हणजे ते मुखच चोहोंकडे आहे असे समजून

अन्ये अपि ज्ञानयज्ञेन यजन्तः एकत्वेन पृथक्त्वेन च विश्वतोमुखम् माम् बहुधा उपासते।

याहून दुसरे जे ज्ञानयोगी ते ज्ञानयज्ञाने यजन करून ( एक अभेदभावाने ) उपासना करितात; दुसरे ( भेदभावाने देवतारूपी असणाऱ्या मला भिन्न भिन्न ) मला पृथक्भावाने समजून उपासना करितात; तर इतर कित्येक विराट् स्वरूपी मी विश्वतोमुख आहे असे समजून माझी उपासना करितात—बहुधा 'विश्वतोमुख' जो विश्वव्यापी विष्णु जो मी त्या मुखाची ( विश्वतोमुखाची ) उपासना करितात ( १५ )

**परी भजन करिती हतवटी । तूं जाणत अससी किरीटी ।**
**कां जे मागें यया गोष्टी । केलिया आम्ही ॥ २२९ ॥**
**तंव आथी जी अर्जुन म्हणे । तें दैविकिया प्रसादाचें करणें ।**
**तऱ्ही अमृताचें आरोगणें । काइ पुरें म्हणावें ॥ २३० ॥**
**या बोलाआंतु श्रीअनंतें । लागटा देखोनि तयातें ।**
**कीं सुखावलेनि चित्तें । डोलतसे ॥ २३१ ॥**

म्हणे भलें केलें पार्था । पऱ्हवीं अनवसरु हा सर्वथा ।
परी बोलवितसे आस्था । तुझी मातें ॥ २३२ ॥
तंव अर्जुन म्हणे हें काई । चकोरेंविण चांदणेंचि नाहीं ।
जगचि निवविजे हा तयाच्या ठाईं । स्वभावोचि कीं जी ॥ २३३ ॥
येर चकोर ते आपुलिये चाडें । चांचु करिती चंद्राकडे ।
तेवीं आम्ही विनवूं तें थोडें । देवो कृपासिंधु ॥ २३४ ॥
जी मेघु आपुलिया प्रौढी । जगाची आर्ति दवडी ।
वांचूनि चातकाची तहान केवढी । तो वर्षावो पाहोनी ॥ २३५ ॥

(२३०) आरोगणें=सेवन अमृताचिया आरोगपणें काय पुरें म्हणवेल ? काय पुरें म्हणावें ? (२३१) लागटा = लगट करणारा उत्सुक. देखोनि-देखिला. डोलतसे-डोलत असे. (२३२) अनवसरु =युद्धप्रसंगीं अयोग्य. (२३४) चाचु=चोच. ते-तिये. थोडे-थोकडे. (२३५) आपुलिया-आपुलिये. प्रौढी = मोठेंपणासाठीं. आर्ति = पीडा, तृषा.

हे अर्जुना, ती जी भजन करण्याची हातोटी (हतवटी, शैली) ती साधणारी कशी हे तू जाणत आहेस, कारण ह्या गोष्टी आपण पूर्वी केलेल्या आहेतच (२२९)

असे तें एकत्व जेव्हा पुढे घेऊन असावे, तेव्हा तेथे ' जीवन ' हेंच ' जीवभूत ' भूतदयाच ! त्या भूतमात्राना पोषण देऊन असतें.

ही भजनहतवटी हीं पूर्वी केलेली अशीच आहे नव्हे ? असे श्रीकृष्णानीं अर्जुनास विचारल्यावर अर्जुन हा म्हणूं लागला कीं, अहो, हें काय, हें तर दैविकी इच्छा जी तिचेच करणें असून तेथे लोकोत्तर अशा एका समाधानाचें नादणेंच होय. तेथे प्रसाद हाच पुढे होऊन असणारा · तेव्हा अशा प्रसाद-प्राप्तीची जी जागा तेथे अमृत हेंच प्राशविले जाणारे-तेव्हां अशा आरोगण्यास, एक माजच जसा काहीं ह्या प्रकृतीनें केला, असे तें स्नेहाचें नवलपण : तेथे अमृत हेंच वाढले जाणारें : तेव्हा अशा ह्या जेवण जेवण्याचे जे काहीं प्रसन्नपण-प्रसादाचे, मनःप्रसादाचे सौम्यस्थैर्य-एक देवलक्षणानें असणे हे काहीं पुरें असे म्हणतच नाहीं तेथे ह्या विश्वापासून जें मुख निघालेले त्या मुखानें सगुण शोभा घेऊन तें त्या एकत्वासच आले. तेव्हा आता आनंदच अवतरला काय ! असे आवडणेंच एक तेथें झालें आतां ह्या अर्जुनाची मात्र लगट करण्याची मर्यादा ही सपुटातच आली असे देवानीं जाणून तेथें त्या अर्जुनाचे मन हें आतल्या आत उसळयाच घेत असलेलें असें जेव्हा त्यानीं पाहिले, तेव्हा श्रीदेवांना अवर्णनीय असा आनंद झाला-अवर्णनीय अशा आनंदास त्यांनीं येणे केले-त्यांना अति आनंद झाला-त्यानीं आता तर डोलच दिला-ते डोलं लागले-प्रसन्न झाले-चित्त हें परम सुखसमाधानाचे झाल्यानें देवांना, श्रीअनंतांना, आतां आनंद झाला व ह्या अर्जुनानें मात्र ह्या ज्ञानास माळच घालावी कीं काय असे तेथे त्याचे ज्ञानानें असणे हे हृदयास प्रफुल्लितपणाचे, ज्ञानदतेचे करून आल्यानें त्यांनी आता ' भले भले ' असेच त्या पार्थास म्हणूं केले. (२३०, २३१)

तेथे अर्जुनानें त्या सगुणाचें होणे हेंच श्रीअनंतांनीं पाहून, ते प्रसन्न होऊन म्हणूं लागले कीं, हे अर्जुना, भले भले, हें जे ज्ञानानें असणे हें तुला समजून तूं त्या मधून वागत आलास-वागलास-म्हणून तुला भले असेच एक उत्साहवर्धन बोलवणेंच जसे : हे आता असें म्हणण्याचें कांहीं नकोच आहे, कारण हें कांहीं तें तितकी किंवा तेवढी वेळा साधून आहे असे आहे नाहीचें-म्हणून ह्या वेळेस कांहीं तुला तें 'भले' म्हणणें हें तुझ्या आस्थेची जी सीमा तीच पाहात आहे-ही ज्ञानइच्छा ही अनेक तऱ्हानीं आपल्या आस्थेची झाली तरच बरें-तेथे काय अगत्य, काय आर्जव, काय विहार, काय विस्तार, काय वेळा, काय

अवंळा, असे पाहण्यारी नाहीं : ही आस्था ही अति उत्तमतेस आली–किंवा यावी असेच केव्हांहि उपयो-जन पाहावे लागत असून, तेथे ती आपलेपणास आली तर जसा काहीं तो आयुर्वेदच एक आपलें अगतः प्रकृतीचें स्वभावलक्षण हें घेऊन आल्याने किंवा असल्यानें आहे. तेथं सुखाचें असेच एक सत् लक्षण उगवणारे होंते. हें लक्षण, अनेक अशीं जों ज्ञानलक्षणे त्या सर्वांहि लक्षणामध्ये उच्च असे असून, तेथे जी एक उदासीनता तीच ह्यानें बाजूस करून तेथं आरोग्यसीमा हीच ह्या मनास दिल्याने, त मन हे प्रसन्नपण पाहाणारे होतें–झाले : हीच आस्था होय. म्हणून त्या तुझ्या आस्थेनेच आम्हाला तसे बोलविले एरव्हीं ह्या प्रसंगास काय 'भले' असे म्हणणे नव्हेच, कारण तेथे दर्शनाचा आनदच भरभरून आलेला आहे!! (२३२)

अर्जुनाने त श्रीदेवाचे बोलणे ऐकून घेतलें, व म्हणू लागला, "अहो जी अहो! श्रीकृष्ण हेच चंद्र प्रत्यक्ष! तेथें चकोर हाच त्या चद्रास आपले चादणे प्रसरविण्यास लावतो–एरव्हींचे जे चादणे पडत, ते काय चंद्रावर नव्हेच. तर ते चकोरावरच पडणारे असे असून, तेथं अमृतकणच ह्या चित्ताच्या निव विण्यास आले : हा त्या चद्राचा किंवा चकोराचा स्वभाव, हा सर्व जगाच्या निवविण्यास आला. असे त आपले बोलणें म्हणजे आमचा उत्साह हाच वर आणिला जावा असेच असून तेथे चकोराप्रमाणे असणें हेच मला आवडत आहे, कारण तेथं (जसे काहीं) चद्रच तो चकोर होऊन हे सर्व चादणेच मुळीं त्याचे पाहाण्यास आले–म्हणून चकोर हा केव्हाहि पाहिला तरी त्या चद्रापेक्षाहि अति उत्सुकतेचा, आस्थेचा हें केव्हाहि! (२३३)

अहो! तेथं चकोर हे तर आपल्या इच्छेच्या चाडीन–आशेने–आशा बोलविली गेली असे नच होता–ते चकोर आपली चाचू–चोच ही चद्राकडेसच लावून असल्याने, तेथं चद्राने वर्षावे हे होतच आणि म्हणून आम्ही देवाना जे जे म्हणून विनवणे करावे ते काहीं थोडेच असे! आम्हीं जे काय वाटेल तें जर विनविलें, तरी ते श्रीदेव हे पुरवून असणारे आहेतच, असा त्याच्या कृपादृष्टीचा लाभ हा आम्हास वृत्ति देऊन आहे–आम्हीं मागावे आणि श्रीदेवानीं ते पुरवावे असे असल्याने, तेथें आमचे मागणे हे पुरते होऊन असते, का त्याचे ते पुरते करणे हे एक पाहाण्यासारखे स्थळ का बर नव्हे?

आम्हीं काय वाटेल ते जरी मागितले, तरी श्रीदेव ते पुरविणारे आहेतच–त्याचे ते सिद्ध एवढे असणें हे एक कृपाच तेथे सागरासारखी मोठी होऊन आहे–'आम्हीं विनवू तें थोडें, देवो कृपासिंधु' असेच तेथे बोलणे! कारण आम्हीं जे काहीं मागणे करावे, त आम्हीं आपलेच मुळीं त मागणे केलेले हे उजवून घेण्याचे केले तरच बरे!! देवाना काय त! ते काहींहि वाटेल ते देणारे तर आहेतच! परंतु येथे एक मात्र बोलणे, ते कसले म्हणाल तर आम्हीं मागावे व देवानीं तें 'देवो कृपासिंधु' असे –त्याच्या आशीर्वादाने एक तेथीलच जीवित हेच अमृताचा बहर होऊन अमरपणास आले असे ते–सबोधणे हे परम अर्थाची एक प्राप्तिच पुढे करून देवाना आळवीतच जणुं आहे! कीं, अहो देवा, आपण कृपासिंधु आहात, तेव्हा आमचे जे काही मागणें ते काय कसलेहि महत्त्व घेऊन असले, तरी ते थोडच असे आपल्या दृष्टीचें नवल असल्याने, तेथे देवानीं आपलेंपण–देवपण–हेच जसे तेथे उगविले–उजविले–उगवं दिले, देव होऊन आले असे जर, तरच त आपले कृपाळुपण झाले तरच मात्र तेथे देवाचे कृपासिंधुपणाने सबोधिलेलें देवपण हे देवच झाले असें असावे! (२३४)

एखाद्या शिक्षकामधील आजपर्यंत सर्व जन्मांत जे काय शिकले, पढिले, पाहिलें, ऐकिले, जीवित जगलेले, संपन्नपण, जसा काय तो तो वेष त्या त्या वेळच्या वृत्तीस वृत्तीवर ठेवूनच हे जीवित एक आनदाचे स्थानच जगण्यास योग्य असे एक आनंदणेच–तेथे सर्व कांहीं जो उत्साह भार हा आनंदाने पुरस्कृत केलेला असल्यानें, तेथें केवढा तरी एक जुनेपणाचा वेषच घेऊन असलेले त मन हे जेव्हां का

एखाद्या मुलानें एखादा प्रश्न मोठ्या आस्थेनें विचारिलेला, तेथें तें शिक्षकपण हें आपल्या सर्व भारास घेऊन जर तें उत्तर पुरवितें करण्याचे करील, तर तेथे दोन्ही बाजू-ही विद्यार्थीदशा व तें शिक्षकपण-ह्या जेव्हा तोलल्या जातात, तेव्हां एका बाजूस एक मोठे उदार लक्षण-ज्ञानदानाची शैली-व त्याचे दुसरे बाजूस त्या विद्यार्थ्याचें जें काय आस्थेनें असणें तें कसे बरे परस्पर देण्याघेण्यानें विनियोजिले जातें-उपयोजिलें जातें-आनंदास ये ये म्हणणारें होतें : तसेंच ही जी ज्ञानेच्छा ती कशी उचलून धरली जाते-तेथे केव्हाहि एक भारच ओतला जाणारा कीं हे जीवित हे एका प्रभावशाली अशा भूमिकेस पाहाणारें व्हावे अशी ती ज्ञानदानकला ही परम सीमा ज्ञानदातृत्वाची का नव्हे बरें !!

तसें येथे जो महा उदार मेघ हा उदारपणानें वर्षाव करणारा-उदात्ततेची सीमा घेऊन त्याने जगाचें जें कांहीं एक आर्त लक्षण इच्छा ही नेहमीं तोंड उघडून पाहाणारी-तेथे चकिततेचें जसें एक कदाचित् ह्या निकेपणास पाहाणारें तें-त्या चातकाची तहान हीच जशी काहीं अनेक जन्म झालेले जे ते किंवा पुढें होणारे-येणारे जे काहीं एक जगणे-ते (जसे काहीं) मोठ्याहूनहि मोठा हातभार दिलेला

येथे काय बोलण्याचें कौतुक तें कसचें? अहो, मेघ सर्वच्या सर्व जगाची जी एक सहज सेवा, इच्छा अथवा ज्ञानसादृश्यता ही, अथवा आर्तता ही इच्छाच एक तळमळत असलेली कीं, मी केव्हा बरें त्या महत् समाधानाचा होईन? केव्हां मी त्या आनंदास येऊन आपलें उदारपण हेंच ह्या मनाचे तेंच जसें वागविलें गेलें-तेंच जसे पाहविलें गेले, पुरविलें गेले-असे तें आर्त आता प्रसन्न होऊन त्यानें तो सर्वच्या सर्व वर्षावच आत घेतला जसा-व आता त्या प्रकृतीचें जे काहीं ह्या प्रसन्नपणास जीवित शोभं लागलें, जीवितजीवन सुशोभित झालें, असे जे एक प्रसन्न लक्षण ते उदारपणानें वागू वावरू लागले : : म्हणून केवढा बरें भार येथे जणूं ह्या जीवदशेस महान् आधार देत असलेला-आनंदाचा बहरच जसा ह्या जीवितासाठीं असलेला : तेथे काय उपमा ही तोलली जाणारी-का ह्या जीवितासच जसे काहीं सर्व आभरणच दिलें-संपन्न केलें, एक भारच त्याजवर आभारास ये ये म्हणणारे असे ते जगत्-विश्व-चातक-ह्याची संपत्तीच एक देखीस घे म्हणणारी-दर्शनाने प्रसन्नचित्तच होणारी-अशीं अनेक लक्षणें हीं तेथे आपला उदार भाव, औदार्यलक्षण हे प्रौढपणाचे ह्या स्वभावास दिलेले-स्वभावाकरिता काढून ठेविलेलें-स्वभावच जसा हा एकंदर आपला महत् भार हा पाहून-असे त त्या मेघाचें (श्रीगुरूचें दातृत्व) ह्या जीवदशेचें कोडकौतुक करणारें, पुरविणारे, एक देवतुल्यतेचे आख्यच! ख्याति! आख्यायिका!! 'ख्य' च एक!! (२३५)

परी चुळा एकाचिया चाडें। जेवीं गंगेतेंचि ठाकावें पडे।
तेवीं आर्त बहु कां थोडें। तऱ्ही सांगावें देवा ॥ २३६ ॥
तेथें देवें म्हणितलें राहे। जो संतोष आम्हां जाला आहे।
तयावरी स्तुति साहे। ऐसें उरलें नाहीं ॥ २३७ ॥
तूं परिसतु आहासि निकियापरी। तेंचि वक्तृत्वा वऱ्हाडिक करी।
ऐसें पुरस्करोनि श्रीहरी। आदरिलें बोलों ॥ २३८ ॥
तरी ज्ञानयज्ञ तो एवंरुपु। तेथ आदिसंकल्प हा यूपु।
महाभूतें मंडपू। भेद पशू ॥ २३९ ॥
मग पांचांचे जे विशेष गुण। इंद्रियें अथवा प्राण।
हाचि यज्ञोपचार भरण। अज्ञान घृत ॥ २४० ॥
तेथ मनबुद्धीचिया कुंडा-।-आंतु ज्ञानाग्नि धडफुडा।
साम्य तेंचि सुहाडा। वेदिका जाण ॥ २४१ ॥

तेथ सविवेक मतिपाटव । तेंचि मंत्र-विद्या-गौरव ।
शांति स्रुक् स्रुव । जीऊ यज्वा ॥ २४२ ॥
तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेकमहामंत्रें ।
ज्ञानाग्निहोत्रें । भेदु नाशी ॥ २४३ ॥

(२३६) ठाकावें-ठाकणें. देवा-देवें. (२३७) जाला-जाहला. (२३८) परिसतु आहासि निकियापरी = सावधान ऐकतोस. वन्हाडिक-वन्हाडी करी = उत्साह देणारे. पुरस्करोनि = गौरवून. (२३९) यूपु=यज्ञस्तंभ भेद = जीवशिवाविषयीं भेदबुद्धि. (२४०) इद्रियें अथवा प्राण-अथवा इद्रियें आणि प्राण यज्ञोपचारभरण = यज्ञकर्माचें साहित्य. (२४१) धडफुडा = भडाभड पेटलेला, सुहाडा = मजबूत. वेदिका = ओटा जाण – जाणे (२४२) सविवेक मतिपाटव = सत्यमिथ्या विवेक करण्याविषयींचें बुद्धिकौशल्य. स्रुक् व स्रुव – हीं यज्ञपात्रें होत. यज्वा = यज्ञकर्ता.

'एक चूळ भरावीशी वाटतें' असें जे जरूरी भासणारे तें काय गगेसच जाणें जरूरी आहे? तसे तेथे जे आर्त लक्षण तें काय थोडेथोडकें म्हणावे का बहुत असे? एखाद्याच्या मनात त्या चुळेचें आपण व्हावे तेव्हा तेथे त्या चुळेची-चूळ भरण्याकरिता जी काय चुळेची होणारी अशी नड ही ती नडच जशी चाट केली-नडीसच मुळीं इतके काहीं बोलणे केलें किंवा तें वैखरीनेंच नटविले गेल्यामुळे, तेथें आता उरलेच मुळीं कांहीं नाहीं. म्हणून तेथ चूळ जर भरणें-जसे काहीं तें ब्रम्हच पाहाणें-तें काय नड नड किंवा नडलो नडला असे म्हणून चूळ (ब्रम्ह) नच भरिता बोलिलेंच नुसतें, तर तेथील जे काय आर्त लक्षण त कसचें काय !! काय तें ब्रम्हाचे का चुळेचे का चाडेचें का गगेचे बरें! हें देवानीं कृपा करून सागण्याचें करावें अशी विनंति आहे तेथें चूक तरी ती काय अर्धा का केवढी तेंहि बोलावे असे देवाना विनवणे आहे

इद्रियच लपले जसे . जठराग्नि हाच लपविला जीवच कोंडून धरला. त्या जीवदशेची व्याप्ति, अंत.करणव्याप्ति, हीच काढून घेऊन जसे का ह्या पायाचें त अंतकरण का नव्हे असे ते पायच मुळीं काढून घेतल्यामुळे ह्या जीवदशेचें जें पिळणे झालेले-निपटणें झालेले-निवटणे झालेले-तें मुळीं काहींच बोलेना! तेथे हर्षच आंधळाच-दातच दळले गेले-काय येथें हर्ष असे म्हटले जाणे! वेदनानीं प्राणोत्क्रमण होणे हेंच आतल्या आतच तळमळत असणारे : तेथें वेदना ह्या महाभयंकर अशाच-काय तेथें नाम! का जीवदशा! का मुख! का लग्न! का स्त्री! तेथे काहींच नाहीं! तेथे तेथीलचे गुण हे कोणीं वर जाणावे? म्हणून येथें देवाना दर्शन! परंतु येथे तूं महाभयंकर अशा यातनाचें एक घरच होऊन त्यानें तो देव उजविला जावा असे एक जे गूढत्व तें काय बोलण्यासारखें मुळींच नाहीं!! तेथे 'ब्रम्ह' तर येथें नुसतें जळणेंच एक प्रकृतीचे-देहधारणेचें!! (बुद्धीने गगन आक्रमिलें-त्यामुळे तेथें तीच आपलें नाट्य घेऊं लागल्याने ही जीवदशा आपल्ये एकान्तास येईचना!! म्हणून ह्या बुद्धीचें तें प्रसरण त्यानें तर डोळेच दिपविले, थिजविले का आपल्याच उपयोगास घेतले असे झालेलें.)

गंगेनें सागराचें पाणिग्रहण करणे हें केव्हाहि! तेथें ब्रह्मसागरच एक चूळच भरून आटोपशीर केलेला! तेथें मग ह्या स्वर्गनदींनें पाहाणारीं जीं ह्या भूलोकावरील दिव्यें तींच जशीं एकत्र होऊन त्यानीं ज्ञानदिवाच लाविला-तेथें सागरच जसा ब्रह्म होऊन आला किंवा ब्रह्मच सागरासारख्या महतीचें व तेथें मग गंगेनें तर आपोआपच ठाकणें केलें होणारें असे!! (२३६)

येथें काय गगा ही आपण होऊनच तेथे आली पाहिजे असें कांहीं आर्त तें केवढे बरें! येथें ह्या बोलण्यानें देवांना संतोष झाला. तेथे जणूं काय ती सर्व शक्ति जी ह्या सत्वशुद्धीचें रम्य असे स्थान

तेंच देवांनीं बसण्यास घेतले व आतां आर्त लक्षण हें विशालपणाची एक परम सीमा : तेथे आता काय बरें देऊन तें आर्त हे बाजूस होईल असे एक विचारणेंच : येथे ब्रह्मच एक चुळेचें केलें : तेव्हा तेथे हा कंठदृष्टीचा असणारा जो वेध तो केवढा तरी होऊन आहे-देवाना मात्र तो संतोष देणाराच ! ! परतु ह्या अर्जुनाची ती त्रेधा ती काय विचारावी ! ! येथे तें प्रकृतीचें भारभार ! कर्माचे भारच गुडाळले ! व त्या भाराच्या योगानें देव देवपणास आला : श्रीदेव हे देव झाले. त्याना ह्या कर्मभारानें डोल येऊं लागून त्यांची काठी ही डोलतच राहिली असे त्यांचें तृप्तीचें एक ! परतु येथे त्याना स्तुति ही आवडली नाहीं, कारण येथें तृप्त लक्षण हें सतोषास आले व संतोषावर काहीं आणिक स्तुति उभारावी असे नकोच असे त्यांनीं म्हणूं केलें : आतां येथें स्तुतीचें कामच नाहीं-कारण जे काहीं ह्या आर्ततेचें घेतलेले लक्षण तें उगीच सहन करून आहे : त्यानें आपले अजाणपणावरच तें उभारिलेले दिव्य हे देवाना प्रसन्नपणच देत राहिल्यानें, त्याना तेथे त्या प्रसन्नपणांतच एक मुग्ध अशी स्तुतिच भेटूं लागल्याने, त्याना ज्ञानाचे जे एक उदार लक्षण तेच लहानपणच बुद्धीचे जसे काहीं बापपणानेच तें उचलून धरिले गेलेलें आर्तपण ह यावर कांहीं बोलूच देईना :: तेथे दृष्टिच मुळीं रुसली व आता बोलणेच मुळीं नाहीं व बोल हाहि पण तेथे बोलणें करीना : व आता ह्या निकयाचे पारुसपण हें कशानें तोलले गेले म्हणावे तो तें म्हणजे "आता यावर बोलणेंच मुळीं उरले नाहीं असे तें एक मुग्ध असेच प्रसन्न" (२३७)

परंतु येथें पाहावे तों लहानपण हेच जसे श्रीआज्ञा घेऊन चालत असलेले : त्यान ज्याला त्याला 'लग्नाला चला' 'लग्नाला चला' म्हणत म्हणतच ह्या वक्तृत्वास एक उत्तम तऱ्हेचा असा सलग्न घटीचा वळसा देऊन जो तो त्या तेथीलच्या लग्नघटीस वऱ्हाडिक करू लागला जो तो म्हणूं लागला कीं, ह्या वऱ्हाडिकतेनेंच फक्त ती कला ही शोभविली जाणारी-ती कला ही सुलग्न शात वेळाच एक होऊन आली व तिंने असा काहीं एक आपला सभारंच-महत्त्व-मान्यता-ही पुरस्करून तीच आता उचलून धरिली जावी, झपली जावी, अशी एक सोयच कशी होईल असे पाहून तेथें जो तो त्याना वेळांना-वेळेला-लग्नघटीस पाठिंबा देत राहिल्यानें, तेथें लग्नघटीचें तें महामुहूर्त घेऊन आल्याने, तेथें कर्म हें शून्य झाल्याने, तेथे सर्व जे भार आंतले गेले ते त्या घटीसच साधीत गेल्याने, आता वक्तृत्व हे महत् सुलक्षणाचें झाले-तें अप्रतिम असें मनःशाततेचें-स्वभावभावाचें-एक मनुष्याने मनुष्यच पाघरले असे सगुणरूप हे शोभायमान झाल्यानें, तेथे वक्तृत्वास ज्यानीं त्यानीं माना डोलवूं केलें व प्रसग हा अति उत्तमतेच्या रम्यपणाचा होऊन आहे असेच दिग्दर्शन प्रगटतेचें झाले-असे तेंच आता पुढे करून श्रीदेवांनीं आतां आदर पाहून पुढे जें काय महत्त्वाचें बोलणें तच त्यांनीं आभारप्रदर्शनाचे असेच एक चालणें केलें. (२३८)

येथें रूप जें तें ज्ञानयज्ञाचें : आदिसंकल्प हा सृष्टी उत्पन्न करावी अशी एक मेढच रोविली गेलेली-महाभूतांचा केलेला हा मंडपच दिला आहे असा व तेथे भेद हाच एक पशु-लज्जाच जशी बळी घेऊन आपल्या स्वभावास किंवा रुपास येणारी-स्वरूपास पाहणारी-आदिसंकल्प 'एकोऽहम बहु स्याम्'-मी एक आहे पण बहु व्हावें असे पहिल्या संकल्पाचे-असे एक यज्ञस्तंभाचें जसे उभारणे (२३९)

पंचमहाभूताचें जे विशेष गुण-अथवा दशेंद्रिये व त्रिगुण-हेच यज्ञोपचाराचें भरणें करण्यासाठीं योजलेले-व येथें अज्ञान हेंच घृत हवीचे जागीं असलेले. (२४०)

तेथें मन हेच एक कुंड, (तीर्थकुंड) अग्निकुंड, ओटाच एक, करून ठेवलें-ते नेहमीं तप्त असेच तपलेलें-बुद्धि ही पण तशीच आपल्या शुद्धीवर असलेली व ज्ञानकण हेच वेचणारी अशी एक सामर्थ्यवान-तेथें पंचभूतांनीं मान्य होऊन आपलेंपण हें 'सम' असें करून आतां पंचप्राणांनीं तें विस्तीर्ण-मजबूत-सपाटेबंद-असें हें जीवित करून ठेवलेलें व तीच एक वेदिका म्हणजे स्थंडिल होय.

(वेदिका, ओटा = ओटा, वटा, अंगवठा, शिणवटा, मुखवटा, लखौटा, खनवटा, अंगवठा, अंगवटा, अंगुष्ठी, अगुठ, स्थापिलें मूळपीठ) : अंगुष्ठ हाच एक ओटा, परंतु त्यास पाऊल असेंच ठेवणे केलेलें-तसें अंगुष्ठपण पाऊलाचें. (२४१)

मंत्र हेच विद्येला गौरव देऊन असणारे असे मतीचे-मतिरूपी वस्त्रच पांघरलें आहे असे विवेक-व्रताचे सहज पटणारें, पटलेलें असे मनाचें रंजन घेऊन तेथे लक्ष हें देण्याचें आतां नाहीं-निश्चित असेच घेतलेलें मनाचें विश्वसन-असे विश्वासपूर्णतेचें एक पटच, वस्त्रच, बोलणें पटविलेलें असे पाटव, त्यानें विद्या ही शोभविली, गौरविली, ' सर्व कुशल ' असेंच पाहणारी व एक जसे कांहीं सहजपणानेंच ते परम संस्कार हे आपले तन्मात्राचे प्रसरण करून ज्यास त्यास आभरणेंच करीत आहे असे ! शांति हीच एक पळी-स्रुवा-ज्या पळीनें तें जे आज्य हें अग्नीस हवन केलें जाणारें व जीव हाच मुळीं तेथें यजन करणारा असा ऋत्विजच-यज्वाच ! यज्ञकर्ताच ! विद्यागौरव व शांति हीं यज्ञपात्रेंच ! (२४२)

त्यानें आजवरची आपली जी प्रतीती तीच विद्यापात्ररूपी गौळणच गाइलेली-गाणारी-तेथे विद्या हीच आपले गृह करून आहे व आजपर्यंत जे तिनें आयुष्यानें जगणें केलेले तें जसे का सर्व विद्यमान घेऊनच ती वागणें करीत आहे : पात्र हें ध्वनि करणारें किंवा प्रतीतीच साठविली व ती एक विद्याच जशी स्वतःस साभाळून असलेली : अंतःकरणात न राहणारी गोष्ट हिनें आपल्या जीवाभावापलीकडे जपून ठेवली आहे . तेथे एक पात्रच-कृपापात्रच-ती होऊन आहे व जणं काय ती प्रतीतीच तिजवर प्रसन्न होऊन आपणच तें तिचे काम स्वत: उचलीत आहे-विवेक हा एक मंत्र ती घेऊन आहे : अहो, काय प्रत्येक गोष्ट सागण्याचें करणें हे केव्हाहि महत्त्वच तेथीलचें उडले जाणें-तें काय बरें असे कसे ? तेथें वेळ काय-काय काय कुठें नडलें-आपली जागा कुठे-प्रतिष्ठेने असणें हे केव्हाहि नकोच-तेथें काम काजात मुरून जाणें-पडलेलें, नडलेलें काम त्वरिततेनें करणें-काम पुढ आलें कीं तावडतोब त्या कामास हातभार हा लावणे इत्यादि ज्या गोष्टी ह्या सहजच जसे ह्या देहाचे एक सुनियंत्रितपणासच पाहाणारें दृष्टिसौष्टव हे, हा सर्वच्या सर्व देहच मुळीं एक गौरवरूपी मंत्रान मंत्रित केलेलें तीर्थच घेऊन आहे : गौरव, सेवा, निष्ठा, तत्परता, सुलीनता, विनय, त्वरित मरण, आभरणेंच केलें ह्या सेवानिष्ठा इत्यादि गुणाना . असे तेथे जे वागणें वर्तणें हें विवेकासच शोभविले असे सहजरम्य हें पाहणाऱ्या डोळयाना-कामाकडेस लागलेल्या डोळयाना-जसें त तत्परपण हें धन्य धन्य असेंच गाऊन तेथे सर्व प्रेम हें दृष्टि-निक्षेपाचें परम आल्हाद देणारें असें कर्तव्यच रंगले-कर्तव्य अशा त्वरित उपचारानें रम्य केलें : तेथें जीवदशेवरील ओझेंच मुळीं हलके केलें असे एक स्थळ, तें उपकाराची राशी होऊन, उपकार हाच नतर परम रम्यतेची नवलाई अशीच एक सुरम्यतेनें गाणारी जागा होऊन, तेथें त्या उपकाराची फेड म्हणजे कर्तव्य नटविले, सुशोभित केले, सन्माननीय केलें, व आता तेथें कर्तव्य जे केलेलें तेंच लाजूं लागून आपली जी योग्यता तीस केव्हांहि टाकीत नाहीं : आपली योग्यता ही आपणच पाहूं लागून जी जागा स्वतःच्या योग्यतेची तीच ते कर्तव्य घेऊन असल्यानें, तेथें आतां विद्या हीच ( स्वामी हाच ) परम दीर्घ असा उच्छ्वास घेऊन सर्व विश्वतेची झाली तेथें कर्तव्यानें आपले स्थान रंगविलें-तेथें विवेक हा सजीव असा जीवंतपणाचा, जागती ज्योतच जशी-तेथे ज्ञानाग्नि हाच ह्या कर्तव्यानीं जसा उजविला गेला-ज्ञानच ज्ञानास आणिले-अग्नि हा मनस्वीपणाचा झाला व आता इतर गोष्टी ह्या मागेच पडल्या तेथे कर्तव्य हेंच परम रमणीय असे स्थान घेऊन आल्यानें, ज्यास त्यास तेंच एक प्रिय असे झालें-कर्तव्यच रमूं लागलें-व या कारणानें तेथें ' भेद ' तो काय, फरक तो काय ! तेथे आपले किंवा परा-च्याचें ह्याचें नांवच नाहीं ! मनास तेथें दुजेपण शिवलें नाहीं-कर्तव्यच एक तें सर्व होऊन आलें-ते जे मनोधर्म तेहि पण जसे कांहीं ही कर्तव्याची-कर्तव्य करण्याची जी सीमा तीच मुळीं तृप्ति, रति व

संतोष ह्यांची झाल्यानें, तेथें भेदच मावळला व त्यानें समता हीच पुढे केली-कर्तव्य हेंच एक पुढे झालें व तें म्हणूं लागलें कीं, मीं हें एक जें कर्तव्य तेंच जाणून तेथेंच रमणें करीत आहे. तेथे भेद तो काय किंवा दुजेपण ते कसलें-तेथे मनोधर्मांनीं आपले उत्तीर्णतेस येऊं केले. (२४३)

तेथ अज्ञान सरोनि जाये। आणि यजिता यजन हें ठाये।
आत्मसमरसें न्हाये। अवभृतीं जेव्हां ॥ २४४ ॥
तेव्हां भूतें विषयें करणें। वेगळाले कांहीं न म्हणे।
अघवें एकचि ऐसें जाणे। आत्मबुद्धि ॥ २४५ ॥
जैसा चेइला तो अर्जुना। म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना।
मीचि जाहालों होतों ना। निद्रावशें ॥ २४६ ॥
आतां सेना ते सेना नव्हे। हें मीचि येकु आघवें।
ऐसें एकत्वें मानवें। विश्व तया ॥ २४७ ॥
मग तो जीऊ हे भाष सरे। आब्रम्हपरमात्मबोधें भरे।
ऐसें भजती ज्ञानाध्वरें। येकत्वें येणें ॥ २३८ ॥
अथवा अनादि हे अनेक। जे आनासारिखे येकायेक।
आणि नामरूपादिक। तेहि विषम ॥ २४९ ॥
म्हणोनि विश्व भिन्न। परी न भेदे तयांचें ज्ञान।
जैसें आवेव तरी आनान। परी येकेचि देहींचे ॥ २५० ॥

(२४४) ठाये = संपतात, जेथल्या तेथेंच राहातात अवभृतीं जेव्हा – अवभृथ स्नान = यज्ञ समाप्तीच्या वेळचें स्नान. (२४५) करणे = इंद्रियें अघवें – आघवे (२४६) चेइला = जागा झालेला. (२४७) मानवे–मनवे–मनावे–मानावे = प्रचीतीस येतें, समजते. (२४८) परमात्मबोधें–परमात्माबोध ज्ञानाध्वरें = ज्ञानयज्ञानें. (२४९) विषम = भिन्नभिन्न (२५०) आवेव – अवयव.

तेथें आतां अज्ञान लोपलें : यजन हेंच उभें राहिलें : यजिता हा तेथं पुढे झाला : तेथे आत्मरति हीच समरसून गेली व कर्तव्य केल्यानें जे कांहीं एक स्नानच झालें असें ते यज्ञाचे शेवटचे अवभृथ स्नानच एक तेथें झाल्यानें, आतां अज्ञान हे सरून गेलें व स्नानामुळें एक दिव्यताच ह्या प्रकृतींने पाहूं केली. (२४४)

आतां येथे ‘भूते,’ ‘विषये,’ ‘करणे’ हीं–भूते हीं भूतभाव्य झाल्याने–आपली उत्तीर्णता घेऊन आलीं, तीं आतां भूतें आपल्या योग्यतेचीं झाल्यानें, त्यांनीं ह्या जीवदशेस पंचप्राणरूप बल देऊन आत्म्यास येऊ केलें–तेथे आत्माच तीं झालीं व त्यामुळे त्यांना स्वतःमध्ये व त्यामध्ये काहींच मुळीं फरक हा दिसूंच लागला नाहीं–तीं तन्मय होऊन गेलीं

इंद्रियांचे विषय हे जेथल्या तेथे बसल्यानें–जसे नाकाचा विषय सुगंध घेणें–कानाचा शद्ब ऐकणे–तेथें इंद्रियें हीं आपापल्या विषयामध्यें रंगल्यामुळे, सर्व सुखात मुरुन गेल्याने, तेथे तन्मयता ही इतकी कीं, तेथे समरसणेंच ह्या जीवदशेनें घेतलें व पंचप्राणाचें हें आहेच आहे असे एक आत्मसूत्रच तेथे पुढे झाल्यानें, तें आपले एकलेपणांतच, एकुलतेपणांतच रमून गेल्यानें, तेथें आत्मरतिच ही तल्लीनता

करणें जीं आहेत–उपकरणें जीं आहेत तीं–हात हा एक उपकरणच–वस्तु घेण्यासाठीं योजलेला असा एक करणभारच! तरीं हीं कर्मेंद्रियें ह्यांनीं आपला विश्वभार हाच आकाराचा करून, तेथें दृष्टि स्वरूपीं ठेवून, ह्या कर्मेंद्रियांनीं तेथीलचा भोग घेणें हें असे एकतानतेचें असे आकाररूप : रति

ही आत्मबुद्धीच बोधास आली, एकमेव बोधाची झाली : तेथे भूतें हीं पंचमहाभूतांचीं किंवा विषय हे कर्मेंद्रियें किंवा ज्ञानेंद्रियांचे–किंवा करणें हीं साधनेंच जशीं ह्या आत्मबुद्धीवर आरूढ होण्यास योजनेस घ्यावीं असे म्हणणेच नाहीं : तेथें वेगळेपण हे मुळींच आपलेपणास आलें नाहीं–' वेगळे ' असें तेथें काहींच झालें नाहीं–सर्व एक एकतानतेचें झाल्यानें तेथें आत्मबुद्धि हीच सरसावून पुढें झाली व तिनें आत्म्यासच आलिंगिलें : तेथें भूत, विषय व करण (इंद्रिय) हीं एकत्व घेऊन आलेलीं : करणे हीं जशीं उपकरणेंच = कर्मेंद्रियें पाच व ज्ञानेंद्रियें पाच अशीं दहा हीं करणच, उपकरणेंच (२४९)

असा तो जागा झालेला जो, तो म्हणूं लागला कीं, ह्या स्वप्नामध्यें जी काहीं एक रचनाच जशी एका सेनेची-तेथें ठाकठीक, सर्व व्यवस्थित असें असलेलें-एकाच्या सैन्याचें उभारणेंच-ते सर्व मीच झालों होतों ना ? ही निद्रा हीच तेथे आपण एक कारणच पुढे घेऊन, उभे करून, ते जे रचलेले, सुधारलेलें, असें ह्या बुद्धीचें कौशल्य, तिनें त्या बुद्धीने–ह्या आत्म्यासच एक रूप दिले, तेथें परम परम असे जे ह्या आत्मस्वरूपाचें नटणें- जेथें कठ हाच स्वप्न पाहाणारा–कठामधील जो जागा जीव तो ह्या आम्याचा विलास पाहू लागल्यानें, तेथें ह्या वासनाच जशा ह्या जीवदशेस अनेक जीवानीं नटविलेलीं वासनाचीं शृंगेच जशीं तेथे उभारिलीं गेलीं–हा एक सजीवच तेथें आत्मस्वरूपावर–ओंकारा-वरच–उच्चारावरच–जसे उच्चाराने अनेक स्वरूपे धारण करून जेथें तेथे त्या उच्चारांतच उभा राहणारा : परंतु जागृती म्हणजे जागेपणींच ते तसे भासमान होणारे जे जग तें स्वप्नावस्थेनें पाहिले असता जसे काहीं एक रचलेले असे उच्चाराने पाहिलेले अथवा न पाहिलेले असें अनेक जीवदशानीं घेतलेलें तें रचणे देहधारणा–आकार-देहाची रचना हीच तेथे आपलें मूळ पाहावे म्हणून ह्या जीवदशेस दाखवीतच आहे कीं, ह्या जीवदशेनें घेतलेल जे अनेक होणे हे एका आत्मबुद्धीवरच टेकलेलें कसे ते : येथे आत्म म्हणजे ह जीवित ह्या बुद्धीवर कसे कसे परिणाम करणारे ते त्या जीवचैतन्यानें जसे पाहून ते आता मूळच्या शुद्ध स्वरूपात स्थित झाल्यान,त्याने व एकाचें अनेक होणे हे कसे वासनासभारानें जसे अनेकत्व ह आपले एका जीवचैतन्याचें जसे–तसे स्वप्नसृष्टीने ते जीवित हेंच एकात्मभावाचें जरी तरी अनेकत्वान पाहू केले : स्वप्न हे कंठामधील जी अभिमानी देवता तिनें जसे काय ' स्व 'नपणेच (म्हणजे स्व हेच त्याने मापले, मोजले . तसे एक इंच अथवा फूट अथवा यज हच जसे ह्या जीवितास मोजीत असलेले) केले : स्वजीवित हेच तिने मूळ चैतन्यावर उभे राहून पाहाणे केले, तो त्या चैतन्यास असेच दिसूं लागले कीं, मूळ हे एकच असून त्या एका मूळच्यावरच हे गिणले गेले–गुणिले गेलें–गुणासच गुणिले–गुणानें गुणासच गुणिल्यामुळे तेथे एक ह्या जीवितचैतन्यानें आपलेपणच जसे ह्या देहसृष्टीच्या आधारानें असलेले पाहिले, तो अनेक जीवदशानीं घेतलेलीं जगीं तीं सूक्ष्म बीजे हीं ह्या एकाच्यामुळेच जणूं काहीं जीविल घेऊन असलेलीं अशींच दिसूं लागलीं, परंतु तेथे ह्या एकाच जीवदशेने तीं अनेक स्वरूपे घेतलेलीं आहेत असे एकात्मभावानें असेच ! तेथे ह्या मूळाने जर हालचाल केली, तरच ती सर्व सृष्टी-ती जीवसृष्टीमध्ये असलेलीं अनेक स्वरूपें–ह्या एकाच्या हालचालींनीं जशीं उभविलीं अथवा लपविलीं गेलीं असेच स्पष्ट असणारे त्यानें जेव्हा पाहिले, तेव्हा त्यास अति आश्चर्य वाटलें : त्यास वाटूं लागले कीं, ही सर्व सेना-समुद्रच एक–मीच होऊन आहे–माझ्या हालचालींवरच त्याचें जसे हालणें चालणें ते पाहाण्यामुळे मला तर एक महत आश्चर्यच भासत आहे कीं, मी जो ह्या स्वप्नामध्यें अनेकत्वानें असलेला तो मीच मी आपल्यावर परिणमलेलो असा एकाचा अनेक झालेला होतों (२४६)

तेव्हां आतां जागे झाल्यावर पाहू लागलो तों ती सेना नव्हे–तें सर्व मीच एकटा होऊन आलेलों असाच होतों व सर्व किरव जसे काहीं हें देहधारणेच्या आधारावर उभे असलेलें असून, तेथे मीच एकटा असा सम ह्या विश्वाचा जीवच, आत्माच ! (२४७)

असा तो जीव आतां जीव कसा बरें ! अहो, तो तर अंगुष्ठापासून मस्तकापर्यंत-मुंगीपासून मस्तकापर्यंत—आ म्हणजे सर्व जें कांहीं तें ब्रह्मच परमातमरूप होय असें स्पष्ट दिसूं लागलें-दिसलें-पटलें-बुद्धींत उतरल्यानें बोधच ह्या बुद्धीस झाला : जागीच ही बुद्धि झाली : तिनें शुद्ध सत्वाचें होणें केलें व निश्चयाची तो झाल्यानें ह्या बोधास घेऊन जागेपणास आली : जागी झाली : व म्हणूं लागली कीं, अथपासून इतिपर्यंत सर्व कांहीं हें ब्रह्मच आहे, तें परमात्म स्वरूपच आहे ! असे ते ज्ञानाचें उपासक-यजनकर्ते जे अध्वर्यु-होते हे तेथें एकपणानेंच पाहाणारे-ह्या सर्व सृष्टीस एकत्वानें पाहाणारे असेच होऊन असतात. (२४८)

अथवा हें जें अनेक तें अनादि असेंच जसें एकासारखें एक, दुसरें जे तेंहि पण ह्या एका सारिखेंच एक-एक जरी दुसरेपणानें असलेलें तरी-तेथें अनेकत्व हें दुसरेंपणास पाहाणारें-आन आन पाहाणारें जरी, तरी एकासारिखेंच एक असल्यानें, तेथें नामरूप आदिकरून हेंहि पाहों गेलें, तरी विषय असेच दिसणारे, तरी पण दुसरेपणानें एकाचे झालेले असेच. (२४९)

या कारणास्तव हें विश्व जरी भिन्न असे, तरी त्याचें ज्ञान जें आहे तें मात्र कांहीं केल्या 'भेद' पाहाणारें होतच नाहीं : त्याचें मूळ जे ज्ञान तें भेद पाहात नाहीं : भेदणें हें जसे कांहीं ज्ञानानें घेतलेलें दुसऱ्या ज्ञानावर उभें राहाणें तें त्यांना ह्या मूळ ज्ञानानें स्थिर केल्यामुळें-बोधच तेथें दृढ झाल्यानें-त्याजवर दुसऱ्या बुद्धीनें भेदाचे ठसे उमटतच मुळीं नाहींत : ह्या ज्ञानबोधानें सर्व ब्रह्मच जसें आत्मस्वरूपींच विलसणें केल्यानें त्याचें केवळ ज्ञान हें भेदले जातच नाहीं : तेथे भेदभाव हा पाहिला जात नाहीं : भेदभावानें तें त्याचें ज्ञान हे परिणाम केलें जातच नाहीं : कारण एकाच देहाचे अवयव हे आन म्हणजे दुसरे-जसे हातपाय इत्यादि हे एकाच देहाचे असल्यानें, तेथें हात म्हणजे पाय नव्हे ? किंवा हातास लागलें असता पायास लागत नाहीं ? म्हणून काय ह्या जीवदशेस ह्या देहास तें एकाच देहाचे अवयवाचें असणें तें परिणाम करतेंच : एकाच देहीचे अवयव ते असल्यानें, तेथें हातास लागलें तर जीवितास लागणारें असेंच ! दुःख हें देहीसच होणारें असल्यानें तेथें पाय हेहि पण-जर हातास लागलें तर-तेथीलच्या चैतन्याचें जें परिणाम केलें जाणें-जीवदशेने घेतलेलें जें जीवित तें येथें ह्या हाताच्या त्रासामुळें सर्वच्या सर्व गात्रेंच मुळीं-अवयवच मुळीं गोळा केलीं जाणारीं-परिणाम केलीं जाणारीं झाल्यानें-तेथें एकच जीवित हें ह्या काय हातास लागलें किंवा काय पायास टोंचलें, तरी सर्व जीवितच भेदलें गेलें असें जीवित चैतन्य हें केव्हांहि जीवितच ! तेथें अवयवानींच तें एकाच देहीचें असें असलेलें, तेथें जीवित्व हेंच परिणाम केले जाणारें ! काय ह्या हातास लागलें तर निराळें एकादें जीवित परिणाम केलें जाणारें-किंवा पायास लागलें तर तिसरेंच जीवितास लागणारें असें नव्हेच ! म्हणून एकाच ह्या जीवितास लागणारें-कळणारें-समजणारें-तें जे हाताचें किंवा पायाचें भेदणें हें सर्व जीविताचें होय-तेथें हातहि आले, पायहि आले, सर्व कांहीं अवयव जे तेहि पण आले : असे सर्व त्या एक जीवितावरच जसे परिणाम होणारें-केले जाणारे असें ते भेदणें हें.

तेथें दुसऱ्याच एखाद्याचें जीवित आलें-किंवा एकाद्या दुसऱ्याच जीवसृष्टीवर अथवा वृक्षयोनीवर तें परिणाम करणारें झालें असें होत नाहीं : परंतु जीवदशा हीच तेथे परिणमलेली अशी असल्यानें, तेथें देहादेहाच्या आधारानें असलेल्या त्या अवयवांवर मात्र जीवसृष्टीमधील जीविताचें जें जन्मणें अथवा मरणें हें परिणाम करणारें होतें, परंतु तेथील ज्ञान हें मात्र एकच एक ज्ञान-हें एकटेंच एकलेंच-तेथें तें मात्र केव्हांहि कधींहि भेद केलें जाणारें होतच नाहीं-ज्ञान हें भेद पाहातच नाहीं : बोध हा बोधरूपच ! जागा झालेला तो काय निद्रिस्त असा नाहींच ! स्वप्नामध्यें असणारा तो जागेपणानें असलेलें जें व्यवहारणें तें घेतच नाहीं. म्हणून तेथें ज्ञान हेंच परम बोधरूप होऊन असल्यानें, तेथें बोध हा बोधच !

ज्ञान तें ज्ञानच ! तो ' मर भरून ' असल्यानें त्यास केव्हाहि बोध येतो किंवा त्याचा भेद केला जातो असे केव्हाहि नाहीं : बोध तो बोधातच स्थिर होऊन असतो : ज्ञान तें ज्ञानच सर्वथैव. (२५०)

कां शशक सानिया थोरा । परी आहारीं येकाचि तरुवरा ।
बहुरश्मि परी दिनकरा । येकाचे जेवीं ॥ २५१ ॥
तेवीं नानाविधा व्यक्ति । आनानें नांवें आनाना वृत्ति ।
ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेद्या मातें ॥ २५२ ॥
येणें वेगळालेपणें पांडवा । करिती ज्ञानयज्ञ बरवा ।
जे न भेदती ह्या जाणिवा । जाणते म्हणोनि ॥ २५३ ॥
ना तरी जेथवां जिये ठायीं । देखती कां जें जें कांहीं ।
तें मीवांचूनि नाहीं । ऐसाचि बोध ॥ २५४ ॥
पाहे पां बुडबुडा जेऊता जाये । तेऊतें जळ एक तयातें आहे ।
मग विरे अथवा राहे । तऱ्ही जळाचि मार्जी ॥ २५५ ॥
कां पवनें परिमाणु उच्चलिले । ते पृथिवीवेगळे नाहीं गेले ।
आणि मागुतें जरि पडिले । तरी पृथ्वीचिवरी ॥ २५६ ॥
तैसें भलतेथें भलतेनि भावें । भलतेंहि अथवा न होआवें ।
परि तें मीचि ऐसें आघवें । होऊनि ठेलें ॥ २५७ ॥

(५१) सानिया थोरा = लहानथोर रश्मि = किरणें येकाचे - येकाचियें. (२५२) नांवें - नामे भेदला भूतीं = भिन्नभिन्न भूतामध्यें. (२५३) जाणिवा = ज्ञानाला. म्हणोनि - म्हणऊनि. (२५५) एक तयाते आहे - तया एक आहे. (२५६) परिमाणु = बारिक कण पृथिवीवेगळे - पृथ्वीपणावेगळे. वरी - वरुते.

येथे बोलण्यासारखे म्हणजे ते कसे ह्या मनानेंच घेतलेलें हे देहाचें रूप असे: तेथें मन हेंच जणू सर्व संसार करीत आहे असे असलें, म्हणजे त जे वर बोलणें केलें त्यास काहीं महत्त्व हें आहे किंवा येईल हें केव्हां बरे ! येथे जर मनुष्याने ह्या मनोधर्माची छाननी करून तेथे जे काहीं ह्या मनास आवडणारें जे रतीचें एक सुखसमाधान तें असे काहीं एका तृप्तीसच आले : तेथें ही देहधारणा म्हणजे आनंदाचें, क्रीडेचें एक स्थानच असे असे होऊ लागल्यानें, सर्व आनंदच तेथे उगवूं लागून मग ती पूर्तता हीच जशी कांहीं ह्या देहास स्थिर करणारी होय : म्हणून येथे जर ह्या मनोधर्मासच अग्रोदर पाहाणें करून मग जर का ह्या वर म्हटलेल्या स्थितीस अनुभवण्याचें केले, तर मग तेथे तें जे बोललेलें ' न भेदे तयाचें ज्ञान ' हें ज्ञानच एक केवळ असे शद्वावर उभें राहिलेलें, ते शद्व म्हणजे एक वाक्यच जसे सर्वच्या सर्व ह्या देहास उचलून भरून तेथे वामणारे असे . तेथे केवळ हेच रूप त्या ज्ञानास आल्यानें, तेथे भेदणें हे सर्व कांहीं एक सहज सेवानदानें घेरलेलें असल्यानें, तेथें सर्वच्या सर्व देह हाच जसा सर्व अवयवांना व्यापून असलेला व एकाच वृत्तीवर टेकलेला असल्यानें, तेथे हे मनच जसे पायीं रत होणारे असे-भेद नच घेणारें असे.

मन हेंच मुळीं ह्या भेदसृष्टीचा एक कांटाच तोलणारा असल्यानें, तेथे भेदभाव हा कांहीं केल्या पुढेच येऊं दिलेला होत नाहीं-म्हणून वर जे म्हटलेलें एक एकात्मतेचें होणें हें बुध्दिसृष्टीनें सर्व भार हाच जसा सर्व सृष्टीच घेणारा होऊन, येथें जीव हा पायीं लोळण घालणारा असा ! किंवा जसा कांहीं तो जीव हा दमच धरून असलेला कीं, ह्या अशा आत्मतेच्या क्रीडेंतच आपल्यास बसण्यास मिळावें व

म्हणून तेथे जशी काहीं एक लोळणच ! व ती लोळण घालण्यास आपणास केव्हां बरें मिळेल म्हणून नेहमीं दम धरून असलेला असाच पाहण्यांत येतो

एकच बुद्धि किंवा एकच वृक्ष हा अनेकशः लहान मोठ्या खांद्यांनी शोभविलेला असतो. तेथें जरी अनेकशः त्या खांद्या–फांद्या असल्या, तरी तो वृक्ष जसा एकच एक, तसें येथें ज्ञानबोधाचें एकच होणें तें भिन्नभिन्न विश्वांनीं नटलेलें असें जरी असलें, तरी तेथें त्या मूळच्या ज्ञानासच तें चिकटून असणारें होय

अनेकशः रश्मी म्हणजे किरण हे जरी दिनकरास–सूर्यास–दिनकरनाथास–असतात, तरी तेथें काय अनेकसे सूर्य हे नव्हतच–तेथे एकच सूर्य ! तोच मुळीं ह्या अनेकशः किरणांनीं विराजमान होणारा असल्यानें, तेथें अनेकशीं किरणें हीं काहीं तेथें अनेकसे सूर्य आहेत असें म्हणताच येत नाहीं· तेथें एकच सूर्य किरणद्वारा अनेकां ठायीं प्रकाशित होणारा असल्यानें, तेथें विश्व म्हणजे सूर्यकिरणें हीं त्या एकाच केवळ ज्ञानसूर्याचीं होऊन असलेलीं : तेथें ज्ञानबोध सूर्य हा केव्हाहि भेदला जाणारा होतच नाहीं (२५१)

येथें अनेकविध–नानाविध–व्यक्ति जरी असल्या तरी,–तेथें आन आन नावें असलेलीं–वृत्ति ह्याहि पण आन आन म्हणजे निरनिराळ्या अगा जरी असल्या, तरी मी जो अभेद आहे, त्यासच अनेक रूपानीं जसे नटविलें–तेथें भूत हींच भाव्य झालेलीं व पंचप्राणानीं प्रकाशरूपी जीवदशेस–आलेलीं असल्यानें, तेथें ज्ञानी जे आहेत ते म्हणतात कीं, भेदला म्हणजे आत्मानंद अनेक रूपांचा झाला–ह्या भूताचा भेद करून–ह्या भूताना साम्ययोग्य पाहूं केल्यानें, तेथें पंचप्राण हेच जीव व प्रकाश घेऊन आहेत व तेथ मीच जी रूप घेऊन आहे, जो ज्ञानस्वरूप घेऊन आहे, केवळ ज्ञानबोध असा जो मी आहे, तोच जसा काहीं अनेकत्वानें भेदला गेला. तेथें पण महाभूताचें भाव्य झालेलें तेंच जसें एक भूतास भूताची योग्यता दिली व आता जीवचैतन्यानें एक समसमा किंवा सामावलें जाणें (भूतानें भूतात) हेंच प्रकाशाचें झाले–जीवचैतन्याचें झालें–अनेकत्वानें व्यक्तित्वास आलें : तेथें ज्ञानबोध हा एकलाच असा असून, तेथें मीच तो आता अनेकत्वानें दिसूं लागला : तेथें प्रकृती हीच आता भक्ति झाली, व तिनें हसयोगच पाहिला तेथें ज्ञानबोधच सूर्य असा–जगाचा डोळाच जसा–आत्माच एक असा ! ! (२५२)

असे जे 'जाणणें' कीं प्रकृति ही भक्ति होऊन आली, तिनें हंसव्रतच घेतलें, व आता 'अभेदा मातें' तें जाणूं लागून एक जाणतें झाले परंतु जाणतें झालें म्हणून त्यानीं त जाणतेपण काहीं भेदण्याच केलें नाहीं : तेथें हीच एक विशेषशी गोष्ट म्हणजे तें जाणतेंपण हें नच भेदण्याचें करण्याचें होय: जाणतें झालें म्हणून काय तें जाणतेंपण हे भेदवून घ्यावें ?

असे तें पृथक्तेनें, निरनिराळेपणानें, वेगळेपणानें जरी तें अभेद भक्तीचें झालेलें तें एक ज्ञान हेंच केवळ तेंच मुळीं बोध ! तेथेंच ते रमून राहिले : त्यांनीं आतां जाणतें म्हणून तें जें बोधामृत किंवा ज्ञानामृत हेंच भेद करून पाहूं या असे म्हणणेंच नाहीं : त्यांनीं त्या बोधास भेदण्याचें केलें नाहीं : ते ज्ञानच होऊन राहिले : म्हणून येथें अत्यत अशा प्रशंसेची एक गोष्ट ह्या अभेद भक्तीच्या पाठीमागे लपलेली ती म्हणजे ज्ञानानें अस . बोधाचा सर्वथैव असाच होऊन ऐस : केव्हाहि ह्या जाणिवेस–ज्ञातेपणास–जाणतेपणास–भेदाचें करूं नको : केव्हाहि त्या बोधास सोडूं नको. हीच गोष्ट हरघडी डोळ्यासमोर टेवून त्यानीं त्या बोधाचें सर्वथैव असेच होऊन असणें हेंच त्यांना महत्त्व देऊन, तेथे बोधच जसा बोधास आणिला : बुद्धितत्त्व हेंच असें शुद्ध अभेद करून घेतलें : बोधितव्य हेंच त्यांनीं अभ्यासी–अभ्यासाचें–केलें : अभ्यस्त केलें : म्हणून येथें जाणते जे त्यांनीं केव्हांहि आपले मोठेपणास, जाणिवेस, ज्ञानास टाकून देऊं नये : त्यांनीं इतर गोष्टींचे होऊं नये : येथें हेंच नेहमीं डोळ्यांत तेल

घालूनच जसे तेथीलचें एक होणें हेंच जाणिवेसच ज्ञानाचें पुढं चढविणारें होतें हें नीट लक्षात ठेव : खूब लक्षात असूं दे : (येथेंच 'निजवृत्ति न सोडावी' हेंहि लागू पडतं) : येथे वेगळालेंपण हेंच वरचेवर नडवितें म्हणून स्वतःस येण्यासच केव्हांहि जेव्हां तेव्हां करील जा : पृथक्तेचें, आनपणाचें, बहुविधतेच, निराळेपणाचें असे जें तेंच समजून घे व अभेदत्व हें सामाळून ऐस (२५३)

हेंच दुसऱ्या तऱ्हेनें बोलणें म्हणजे जेव्हां म्हणून ज्या ठिकाणीं असाल-तें जाणते जे, जेव्हां ज्या ठिकाणीं असतात-तेथे त्यांना जे जें कांहीं पाहाण्यास मिळतें, तेथे त्यांनीं मजवांचून कांहीं पाहिलेंच नाहीं-तेथे त्यानीं मीच आहे अमेंच समजून ते मजमींच गोष्ट करून असतात-व हाच बोध त्यांनीं स्थिर करून त्यातच ते बसलेले असतात (२५४)

असे जरी सहज बोलणें केलें, तरी बुद्धि हीच मुळीं आपली शुद्धि ही हरविणारी झाल्यानें, तेथ तिजला मुळीं हा वेध लागून ती स्वतःसच हरविते-असे तिनें स्वतःस हरवूं नये म्हणून आणीक एक तऱ्हेनें आता हेच सांगितलेलें तें कसे बरें-तें म्हणजे जसा एखादा बुडबुडा हा जिकडे जिकडे म्हणून जातो, तेथे त्यामध्ये एक पाण्याचा थेंबच भरून असतो, तेथे मग तो बुडबुडा विरून जावो, अथवा तसाच जरी राहिला, तरी तो पाण्यामध्येंच मुळीं तसा तो बुडबुड्याच्या रूपानें असलेला अथवा विरलेला होऊन असतो.

तसे येथे ह्या जीवदशेचें जे असणें तें म्हणजे ह्या भूतामध्यें भून मिळून जाऊन त्यानें साम्य-योगास पाहिलें व आतां पंचप्राणानीं ती जीवदशा जशी कांहीं ह्या स्वरुपावरच उभी केली. तेथें ज्ञान हेच काय तें ह्या स्वरुपावरच चालतें बोलतें होणारे, परंतु तेथे तें जें बोलणें हें ज्या आधारानें असलेलें तो आधारच मुळीं जेव्हा तेव्हां पाहाणें केल्यानें, तेथें मग ती जीवदशा हीच मुळीं अनुभवानें सर्वथैव ह्या ज्ञानाची झाल्यानें, तेथे ज्ञानच काय तें एक-जळच एक जसें-तसे हें जीवदशेचें प्रकारणें हें कसे ओघा-ओघानें आपल्या अभेदत्वास येतें, ऐक्यास पाहातें, तें समजणारे होतें, तेथे ज्ञान हेंच एक! तेथें भेदणे नाहींच! नकोच! (२५५)

हें बोलणें कसे म्हणाल तर जसें कांहीं वारियानें-पवनाच्या योगानें-उचलिले जाणारे परमाणु-मनपवन हाच जसा कांहीं तेथे महत्त्व घेऊन असलेला-तेथे जे कांहीं परमाणु, सूक्ष्म असे कण, मातृका, ते पृथ्वीपणाचे सर्वथैव असेच-विश्वाचे अमेच होऊन असलेले ते काहीं विश्वाहून वेगळे केले जातच नाहींत-ते जेव्हां ह्या आरंभास पाहणारे, तेव्हा ते काय विश्वावेगळे उचलिले गेले असे नाहींच-जेव्हा ते जसे उचलिले गेले, तेव्हां ते विश्वावेगळे नच होऊन असलेले व जेव्हा पुन्हां परत पडले, विसांवले, तरी ह्या विश्वातच-पृथ्वीवरच पडणारे होऊन असलेले-ह्या विश्वावरच ते विसावून असलेले-विश्वा-तच पडलेले असेच असतात. (२५६)

तेथें आता कोठेहि, भलत्यासलत्याहि पण अनुस्थितीने, किंवा भलत्याहि एकाद्या भावानें-शद्बानें-दिठ्यानें-भलत्यानेंहि तेथें यावे, व्हावें, तें भावानें होऊन असावें-असे भलतेंच जरी होणें झालें अथवा नच होणें झालें, तरी तेथें आतां तें भावणें-अनुवृत्तीनें असणें-अनुष्ठानाचें होणें तें तें मीच सर्व कांहीं-अवघे ते मीच होऊन गेले : बोधच असा कांहीं बोधाचा झाला कीं, तेथें आतां भलत्याहि ठिकाणीं, भलत्याहि कोणीं, भलत्याहि प्रकारानें भावणें जरी झालें, तरी तें बोध-ज्ञान-हें भावास आलेलें असे मीच तें होऊन गेलें-मीच तें होऊन आहे असेंच-तें तसे मीच होऊन असतें-होऊन आलें-तें, ज्ञान मीच होऊन तें तेथें उभेच झालें जसे. (२५७)

अगा हे अेव्हढी माझी व्याप्ति । तेवढीच मयांचि प्रतीति ।
ऐसें बहुधा कीर वर्तती । बहूचि होऊनी ॥ २५८ ॥
हें भानुबिंब आवडे त्या । सन्मुख जैसें धनंजया ।
तैसें तें विश्व ययां । समोर सदा ॥ २५९ ॥
अगा तयांचिया ज्ञाना । पाठीपोट नाहीं अर्जुना ।
वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ॥ २६० ॥
तैसा मी जेतुला आघवा । तैंचि तुक तयांचिया सद्भावा ।
तरी न करितां पांडवा । भजन जालें कीं ॥ २६१ ॥
येऱ्हवीं तरी सकळ मीचि आहे । तरी कोणें कें उपासिला नोहे ।
हें एक जाणणेंविण ठाये । तयां अप्राप्तीसी ॥ २६२ ॥
परी तें असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितसांते ।
उपासिती मातें । ते सांगितले ॥ २६३ ॥
अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पितसें मज येकीं ।
कीं नेणणियासाठीं मूर्खीं । न पविजे मातें ॥ २६४ ॥

(२५८) ऐसे – तैसे. बहुधा कीर – बहुधाकार, बहुधाकारी. बहूचि – मीचि (२५९) आवडे तया = पाहिजे त्याला. विश्व – विश्वा. (२६०) पाठीपोट = मागेपुढे, आतबाहेर. (२६१) तुक – तुर्क = प्रमाण. (२६२) कोणें – कवणीं. हें एक – येथ एके " "" = ज्ञान नाहीं म्हणून मी दुरावला आहे. (२६४) अर्पितसे – अर्पत असे. पविजे – पविजेचि.

अगा हे अर्जुना, ही माझी जेवढी म्हणून व्याप्ति आहे-तेवढी ही त्याची प्रतीति होऊन असते-असे ते बहुधा, बहुविध आकारीं, आकारांमध्ये वागून असतात-ते स्वत.स तेथे वर्तवितात-स्वतःचे वर्तन हे त्यांनीं आकारामध्यें वागून प्रतीतीचें केलें व आता ते बहुच झाले, मीच बहु असा झ.लो-तेथे कामकला हीच जणूं आकाराची होऊन तिनेंच बहुपण हे माझेंच सर्वथैव असेच करून ठेविले (२५८)

हें भानुबिंब जें आहे तें ज्यास आवडतें-तेच नेहमीं पाहावे असे ज्याचें मनाने घेतले आहे-प्रसन्नपण तेथें त्यांना तेंच नेहमीं दिसणारें-असे, हे धनंजया, असतेच, होतेच-त्याची ती आवड जी तीच त्यांना त्या एका बिंबासच नेहमीं पाहाणारी झाल्यानें, तेथे त्यांना ती बिंबात्मता ही नेहमींच भेटणारी होते-तसे येथें हें जें विश्वाबद्दल सांगणें केलें, तेथे ते विश्व हे त्यांना नेहमींच्या नेहमीं समोरच आहे-असें तें सामोरें होणारेंच जसें असे त्यानीं तें विश्व पाहाणें करूत तेथेंच ते राहू लागले-ह्या विश्वाला, ह्या विश्वास ते सदा समोर असेच पाहाणारे होऊन असतात-विश्व हें त्याना सदा समोर असेच होय : (येथें काय त्या मुखाची सोयच जशी ह्या विश्वानें उच्चाराची करुन तेथें बिंबच एक लक्ष्य असे सदा समोरच असणारे.) (२५९)

तेथें ह्या ज्ञानास कांहीं पोट निराळे व पाठ निराळी असें नाहींच ! त्यांच्या ज्ञानानें बोधरूप झाल्यानें तेथे आतां नेहमीं समोरच असे तें ज्ञान (मुख) झाल्यानें, तेथें सर्वांग हें त्या विश्वाचें झाले, मुखाचें झालें, ज्ञानास आलें, बोधाचें झालें : गगन हें वायूनें व्यापिलें म्हणजे तेथें सर्व गगन हें वायूने व्यापिले असेच होऊन असतें, तसें येथें ते जें चिद्‌गगन हें मनपवनरूपी वायूने जेव्हा व्यापून असलेलें होते, तेव्हां तेथे एक ज्ञानच ! तेथें काय पाठ किंवा पोट असें निराळें नाहींच : तेथें पाठ हेच पोट (पाय) झालें : कसें निपीट दिसत आहे : एकदम उत्तर देण्यानें तेथें वांझट म्हणाल : मस्तक तें पाय झालें, व तेथेंच हृदयानें वस्ती केली-असे तें त्यांचे ज्ञान सर्वांगीं वसलेलें होऊन असतें.

[ नवल एक देखिली लीला ॥ पाठ तेचि झाले पाय । कैसें दिसताहे निपोट । पाहतां दिसे बरवट । झणें वाझट म्हणा या बोला ॥ मस्तक तेचि झाले पाय । तेथेंचि हृदय दिसताहे ॥ तया नाठवे बाप माय । पाहतां जाय पुण्यपाप ॥ (एकनाथ) ] (२६०)

तसा मी जेवढा सर्व काहीं तोच जसा तोलून धरून तेथें भाव हाच त्या सत्स्वरुपावर उभा केल्यानें तेथे तुलनाच झाली ह्या ज्ञानाची व ह्या सद्भावाची-तेथें आतां प्रत्यक्ष भजन नच जाहलें, तरी हेंच तें भजन जाहलें-ह्यासच भजन म्हटलें-सहज भजन झालें : भजन नच करिता हेंच सद्भावाचें झालेलें तेंच भजन म्हटलें गेलें : म्हणून येथे मी जेवढा जसा तो आता भजनास आला ह्या सत्स्वरूपावर उभा केलेला जो भाव त्यानें-म्हणून, हे पांडवा, हें भजन समजून घे व तेथेंच रम-तेथेंच ऐस-तेंच होऊन राहा (२६१)

एरवीं पाहिलें असता सर्व हें जें काहीं आहे तें मीच जरी, तरी जर प्राप्ति नाहीं-अप्राप्तपण जर का तेथे पुढे झालें जो ह्या प्राप्तींत बसला नाहीं-त्यास हें सर्व काहीं जे तें नच जाणलें गेलें-तें ज्ञानाचें नच झालें-असे झाल्यानें तेथे कोण बरें-कोणीहि तो-कशाहि तऱ्हेनें उपासिला गेलाच नाहीं-उपासिलेल्या होतच नाहीं. तेथें जाणणेंच नाहीं, जाणतेपण नाहीं, ज्ञान नाहीं, असे तें जाणल्याशिवायच असलेलें होऊन राहात. (२६२)

परंतु ते असो ! येथें योग्य जे-औचित्य जे-तें करणेंच योग्य असे जाणल्याचें लक्षण-ज्ञान्याचें लक्षण हे त्वरिततेचें, तेव्हा त्यातच बसल्याबरोबर ते कसे उपासिलें जातें तें सांगितलें-हा ज्ञानयज्ञच यजिला-जाणणें जे जाणतेपण घेऊन आलें, ते आता बरोबर रीतीनें उपासिलें गेल्यानें, तेथे सर्व काहीं योग्यतेस आलें-तें ज्ञान झालें तें जाणतें झालें-तें प्राप्त झालें-असे जे कांहीं होणारें, होत असलेलें, तें आता सांगितलें. (२६३)

सर्व हें नेहमींच्या नेहमींच अखंडतेने सर्वांच्या मुखामध्ये वास करीत असलेलें असे आहे तें सहजपणानें उपासिलें गेलें म्हणजे मजला तें अर्पण होतें-मीच तेथें उगवतों, व आता उपासना हीच अर्पण झाली व तेथे मुखच जे-सकळाच्या मुखामध्यें वास्तव्य करून असलेले तें मुखींच अर्पण केलें. सर्वांच्या मुखामध्यें असणारें असे तें अखंडतेनें सर्व कांहीं असें ' सकळ ' हें मुखामध्येंच जेव्हा अर्पण होतें-मुखानें मुख मुखांतच अर्पण झालें-सर्वांच्या मुखींच तें जेव्हां मुख असें तें मुखच एक असे अर्पण केलें-अर्पण झालें, तेथें मजलाच तें अर्पण होत असून-तेथे मीच मुखाचा होऊन-मुखीं मुख-असे तें माझें मुखरूपाने येणें अथवा असणें हें-अर्पण केलें असेच-मजलाच तें दिलें-मजलाच त्यानें मुखाचें केलें असें-मुख हे जरी तरी तेथें ह्या सत् भावानें बोलिलेलें-आतां तें बोलणें केलेलें जें मुख तें मुखीं मुखच बसलें-मुखीं मुखच आलें-भावाचें झालें-उपासिलें गेलें, ही उपासनाच एक झाली : तेथे बोलण्यानें-मुखाच्या बोलण्यानें-तें प्रधान गात्रच जसे भाव पाहूं लागल्यानें-भावाचें झाल्यानें-भावाचें केल्यानें-तेथे आता ज्ञानच एक जें अखंडतेनें असलेलें तें मुखासच आलें-सगुण झालें-उपासनाच ती झाली-अर्पणच एक जसें ' मुख ' केलें व आतां ' सर्व ' मुखीं तें मुख बसल्यानें तेथें अर्पण हें भावाचें झालें-प्रेमाचें झालें-हेतूचें झालें-उपासना एक येथें सिद्धतेस आली-सिद्ध झाली : म्हणून मुख हेंच मुखासच भावाचा साज करितें-त्यास सगुण करितें-सहज उपासना येथे झाली-अर्पणच एक तें देवास मुखरूपानें झालें-तेथे सहज देवपण उगवलें.

परंतु ' नेणणें ' यामुळें त्या मुखरणाराचें मला पोहोंचणेंच होत नाहीं : नेणण्यानें लाज आली व आतां मी जवळ नच आल्यानें तेथें एक मूर्खपणच पदरांत पडणारें होतें : म्हणून जाणता हो : नेणतपण पाहूं नको : वृत्तीवर असत जा : म्हणजे हें जाणणें तुजला सांपडेल व ममच हें पदरांत पडणारें होईल !! (२६४)

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमौषधम् ।**
**मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥**

क्रतु = श्रौत. यज्ञ = स्मार्त. स्वधा = पितृ. औषधम् = वनस्पति. मंत्र = मंत्रजाळ, पितराना अवदान. आज्य = तूप. अग्नि = अग्नि (संयमादि). हुतम् = आहुती, हवन जे

अहम् क्रतु : अहम् यज्ञः अहम् स्वधा अहम् औषधम् अहम् मन्त्रः अहम् एव आज्यम् अहम् अग्निः अहम् हुतम् ।

श्रौतयज्ञ जो तो मीच आहे · स्मार्तयज्ञ तसेच पितृयज्ञ मीच आहे · वनस्पति म्हणून जी औषधरूपाने असलेली तीहि पण मीच तसेच मत्रहि मीच, आज्य मीच मी अग्नि आहे व आहुतिहि पण मीच आहे · हवन जें झालेलं तेहि मीच आहे. ( १६ )

**तोचि जाणिवेचा उदयो जरी होये । तरी मुद्दल वेदु मीचि आहे ।**
**आणि तो विधानातें जया विये । तो क्रतुहि मीचि ॥ २६५ ॥**
**मग तया कर्मापासूनि बरवा । जो सांगोपांगु आघवा ।**
**यज्ञ प्रगटे पांडवा । तोहि मीचि ॥ २६६ ॥**
**स्वाहा मी स्वधा । सोमादि औषधी विविधा ।**
**आज्य मी समिधा । मंत्र मी हवी ॥ २६७ ॥**
**होता मी हवन कीं जें । तेथ अग्नि तो स्वरूप माझें ।**
**आणि हुतक वस्तु जें जें । तेंहि मीचि ॥ २६८ ॥**

(२६५) विधानाते = विधिअनुष्ठानाला क्रतु = यज्ञ. (२६७) स्वाहा = देवास हवि देण्याचा मंत्र स्वधा = पितरांस हवी देण्याचा मंत्र. आज्य = तूप. (२६८) हुतक वस्तु = होमद्रव्य

म्हणून येथें ' जाणणें ' जे त्यावर केवढा बरे विश्वास दिला. सर्व श्वसन हेच जसं त्या जाणण्याचं होऊन आहे असे ते जाणणें–जाणतेपण–ज्ञान ! ह्या जाणण्याचा जर उदय झाला, तर हे तेथे स्पष्टच होऊन असतें कीं, वेद जो तोहि मीच होय तेथें जें कांहीं विधान, क्रिया, विधिरूपानं उगवणारं–वियालेंपण घेणारे–उपजणारें ते जसें कांहीं श्रुतिच येथें (माऊलीपण घेऊन असलेली) मूर्त झालेली–तीच मी हें स्पष्टतेचे झालें : तेथे क्रतु म्हणजे क्रम हाच आक्रमतु–आक्रमिजे–असे जे गुणाचें ते सर्व एकत्र होऊन तेथे गुण हाच संपणारा झाला व आतां ज्ञानच–जाणणेंच–उदय घेऊन आलें. (२६५)

येथे जणिवेचा उदय जो सांगितला, तो जसा कांहीं एक भावच उगवला : तेथे भक्तिरूपी बहीण हीच श्रीगुरूंचें ऐश्वर्य पाहाणारी असल्याने, तेथे लग्नच एक तऱ्हेनें लागलेले होतें : आतां ज्या कांहीं लग्नाच्या गोष्टी स्थूल दृष्टया पाहविल्या जाणाऱ्या त्या येथें मुळींच योगास येणाऱ्या किंवा उपयोगाच्या होणाऱ्या होत नाहींत : येथे ज्ञानबहिणीचें ऐश्वर्य हें भावास सुरंगतेनें करून असल्याने, तेथे प्रेम हें सीमा पाहाणारें झाल्याते, प्रकृतीनें घेतलेलें जे अतितर गम्य तेंच येथे प्रसन्न होऊन तेथे श्रीमुख हेंच मुखास आलें, मुख मुखाचें झालें, तें प्रेमांत आलें, प्रेमाचें झालें, तेथे श्रीच जशी ते तसें होऊन आलें, ते श्रीच झालें व आतां श्रीनें इंवरिलेले तें मुख श्रीचें झाल्यानें, तेथें ऐश्वरम् हें ऐश्वर्यच पाहूं लागल्याने, तेथें सौंदर्य हें तेजवान सुंदर झाले–तेथें प्रकृति ही प्रसन्न झाली व त्यामुळें सूक्ष्म असे जे प्रेम तेच बोलास येऊं लागल्यानें, तेथें ' जाणीव ' ही आतां उमेदपण घेऊन धीट झाली व आपल्या कामांतच नेहमीं राहण्याचा तिचा तो संकल्पभार अथवा आरंभगौरव हा त्या जाणिवेस आतां ' ज्ञान ' म्हणूं

गितले॥६३॥ आखंड सकळ हे सकळा मुखि॥ सहजें अर्पित से मज्ज येकी॥
किं नेणणीया साटीम रिघे॥ न पवीजे माते॥६४॥ श्लोक॥ ॥अहं क्रतुर
हं यज्ञस्स्वधाहमहमौषधं॥ मंत्रोहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतं॥१६॥
टीका॥ ॥तो चि जाणिवेचा उदयो जरि होय तरि मुद्दल वेदु मि चि आहे॥
आणि ते विधानातें जया विये॥ तो क्रतु हि मी चि॥६५॥ मग तया कर्मोपा
सूनि बरवा॥ जो सांगोपांग आघवा॥ यज्ञ प्रगटे पांडवा॥ तो हि मि चि॥६६॥
स्वाहा मी स्वधा॥ सोमादि औषधि विविधा॥ आज्य मि समिधा॥ मंत्र मि हवि॥ ६७
होता मि हवन कीजे॥ तेथ अग्नि तो स्वरूप माझे॥ आणि हुतक वस्तु जें जें ॥
ते हि मी चि॥६८॥ श्लोक॥ ॥पितामहस्य जगतो माता धाता पितामह॥
ह॥ वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च॥१७॥ टीका॥ ॥पैं जयाचे
नि अंगसंगे॥ इये प्रकृतिस्तव अष्टांगे॥ जन्म पावीजे सजगें॥ तो पिता मी ग त
॥६९॥ अर्धनारिनटेश्वरी॥ जो पुरुष ते चि नारी॥ लवि मि चि चराचरी॥ माता
हि होय॥७०॥ आणि जाले जग जेथ राहे॥ जेणे जीवि याढत आहे॥ ते मि
वाचुनि नाही॥ आन निरुते॥७१॥ इयें प्रकृति पुरुष दोन्ही॥ उपजलि जया

लेखकाजवळ असलेल्या हस्तलिखित पोथीच्या ९ व्या अध्यायातील अक्षराचा नमुना

लागून ती आपल्या कामांतच गुंगून गेली-रमूं लागली-रमली-व त्यामुळें प्रसन्नता हीच चोहोंकडे नांदं लागून ती जाणीव आतां हाच यज्ञ होय असेच घेऊं लागून बरवपण हेच ज्ञानास आलें : तेथे नसल्याच कर्मयोगापेक्षां हा जो यथासांगतेन सागितलेला यज्ञ तो ह्या जाणिवेनें प्रगटतेचा करून तेथे तो ' मीच ' असेंच प्रतीतीचें एक नित्यत्वच स्पष्ठ झाले. (२६६)

येथे श्रौत असेच ते श्रुतीनें पाहाणारें जें भवन ते विद्यावंत असेंच होऊन त्यानें जाणीव ही ज्ञानास आणिली, व आतां तं यजन हेच वर सागितल्याप्रमाणे स्पष्टतेचें झाल्यानें, तेथे स्मर जो तो ' स्मरहर ' असाच-तो आता ह्या स्मरगर्गानीं आर्त झालेले जे व्यक्तिमात्र-भूतमात्र-इत्यादि त्याचें तेथें यजन झाल्याने, जसे काहीं एक ते पूजनच झालें-पूजा उपासिली गेली असें ते स्मार्त तेंच आता श्रुतींना गौरव देऊन त्या आर्तलक्षणास उपासनाविधानात घेतल्यानें, तेथे ' जाणीव ' हीच विधानास आली; तेथे ' स्वधा ' हीच स्वाध्यायाची होऊन आली

तेथें मन हेंच त्या सोमाचें झाल्यानें आतां अमृतप्राशनच एक अशा त्या अनेकशः औषधींना गुणाचे करून आहे असें

तेथे आज्य जे व समिधा ज्या त्या मीच होऊन असणारा असून नें मंत्रजाळ हेहि पण मीच होय.

ह्या विश्वातर्गतच ह्या क्रिया होणाऱ्या-तेथे समिधा, आज्य, मंत्र, औषधि ह्या विश्वामधूनच घेतल्या गेल्याने, तेथें हे विश्व हेच आपला भार पुढे करून तेथे जे काहीं ' नेणणे ' हें मूर्खपण पदरात टाकणारें-तच ह्या अनेकविधतेचें असे बोललेले-समिधाचें, आज्यतेचें, मंत्रजाळाचें तेंच ते मूर्खपण-हच एक येथे हवन झाल्याने, तेथें प्रकृतीन घेतलेला स्वतःचा भार हाच हवन झाला-बाजूस केला गेला-व आता जाणीव हीच ज्ञानास आली : ती जाणती होऊन तिनें मीच वर आणिला गेला व तो मीच येथे आत्मबुद्धीचें एक एकत्वच, आपत्तेपणच, वेगळेपणानें न राहता एकात एक मिळून गेल्यानें तेथें उदयच झाला जाणीव ही आता उदोची झाली. (२६७)

तेथे विश्व हे जें त्यामध्येच असणारा-त्यामध्येच वागणारा-मुखापाशीं अगदीं जवळच असणारा असा तो-हे सर्व विश्व पुढे घेऊन त्याने ते होतेपण अथवा हवन होणारे द्रव्य जे-तसेंच हुतक अथवा हुतवस्तु म्हणून जी ती सर्व मीच होऊन असणारा असा तो विश्वभार हाच उजवला गेला-तेथे अग्निरूपानें मी प्रकाशणारा-सगुण ब्रम्हच जसे स्वरूपास आले. ब्रम्ह ते अग्निरूपानें वागणारे ते स्वरूप माझेच होय. अग्निप्रमाणे तेजःपुज असे सगुण स्वरुपाचे दर्शनच ते !! (२६८)

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥**

धाता=धारणकर्ता, पालन करणारा, कर्मफळ देणारा. पिता=उत्पत्ति करणारा पुरुष; उत्पत्ति-स्थान प्रकृति. पितामह=मूळ परब्रह्म, प्रकृतिपुरुष यांचा जनक वेद्य=ज्ञेय, जाणण्यास योग्य, वस्तु, ब्रह्म पवित्र=ब्रह्मज्ञान प्राप्तीचें साधन-पवित्र असा प्रणव, ओंकार.

अहम् अस्य जगतः पिता माता धाता पितामहः एव पवित्रम् वेद्यम् ओंकारः ऋक् साम यजुः च ।

**ह्या जगताचा पिता, माता, धाता, पितामह ( आजा जो ह्या जगाचे आदिकारण असा ) मीच आहे. मी जें वेद्य पवित्र असे आहे तें आहे; ओंकार, तसेंच ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद हेहि मीच होऊन आहे.** ( १७ )

पैं जयाचिने अंगसंगें । इये प्रकृतिस्तव अष्टांगें ।
जन्म पाविजतसे जगें । तो पिता मी गा ॥ २६९ ॥
अर्धे-नारी-नटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी ।
तेवीं मीचि चराचरीं । माताहि होय ॥ २७० ॥
आणि जालें जग जेथ राहे । जेणें जीवित्व वाढत आहे ।
तें मीवांचूनि नोहे । आन निरुतें ॥ २७१ ॥
इये प्रकृति पुरुष दोन्ही । उपजलीं जयाच्या अमनमनीं ।
तो पितामहो त्रिभुवनीं । विश्वाचा मी ॥ २७२ ॥
आणि अघवियां जाणणियाच्या वाटा । जया गांवा येती सुभटा ।
जो वेदार्थी चोहटा । वेद्य जें म्हणिजे ॥ २७३ ॥
जेथें नाना मतां बुझावणी जाली । येकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली ।
चुकलीं ज्ञानें जेथ मिळो आलीं । जें पवित्र म्हणिजे ॥ २७४ ॥
पैं ब्रह्मबीजा जाला अंकुरु । घोषध्वनि नादाकारु ।
तयाचें भुवन गा ओंकारु । तोहि मीचि गा ॥ २७५ ॥
जया ओंकाराचिये कुसीं । अक्षरें होतीं ' अउम ' कारेसीं ।
जियें उपजत वेदेसीं । उठिलीं तिन्ही ॥ २७६ ॥
म्हणोनि ऋक्-यजुः-सामु । हे तिन्ही म्हणे मी रामु ।
एवं मीचि कुळाक्रमु । शब्दब्रह्माचा ॥ २७७ ॥

(२६९) अष्टांगें = अष्टधा प्रकारानें. पाविजतसे – पाविजत असे (२७१) आन = दुसरें निरुतें = खरें (२७२) अमनमनीं = निर्गुणांत, मनरहित स्वरुपात. पितामहो – पितामह जाणणियाच्या – जाणणेयाचिया जो वेदार्थी चोहटा वेद्यु – वेदाचिया चोहटा वेद्य = वेदांच्या चवाठ्यावर ज्याला वेद्य म्हणजे ज्ञान होण्यास योग्य-ज्ञेय-म्हणतात (२७४) बुझावणी = ओळख जाली-झाली-आली (२७५) जाला – जाहला घोषध्वनि नादाकारु = योगयुक्तीच्या सोई ज्या परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी या चार वाचा या ब्रह्मबीजास फुटलेले अंकुर होत भुवन गा ओंकारु – गा भुवन जो ओंकार (२७६) कुसीं = पोटीं उठिलीं- उठलीं (२७७) कुळाक्रमु – कुळक्रम शब्दब्रह्माचा – वेदाचा = वेदाची कुलपरपरा

हे जग जे जन्मणारें तें ज्या पित्याच्या योगानें होणारें-तेथें तो पिता हा आपलें अंग हें संगाचें करून, तेथें ह्या प्रकृतीमुळें प्रकृतीच्या आधीन अगोदर होऊन, तेथ भावना हीच आपल्या अष्टांग-योगाची जगीं झाली व आता तें जगच जन्म पावलें असें तें जगाचें जे जन्मणें तें ज्याच्यामुळें होत तो मी ह्या जगाचा पिता आहे

जगानें अष्टांगें घेतलीं-व प्रकृतीच्या अंगसंगानें जें ' विश्व ' जन्मलें-अशी हीं ज्याचीं अष्टांग प्रकृतीच्या अंगसंगासहित जन्मलीं तो पिता मी होय व जें जन्मलें तें विश्व होय.

पिताहमस्य / पितामहस्य :—पिता + अहम् ॥ पिताऽहम् ॥ सोऽहम् ॥ सोऽहं हंसा ॥ अहं ब्रह्मास्मि ॥ पितामहस्य म्हणजे आजाचें हें जें जग त्याची आई मी, धाता मी व आजाहि पण मीच

येथें वैचित्र्य जें एक तें पाहण्यासारखें आहे. तें म्हणजे पितामहस्य म्हणजे आजानें उत्पन्न केलेलें हें जग जें त्याचा पितामहहि म्हणजे आजाहि पण मीच आहे: दुसरें बोलणें म्हणजे ' पिता-

हमस्य जगतः ' ( भूपते विष्णोर्नामसहस्रस्य तस्य लोकप्रधानस्य जगन्नाथस्य श्रृणु पापभयापहम ॥ ) म्हणजे ह्या जगाचा पिता म्हणजे बाप जो तो मी होय येथें पिता + अहम् मधील जो विग्रह ऽ तो ' अ ' सच लुप्त करीत आहे असे भासमान होण्याने, तेथील अर्थाचें एक जें आपल्या यथार्थतेस पाहाणेत्र होईना, म्हणून येथें तो जो अर्थ तो योग्यतेचा कसा बरें ! तो ' पिता + अहम् + अस्य + जगत. ' असेच आहे : येथे जो एक दुसरा पाठ तो ' पितामहस्य जगतः '—ह्या प्रकृति-पुरुषापासून ज्याच्या अमन म्हणजे मनच जेथे नाहीं अशा मनच नसलेल्या पितामहाच्या ठिकाणीं हीं प्रकृतिपुरुष हींच जन्मलीं असे जे एक त्रिभुवन तेथील विश्वाचा मी एक पितामहच आहे असेहि बोलिले

' प ' हा कठोर असल्यानें काहीं एक मृदु जें असणारें तें ' ज ' असावें असे वाटते व नंतरच तेथे जसे ' जपितृ ' हा शब्द उगवून तो गुरुच एक नव्हे कसा ? परंतु येथें तो पिता नव्हे हें खास कारण तेथे फक्त एक ' पितराचे ' असेच होणे झाल्याने, तेथे तो पिता नव्हे, तो फक्त एक पितरच नुसता : येथे आता बोलणें ते म्हणजे पूर्वजाचे का पितराचे हे कसे उलगडणारे बरें ! तें ' स्वधा 'नं समजावून दिले गेले : येथें ' स्वधा ' हीच तेथीलची देवता होय व तिनेच ते स्पष्ट केलें जाणारे होतं. (२६९)

अर्धनारीनटेश्वराचे जे रूप तेथे अर्ध अंग ह्या देहाचे पुरुषाचे वेषाने असणारे व दुसरे अर्ध स्त्रीवेषाने असलेले-तेथे एकच देह अर्धे नटलेले पुरुष व अर्धें नटलेली स्त्री असे ते असल्यानें-तेथे जसा मी पिता आहे, तसा माताहि पण मीच होऊन आहे (२७०)

हे जे जग जन्मले ते जेथे राहात व ज्याच्यायोगाने त्याचे ते जीवित वाढत असते ते मजवाचून दुसरे काहीं आहे असे नाही : तेथ मीच धाता होऊन ते परिपालित असतो (२७१)

अमन असा जो त्रिभुवनामध्ये असणारा तेथ (त्याच्या मनामध्येच) प्रकृतिपुरुष हीं दोन्हीं जन्मलीं-जे त्रिभुवन जन्मले ते ' विश्व ' होय व ज्याच्या मनीं ते जन्मणे झाले तो पितामह ' मी ' होय (२७२)

ह्या वेदाचे जे महत्त्व-अपरपारपण-ते जसे काहीं ह्या गगनासहि पुरविणारे असे चोहटाचे – तेथे आता ज्या काहीं वाटा त्या सर्वच्या सर्व ह्या 'जाणणे'सच आल्या-तेथे एक गाव असेच म्हटले-मी काहीं त्या गावचा नाहीं म्हणजे ती गोष्ट बोलणारा मी नव्हेच असे जे एक म्हणणे होते, तसे येथे ते गाव म्हणजे गोष्टच एक-कानगोष्टच जाणीव घेऊन असलेली-तेथीलचे जे वेद्य अथवा ज्ञेय-ज्ञान-संवेदन-ते मी (२७३)

मतमतांतरे हीं समजुतीस आलीं-शास्त्रें हीं आपली अनोळख दाखवीत होतीं तीं आता ओळखीची झालीं-अनोळखीचे असे जे चुकणेंच एक ते आता ओळख झाल्यामुळें मिळणेच झालें-व तीं जवळचीं अशीं झाल्याने, तेथे 'पवित्रतेचें' असेच एक 'नेणणें फिटलें व जाणणे हें जन्मले' असे ज्ञानच तें-जाणणे एक-जाणतेपणच आतां पवित्र अशा अभेदभक्तीचें झाल्यानें, तेथे मीच एक 'पवित्र' असा (२७४)

ओंकार हा भुवनात दुमदुमून राहिला; तेथे नादानें आकार घेतला, ध्वनीनेहि पण तेच होणें केलें व घोष हाहि तेथेच होऊं लागला-आतां हा अंकुरच एक तो घेऊन असलेला-तेथे बीज हेंच ब्रह्मतेचे-हे सर्व जेथे-ज्या भुवनामध्ये अंकुराची व आकाराची वाढ किंवा सोय घेऊन असते तो ॐकार मीच आहे, तो ॐकारहि पण मीच होय : ब्रह्मबीजाचे राहण्याचे ठिकाण जे ॐकार जो तोहि मीच आहे (२७५)

कुक्षी म्हणजे पोटींच ह्या ओंकाराच्या हीं तिन्ही अक्षरें ' अ, उ, म, ' कार अशी उपजलीं होतात-अकार, उकार, मकार, हीं तिन्ही बाळेंच जशीं ओंकाररूपी योनीमध्यें जन्मलीं-तेथे जाणणें

किंवा 'असें जाण' हें उठाव घेऊन आलें आहे असें तें चिदगगन हेंहि थोडेंच म्हणणारें जें तें: तेथें हा 'ॐकार' हा योनीच एक-योगिनी, विनियोगी, तसेंच विनियोगिनी होऊन असलेली किंवा असलेला. (२७६)

तो आत्माराम मी आहे-येथें कुळ हेंच ह्या शद्बब्रह्माचा क्रम किंवा शब्दक्रम हाच तेथीलचें सर्व कुळच होऊन असणारा असा मीच तो आत्माराम आहे व शद्बब्रह्माचा कुलक्रमही-सर्वक्रम-हाच तेथें सांगितलेला आहे. (२७७)

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

गतिः = कर्माचें फळ. प्रभुः = सर्वांचा स्वामी साक्षी = द्रष्टा, सर्व प्राण्यांचीं शुभाशुभ कर्मे पाहणारा. निवासः = आश्रयस्थान, देह, गृह शरणम् = आश्रय, शरण आलेल्याची पीडा दूर करणारा रक्षक. सुहृत् = निर्व्याज मित्रत्वाचा, निरपेक्ष उपकार करणारा सखा प्रभवः = सृष्टीचा उत्पादक. प्रलयः = सृष्टीचा संहारकर्ता स्थानम् = जगाची स्थिति, अस्तित्व सांभाळणारा म्हणजे सर्वांच्या स्थितीचें कारण. निधानम् = कर्मफळाचा ठेवा, कल्पतरु. अव्ययम् बीजम् = कधींहि नष्ट न होणारें बीज.

गतिः भर्ता प्रभुः साक्षी, निवासः शरणम् सुहृत् प्रभवः प्रलयः स्थानम् निधानम् अव्ययम बीजम् ।

गति, पोषणकर्ता (विष्णु, भर्ता), प्रभु, साक्षी (ब्रह्मा), निवासस्थान, शरण, आश्रय (शिव), सुहृत् (मित्रत्व), प्रभव. (संसरण), प्रलय (निद्रा, मरण, इ.), स्थान (कारण), निधान (द्रव्य), बीजहि मीच व अव्यय असे जे तेहि मीच आहे, अव्यय असे बीज मीच आहे. (पुरुषलक्षणाचे असे पुल्लिंगच तेथे आपल्या प्रभावाने असावेच असावे. ( १८ )

हें चराचर आघवें । जिये प्रकृतिमांतु सांडवे ।
ते सिणली जेथ विसांवे । ते परम गति मी ॥ २७८ ॥
आणि जयाचेनि प्रकृति जिये । जेणें अधिष्ठिली विश्व विये ।
जो येऊनि प्रकृति इये । गुणातें भोगी ॥ २७९ ॥
म्हणोनि जालिये प्रकृतिदशे । कर्ता कार्यतारूपें असे ।
परी विश्व भिळासि समरसें । अलिप्तपणें ॥ २८० ॥
जो विश्वश्रियेचा भर्ता । तो मीचि गा पांडुसुता ।
मी गोसावी या समस्तां । त्रैलोक्याचा ॥ २८१ ॥
आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नावेक उभें न राहावें ।
पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥ २८२ ॥
पर्वतीं बैसका न सांडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी ।
पृथ्वीया भूतें वाहावी । हे आज्ञा माझी ॥ २८३ ॥
म्यां बोलविल्या वेदु बोले । म्यां चालविल्या सूर्य चाले ।
म्यां हालविल्या प्राणु हाले । जो जगा चाळिता ॥ २८४ ॥
मियांचि नियमिला सांता । काळ प्राणु करितसे भूतां ।
इये म्हणियागतें पांडुसुता । सकळें जयाचीं ॥ २८५ ॥

( २७८ ) सिणली – शिणली. विसांवे – विसंवे = विसांवते ( २७९ ) अधिष्ठिली विश्व विये = ज्याच्या आश्रयानें विश्व उत्पन्न करते ( २८१ ) गोसावी = स्वामी, प्रभु. ( २८२ ) नावेक – नावभरी = क्षणभर उभें न राहावे – उभें नसावे. दाहावें = जाळावे. ( २८३ ) बैसका = बैठक. रेखा = मर्यादा ( २८४ ) बोलविल्या – बोलवला. चालविल्या – चालवला. ( २८५ ) मियाचि नियमिला सांता = मी आज्ञा केल्यामुळे ग्रासु करीतसे – ग्रासीतसे म्हणियागतें = आज्ञाकर, सेवक.

हें सर्व चराचर ज्या प्रकृतीमध्यें सांचून असतें–संचून असतें–तें तें संचणें हें केल्यानें ती प्रकृति ही असे सांचवून, साठवून, संचवून जेव्हां शिणली होते, शिणते व आता विश्रांति ही पाहिजेच–तेथें विसांवणें हें घेणेंच होतें–ती विश्राति जेथें मिळते, ती गति मी होय.

असे श्रमणें हें झाल्यानें, तेथे आतां विश्रांतीकरितां हा जीव म्हणा अगर ही प्रकृति चोहोंकडे पाहाण्यानें दमून श्रमून थकते, तेव्हां आतां कांहीं विश्रांतीस येणेंच व्हावें असें तिनें करून ती जेव्हा एका गतीस येते, ती गति मी आहे येथें गति म्हणजे अनेक अर्थांनीं न घेता तें जें निश्चळ असें चित्ताचें होणें, जेथें गति ही (महान् अशीच असणारी जी तीच) स्थिर झाली व शांततेस आली　　　　(२७८)

ह्याच गतीमुळे प्रकृति ही जगते : ही गति म्हणजे परम अशी निश्चळ अशी एक शक्तिच असून तिनं अधिष्ठिलें असता हें विश्वहि पण स्थिर होऊं लागतें, म्हणजेच जन्मूं लागतें–तेथें जो मी तो ह्या प्रकृतिमंततेचा असा आता झालेला होऊन ह्या गुणांना भोगतो : गुण हा गुणास येऊन तेथें जसा इद्रियार्थ हा इंद्रियानींच झपला, तसा गुण हाच प्रकृतिमंत होऊन त्या प्रकृतीसच भोगूं करणारा होतो. तेथे मीच तें परम गतीचें स्थान पाहून असतों–मीच तेथे असतों–मीच ते होय–तें निश्चळ असें गतीचें जियालेंपण हें मीच होऊन असतो व त्या प्रकृतिमंत गुणास भोगण्याचें करितों.　　　　(२७९)

म्हणून प्रकृतिमंत होऊन असल्यानें, तेथे प्रकृतीची जी एक दशा किंवा अवस्था तीच पुढे होऊन, तेथें कर्तेपण अथवा कार्यदक्षपण हें एक रूपच येणारें त्या प्रकृतीस–तेथे विश्व [ प्रकृतिमत–कर्तेपणाचें रूप, हातपाय इत्यादि अवयव इच्छा विश्व–इच्छा समरसली, इच्छा ही रसभरित त्या विश्वास करिते, तरी तें अलिप्त असेच ] हेंच जसे इच्छेमध्येंच गुंतून राहिलें–समरसून गेलें–एकवटलें–तेथे ती इच्छा हीच पुढें होऊन असणारी, तीच आता मनामध्यें मुरून गेली : असे तें प्रकृतीमध्येंच रसणें झाल्यानें तेथें विश्वाचें एक अलिप्तपणच !

प्रकृतीनें आपल्यास वश करून घेऊन हें प्रकृतीचें असेंच एक कर्तेपणाचें रूप घेऊन किंवा कार्यता हीच ह्या प्रकृतीस आपल्या रूपाची करत्ये, येथें प्रकृति हीच ह्या आकारास, इंद्रियास, रूपास, वगैरे येऊन असते.

तेथें विश्व हें अलिप्त असेच होऊन असतें.

इच्छा हीच तेथे समरसून–इच्छा हीच तेथें ह्या विश्वाला रसाचे करित्ये, तेथे त्या रसातच तें रसरसून जातें–तेथे विश्व हें इच्छेनें समरसले जरी, तरी अलिप्त असेच होऊन असतें.　　　　(२८०)

येथे विश्वश्री जी आहे, ह्या विश्वाचें ऐश्वर्य जें आहे (ह्या देहाचें देहीपणानें असणें जें), तो मीच आहे हे पांडुसुता, मीच येथे ह्या त्रैलोक्याचा स्वामीच जरी, तरी पण तो जसा कांहीं गोसावीच एक ह्या त्रैलोक्याचा होय–हें समस्त जे विश्व, त्रैलोक्य–त्या त्रैलोक्याचा मी स्वामीच होय–मी गोसावीच होय–असे तेथीलचें म्हणजे ह्या देहाचें, म्हणजेच विश्वाचें, जें ऐश्वर्य तेथीलचा मी ' भर्ता ' होय.

ह्या विश्वाला प्रकृतीनें प्रकृतिमंत केलें–तेथें त्या कर्तेपणाप्रमाणें रूप येऊं लागलें : तेथीलची जी कांहीं एक मशागत करणारा–पुरविणारा–मंततेचें जें ऐश्वर्य तें पुरुषप्रकाराचें कसें तें मीच पुरवितों : तेथें मार नांवाचा जो मन्मथ किंवा प्रद्युम्नानें पाहिला जाणारा तो मीच तळीचा होऊन असतो : बारीक

सारीक गोष्टींना मीच तेथें पुरविता होऊन असतो व ह्या विश्वाची श्री जी प्रकृतिमंततेने रूप ह घेणारी तेथें जें कार्यदक्षतेनें अथवा कर्तेपणानें येणारें तें मी देऊन असतों : सर्व विश्व हेंच येथें अलंकृत केलें-संपन्न केलें, विश्वसंपदासंपन्न केलें-तें विश्वास शोभवूं लागले : कर्तेपण हेंच भर्ता होऊन असलेले तें जें तें मीच होय-तें **भर्तेपण** मीच होऊन असतों.

**भर्ता**:—'तमिस्रहा' असा जो एक ह्या देहभूमीस अलंकारणारा म्हणा किंवा पोसणारा तो भर्ता, तो एक ह्या 'मारीचा' तळच पाहाणारा असून त्या विश्वरूप महामारीचा जो तळांतूनहि उठणारा तळ, किंवा तळामुळापासून हीं पाळे उगवणारीं त्यांनीं जसे कांहीं ह्या मुळानाहि पण आपल्यांतच अडकवून ठेविलें : किंवा रस हा जसा कांहीं त्याच पाळांनीं अथवा मुळांनीं शोषला जाणारा होऊन, ह्या देहभूमीचे जें सूक्ष्माहूनहिं सूक्ष्म असे मनाचें रूप तेंच पाहूं केलें : तें अत्यंत सूक्ष्म, अत्यंत विशाल, अत्यंत गतीचें असे असल्याने, एक धाकच दाखविणारें होऊन-सहज धाकच एक मनास आलेला तो तळच पाहातो. तेथें ह्या स्वामीचें परम विस्तीर्ण, दीर्घ, अत्यंत खोल असें जें महत् सत्‌चें अथवा सत्तेचें रूप तें शेतकरी म्हणा का कुळवाडी, कुणबावा असें जरी असलें. तरी पण तें म्हणजे काय कल्पनेनें का कुठें तेथीलचें जें ह्या शारदेचें सरस्वतीस पाहाणें तें मुळींच आटोक्यात येणारें नाहीं : परंतु तेथ हीं कर्तव्यें हींच अनेकांस जगीं वांटूनच दिलेलीं : तीं जर व्यवस्थिततेनें उपयोगाचीं केलीं-योजमेचीं उपकृत होऊनच उपकृत होणारीं-ह्या देहाच्या भरण, पोषण क्रिया ह्या तळ घेऊनच उठणाऱ्या झाल्याने, तेथें एक मंगल असेच त्या भूमिक्षेत्रास वचन देऊन असणें होय तेथें जीं कांहीं कामें तीं सहजच अशीं ह्या भूमीस म्हणा किंवा देहास म्हणा आपला आकार हा देऊन, तेथें नाम हेंच पुरविलें जरी तळामधून हीं पाहाणारीं पाळें अथवा मुळावर उगवणारीं मुळे जरी, तरी तीं आपल्या ह्या नाम-सत्तेच्या रूपानें मोसावी जी भारती तीसच कशी खोल बहुखोल अशी जरी, तरी अर्थ पुरविणारी होऊन, तेथें काय ह्या कुणबिणीचें कुणबावीपण हें जसे अर्थ घेऊन अर्थ दे-मातृप्रेमानें मातृप्रेम हे वाढं लागो असें एक मातृदेवो भव असे त्या शारदेचें अथवा जिव्हेचें स्वभावरम्यतेचे कुशल असे म्हणून, तेथेंच त तळांत बसून असतं; नव्हे तर तें आपल्या भर्तेपणाचे जे कांहीं करणे त्यातच भरून असल्याने, तेथें अक्षराचें खोलपण हे समुद्राहूनहि महागंभीर असेच : तरतुदीचें अंग-गरजा पुरविणारें अंग-करणारा पाहाता असा तेथें एक राहाणारा जो तोच कसा मालकी हक्क पुरवून असतो तें म्हणण्यास मिळत क आतां ती जी कुटुंबाची ठेवण तीच येथें जशी 'गृहस्थ' एक गृहास नीटनेटके करून असणारा असा तेथें असल्यानें, तेथें 'मार' नांवाचा जो मण मदन तोच ह्या अग्निबीजाचेंहि बीज होऊन तेथील अनेकपण ह झेंपून धरून सर्वांस आपले प्रेम पुरविणारा होतो.

ह्या प्रकृतीनें असणें जें तें जसा कांहीं अधिकारच वागत असलेला, जेथें ह्या भूताना भावणें देऊनच त्यांना भूतयोग्यतेचें करितें, तें जसें कांहीं प्रकृतीसच प्रकृतीचें करणें होय : व आतां प्रकृतिमंत होणें जे तें ह्या पंचप्राणांनीं जीवदशेस आलेले तें कार्यदक्षतेनें अथवा कर्तेपणानेंच जसे तें प्रकृतीसच एक रूप दिलें असे असून, तेथें प्रकृतिमत म्हणजे रंगरूपेंलाच एक त्या कर्तेपणास आली.

आकाश सर्वत्र व्यापून असतेच तेंच जसें आतां त्यानें सर्वत्र वसण्याचें करावे असे बोलिलें-कारण वर दिलेला जो प्रकृतिधर्म हाच धर्माप्रत आला व आतां तेथें असेच बोलणें केलें कीं, हे आकाश तर सर्वत्र व्यापून असणारें असलेलें जरी, तरी तेथें एक सत्ताच पुढे झाल्याने, तिनें आता 'ह्या आकाशानें सर्वत्र वसावें' असा एक सत्तेचा बोलणारा हात हाच तें तसें बोलणें करीत आहे

त्याचप्रमाणें वायु हा काय उगीच राहाणारा नव्हेच-'अहंभाव' वायु हा काय उगी राहणारा नव्हेच ! नाहींच ! तेथें ही सत्ता वागणारी असतेच-वायु हा कांहीं उभा होणार नाहीं ह्या नांवाच्या

पाठीमागे असणारें जें अहंभावन हें काय स्तुतिच एक ऐकणारें किंवा बोलणारें होतेंच. तेथे नांवानांवांनींच हें बुद्धीचें नटपणेंच एक जसे आपापल्या परीनें बोलिलें गेलें–बोलिलें जातेंच. म्हणून तेथें या वायूनें जसें कांहीं नावभरी उगें न राहावें असे अहंभावनच एक जसे स्तुतीचें तें उभेच राहिलें : पावकानें दाहावें करावे- दाहकत्वानें असावें-व पाण्यानें पाऊसरूपानें वर्षण करावे हें सत्ताच ती ईश्वराची बोलणारी होय-ते प्रज्ञविषारी होय. (२८२)

ह्या पृथ्वीनें आपल्या पाठीवर ह्या भूतांना घेण्याचें केलेंच पाहिजे-तिनें ह्या भूतांना आपल्या पाठीवर वाहून असलें पाहिजे अशी ही आज्ञा ही माझीच त्या त्या भूतास तें तें करण्यास लावितेच.पर्वतानीं जें आपले आसन तें सारूं नये-तें सोडूं नये पर्वतानीं उंच जे असणें तें त्यांच्या बैठकीस एक अत्यंत अशी शोभा येणारी असल्यानें, तेथें त्यानीं तसें तें शोभणें देऊनच असलें पाहिजे–असे तें एक माझी आज्ञाच होय! त्याचप्रमाणें समुद्रानें आपली मर्यादा धरून असलें पाहिजे. त्याने आपली सीमा ही ओलांडूं नये–समुद्रभार हा समुद्रतेचा भाराचा असा तेथें ती जी ह्या मुद्रतेस शोभणारी ती कर्मरेखाच मुळीं पुसून टाकली गेली–म्हणून येथें समुद्रभाराचें जे वागविलें जाणें, त्यानें हें कर्माचें गहनत्व हेंच मर्यादित करून, तेथें तें ओलांडलें गेलेंच नाहीं–तेथे आज्ञाच ती माझी ह्या कर्मरेखेचें व ह्या समुद्रभाराचें एक परस्पर आंदोलनानें असणें तें–आज्ञाच तेथे एक वागविली जाणारी! तेथे कर्मरेखा व मुद्रभार हे परस्पर ओलांडण्याचें करीतच नाहींत. असे तें समुद्रलक्षण हें माझी आज्ञाच घेऊन चाललेलें असेच आहे–तेथे प्रभुपण हेंच ह्या आज्ञेनें ‘ सत्तेचे ’ असेच. (२८३)

असा प्रभुपणानें असलेला–तेथें आज्ञाधारकपण हेंच ह्या महाभूतांना समुद्रपर्वतांना दिलेलें–अहो दिलेले ते कसे बरें ? तेथें सहजतेनंच ह्या भूतमात्रांना त्याचें तें भूतत्वानें असणें हें भाव्य होऊन, भाव्य करूनच मिळाले असल्यानें, दिलेले असल्याने–तेथें सहजच आतां तें ह्या प्राणाच्या गतीनें जसे एक ज्योतच तेथें लाविली असें जीवदशेचे एक आत्मभावन ! म्हणून तेथें आतां ह्या प्रभुपणास विशेषशी अशीच समर्थता पोहोचल्याने, तेथे ह्या विश्वास आपल्या ताब्यांत ठेवून वागविणें जे तें एक प्रेमाचें असेंच–सत्तेचे असेंच–समर्थतेचें असेच होय! म्हणून आतां हें जें कांहीं वाग्मात्र तेथें तर मूळचें जें एक भूताचें तें भाव्यानें भूतप्रकृतीच एक जीवदशेस आली व आतां तें अनाथ असे न राहाता सनाथतेचें असे एक सत्तेनेच वागविलें जाणारें–आज्ञेप्रमाणें वागविले जाणारें असे प्रेमाचे होऊन, तेथे सनाथतेचा भार हाहि पण तें प्रेमानें पाहाणें केल्यानें,आता त्यास ह्या विश्वाचा प्राणच एक,ह्या जगताचा तो नाथच एक, असे सनाथतेचें सपनपण त्यांत आलें– तें सुभगत्वाचें झालें–सौभाग्य एक पदरात घेऊन आहे असें तें जगन्नाथाचें एक अथवा विश्वनाथाचे एक महत्त्व वागविणारें–साभिमानानें असणारें तें नाथलक्षण हे दिव्यच पाहाणारें होतें तें सनाथतेनें सर्व भार पुरविणारे होतें–सर्व नडींचा भार हा तेथें पुरविलेला होतोच होतो. म्हणून आता जी अपौरुषेय वाणी ती ह्या सनाथतेनें ‘ वेद ’ म्हणजे ‘ जाण ’ असे म्हणूं लागून, तेथें वेदच तो एक बोलविला गेला–वेदपणाचा झाला–वेदास आला, व आता तो कांहीं दूर, लांब, कोठेतरी असा न होता, येथेंच ह्या अपौरुषेय वाणीचा असा जवळच घेऊन बोलूं लागला असे तें साक्षीभूततेचें आरव्य महत् आख्यायिकेचें कसे नव्हें बरें !

म्हणून ज्यां बोलविल्या तो वेद हा बोलणारा होतो, सूर्य हा जो आहे, तो आपल्या गतीचा होतो – व्यवहारात वागणारें जे दृष्टीचें धोरण तें त्याच्या प्रकाशामुळेंच होत असल्यानें, तेथे सर्व व्यवहार हे माझ्याच साक्षीभूतत्वाने त्या सूर्याकडून (प्रकाशाकडून) केले जाणारे होत – तेथें प्रकाश हाच चालणारा होऊन असतो–तेथें बुद्धीचे प्रकाशन हे काय उत्तम अशा व्यवहारास पाहूं लागून, हें जगत् महत् अशा आनंदांतच वावरून असतें.

ह्या जगास चालिता असा जो प्राण तो ' खरें-खोटें ', ' अंधस-डोळस ', ' बरें-वाईट ', ' उत्तम-किंफक्ष ', ' उच्चतर-कनिष्ठपक्ष ', ' महत्-लघु ' असें तें त्या त्या प्राणानें पाहून त्यांतील निवडणेंच केलें - व प्राण हाच येथें आतां सत्तेच्या आश्रयाखालीं आणिला गेल्यानें, सर्व जग हें जसें कांहीं त्या समर्थतेच्या अंगाखालीं समर्थतेनें संपन्न केलें गेलेलें असें तें सत्तेचे धोरण हें त्या प्राणावर सत्ता करून असतेंच असतें. असे ते माझे असणें तें मीच आहे-तेथें मीच ' नाथ ' होऊन आहे : ह्या प्राणास सनाथ करून असतो. (२८४)

बाही जशी दिली किंवा पोतेंच एक उचलले जाणे हें जसे काय बाही देऊनच होणारें : तेथें हा काळ (वेळ) जो आहे, तो-मी त्यास आपल्या यथार्थतेस आणल्यानें-ह्या भूताना पोटीं समावेश करून घेण्यास सामर्थ्याने असणारा होतो : अशीं जीं कांहीं बोलणीं तीं काळ, वेळ व सत्ता ह्यांनीच आवरलेलीं असल्याने, तेथे मींच तीं नियमिलीं करून असतात.

आतां ' सकळें म्हणियागतें ' जीं तीं जशीं कांहीं ह्या श्वसनानें केलेले जे सूक्ष्मधनि तेथे ते ब्रह्मच जें जाणलें जाणें, तेथें तें जाणतें जें तेंच ज्ञानी म्हणविलें जाणारें-येथें फरक जो कांहीं एक असणारा तो ह्या ' सोकरी बागडीनें-बा-गडीने ' उचलिलेला-आडवलेला असा तेथें एकच गोष्ट लक्ष्यांत असावी ती ह्या ' जाणतेपणाची ' होय-' जाणत्यांची ' होय-जाणणें जे त्याची होय

' म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे ॥ ' असे तें वस्त्रच एक पांघरणें असून, तेथें ही विद्यासरस्वती हिचा प्रभाव पुढे होणारा होतो-व तोच ह्या व्यवहारांनीं व क्रियेनें परस्परावर परस्पर चढाओढीनें कामातच रंगणें-मात करणें हें एकमेकींस साभाळून-असेच एक जें होणे होते-परिणमलें जाणे होते-परिवर्तित केलें जातें-तेच ह्या जाणतेंपणानें सहजच झेपले जातं : म्हणून अशीं तीं सर्व किंवा ' सकळ ' ह्या म्हणण्याबाबत किंवा ब्राह्मण्याबद्दलचीं जीं कांहीं ' याग, यज्ञ ' हींच जेव्हा तेव्हां अनुलक्षून असावीं-तींच आपण होऊन असावे-असेच एक ते उत्तीर्णतेचे लक्षण हे ईशवात्सल्यच परम प्रेमास प्रसविणारे होऊन, ह्या मनुष्यास परम प्रेमाने आदर देणारें होते : तेथे आदरविलें गेले असे हें प्रेम जे ' जाणते ' त्याजविषयीं : हें जे आज्ञा करणें ह जसे सेवकपणच माझे तो हा काळच होऊन आहे ; मीच तें काळाचें नियमिणे केलेलें असे. (२८५)

ऐसा जो समर्थु । तो मी जगाचा नाथु ।
आणि गगनाऐसा साक्षभूतु । तोहि मीचि ॥ २८६ ॥
इहीं नामरूपीं आघवा । जो भरला आहे पांडवा ।
आणि नामरूपादि वोल्हावा । आपणचि जो ॥ २८७ ॥
जैसें जळाचे कल्लोळ । आणि कल्लोळीं आथी जळ ।
ऐसेनि वसवितुसे सकळ । तो निवासु मी ॥ २८८ ॥
जो मज होय अनन्यशरण । तयाचें निवारीं (मी) जन्ममरण ।
यालागीं शरणागता शरण्य । मीचि येकु ॥ २८९ ॥
मी येकुचि अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतिगुणें ।
जीत जगाचेनि प्राणें । वर्तत असे ॥ २९० ॥
जैसा समुद्र थिल्लर न म्हणतां । भलतेथ बिंबे सविता ।
तैसा ब्रह्मादि सर्वांहि भूतां । सुहृद तो मी ॥ २९१ ॥
मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासि वोल्हावा ।
सृष्टि-क्षय-प्रभवा । मूळ तो मी ॥ २९२ ॥

बीज शाखांतें प्रसवे । मग रुखपण बीजीं सामावें ।
तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे ॥ २९३ ॥
ऐसें जगाचें बीज जो सकलु । अव्यक्त वासनारुपु ।
तयासी कल्पांतीं जेथ निक्षेपु । होय तो मी ॥ २९४ ॥
इयें नामरूपें लोटतीं । वर्णव्यक्ति आटती ।
जातीचे भेद फिटती । जैं आकारु नाहीं ॥ २९५ ॥
तैं संकल्प-वासना-संस्कार । मागुतें रचावया चराचर ।
जेथ राहोनि असती अमर । तें निजधाम मी ॥ २९६ ॥

(२८६) साक्षभूत-साक्षिभूत. (२८७) बोल्हावा = जिव्हाळा. (२८८) कल्लोळ = तरंग आथी = आहे. (२८९) शरण = आधार (२९०) जीत – जिवंत. (२९१) थिल्लर = डबकें. (२९२) बोल्हावा – वोलावा सृष्टिक्षयप्रभवा = सृष्टीच्या नाशाला व उत्पत्तीला. तो – ते (२९३) मग – मग तें रुखपण = वृक्षत्व. सामावें – समावे. (२९४) तयासी – तया निक्षेपु = स्थान, ठवस्थान. तो – ते. (२९५) लोटतीं = लय पावतात आकारु – आकार (२९६) संकल्प-वासना-संस्कार=पुन्हा विश्वनिर्माणासाठीं सूक्ष्म वासनांचे संस्कार ठेवून देव जेथें राहतात तें स्थानहि मीच मागुतें – मागौति. चराचर – आकार निजधाम – निधान.

म्हणून असा जो समर्थ तो (ईशच), नाथच (स्वामीच, गोसावीच) ह्या जगाचा असून त्याचें त व्यापकपण हें चहूंफेर असेंच जसें काहीं तें गगनासच मात देत असलेलें, कीं गगनाहूनहि मोठें मी होऊन असेन असे साक्षिभून जें तेंहि मीच आहे : तेथें सर्वसाक्षित्व हेंच सकळ व्यापकपणानें व्यापकत्व ह्या गगनाचें आक्रमून तेथें समर्थतेनें जे सत्तेचें होणें तेंच मी साक्षीभूत असे-तेथें म्हणजे तें काय महद्-भूत असेच त्या जगन्नाथाचें सत्तेचें सामर्थ्य हे त्याची चरणींची आठवण ही हरघडी देणारी होऊन, तेथें मस्तकच एक नमिलें-तेथें नमन हेंच केलें : पुन्हां पुन्हा नमन दिले, नमच केले : तेथें मी नमन करून आहे. (२८६)

तेथें काय हे शरीरगृहच जसें एक वसतिस्थान झालेलें . तेथें ह्या वसतिस्थानाला-देहाला-विश्वाला-गृहाला जसें एक नाम देण्यानें तेथें प्रेमानें राहाणें केले : त्या नामानें असे तें वसतिस्थानाचें नाम उच्चारिल्याबरोबर प्रेमच उचंबळून आले : ह्या जीवास धीर आला : प्रेम हे ओलें होऊन आले-त्यानें अंत:करणास कोरडें न ठेवितां त्यास प्रेमाचा साज करून प्रेमच तेथें नटूं लागलें-सजूं लागलें-व त्या प्रेमानें आतां तें स्थान कसे जीवितांचें जीवनलहरींचें एक सूत्रच होऊन आहे असे सर्वांगसुंदर-गात्रांचें चारु-रमणीय असें गात्रांचें झालेले एक गृह-निवासस्थान-देह-विश्व-हे रूपच पाहू लागले : तें रूप त्यानें अधिक सुंदर करून पाहिलें-त्या रूपास सर्व अलंकारांनीं मढवूनच त्यास पाहण्याचें केल्यानें, त्या हृदयामध्ये जी कांहीं एक प्रेमकला ती जागी होऊं लागली-ती आकर्षतेचें रहस्य पाहूं लागून तेथें रमून राहिली-स्वत:स रमवूनच तिनें घेतलें : असा जो ह्या नांवानें बोलविला जाणारा रूपानें देखील जाणारा-सर्व विश्व व्यापून असलेला-व तेथें प्रेम तें कसे बरे नेहमीं वर येणारें तें ह्या नांवानें व रूपानें-व हींच तीं ओलाव्याचीं ठिकाणें जो स्वत:च होऊन आहे असा तो जो तो मीच आहे. (२८७)

तेथें कसे बरें तें वसविलें गेलें तें म्हणजे ह्या जळानें-पाण्यानें-तेथें पाणी हेंच तेज, पाणी हेंच धार, पाणी हेंच रूप, पाणी हेंच नाम-अंगांत पाणीच मुरून आहे, सळसळून आहे-असे जें कांहीं बोलणें होणारें तें काय इकडे तिकडे फेकलें जाणारें नव्हेच; ते तेथेंच ह्या निवासामध्यें-वसति-

स्थानामध्ये-गृहामध्यें विश्वामध्येंच जशा कांहीं पाण्याच्या लाटाच उसळत आहेत. त्या पाण्यामध्ये-येथें त्या लाटांमध्ये दुसरें तिसरें कांहीं असणारेंच नाहीं-तेथे पाणीच एक असणारें-येथें मूळ हें पाणी-पाणी हेंच मूळ असून तेथें ह्या विषयांच्या लाटा, प्रपंचामधील ज्या काहीं लाटाच ह्या संसारास पूरच येऊन तेथें हें गृह-विश्व-देह त्या संसारानें आपलें राहण्याचें ठिकाण करून ठेविलें.

तेथे ह्या संसारानें सागरासारख्या एका पुरानेंच असणें-तेथे विषय प्रपंच संसार-नाम-रूप-गृह-ह्यांनीं तेथे भरून असणें-ह्याचें तेथें वसविलें जाणे-तेथें त्या गृहास सर्व रंग वसविले व असा जो काहीं एक निवास निवासाप्रत आला-तेथे तो निवास म्हणजे 'सतां गतिच' एक अशी महत आख्यायिकेची जागाच !! (२८८)

गृहाला गृहच शरण गेले-गृहानें गृहाचे शरण्य होऊन त्यास गृहाचें केलें-तेथें श्रीनें ह्या निवा-स्याच्या जागीं निवास करून तेथे म्हण केले कीं जी काहीं ह्या सज्जनांची गति आहे, तीच मी होऊन असावे-नुसतें असावे नव्हे, तर आहेच आहे-तेथें 'सतां गति' येथे सत जसे सत्तेचे होऊन त्याने (सज्जनसंगति) सत् म्हणून जेवढें आहे, तेथें जसें काहीं ह्या नरदेहानें जन्मणें हें धर्मसाधनाकरितांच असे विश्वसून तेथेच ते राहिले : तेथें गति म्हणजे तेजस्विता ह्या स्वभावास आल्याने, तेथें 'मी'च वास करून आहे, निवासानें आहे : असें 'सतां गति'चे जे अनन्यतेने असणें ह्या निवासानें 'सत'चे नव्हे तर 'श्री'चें होणे केलें किंवा जसें काय आधीं त 'सत'चे होऊन नंतर श्रीस आलें, असे तेथीलचें जे अनन्यतेचें मजला केलेलें आश्रयस्थान ह मजला प्रेमानें आपल्या कडेसच ओढून घेत : तेथें मी त्याचें जन्ममरण हे निवारण्याचें करतोच आणि म्हणूनच तर ह्या शरणागताला जसा एक शरण्य म्हणजे आश्रय होऊन असलेला असा मी आहे शरण ह्या शब्दानें जी आच घेतली त्या आचेनें ज्यास शरण जाणें केलें, त्यासहि पण असे काहीं शरणसंपदेचें आश्रय होण्यानें तेथें ही तसलीच आच ही लागून, तेथें काय तें परस्पर एक प्रेमाचें-गृहाचे प्रेमच तें झाल्यानें तेथें जीव हा ओढ लागतो-जीव हा ओढा घेऊन असतो-व आतां येथे आश्रयानें आश्रयास आश्रयाचें करावें, व्हावें असें एक शरण हेच शरण्य झालें.

कांहींच न सापडलें जाण्यानें-झाल्यानें तेथें मनुष्य हा बाहेर पाहूं लागून काहीं कोठें आधार हा सापडेल काय म्हणून पाहात असतो असें त मनुष्याचें भावावणे ह अनुभवानेंच तेथीलच्या स्थितीस कायमचे आश्रयाचें करूनच तेथ शरण शरण हीच संपदा आश्रयाची-आधाराची-अशी ती ह्या आर्ज-वाची करून, तेथें त्या विश्वासास एक प्रेममुद्रा दिल्यानें, तेथे परस्पर प्रेम हेच वृद्धिंगत झालें-व आता प्रेमास प्रेम हे शरण गेले-माझें असें म्हणूं लागलें-असें अगत्येचें एक नेहमीं पुरत होऊन असणे असेंच 'शरण्य' झालें. (२८९)

मी एकच अनेक झालों प्रकृतीच्या गुणाप्रमाणें प्रकृतीच्या आधीनतेचीं हीं भूतें हीं भाव्य होऊन तेथें जीवदशेनें निरनिराळीं रूपे पांघरून असणें ह प्रकृतीच्या गुणांमुळें होत असलेलें, व असाच मी ह्या विश्वामधील प्राणानें-पंचप्राणानीं-जगत असलेला ह्या जगतामध्यें वर्तत असतो. (२९०)

येथें हें काय एक लहानसहान कुचकामाचें असें मी म्हणत नाहीं-असा मी केव्हाहि म्हण-णारा नव्हेच ! हे काय एक लहानसें डबकेंच त काय कांहींच उपयोगाचें नव्हे असें त्यास त्या समुद्राबरोबर तोलत राहिल्यानें पुढे येणारें तसें बोलणें हें करूच नये काय ह्या पाण्याचें समुद्रामध्येंहि असणें होतें व त्या एका डबक्यामध्येहि : व तेथे सूर्याचें बिंब हें काय तेथें त तसें बोलणे करून त्यांत वसणारें ! तसें नव्हेच ! तेथे काय थिल्लर, काय समुद्र, काय कसेंहि मलतेंहि ठिकाण जरी तरी तेथील पाण्यामध्यें सूर्य हा बिंबून असणारा असतोच असतो. तसा मी ब्रह्मदेवापासून पिपीलिकेपर्यंत-किंवा आब्रह्मस्तंभपर्यंत-सर्व भूतजात हें व्यापून असतों : तेथें माझें बिंबणें हें ह्या हृदयाकर्षतेच्या प्रेमानें,

आश्रयानें, शरण शरण असें होण्यानें, आर्जवानें, अगत्यानें तेथें हृदय हेंच उचंबळविलें गेलें : आर्जवानें अगत्य ही पुढे होऊन तिने आपलें अंग हें संपन्नतेचें करून, तेथें ती जी ब्रम्हसंपदा हीच संपन्न अशी ह्या अगत्यतेकडून, आर्जवाकडून करून घेतली तेथे हरघडी पडेल ते काम करणें-वेळेवर हजर राहणें-प्रसंगास तोंड देऊन तेथें हातभार पोहोंचविणें-हें मनुष्याच्या अंतःकरणास पीळ पाडणारें होऊन, आतां त्या मनुष्याने आपला संपन्नतेने असलेला पुरुषभार हाच त्या आर्जवास, अगत्यास, प्रेमास केला व येथें ' सुहृज्जन ' असेंच तेथें नामाचें विधानच एक झाल्यानें, तेथें तोचि ' सुहृत् ' होय : तो जो सुहृत् सुहृत् जन म्हटला जाणारा, तो जन मीच आहे, असतो, तो मीच होय.

भूतप्रतिष्ठेनें असलेलें जे तें ब्रह्म होय, व ब्रह्म हेंच जसें प्रतिष्ठविले गेलें ह्या भूतमात्रांनीं : असे ह प्रतिष्ठेचें प्रतिष्ठणें तें ब्रह्मासहि पण आहेच व भूतमात्रासहि-म्हणून येथे परस्पराना जे कांहीं त्यानीं आपल्या आश्रयाचें करणे-आश्रय देऊन असणे, तसेंच आश्रय घेऊन असणे-हें सुहृदतेचें असेंच, प्राणाचें, अंतःकरणाचें, जीवित्वाचें जसें : माझ्या जीवींचें जाणून जो त्याप्रमाणे वागतो, तोच मला आवडतो : मी त्याचा मित्रच होऊन असतो : सुहृदच एक : प्रसंगीं समर्थाचें अंतर-अंतरातील गोष्ट-जाणून जो त्याप्रमाणे वर्तन करितो, त्यास भाग्य हें येतच-त त्याचें करणें हे सर्वमान्य होऊन असतें.

येथें शरण जे आहे तें म्हणजे आश्रयावर आश्रय घेऊन स्थिर होणे होय : अहो! जरी ह्या देहाने मनुष्य आहे, तरी पण तेथीलचें जें कांहीं एक भावाचें होणें, महत्वाचें मित्रत्वाचें होणें हे कांहीं मनुष्य-आधाराशिवाय होणेच नाहीं . म्हणून मनुष्यानें मनुष्याचा आधार हा घ्यावाच लागतो : तेथें त्या आधारावरच ह्या जीविताच्या क्रिया किंवा कर्म हाच आखलेला होणारा असल्यानें, तेथें ' शरण ' असेंच जणें म्हणणे करून, तेथें ' स्व ' म्हणून जे त्यास आधार देऊन-आश्वासनच एक तऱ्हेचें, तें देऊन उभे केलें असता, तेथें जसा कांहीं महान् अपराध हा असलेला, तरी हे जे कांहीं शरणत्वाचें करणें ते म्हणजे पायां पडूनच असणें असें एक स्वामी अंतरातील गुज हें जाणल्यानंतरच तें उपयोगास आणिलें, व आता नमस्कारच एक असा त्या अंतर्गतील गुह्यास केला . तेथें काय स्वामी हे दास्यच पाहाणारे-हंसूंच एक तेथें त्याना लोटणारे होतें व आता काय तो अपराध असा म्हटला जाणारा होतच जसा नाहीं.

म्हणून येथें ' शरण ' हे शरणागत सच शरण गेलें-आश्रय झालें-त्याचाच सर्व बोजा वाहू लागलें, असे तें आश्रयस्थान हे ' शरण्य ' कांहीं बोलायास येऊच मुळीं देत नाहीं-असें त गहनतेचें आहे.

म्हणून येथें अंतःकरणातील गोष्ट जो जाणणारा व त्याप्रमाणे आधारावर उभे केलेलें जें त्या गोष्टीनें होणें हें काय मित्रभावाचें नच असे ! अहो तेथें मैत्रीच ! रसायनच तें एक जसें ह्या डोळ्याना नववविणारें असें आनंददायक-तेथें डोळेच सतेजतेनें त्या प्रीतीनें झालें

म्हणून येथें हें त्रिभुवन जे विश्व त्या विश्वाला आता ओल्याचाच आला-तेथें मूळ ह्या जीविताचें जें तत्व प्रेमानें सिंचन केलें गेलें-तेथें काय सृष्टीच एक निर्माण केली असे एक बोलणें होणं रे ! त्याचप्रमाणे ह्या सृष्टीनें जें कांहीं वाढ घेऊन असणें व आपल्या प्रभावास ऐश्वर्यास, तारुण्यास येणें हेहि पण मजमुळेंच होत असलेलें-तेथें ह्या विश्वास जर कांहीं एक नडणेंच झालें व त्यामुळे जो कांहीं त्यावर होणारा परिणाम-जेथें राजणे हेच नडविलें जातें-तेथें त जे जसें एक चंद्राच्या कलांना क्षय लागणें व पूर्णिमेच्या जो कलाहीन असें म्हटलें जाणें, तेंहि पण मीच होऊन असतो : तेथें मूळ जें तें मीच होय. (२९२)

मनामध्ये एक विचार उठला व त्या विचारानें आपले पाय दृढ केले व आतां संकल्पच ह्या मनानें कीं, हे जें एक कांहीं करणें किंवा कार्य हेच जेव्हां तेव्हां पुढे येतलें : तेथें तो जो संकल्प हा

एक बीजच जमिनींत पेरणें असून, तेथें तें बीज अनेक शाखांना वितें-तेथें आतां एक वृक्षच निर्माण झाला-तेथें त्या वृक्षपणानें काय त्या संकल्परूपीं बीजामध्यें सामावून असणें मसतें ! तसें येथें जें संकल्पाचें अंग तेंच एक सर्व कांहीं त्या वृक्षाचें होणें हेंच करून असलेलें होय-तेथें मग जें कांहीं तें वृक्षानें वर येणें तहि पण पुन्हा संकल्परूपांतच मिळून जाणारें असतेंच असतें. (२९३)

अशी एक ह्या सृष्टीस निर्माण करणारी कळा ती संकल्परूपी बीजच होय-तेथें रूप कसलें ? तें जसें ह्या वासनांचें असणें ह्या भूतमात्रांच्या ठायीं तें ' त्रिगुणम वासित ' असे जें सर्व भूतांच्या ठायीं असणारें, परतु तें जसे एक नव्ह जाणणेस येणारें असें काय तें बुद्धीचें एक ? नव्हेच ! काय तें महत्‌चें ? तर तसेहि नव्हेच ! तें महत्‌च्याहि पलीकडे असणारें जें अव्यक्त एक निर्मणच जसे तसे तें असून, ह्या ब्रम्हकल्पाच्या शेवटीं त्या बीजाचें जें कांहीं निक्षेपणें होतें तें ज्या स्थानीं तें मी होय.

दृष्टीनें निक्षेप केला : वासनेनें रूप घेतलें-शुद्ध संकल्प हाच तेथें जगासच आला व त्याने जाग्रतेपण पाहूं लागून, जाणे होऊन, जाणतें होऊन, तेथें प्रभाव-ऐश्वर्यच पाहिलें-असें तें स्थान मीच नव्हे कसे ! अहो, तें मीच होऊन असतो बरें ! तें मीच होय-मीच तें आहे. (२९ )

देव देव म्हणून जे कांहीं एक नेहमींच जेव्हा तेव्हां ह्या मनासच चढ देणारे-तेथें काय देव हे अमर नव्हत-का ते निर्जर असेहि नव्हत ? का ते सुर म्हणावे, का विबुध म्हणावे हें कांहीं समजणारें तें कसे ! काय हा देव शब्द सर्वत्रच लागू होणारा तो काय म्हणून ? काय ह्या अमराचें किंवा निर्जराचें जें असणें तेथे काय कांहीं ह्या देव शब्दानें त्या निर्जराची किंवा अमराची हमी घेतली आहे असे जर नाहीं, तर येथें जेव्हां तेव्हां एक ह्या देव शब्दानेंच जसा आपला वारा त्या सर्वांच्याकरितांच काय कोण जाणें ह्या मनुष्यदेहामध्यें फिरवून असावें असेंच एक दिसण्यास असतें : परतु येथें ' तूं मरणारा नव्हेस बरें ! ' असेंच एक निश्चून केलेलें सामर्थ्यच जसें ह्या मनुष्यजन्मास असलेलें, तेथे 'अ' म्हणजे नाहीं, 'मर' म्हणजे 'मर असें नाहींच' : तेथें वासना हीच तृप्तीस पाहाणारी व्हावी असेच एक विधान तें ह्या मर शब्दास पाहून, तेथें वासनाशाति हीच व्हावी असेंच तें लक्षण तें ह्या अमरपदास पाहातें तेथें ' फुकट मरूं नको, जे कांहीं तुला पाहिजे तें हें घे ' असेच वासनेस पुरविणारें जे तेंच अमर लक्षण होय : अशा ह्या लक्षणानीं युक्त असेच जसें ह्या लिंगदेहाचें होणें तें त्या वासनांकरिताच फक्त पुन्हां पुन्हां जन्मास येतें-ते त्या भगवंताच्या निजधामामधूनच ! तेथें आता चराचर हे आकारले-चराचर हेच रचलेले होऊन आकार पाहू लागले-तेथे संस्कार, वासना व संकल्प ह्यानीं जो जन्म घेतला-तेथे नामरूप हें प्रेमच पुढें आले-वर्णव्यक्ति हीं बरवेपणास आलीं व जाति ही आकाराने आनंद झाली. काय कल्पांतींचे ते जसे सर्व आकार लोपले-जातींचे भेद हे नाहींसे झाले-तेथे व्यक्तिहि नाहीं व वर्ण हाहि पण नाहीं-तेथें नामरूप इत्यादि जीं तींच लोट घेऊन त्या कल्पांतांतच आपला सर्व आकार हाच फेडून टाकणारीं झालीं.

असे जे अमर ते निधान होत : त्या निधानाच्या ठिकाणींच ते पडून राहातात त्या अमरांनींच त माझें निजधाम हें आपलें निधान समजून तेथेंच ते पडून असतात : काय ! ह्या अमराचें ह्या निधानावर-ह्या द्रव्यावर-ह्या नरदेहावर केवढा बरें ईश्वरी संकल्पच एक होऊन असणें तें ! त्याचें तें तसे पडून राहाणें हें जसे, हे भगवन् , तुमच्या ठायीं अखंड प्रीति ज्याची आहे त्याचीच मला संगति द्या म्हणणेंच एक-तेथे मजला दुसरें तिसरें कांहीं एक नको. तेथें प्रीति-तुमचे ठायीं प्रीति-हीच मला आवडून आहे-तेथें मी कांहींच करूं इच्छिणारा होत नाहीं-दुसरें तिसरें कांहीं मागणें मागत नाहीं-तेथेंच-त्या प्रीतीचे ठायींच-मी पडून राहीन बरें ! अहो जी स्वामी, जी अहो, तुम्ही ह्या माझ्या बोलांना आपलें चित्त द्या-तेथें मी त्या प्रीतीच्या संगतीशिवाय दुसरें कांहीं मागेन तर तुमचीच आण

मजला असो असें एक जसें निश्चयात्मकच तें त्या अमरांचें म्हणणें हें तें प्रीतिनिधान मागून असणारें होय : तेथें तुम्ही आम्ही असे दोन नाहींतच, तेथें एकच एक असेच तें मग होणारें झाल्यानें, मग एकानें दोनीचें होणें हें नाहींसें केलें व ते एकच झाले-असे तें प्रीतीचें असणें हें आम्हांस बहुप्रिय आहे असे त्या अमरांचें म्हणणें होय-व तेंच माझें धाम-निजधाम-निधानच-ठेवाच एक-द्रव्यनिधिच ! (२९५-९६)

तपाम्यहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ।। १९ ।।

तपामि = तपतों, तापतों ( सूर्य होऊन ). वर्षम् = वर्षाव करतों. निगृह्णामि उत्सृजामि च = आकर्षण करून घेतों व पुन्हां भरूनच टाकतों. ( बीं रुजण्यानें अंकुरच वर आले असें पृथ्वीचे गुण पृथ्वीस येणारे करतों.) अमृतम् च एव = तसेंच अमृतहि सत् असत् च अहम् = सत् म्हणजे भावरूपानें व असत् म्हणजे अभावरूपानें मीच आहे-असतों · सत् म्हणजे भावच, कारण असत् जें आहे त्यास भाव असत नाहीं, व जें सत् आहे त्यास अभाव कधीं येत नाहीं.

अहम् तपामि अहम् वर्षम् निगृह्णामि च उत्सृजामि : अर्जुन, अहम् अमृतम् च एव मृत्युः, च सत् असत्

मीच तपतो-सूर्य होऊन मीच तापतो · मीच वर्षतो-मेघ होऊन आकर्षण करितों व पुन्हा वृष्टिरूपानें भरून टाकतो · अमृत (देवांना अमरत्व देणारें) मी आहे, तसेच मृत्युहि (मानवी सृष्टीचा) पण मीच हे अर्जुना, सत् व असत् जें तेंहि मीच आहे.

मी सूर्याचेनि वेषें । तपे तैं हें शोषे ।
पाठीं इंद्र होऊनि वर्षें । तैं पुढती भरे ।। २९७ ।।
अग्नि काष्ठ खाये । तैं काष्ठचि अग्नि होये ।
तेवीं मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें ।। २९८ ।।
यालागीं मृत्यूच्या भागीं जें जें । तेंहि पैं रूप माझें ।
आणि न मरतें तें तंव सहजें । अविनाश मी ।। २९९ ।।
आतां बहु बोलोनि सांगावें । तें येकिहेळा घे पां आघवें ।
तरी सतासतहि आणावें । मीचि हें गा ।। ३०० ।।
म्हणोनि अर्जुना मी नसे । ऐसा कवण ठाव असे ।
परि प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें ।। ३०१ ।।
हें आंतु बाहेरी मिया कोंदलें । जग निखळ माझेंचि ओतलें ।
कीं कैसें कर्म तया आलें । जे मीचि नाहीं म्हणती ।। ३०२ ।।
तरंग पाणियेंविण सुकती । रश्मी वातीविण न देखती ।
तैसें मीचि ते मी नव्हती । विस्मयो देखें ।। ३०३ ।।
कां अमृतकुहां पडिजे । कीं आपणपयातें गिंवसु काढिजे ।
ऐसी आथी काय कीजे । अप्राप्तासी ।। ३०४ ।।
ग्रासा एका अन्नासाठीं । आंधु धांवताहे किरीटी ।
आडळला चिंतामणी पायें लोटी । आंधळेपणें ।। ३०५ ।।

तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे ।
म्हणोनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंविण ॥ ३०६ ॥
आंधळेंया गरुडाचे पांख आहाती । ते कवणा उपेगा जाती ।
तैसे सत्कर्माचे उपखे ठाती । ज्ञानेविण ॥ ३०७ ॥

(२९७) तपे = तापतों (२९९) अविनाश मी - मीचि आहे. (३००) येकिहेळा = एकदम. (३०२) निखळ – निखिल. तया आलें – तया आड आलें-तया ओढवलें. (३०३) देखती – देखिजती नव्हती – नोहती. (३०४) कां – परी. अमृतकुहा = अमृताच्या कूपात. गिंवसु – कडिये ऐसी – ऐसे. अप्राप्तांसी = अभाग्यांस. (३०५) आंधु – अंध. आढळला – आडळला. आधळेपणे – आधलेपणें. (३०७) आंधळेया .... = अंधाला गरुडाचे पंख मिळाले तरी काय उपयोग? सत्कर्माचे . = यथार्थ ज्ञानावांचून सत्कर्माचे श्रम व्यर्थ होतात

सूर्याच्या रूपानें मी तपतों–तापतों, तेव्हां हे विश्वच जसे का शोषले जाणारें होते : नंतर प्राची दिशेचा स्वामी इंद्र म्हणजे मघवा होऊन मी वर्षतोंहि : ते जे पूर्वी शोषिले गेलेलें तेंच (पुन्हा) भरून निघतें : शोषण झालेले जे त्याचें आता भरणेच झाले. (२९७)

एखादा गलेलठ्ठ अथवा काबाडकष्टात खपणारा मनुष्य किंवा ज्यांनीं म्हणून एक त्या जमिनीची मशागतच करण्याचें घेतलें, त्याचे ठिकाणीं ती जी वृत्ति ही रान, मशागत, पीक वगैरेच पाहाणारी असते : तेथें हें जे काहीं नागरिकास उत्तमत्व ज्यायोगें येणारें, तेथे तें जसे एक मूलद्रव्यच असून, त्यांतील ज्या ताठर होऊन असणाऱ्या अथवा अज्ञानच घेऊन असणाऱ्या बाजू ह्या अवयवाचें ताठरणेंच एक तें जसे काहीं एक समिधारूपानें–अवयवांचें आपल्या मूळच्या रूपास नच त्या तितक्या प्रमाणात येण्याचें झाल्यानें–तेथें समिधाच ती ताठरणारी बाजू अथवा वृत्ति असून, तीच मुळीं ह्या उत्तमत्वाने उचलिलेला जो गृहस्थधर्म त्यासच पाठीवर घेऊन असणारी होय. म्हणून येथे ही गतिच एक त्या बाजूंना मिळाली, तरच तेथे ते सौजन्य अथवा उत्तमत्व हें येऊ लागून, तेथें मग अनेक ज्या काहीं बाजू अज्ञानास मूळभूत असणाऱ्या त्या त्या गतीसच उत्तमत्व हें कसे पोहोंचतें व्हावे असेच पाहून असल्यानें, तेथें श्रेष्ठत्व हें कसे प्रस्थापित व्हावें–तें म्हणजे ह्या अज्ञानजन्य बाजूंनीं–भूतांचें जे प्रकृतीचें सर्वथैव असें-तेथे काय ह्या भूतांना सूत्र हें नसणारें व शिखाहि पण तेथे कोठची : असे तें नामसूत्र नसलेलें, त्याचप्रमाणें वन्हिशिखाहि पण नसणारी असल्यानें, तेथे ह्या गतीनें तें जीवित हें मनुष्याची जी योग्यता तेथेंच आणून सोडतें.

अग्नि हा काष्ठे म्हणजे लांकडें खातो, तेव्हा ते लांकूड हें जरें अग्निच होऊन असणारे होते: तसें मरतें जें तें व मारितें (म्हणजे मारणारे) जें तेंहि माझेंच स्वरूप आहे : तेथें स्वरूपलक्षण हें जसे लक्षणच रूप होऊन येणारें किंवा स्वरूपास पाहा म्हणणारें होय (२९८)

तेथें भागच एक–कामच जसें विभागिलें गेलें–म्हणून हा जो कांहीं भाग, श्रमभाग, हा ज्यानें म्हणून घेतलेला त्यास मृत्यु ही संज्ञा आहे : तेथें तो अनेक नांवांनीं असलेला जरी, तरी तेथें मृत्यु ह्या शद्बानें अनेक असे भाग घेऊन तेथें निरनिराळ्या प्रसंगीं त्याचें तें करणें हें भागाचें असेच कार्य, भागाचें असें (महा)भागाचें तेंहि माझेंच रूप आहे : व मं मरतें जें आहे तें तर केव्हांहि मीच : तेथें भाग हाच एक रूप घेऊन येतो : मारतें जें तेंच जसें भागासच रूपाचें करून रूपास आलें : तेथें मृत्यु हा काय भागाचा झाला अथवा भागानें ही पाहून तेथें रूपास येणें केलें : असें तें रूपास येणें तें माझें रूप होय.

येथें आतां तत्त्व म्हणून जें न मरतें असे-तें काय मरतेंहि नव्हे व मारितेंहि नव्हे : म्हणून तें एक अविनाश असेंच : तेथें त्याचें स्वरूपाचें होणें हें जसें कांहीं मरतें-मारितें दोन्हीहि नसणारें असें 'सहज' असें अविनाश. (२९९)

आतां पुष्कळसें बोलणें करून सांगण्याचें तें आतां एकदमच सांगून टाकतों कीं,-एकदम तें असें समजेस घे कीं,-'सतासत'हि सर्व जें तें मीच आहे हो ! हें सत् अथवा असत्-त्यास वाटेल तर खरें म्हण किंवा खोटें म्हण-तें सर्व मीच आहे (३००)

म्हणून, हे अर्जुना, मी नाहीं असा ठाव (ठिकाणाच मुळीं ज्यास नाहीं, पत्ताच मुळीं ज्यास लागेना) तो माहीत असणें हें तरी काय ! तेथें खोल पाण्यास मुळीं ठावच नाहीं असें तें बहुखोल असल्यानें, तेथें सहजतेनें-एकदमच-तो कसे बरें जाणला जाईल असें पाहाणेंच होत नाहीं : तो पाहाण्यानें जवळ असतो, परंतु ह्या प्राण्यास काय म्हणावें बरें कीं दैव हें जवळ असून तें पाहातच कोणी नाहीं : कसे बरें तें ! काय दैव म्हणावें ! न देखण्यानेंच तें जसे वर यावे, देखीचें व्हावें, दैवाचें व्हावे असेंच ज्या प्राण्यांनीं घेतलें, त्यांना काय दैवाचें होता येईल ? तेथें देखणेंपण हें कांहीं रूपाचें झालें नाहीं व देखणें-देखणारें असेंहि झालें नाहीं. (३०१)

अहो, आत पाहावे तों मीच आहे, तसेच बाहेर पाहावे तोंहि पण मीच जसा कोंदकोंदून भरलेला असा आहे : हें जे कोंदणें तें काहीं सहज समजण्यास येणारें होतच नाहीं : तें जसे कांहीं पट्टी लावून जसे भिंग हें चौकटींत बसवितात, तसें हें जें साधणें तें जसे काय कोंदणानेंच सांधून असलेलें असे : तेव्हा हे सर्व विश्व जसे काय एखादें ओतीव असे मूर्तीचें एकजीव होऊन असलेलें असेच दिसणारें होय: तेथें मुळींच रेसभरसुद्धा जागा ही पण मींच व्यापून असलेली असल्यानें, तेथे सर्व जग हें जागण्यानेंच एक, म्हणजे ह्या श्वासभारानें घेतलेला तो अंतरक्रम हा अतरांतील साक्षित्वानें सर्व जग हें जणूं माझेंच-केलेलें-ओतलेलें असे असून, तेथें कां बरें तसे तें पाहाण्याचें होत नाहीं ? तें कांहीं नवलाचें असें तरी काय म्हणावे ! जीवदशा ही प्राणानें संचरलेली अशी, तेथें तो जीव हा सर्व देहाची व्याप्ति घेऊन असलेला, तेथे प्रभा ही चोहोंकडे फाकणारी अशी निखळ माझीच असून, ह्या प्राण्यास जें कांहीं जागण्याचें कौतुक-तें का बरे सापडूं नये हें कांहीं बोलण्यास येऊंच देत नाहीं : तेथें ह्या जीवदशेनें आपले अज्ञानावर उभें राहून, तेथें साक्षित्वानें असलेलें जे निवृत्तिपर लक्षण हें त्या नामसूत्रानें चालणारें असलेलें तें न पाहाता, ह्या कर्मभूमीसच मुळीं आकलन करण्याचें तें कसें हें नच समजून घेता, तें आकळून असण्याचें नच करिता, हीं कर्मेंद्रियें हींच मुळीं मोकळीं ठेविलीं : म्हणून कर्मेंद्रियें जीं तींच ह्या मनासच मुळीं अगोदर आकळून घेऊन तीं आवरलेलीं जर, तरच येथें कांहीं गम्यत्व हें वर येऊं काय असेच म्हणूं लागून, त्या प्राण्याचें जें कांहीं ह्या वृत्तीस आकळून असण्याचें धैर्य हें तेथें काय कांहीं कसोटी ही पाहविली जाईल असे विचारणारें होऊन, तेथें मग तें कर्म हें जें आसन असणारें, आड येणारें, आड पडणारे तें ह्या कर्मेंद्रियाच्या आवरण्यानें तेथे योगच जसा युक्ततेचा झाला : व आता कर्मेंद्रिये हींच मुळीं मनाच्या मोठेपणामुळें, मनाच्या दिव्यतेमुळें, मनाच्या आवरण्यामुळें, मनाच्या 'नच आठव' ह्या कर्माचें केल्यामुळे, मनानें एक देवपणाचा बाणाच पाहिल्यामुळें, एक मन हेंच सर्व कांहीं होऊन असल्यानें, तेथें मन हेंच पुढें घेऊन, त्यानें ह्या इंद्रियांना आवरून धरून, ह्या देहास, विश्वास, वृत्तीस आवरून धरून असण्यानें, तेथें मग मी जो काहीं सर्व व्यापून असलेला, तो नाहीं म्हणण्याचा प्रसंगच पुढें होणारा होतच नाहीं : येथें हें कर्मच मुळीं-ह्या इंद्रियांचें मोकळें असणें हेंच मुळीं-युक्तता ही नच पाहात राहिल्यानें, तेथें आश्चर्याचें होऊं नये-घाबरून जाऊं नये-संधि चुकवूं नये-योगास योजणें जें हें नेहमींच करावें लागणारें तें दवडूं नये-तरच हें असें 'मीच नाहीं'

असें बोलणारें बोलणें हें काय ' कसलाच मुळीं वृत्तिभार हा व्यर्थ दवडू देणें ' हें होतच नाहीं : वृत्तीला आवरून असणें हे एक त्या देहधारणेस मुळीं तें तत्त्व पाहविण्यास लावणें होय. तेथें कर्तव्यात असणे तेव्हांच काय तें तसे इंद्रियांना आवरून असणें हें करावें व एरव्हीं पाहावें तों वृत्ति ही मोकळी सोडून देणें हें त्या कर्तव्य केलेल्या भारासहि पण दवडणारे होतें : असे झाल्यानें तेथं वृत्तिभार हा मनुष्य-प्राण्यास जी एक संधी मिळाली ती ' पुढे आलेले तें पुढें घेऊन असणें हें ती ' वेळा जर चुकविली-दवडली—तर पुन्हां तें तसे व्यक्तीचें पुढे येणें व्हावे व मग मला ती अभ्यासाची सधि ही दिसेल-सांपडेल-असे म्हणणें होऊ लागणारे होते : म्हणून येथे वृत्ति ही आवरून धरून, ह्या कर्मेंद्रियाना म्हणा अगर मनाला म्हणा वृत्तीवर घेऊन असावें-वृत्तीनें असावे, तरच तो भार हा सांपडणारा होतो : तेथे भोग हाच जणूं कर्मच म्हणूं लागणारा असतो. म्हणून युक्ततेनेंच तो भोग हा इंद्रियाना आवरून धरून, तेथें आपली दिशा ही उचलून असणें हें त्या भोगासहि-योगभोगासहि पण-आपलें ऐश्वर्य देखण्यास देणारें होतें : व मग असे तें ' मीच नाहीं ' म्हणजे दिव्यतेनें असणारें जे देवलक्षण तेंच मुळीं ह्या जगात-विश्वांत -देहात- नाहीं असे म्हणणें तें काय कोठचें तें उमजण्यास येऊ लागून, मनुष्यास वृत्ति ही सांपडल्यानें-तेथें मग व्यर्थतेचें जे बोलणें जे ' मीच नाहीं ' म्हणणारें-तें आपलें वृत्तिसाक्षित्व सापडल्याने, तेथे मग प्रयत्न तरी पुढें होतो-व्यक्ति हीच भेटणारी होते-गृह हेच मजला पाहा म्हणतें : व तेथें तें जे नामसार तत्त्व अथवा युक्ततेनें असणारे भोगभाव्य हेंच ह्या मनुष्य-देहास आपला अलंकार घालून, तेथें राजीवतेचें एक ह्या मनास रंजनच येणारें होतं-येण्यानें मन हें रमतें-तें प्रसन्न होतें-ते आपला तृप्ततेचा असा जो एक दिव्य भार ह्या देहास देऊन, तेथें वृत्ति हीच साक्षित्वाची झाल्यानें देवभारच जसा देवपणास आला-भोगलक्षण हेंच समाधानाचे झाले व त्यानें उच्छ्वास घेऊन आपलें मन हें प्रशात केलें : प्राणच प्रसन्न झाला व ह्या एकमेकाशीं बोलण्याने तेथे अंगचें पाणीच मुळीं हास्य करूं लागलें. (३०२)

पाण्यामध्ये उठणारे तरंग हे पाणी जर तेथें नसेल, तर ते सुकून जातात . मनामध्ये येणारे विचार हे तेथे जर चित्त नसेल, तर ते म्हणजे नसतेच अभ्राचे : ते परिणामकारक होत नाहींत : ते उमवूं शकत नाहींत : तेथें जर चित्त नसेल, तर ते तरंग हे व्यर्थच होत (अभ्र अपव्ययाचे होत) : दिवा जर तेथें नसेल तर-किंवा वात जर तेथे लाविलेली नसेल तर-रश्मी किंवा किरण हे दिसणारे होतच नाहींत : येथें काय बोलणें हें जसे कांहीं त्या रश्मी ह्याच पाहाणाऱ्या होत नाहींत असे एक जें तें म्हणजे पाहिल्या जात नाहींत किंवा पाहविल्या जात नाहींत : त्या रश्मी, ते किरण जे ह्या दिव्यापासून उत्पन्न होणारे-परंतु तेथे म्हणजे त्या दिव्यांत जर वात नाहीं, तर हे बोलणें कसे बरे—तसे येथे मीच जे असतात ते 'मी' होतच नाहींत-हें कसे बरें विस्मयाचें एक असें आहेच असेच पाहा.

काय येथे आश्चर्य करण्यासारखी जागा ही आहे ! म्हणून येथें 'मी'च जे होऊन आहेत, ते 'मी' होत नाहींत हें कसे खरें खोटें याजमध्येंच एक डाव लागलेला कीं, हें जे कांहीं पैंज करूनच एक जसें म्हणणें कीं, 'मी'च जे होऊन आहेत, ते 'मी' नाहीं असें म्हणणारे होतात . हें विस्मयाचें असें जसें का उतलेंच तें जे वृत्तीचें ! तेथें वृत्तिच मुळीं मनाची झाल्यानें-होण्यानें-तेथे चांचल्य हेच भटणारें होतें आणि म्हणूनच तर कसें हें विस्मयकारक असें एक आश्चर्यच. (३०३)

येथें दुसरें तिसरें कांहीं पुढें घेण्यानें तें स्पष्टतेस आणलें जाणार कदापिहि ! म्हणून जसे कांहीं अमृत हें विहिरींत पडलेलें तें काय सांपडणारें किंवा चवीनें तरी काय कसचें निवडिले जाणारें !!

हें एक अमृतच प्राप्त झालेलें, नरदेह हा एक अंशतः अमृताचा असलेला : नरजन्म हा जसा कांहीं मायेनें आडविला जावा-तेथे हा जन्म कसा भाग्याचा असूनहि-किंवा जसे काहीं अमृताच्या विहिरींतच पडलेला जो त्यानें स्वतःस कसें काय बरें निवडावें-तो जन्म साधावा, दैवाचा करावा, भाग्याचा करावा !! तसें येथे आपणच आपणास ढुडकणें-कसें बरें आपण आपणास यंत्रसेख अथवा विक्षणारें होईल तें पाहाण्याचें जर कोणी करील, तर तें वर सांगितल्याप्रमाणें होय ! म्हणून अशी ही एक कथा जशी तशी गोष्ट असल्यानें, तेथें त कसेहि जरी कोळूं केले, तरी पुरतें तें कसें होणारें कोण जाणे ! म्हणून येथें अप्राप्त जें त्याची गोष्ट इतकी विलक्षण आहे कीं, तेथे महत् एक भार ह्या मनास जसे दडप असे म्हणणारा होऊन असतो-असे ह्या कर्मप्रारब्धवादीचें तंत्र हें अति विलक्षण असून. ते काय कांहीं कितीहि जरी परोपरीनें सावरण्याचें केलें, तरी ते पुरतें होणारे नव्हेच : म्हणून 'अप्राप्त' तें कसे हें समजून तरी एस निदान : भाग्य हे कसे कोठें लपून असतें तें पाहा तरी : अभागी जो. 'भाग्यवंत नाहीं जो,' त्यास काय करावे बरें !! त्यास भाग्य हे कोठून येणारें होईल !!! (३०४)

अन्नाच्या एका घासासाठीं अंध जो आहे तो धावतच येणारा असतो : अंध असे तो अन्नाच्या एका घासासाठीं धावत येणारा-असे धावत येत असताना रस्त्यामध्यें एखादा चिंतामणी जरी त्यास भेटण्यास झाला, तरी तो त्यास जसा का पायानें लोटून देऊन पुढे जाणारा होतो-कारण डोळेच मुळीं पाहाणारे न झाल्याने-आंधळेपणाच जेथें-तेथें काय तें चिंतामणीचें असणें हें सापडणेंच होत नाहीं. तो चिंतामणी पायानें दूरच लोटला जातो; परंतु त्याचे तें पाहाणें चिंतामणीस पाहाण्याचें थोडेंच !! तेथे एक अन्नाचा घासच मिळावा हाच उद्देश पुढे असल्यानें, तेथें साहजिकच त्याचें तें न पाहाणें होणारे. (३०५)

तसे ज्ञान हें जेव्हा साडून दिले जातें, तेव्हा अशी ही दशा आहे-होते-येते : म्हणून जें कांहीं करणे तें केले असे होतच नाहीं : कारण तेथे ज्ञानच नाहीं : जाणणेच नाहीं : जाणतेपणाच घेऊन चालणे केलें नाहीं : केलेले काम ज्ञानाने केले नाहीं : त्या कामाच्या ज्ञानाशिवाय-त्या कर्माच्या, कर्तव्याच्या ज्या काहीं जाणण्याच्या, ज्ञानाने असणाऱ्या तल्लक्षणा-जाणिवा-ज्ञान तेच होऊन करावे, तेव्हाच ते केलेलें केलें असे होतें : म्हणून जें काहीं करावे, तें त्यात मन घालून-त्याशीं बोलण्याचें अनुसंधानच ठेवून-करावें, तेव्हाच तें केलें असे (३०६)

आंधळ्या गरुडाला पंख आहेत, ते कुणाच्या बरे उपयोगास पडतात : तेथे त्या गरुडास पंख असले, तरी तेथे उडणेंच नाहीं : तसे येथे सत्कर्म हें जरी केलें, तरी त्यांतील खोंचनोक ही जशी कांहीं त्या कर्म करणाऱ्यामधूनच तुटून जाऊन बाजूस पडणारी होते; कारण काय तर तेथे ज्ञान त्या सत्कर्मासंबधीं नाहीं : तेथील नोकझोंक हे-जे सत्कर्म म्हटविलें जाणारें ते त्या सत्कर्मासंबंधीं ज्ञान नसल्यामुळे-त्यामधून तुटून जाऊन बाजूसच होणारे होतात : तेथील मंगलदायक जें-प्रकाशाचे जे-जाणता प्रकाश जो-ह्या देहामधील ज्ञानदृष्टीनें पाहिला जाणारा व जेथे अनुसंधान हेंच एक मरणेंच करून असणारें, ते आता म्हणजे ज्ञान जर नाहीं, तर तेथील शब्दाचें म्हणा अगर बोलण्याचें म्हणा-लिंगदेहाचें म्हणा-तसेच आकंठ मर्यादेचें म्हणा-ते जसें काहीं तोडूनच नेलें असें होतें : तें सर्व खोचपेच एक झाले व ह्या देहाने जे काहीं केलें ते नच केले होऊन, व्यर्थ श्रमाचें एक ओझेंच : म्हणून ज्ञानानें-जाणिवेनें-जाणतेपणानें होऊन तेथील संधानानें ऐस : जेव्हां कांहीं एक सत्कर्म हें करण्याचें होतें, तेव्हां मगच तेथें ते ज्ञान हें वेळानें कां होईना पण आपलेपणास येणारें व्हावेंच असे घेऊन असतें : तेथें जेवण जेवलें तरी नच जेविलें असें एक उपासमारच ! उपवासणें हेंच तेथें झालें गेलें-सत्कर्म हेंच जेथें ज्ञान त्यानें नेलें : व येथें श्रमच व्यर्थ : श्रम केलेले व्यर्थ गेले असे. (३०७)

त्रैविद्या मां सोमपा पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकम् अश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥

त्रैविद्याः ( त्रैविद ) = तीन विद्या, तीन वेद, विद्यात्रयी जाणणारे : मजला तीन तऱ्हांनीं जाणिलले : तीन विद्यांनीं ( वेद, विधि, विधान ) मला जाणून त्रै = संरक्षण करणे विद्यांनीं संरक्षण केलेले म्हणजे तीन वेद जाणणारे सोमप = सोमरस पिणारे मरुद्गणच देव जसे. हें मनच जेथें जन्मतें तें स्थान त्यांनी पिऊन ते पूतपाप झालेले इष्ट्वा = यजन करून. स्वर्गतिम् = स्वर-गतिम् अथवा स्वर्ग-गतिम्. प्रार्थयन्ते = अर्थच प्रार्थ असा प्रार्थनेचा करून. आसाद्य=छंदास लावून : पुण्य हेंच त्यांनीं छंदाचें केलें. अश्नन्ति = जातात, येतात जा – ये करून : देह-मरण क्रिया ह्या त्यांनीं आपलें पुण्यच जसें स्वर-गतीस आणून तेथें तें छदाचें केलें व दिवि म्हणजे ह्या देहधारणेस त्यांनीं देवभोगच भोगताहेत असें सहज अर्थप्रद असे प्रार्थनच एक ते होऊन बसले.

त्रैविद्याः सोमपाः माम् यज्ञैः इष्ट्वा पूतपापाः स्वर्गतिम् प्रार्थयन्ते । ते पुण्यम् सुरेन्द्रलोकम् आसाद्य दिवि दिव्यान् देवभोगान् अश्नन्ति ।

विद्यात्रयींनीं संरक्षण केलेलें व स्वर्गति प्राप्त झालेले माझे ( यज्ञाने ) यजन केल्यानें त्यांना सोमरस पिणें हें मिळणारें—व आतां पाप नाहींसे झाल्यामुळें पवित्र झालेले ते स्वर्गतीची प्रार्थना करितात . ते पुण्य जें त्यांनीं केलेलें त्या मुद्दलावर उभें राहून सुरेंद्र म्हणजे देवलोक भोगतात — तें पुण्य करण्याने जो काहीं एक छद त्याना आलेला त्याजवरच ते उभे राहून देह हाच दिव करून दिव्य असे देवभोग भोगतात (२०)

[ त्रिविधतेनें-विधिविधानविहित असे विद्यमानास येणारे जे-विद्यमानात वागणारे जे-विद्यमानानें असणारे जे-ते ' त्रिविध, ' ' त्रैविद्य ' होऊन असलेले ते : तेथें हे जे ' वेद ' म्हणजे जाण–जाणणे-नाणते झालेले-ज्ञाते ते, व असे ते म्हणजे ह्या मनाचे जे जन्मणें, शुद्ध स्वरूपाने असणे, तें त्यानीं नेहमींच पान करून असणें व अशानें ते पून म्हणजे धूत झालेले आहे पाप ज्याचें असे पूतपापाः— तेथें ' जो वरि मायेचा पूत व देखिला बाप'-असे ते त्यानीं माया ही पाहाणेंच केलें नाहीं–त्यानीं पूतपाप होऊनच ह्या माझ्या स्वरूपासच जसे येणें केले–तेथेंच ते राहिले–मला तसे त्यानीं शुद्ध (स्वरूपानें) करून ह्या दासीपणास पाहिलेच नाहीं, तर ते सर्वथैव तेच होऊन राहिले. असें त्यानीं माझें यजन केले : त्यानीं हा एक यज्ञ करूनच मजला 'इष्ट' असें आवडून घेऊन नेहमीं 'स्वर्गति' हीच प्रार्थू आदरिली : स्वर्ग-, स्वर-ग, गति हींतच प्रार्थनाच जशी एक नेहमीं आपलीशी केलेली असे ते त्याच गतीस नेहमीं हात जोडूनच आहेत असे : त्यांनीं आतां आपलें पुण्यच, अथपासून इतिपर्यंत, सर्व साद हाच उभे राहण्यास घेतला-तेथें पुण्यच जसें साद झालेलें तें सुर म्हणजे (त्रिपद अथवा त्रिदश अथवा) विबुध असे सुर, देवलोकचें जें इंद्रपदच (अवगम) तेंच भोगच भोगण्याचे ह्या देहास देऊं केलें-दिवि ह्या देह आकाशाला (देहावरील जो वायूचा दाब त्यास) दिलेलें जें तें देऊन-घेऊन-त्यांतच रमून देवभोग घेत राहिले.

तेथे अश्न म्हणजे येणें-जसे कांहीं पूर्वी दिलेलें कर्जच तें आतां ह्यानीं परत मागण्याचें होत आहे असें-तेथें नेहमीं असे 'येणें'च एक पुढे करून त्यांतच ते राहिले : तेथें त्यांनी 'देणें-घेणें'च किंवा दुसरें कांहीं बोलणेंच आवडून घेतले नाहीं : तसेंच 'वसन' हेंहि एक वसनच तें त्या येण्यानें पांघुरविलें असे ते भोग ह्या देहास देऊन, तेथें ते देवच आहोंत असें म्हणणारे-हे काय विलक्षण नव्हे काय ! काय

ते जसे आया बंधुवर्गासहि लागू होऊन तेथें पुरुष हा 'अज' असाच म्हटला गेला : तेथें तें जें नेहमींच्या नेहमींच एक पुढें झालेलें तें कालाचे उपमेस दिलेलें असें 'लांडग्याचें भेकाचें' जें देवबृक का देवरुखाचें तें नच मुळीं आठवणारें असे असून, तेथे काय ह्या पुरुषास कसे त आठवणीस आणतें तें पाहाण्यासारखें आहेच : म्हणून ते आ-साद असेच.

प्रथम त्यांनीं काढली-कसकसून खालच काढली-ह्या विग्रमानाने असणें जें नरदेहधारण, तें १ उपनिषदें, २ ब्रम्हसूत्रे व ३ गीता ह्या त्रयींनीं त्याना आधारावर उभें करून, यज्ञ इष्ट केले व मूळ जें मनाचें तेंच त्याना सापडलें व त्याजमुळें ते पूतपाप झाले व आता पुढें काहींच न गति झाल्यामुळें त्यानीं स्वर्गतीची प्रार्थना पुढें घेतली : त्या प्रार्थनेसच त्यानीं स्वर्गति हीच अर्थप्रधानतेची अथवा अर्थप्रार्थन हेच स्वर-गतीचें जे महत् असे स्थान ( त्यास नाम म्हणा वाटेल तर ) तेंच एक प्रार्थ असे दुसऱ्यांनीं म्हटलेलें-ते तेथेंच राहिले : आतां नाम पुढें झालें (म्हणा बटकाभर) व हेंच पुण्य सर्व साद घेऊन चाललेलें तें दिव म्हणजे (आकाशाच्या वर टेकणारें जें) संकल्पात्मक टाकून देऊन एक ह्या सादानें देवभोगच भेटणारा होऊन, तेथेच ते आपला सर्व व्यवहार हा करून असतात : तेथें देवभोगच ! व लोक जो तो सुराचा राजा जो इंद्र त्याचा होय : तेथे देव म्हणजे प्रकाशशलाकाच त्याना सापडलेली तीवरच ते टेकतात ]

देख पां गा किरीटी। आश्रमधर्मांचिया राहाटी।
विधिमार्ग कसवटी। जे आपणचि होत ॥ ३०८ ॥
यजन करितां कवतिकें। तिहीं देवांचा माथा तुके।
क्रिया फळेंसीं उभी ठाके। पुढां जया ॥ ३०९ ॥
ऐसे दीक्षित जे सोमप। जे आपणचि यज्ञाचें स्वरूप।
तेहीं तया पुण्याचेनि नांवें पाप। जोडिलें देखें ॥ ३१० ॥
जे श्रुतित्रयातें जाणोनि। शतवरी यज्ञ करूनि।
यजिलिया मातें चुकौनि। स्वर्ग वरिती ॥ ३११ ॥
जैसें कल्पतरुतळवटीं। बैसोनि झोळिये पाडी गांठी।
मग निदैव निघे किरीटी। दैन्य माकु ॥ ३१२ ॥
तैसें शतयज्ञ यजिलें मातें। काइं इच्छिनात स्वर्गसुखातें।
आतां पुण्य कीं हें निरुतें। पाप नोहे ॥ ३१३ ॥
म्हणौनि मज विण पाविजे स्वर्गु। तो अज्ञानाचा पुण्य मार्गु।
ज्ञानिये तयातें उपसर्गु। हाणी म्हणती ॥ ३१४ ॥

(३०८) कसवटी = कसोटी. होत – होती (३०९) कवतिकें – कौतुकें. देवांचा - वेदांचा. तुके = मस्तक डोलतें. (३१०) सोमप = सोमपान करणारे. तेहीं – तिहीं (३११) शतवरी=शंभर. चुकौनि – चुकोनि. स्वर्ग – स्वर्गा. (३१२) पाडी – पाडीतसे, देतसे. निदैव = करंटा दैन्य माकु – दैन्य करूं = भिक्षा मागायला. (३१३) शतयज्ञ-शतक्रतु = शंभर यज्ञ इच्छितातीं-ईप्सितातीं = इच्छितात (३१४) हाणी-हानी = विघ्न

हे अर्जुना किरीटी, 'आश्रमधर्म' हाच तेथें राहाटविला जाऊन 'विधिविधान' हेंच कस लावून घेऊन तेथेंच ते राहिले, असें हें पाहाण्यासारखेंच आहे : तेथें त्यांनीं ती स्वतः आपणच ती कसवटी पाहून, त्या तेथील कसोटीस उतरून ते स्वतः आपण ते झाले : तेथें आश्रमधर्म हाच विधिमार्गावर

आरूढ झालेला : कसवटीच पाहिलेली अशी ती त्यांची राहाटणें करण्याची शैली ही त्यांनाच पाहिलें असता समजणारी होते : ते आपण स्वतः त्या कसोटीस उतरलेले असेच होऊन असतात. (३०८)

त्यांचें तें यजन करण्याचें कौतुक इतकें कांहीं लडिवाळपणाचें कीं, तेथें त्यांनीं देवांनाहि पण मानाच डोलविण्यास लाविल्या-देव तेथें डोलूं लागले-तिन्ही देवांनीं आपले माथेच लवविण्याचे केले-तुके म्हणजे समदेवाचें तुके-देव सम असेच तुळिलेले-तेथें काय देवासमान हें देवांनी माथाच आपला लवविला कराका असे देवसम, देवतुल्य-असे तें त्यांचें यजन हें कौतुकाचें असेंच : क्रिया जी केलेली तेथें फळ हें त्वरिततेनें हात जोडून उभेंच असलेलें : असे त्वरित फळ देणारें असे त्याचें पुढें होणारें तें क्रिया-कामाचें. (३०९)

असे जे दीक्षित ते जसे कांहीं ' दान दीक्षा गुरु ' प्रत आणले मेलेले-येथें कसे तें दान पोहोंचतें केलेलें किंवा ती दीक्षा ही म्हणजे एक शिक्षणच शिक्षाच (अथ शिक्षां प्रवक्ष्यामि) एक ती, अध्ययन हें झालेलें, तें आता अध्यापनाप्रत येऊन त्यानेंहि दीक्षिततेचें जें कांहीं धर्माचरण हें अनुभवराहाटीनें पाहविलें गेलें-अनुभवास आणून त्यातच ते अनु अनु भव भवाचें जें दृष्टीस आणून-कर्तव्यात घेऊन-तेथील दृष्टी ही सृष्टीच एक, सर्व कर्तव्य कार्य हें त्या कामांतच विधींतच रमून तें अनुभवाचें असे दृश्य केलें: तेथें तो यज्ञ म्हणजे तेच होत : तेथें कांहीं दुसरा तिसरा, इकडचा तिकडचा किंवा बाहेरचा जो काहीं तो म्हणजे यज्ञ असा नसून, ते स्वतःच ते-त्यांचे आतच-तो यज्ञ होत राहिल्यानें, तेथें तेच स्वतः त्या यज्ञाचें रूप होत : परंतु आश्चर्य जें एक येथें बोलूं लागलें, तें म्हणजे काय अहो ! हें काहीं आश्चर्य नव्हे काय ! कीं त्यांनीं तें जे यज्ञाचें स्वरुपानें असणे-नें म्हणजे पुण्यच एक केलेले तें-मजला चुकल्यामुळें एक पापच केलें : येथें देव देव हें कसे नवलाचें बोलणें आहे ते कीं, त्यांनीं ते जे पुण्य केलें तें पापच केलें असे. (३१०)

काय अहो ! तेथें आश्रमधर्म नटविला, विधिविधान हें कसकसून आपणच ते झालेले, तेथे ते एक ह्या देहधारणेसच ह्या देहावरील जो राब किंवा देहच हा भरून घेऊन तेथे जरी तें त्याचें करणें तरी त्यानीं श्रुतिस्मृतिपुराणातरीं जे दिलेलें ते जाणून घेऊन व एक शभर वेळाहि ह्या यज्ञाचें यजन केलें-यज्ञानें ते स्वतः ते होऊन असले-तरी सुद्धा तेथे माझें खरें अंग-मी जो यजिला गेला तो-मी जो तेथ कसा आहे, केवढा आहे, माझे तें असणे हें कुठे हें नच जाणल्यामुळें मला ते चुकले-मी ते होऊन तेथेंच त्यांनीं राहाण्याचें केले नाहीं : परंतु त्यानीं तें स्वर्गसुखच वरण्याचें केले : भोग-मोक्षानें असलेलें जें स्वर्गतुल्य त्यासच त्यानीं माळ घातली व तेच प्रिय आहे असे म्हणून त्या सुखाचें व्हावे व एवढ्याच करितां हे यज्ञ करणे असेच त्यानीं त्या स्वर्गसुखासच महत्वाचें केलें-व तेथेंच ते रमूं लागले: स्वर्गतुल्य असें तें सुख मजला नेहमींच असावे असे तें सुखच एक त्यासच माळ घातली : त्या सुखाचें एक स्वयंवरच तें जसे-तेथें पुष्पहारानें तेंच त्यांनीं जगाच्या डोळ्याना प्रिय प्रिय असे दाखविणें करून तेंच एक म्हणजे स्वर्गीतच राहाणें-स्वर्गतुल्य ह्या देहामध्ये असतांनाहि-ह्या देहधारीपणाने असूनहि-ते यज्ञाचें स्वरूप झालेलें जे तें स्वरूप त्यांनीं त्या सुखासच देण्याचें केलें व आपल्या झालेल्या त्या पुण्याईचें एक तिलोदकच सोडून, तें फक्त एक त्या सुखाकरतांच असें-म्हणजे त्यांनीं तें स्वर्गसुखच आलिंगिलें, तेंच आदरिलें-वरिले-प्रिय असे केले : मजला त्यांनीं तें कसे चुकण्याचें केलें बरे ? ते मजला चुकले-त्या यज्ञपुरुषास त्यांनीं पाहिलें नाहीं असेच येथें म्हणणें तें कसे बरें ? (३११)

खाणें पिणें, लानछोकी, नटणें, थटणें, सदाविद्यांत डोलणें, कपड्यालत्यांनीं ह्या देहास जसें एक काय मनोहार मी दिसत आहे असे एक स्वर्गतुल्यच वाटणें केलेलें, ह्या मनाचें रंजन तें काय बहु बहु,

प्रिय असे ह्या देहाचा सर्व संसारच मुळीं थटविला–काय ह्या नटण्यानें तें नटणें हें स्वर्गावरहि मात करणारें होत नाहीं असें तें रंजन हास्यच एक करून असणारें असें !!

अहो, ह्या नरदेहास येऊन–मनुष्यजन्माचें होऊन–हा देह म्हणजे धर्मधारणेच्या साधना-करितांच फक्त आहे असें तें निक्षून केलेलें बोलणें–तेथे तसा तो प्रसंग ह्या धर्मसिद्धातांनीं वरचेवर पुढे होऊन तेथे दैव तें कुठे आहे तें दाखवून दिलेलें : तें दैव हें एक ' ओम् भवति ' करण्यास जसें कांहीं निघालेलें–तेथें ती जी कामधेनूसारखी सर्व कांहीं पुरविणारी तिजलाच जसें एक मागणें करून असलेलें : तेथे ती देवता ही पण तुमचे काय मागणें होत आहे तें पाहून तेथें कदाचित् एक दैवच ह्या झोळींत पडणारें होईल–सोन्याची वीटच कदाचित् तेथे येईल : असे दैव तें नच घेता निदैव्याचें लक्षण हेंच पुढें आलें व त्यानें त्या झोळीस गांठच मारली–कारण न जाणो दैव हें येईल : असे काय विलक्षणतेचें तें अंग हेंच पाहूं करून, जेथे जाईल तेथें, जेव्हां तेव्हा मी काय गरीब अहो ! दैन्यच त्या देवास देऊ करून, अहो काय देवच तो–हा–किंवा जो एक तो दीनच–दीनपणाच ! काय त्यानें तें दैव देणें हें नव्हेच, असे सुलटें नव्हेच असे बोलणें करूं केलें. हे अर्जुना, ही देहबुद्धीची गोष्ट किती बरें विलक्षणतेची आहे कीं, जो कल्पवृक्ष म्हणजे परम अर्थाचें असे ऐश्वर्य पुरविणारा, तेथें ह्या देहदेऊळामधील देव हाहि पण दाखविला जाणारा–काय तेथे साधन अथवा व्रत अथवा सेवाच एक मागावी किंवा भक्तबीजरूपानें भक्तिच घ्यावी असे सहज ह्या देहास योग्यतेस आणून असावे तें न करिता. काय ह्या पंचमहाभूताचें जे हे केलेलें त्यास लाजणेंच एक पतकरून असणें हें काय कुणाचें बरें ! कुणीहि असे तें त्या स्वरुपास पाहातें, म्हणजे महत् लज्जाच पदरांत पडत आहे असे समजून तेथें डोळेच झांक–डोळेझाकच एक !! असे तें पाहाणें हें नकोच असे कसे बरें ! काय ह्या मनुष्याची अशी त्रेधा कीं, तें स्वरूप हें डोळयातच मुळीं येईना ! तेथे डोळे आपोआपच मिटले जाणारे, असे काय केवढे बरे दैन्य हे ! म्हणून हीं व्रतें पाहा तरी ! तेथें ह्या शिखासूत्रास काहीं एक ' महत्त्वाचें आहे बरें ' असे त्या भूतांनीं पाहिल्यामुळें, त्यांना अतिशय आधार वाटला–आदराचें, परम आदराचे असे हें बोलणें आहे असे त्या भूतानीं पाहून, त्याना आपलेंपणच आलें व येथें मला, आम्हाला, कोणी तरी जीविताचें करील–आम्हांस आमचें आपलेंपण जें ' एक मान्य ' असे तें दिल्याने आम्ही आम्हीच, आम्ही आपलेच, आमचेच असे त्या भूतांना एक विश्वसन आल्यामुळे विश्वासच ते पाहूं लागले : त्याना विश्वास पटल्यामुळें हें सर्व विश्व आतां उच्छ्वास टाकून श्वास घेऊं लागलें व जीवितास आलें, हास्यछटेचें असे झालें : म्हणून कल्पतरूखालीं–जो सर्व कल्याण पुरविणारा असा त्याचे खालीं–त्याचे आश्रयास बसून–तेथें एक शरण असेच आधाराचें होऊनहि कां बरें डोळेझांक करावी ? तेथे आपली जरूरी ही त्या झोळीमध्ये–येथें देहालंकार–देह हा धर्मधारणेच्या योग्यतेचा व्हावा असेच एक ह्या झोळींत–देहात–पडावें असे तें मागणें तें नच करून, तेथें काय ह्या झोळीस–देहास–लाजूनच, डोळे झाकूनच असणें असें कां बरें ? परंतु काय करावें, हे अर्जुना, येथें निदैवच जसे दैन्यभाक् झाले. (३१२)

व आतां शंभरावरहि यज्ञ करून माझें यजन केलें, तरी तेथें अहो ' स्वर्गसुख पाहिजे कीं, ' असेंच ईप्सिणें इच्छितें; तेव्हां येथे काय तें पुण्य झालें कीं पाप झालें ? तेथें तें पुण्य असेच दिसणारें, परंतु तें ह्यावरील त्याच्या त्या ईप्सेमुळे तें पाप असे कां बरें नव्हे ? (३१३)

म्हणून मजशिवाय–' माझे ' असण्याशिवाय–स्वर्गास पावणें, पाहाणें, पोहोंचणें हा म्हणजे अज्ञान-जनांचा पुण्यमार्गच एक ; परंतु ज्ञानी जे आहेत, ते त्यास उपसर्ग किंवा हानी म्हणतात : निष्कारणच–व्यर्थच–तें एक जसें तेथें तें कारण हेंच जसें दवचिलें जाणारें, आणि म्हणूनच तेथें एक

बाधाच होणारी अशी ती जागा-आड येणेंच एक-वाढवधच कदाचित् एक-हानी म्हणजे विघ्न करणारे, नुकसान करणारें असेच एक-लुसकान म्हणजे अशक्त करणारे, शक्तिच नेणारे असे-हा देहच जसा नडविला गेला-दुसऱ्या कुणा एकास पाघरविला गेला-असे तें आहे असे ज्ञानी जे ते म्हणतात.

**उपसर्ग : हानी** : येथें योगसूत्रें काय म्हणतात तें असे : येथें योगसूत्राचें म्हणणें कसे तें पुढीलप्रमाणें:-

म्हणौनि मजविण पाविजे स्वर्गु। तो अज्ञानाचा पुण्य मार्गु। ज्ञानिये तयातें उपसर्गु। हानि म्हणती॥ ३१४॥

जसे काहीं एक विघ्नच आलें, असे तें अज्ञानपटलाचें जे तेंच येथें उपसर्ग असे म्हटलें : तेथें हानी म्हणजे अज्ञानच एक, अंधारेंच एक, अंधकारच जसा का ह्या ज्ञानास झांकून आहे, असे तें विघ्नच होय असे ज्ञानी जनानीं त्यास म्हटले : मुख्य एक जी गोष्ट ती ही कीं, जें दुःख अद्याप आलेलें नाहीं, तें कसे टाळावें याबाबत काहीं जी विचारसखीची जोड ती त्याबद्दल काहीं विशेषत्वानें जर बोलणें केले तरच बरे : म्हणून येथे आपण हा उपसर्ग किंवा ही हानी ती कशी बरें, कोणत्या उपायांनीं टाळावी लागते तें बोलूं क्लेश हे नाहींतसे करण्यास ' तप, अभ्यास, स्वाध्याय आणि कर्तव्यच याचें परमेश्वरास अर्पण करणें ' ह्यानींच तें करणें होय : ह्यांना क्रियायोग म्हणतात : आता येथे आत्मा कसा, विश्व हें कसे उत्पन्न झाले-हानी जी होते ती ह्या अज्ञानसंयोगामुळे-तेथें संयोग हा त्याज्य कसा : तेथें स्वरूप होऊन असावे, तेथे आपण (आत्मा) आणि शरीर हे भिन्न आहो असा अनुभव येईल ते कसे-चित्तास पक्के स्थैर्य आलें म्हणजे अध्यात्मप्रसाद प्राप्त होतो-तेथें ज्ञानाची प्राप्ति होते : समावस्था, प्रधान, प्रकृति, अव्यक्त हीं सर्व एका तन्मात्रविषयाची सूक्ष्म अशीं आहेत : अज्ञानाचा, अंधाराचा अभाव हाच मोक्ष होय ::

तेथें मनःशांति-दुःखाचा परिहार-ज्ञानाची प्राप्ति-चित्तविमुक्ति-चित्ताचा लय व गुणसंबंधरहित आत्मा प्रकाशूं लागणें होतें. ' स्वस्वापि स्वरूपोपलब्धिहेतुः सयोगः ' ( यो सू )

येथें त्याचें बोलणें हें जसे ह्या मनबुद्धयादींना एका स्वामीचे करुन ठेविलें आहे असे : तो जो स्वरूप उपलब्ध होण्यास लागणारा संयोग हाच तेथें त्या त्या मनाचा का अहंकाराचा कां बुद्धीचा तो तो स्वरूपदर्शनाचा एक स्वामीहेतुच ! तेथे तो संयोग हा अंगावर नच घेता त्याच्या साक्षित्वानें जर असणें केलें, तर तेथें अज्ञानजन्य-अंधारजन्य-असे ते दर्शन न होता, तेथे मोक्ष अथवा कैवल्य हेंच संयोगप्रभावानें स्थिरतेस आणणेचें : तेथें स्वरूप होऊन असावें-तेथें आत्मा व शरीर भिन्न भिन्न असाच प्रत्यय !!

दृश्य म्हणजे हें जग-प्रकृति, व द्रष्टा म्हणजे आत्मा : ह्या दोघांच्या सयोगाने दोघाच्या शक्तिच प्रत्ययास येतात : दोघाचे निरनिराळे स्वभाव हे पुरुषप्रकृतिसंयोगानें व्यक्त होतात : ह्या दोहींचा संयोग हा निरनिराळीं रूपें दृश्यत्वास आणून व्यक्त असतो-ह्यास अज्ञान हेच कारण आहे : द्रष्टा हा केवळ ज्ञानमय आहे. आपण आपल्या देहाशीं तादात्म्य होऊन असल्यामुळें आपणांस अनेक प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात. याचा अनुभव आपणांस प्रत्यहीं येत असतोच. द्रष्टा हा ज्ञानमय असून, तो शुद्ध असूनहि, बुद्धींत प्रतिबिंबित होऊन तिच्या द्वारें अवलोकन करितो, याच कारणामुळें दृश्यत्वास दृश्यत्व येतें.

म्हणजे अज्ञाननाशाचा मार्ग म्हणजे संयोगाचा त्याग होय. तेथेंच मोक्ष, तेथेंच कैवल्य.

पुरुषावांचून बाकी सर्वांचा समावेश अव्यक्त किंवा सूक्ष्म रूपांत होतो परमाणुरूप, तन्मात्ररूप विषयास सूक्ष्म अशी संज्ञा आहे-अव्यक्त ह्या संज्ञेमध्यें अंतर्भाव ज्याचा होतो तें-' अंतरिंद्रिय मन

(सर्व इंद्रियांचें समवायी रूप), अहंभाव, चित्त आणि सत्त्व (रज-तमाची समावस्था), प्रधान आणि प्रकृति होय.

मनाच्या धर्मलक्षण अवस्था ह्या तीन आहेत : त्यांत आकार, काल व स्थिति ह्या ज्या मनाच्या तीन अवस्था त्यावर योग्यास ताबा चालवितां येतो : ज्यावेळीं भूत आणि वर्तमान याचा तुल्य प्रत्यय येईल, त्यावेळीं मनाची एकाग्रता झाली असे समजावें : चित्त हें वृत्तिरूप न होऊं देणें त्यास योग म्हणतात तेथें स्वरूपदर्शन हें स्वयमेव जसें असतें तसेच होतें-अथवा ईश्वराच्या उपासनेमुळें ही फल-प्राप्ती लवकर मिळते ईश्वर म्हणजे एक पुरुषविशेष, त्यास कसल्याहि प्रकारचा क्लेश नाहीं-तो कर्म करीत नाहीं- अथवा त्याचें फळहि भोगीत नाहीं, तसेच त्याला कशाहि प्रकारची इच्छा नसते. त्याच्या ठिकाणीं ज्ञान हें अनतत्वानें वास करीत असतें इतराच्या ठिकाणीं तेंच ज्ञान बीजरूपानें असतें ईश्वर काळानें परिच्छिन्न नसल्यामुळें अत्यत प्राचीन गुरूंचाहि गुरु आहे. ॐ हा त्याचा बोधक आहे. (ह्या ॐकाराचा जप व अर्थाचें अनुसंधान हाच मार्ग आहे.) पंचतत्वे हीं जड अथवा स्थूलरूप असून त्यापासून सर्व चराचर सृष्टि निर्माण झाली आहे

हौदामधील पाणी-त्यातील लाटा शात होऊन-अत्यंत स्थिर झालें आहे-खालचा तळ स्पष्ट दिसत आहे : असे हें चित्त निष्पद झालें म्हणजे आपलें खरें स्वरूप दर्शनास येतें चित्तावर अनेक पदार्थांचे तरग जोंपर्यंत उत्पन्न होत आहेत, तोंपर्यंत स्वरूपदर्शन होत नाहीं. तेंच अगदीं शात झालें म्हणजे 'स्वयमेव' होऊन असतें : चकचकित शिंप पाहून किंचित् काल चादीचा भ्रम होतो-अशा वेळीं चित्तानें चादीचा आकार घेतल्यामुळे 'शिंप' आहे असे ज्ञान होत नाहीं, पण भ्रमनिरास झाल्या-बरोबर तेंच चित्त 'शिंप' आहे असे म्हणूं लागतें

हानी जी होते ती अज्ञानामुळे होते अज्ञानांधकार, अंधार, ही हानीच एक-विघ्नच जसे अभ्यासामध्यें, स्वाध्यायामध्ये आलें असें असल्यानें, तेथें तें अज्ञान हें उपसर्ग किंवा हानी झाली असें म्हणणारें होतें : तेथे तें कसा आपला तळ घेऊन असते तें सांगण्याचें करितों : अज्ञान, अंधारे म्हणजे क्लेशच जसा-त्याचें स्वरूप पांच प्रकारचें आहे : अज्ञान, अहंकार, आसक्ति, द्वेष व सासारिक जीवित्वाची अत्यंत इच्छा, आवड : तो क्लेश कधीं निद्रित, कधीं सूक्ष्म, कधीं अस्पष्ट, कधीं उघड, असा होऊन असतो : नित्य शुद्ध सुखमय असा आत्मा असतां तो सोडून अनित्य, अशुद्ध आणि दुःखमय अशा अनात्म वस्तूंचें ग्रहण करणें हेंच अज्ञान-हेंच अधारें-अज्ञानमूल असेच ते क्लेश असतात तेथें जे दुःख अद्याप प्राप्त झालें नाहीं, तें टाळावे असा हेतु तप, अभ्यास आणि कर्मफल यांचें परमेश्वरास अर्पण करणें ह्या क्रियानीं (साधनास करणें होय) तपणें होय

सर्व विश्व त्रिगुण आणि इंद्रियें याच्या संयोगानें उत्पन्न झालें आहे : प्रकाश, क्रिया व स्थिति हा त्याचा त्रिविध स्वभाव होय : पुरुषाला अनुभव व मुक्ति व्हावी हा त्याचा हेतु आहे : तमोगुण अज्ञान व जाड्यरूपानें, रजोगुण हा चापल्यरूपानें व सत्त्वगुण हा शातीच्या व ज्ञानाच्या रूपानें व्यक्त झालेला आहे. क्रियाशक्ति ही नमःसत्त्वापासून उत्पन्न होते. विश्वाची उत्पत्ति होण्यापूर्वी प्रकृति अव्यक्त स्थितींत होती (असे सांख्ययोग म्हणतो) : ज्या स्थितींत नाम नाहीं-व्यक्तित्व नाहीं-ती स्थिति अव्यक्त होय या स्थितींत सत्त्व, रज, तम हे तीन गुण समतोल स्थितींत असतात : यानंतर हा समतोलपणा बिघडला, म्हणजे या तिन्ही गुणांची सरमिसळ होऊन विश्व हें अनेकतेनें भासूं लागतें-त्यांत अनेक रूपें विलसूं लागतात-त्यास भिन्न नामें प्राप्त होतात.

**उपसर्गः**—बाधक वर्ग, उपबाधा करणारें जें तेथें विघ्नच एक-तें विघ्न जें तें दूर करण्यास-निरसण्यास-उपाय करावा.

साधकबाधक विचार करणें–जेव्हां कां एकादा नियम किंवा कानू बनवायचा असतो, नवा करावयाचा असतो, तेव्हा तेथें जसे विचार करणें हें साधकबाधक दोन्ही बाजू घेऊन, तें कानूचें करणें होतें : तसे येथे अज्ञानाचा पुण्यमार्ग म्हटलेलें ते जसे कां संसर्गांनीं–उपसर्गांनीं-हानीच करणारे, बाधाच करणारें जे तें तेंच दोन्हीं बाजूंनीं विचार करून–उपबाधक व साधकबाधक दृष्टी पुढें घेऊनच–ते माझेपण हें स्थिर करून असावे–मजला पाहात असावे : मी तेथे मजविण असा नच करून, तेथे मीपणच स्थिर असावे, तर तेथें तें पावणें हें केव्हाहि पावणारें होतेच. तेथे मग लोधलेपण हें परिणाम करणारें होत नाहीं : तेथें शात असेच एक निर्दोष अशा आनदाचें स्थानच सापडतें (एखादे काम हे जर खोटी केलेलें, तर तेथे जसे कां उपसर्ग पोहोंचला असे, व असे नेहमींच जर झाले, तर काय ती एक मोठी हानीच समजावी ) (३१४)

येऱ्हवीं तऱ्ही नरकींचें दुःख । पावोनि स्वर्ग नांव कीं सुख ।
वांचूनि नित्यानंद निर्दोष । स्वरूप माझें ॥ ३१५ ॥
मजपासीं येतां सुभटा । या त्रिविधा गा अव्हांटा ।
स्वर्ग नरक या वाटा । चोरांचिया ॥ ३१६ ॥
स्वर्गा पुण्यात्मकें पां पैं येईजे । पापात्मकें पापें नरका जाईजे ।
मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य (गा) ॥ ३१७ ॥
आणि मजचिमाजीं असतां । जेणें मी दुऱ्हावें पांडुसुता ।
तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न झडे काई ॥ ३१८ ॥
परी हें असो आतां प्रस्तुत । ऐके यापरी दीक्षित ।
यजुनी मातें याचित । स्वर्गभोगां ॥ ३१९ ॥
मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे ।
तेणें लाधलेनि सौरसें । स्वर्गा येती ॥ ३२० ॥
जेथ अमरत्व हें सिंहासन । ऐरावतायेसें वाहन ।
राजधानी भुवन । अमरावती ॥ ३२१ ॥

(३१५) स्वर्ग नाव – स्वर्गा नाव, स्वर्गा नाम वांचूनि = शिवाय निर्दोष – निर्दोख स्वरूव - ते स्वरूप. (३१६) अव्हाटा = आडवाटा. (३१७) पा पैं – पापें (३१८) दुऱ्हावे - दुरी होवे. झडे – तुटे. (३१९) स्वर्गभोगां – स्वर्गभोग. (३२०) लाधलेनि – साधलेनि सौरसे = प्रेमाने, आवडीनें. (३२१) ऐसें - सारखे.

जवळजवळ 'भूत प्रकारच एक' असे होणे हें म्हणजे एक हानीच–क्लेशाच ! ह्या क्लेशामध्ये प्राण्याचें सर्व अंग बुडलें–क्लेशांनीं ह्या प्राण्याचें सर्व अंगच जसे बुडविलें–अडवून धरिलें–तेथें बाधाच एक होणारी ! म्हणून मजला पाहात ऐस : मजला अगोदर सांपडवून घे : मीच हो तरच बरे !!

म्हणून येथें ह्या उपायाना नच करितां असणे–ह्या पंच क्लेशांना निवारणे करण्यास–क्लेश झाल्यावर, भूत लागल्यावर, विघ्न आल्यानंतर, बाधा झाल्यावर–उपाय करणें हें काय किती उपयोगाचें ! करिता अगोदरच जें काहीं उपायानें असणें तेंच हें माझ्य असून, तेथें शील, अनुष्ठान, अनुकार हाच प्रामुख्यत्वानें चालणारा–वागविला जाणारा : तेथें जर हें मूलप्रकारणे झालें, जर ह्या पंचभूतांनीं प्रकाराचें झाल्यानें, तेथे केवढी बरें त्रेधा पुढें येणारी : येथें तुम्ह म्हणून जें, तें करणीच एक केली, देवच घातला, असे व्यवहारानें बोलणें होणारें तें ' आपंचीकृत–पंचभूतानि ' जें बीजधारण तेंच आतां मूळास आणले गेल्यानें, तेथे जशी ही वर दिलेल्या 'आपंची–' ची एक उलट सुलट छाननीच होणारी : तेथें काय क्लेश,

काय दुःख, काय गेह, काय देह, काय मन, काय धारण, काय धर्म, असेच एक उघडया जागेचे फक्त, तेथें मातीच मुळीं लोणा लागलेली, जळमटेंच जशीं ह्या मातीचीं झालेलीं, तेथें जणं स्वस्पर्शेच नाहीं- असें बिन बांधलेल्या अशा पडक्या घराचे एक जीवित तें काय भूतप्रकारच असे नव्हे ! काय, याशिवाय आणखी एखादा आणीक यातना देणारा नित्य हा असतो असे म्हणणेंच नाहीं ! अहो ! ह्या यातना होत : तेथे दुःखच एक : ( येथे बुद्धि ही हें नीटसे समजाऊन देत आहे : तिजला काय कोणीं दोष द्यावा हें नच. ) म्हणून येथे हें दुःख पावून, ह्या दुःखामध्यें राहून, ह्या दुःखाचें होऊन जरा तें स्वर्ग म्हटलेलें सुख हें घेऊं केलें, तर तेथें अहो ! काय हें स्वर्गसुख होय ? असेच म्हणणारें होतें अहो, येथे ' किं सुखम् ' सुख तें काय ! येथे सुखच मुळीं नावास नाहीं असे म्हणणारे-असेच म्हटलें जातें : येथे नाममात्रच तें-नावास सुद्धा तें सुख नाहीं असेंच म्हणणें होतें

म्हणून येथें मी जो आहे तो नामाचा असाहि त्या नामाशिवाय, तेथे सुख तें कसलेंच नव्हे असे ! म्हणून जेथे नित्यता हीच आनंदवून असेल, नित्य जे आनंदाचें असे, जे निर्दोष असे, तेंच माझे स्वरूप होय : नित्यानंदाचें जें तेथे सत्य, ज्ञान हे अनंत आहे असे, तेथें परम आकाश हेंच जसे आनंदाचे झालेले, तेथीलची गोष्ट ही परम सायासाने प्राप्त झालेली : तेथे अंगण हेच अन आकारांनीं किंवा नाना आकारांनीं-तसेच भुवन आकाराचे असें-तेथे ही धरणी हीच, सृष्टी हीच जशी अनाथांना सनाथपणे वागविणारी-तेथें यापेक्षा कमे तें बोलणे करावें बरें : म्हणून असे जें निर्दोष तेच माझे स्वरूप : तेथे नित्यता हीच आनंद होऊन आली

म्हणून, हे अर्जुना, मजला भेटण्याचे करताना-मजकडे येत असताना-' मी होऊन असणे ' जे तेथे मजकडे येत असताना-ह्या दोन तऱ्हांचे ते येणे होते-तेथे मजकडे येत असताना ह्या दोन तऱ्हांनीं ते-द्विविध असेच ते असून-तेथे ते स्पष्ट करून सांगितले-पायच ओढले जाणारे असे इतर काहीं ज पाहाणे त असतें : तेथे पायच कोठे स्थिर होत नाहींत : म्हणून अनेक ज्ञाने, अनेक मार्ग, अनेकीं अनेक झालेले जे ज्ञानाचे प्रकार ते सर्व एकत्रित करून पाहिले असता, ते सर्व या दोन तऱ्हांचे होत : वर सांगितलेल्या दोनच वाटांचे होत : तेथे पोहोचण्यास ह्या दोनच आडवाटा आहेत : मजकडे येत असताना हे दोन आडरस्ते लागतात : स्वर्ग व नरक ह्या वाटा चोराच्या होत : एरव्हीं पाहिले असता हें स्वर्गसुख तें नरकींचें दुःख असे जे काहीं हे-म्हणज चोरांनीं आपली वाटच तेथे करून ठेविलेली-किंवा त्या सुखासाठीं लपणेंच एक तें : तेथे अनेक वाटा ह्या सुखदुःखांनीं करून ठेविलेल्या अशा, ह्या स्वर्ग म्हणविल्या जाणाऱ्या सुखाच्या किंवा दुःख म्हणविल्या जाणाऱ्या अशा यातनेच्या होत-तेथें चोर म्हणणें हें तरी काय ! ज्ञानासच एक चुकविणे-चोरणे-चोरिवणे-असे काय हास्यास्पदतेचें तें कसे बरें ! ! (३१६)

पुण्यात्मकानें (पापाचें होणें : पापच जसें आलें असे व्हावें) कर्म करण्याने स्वर्गास येणे होतें व पापात्मकानें नरकास जाणें होतें असे ते : मम मला जे काहीं पावणें-जे मला पोहोचणे-ते किंवा मी होणे तें एक शुद्ध पुण्यच होय. (३१७)

' आहेच आहे ' असे जे ते मजमध्ये असूनहि, तेथें मी ज्यायोगें दूर होईन तें जे काहीं करणे त्यास पुण्य म्हणणे करणें, असे म्हणताना काय जीभ ही तुटणारी होत नाहीं ? जीभ ही झडलीच गेली असे होत नाहीं ? वाणी ही ' झडच एक ' लागली असे होत नाहीं ? (३१८)

परंतु हें असो : आतां प्रस्तुतच्या प्रसंगीं जे काहीं आपले बोलणे होत आहे, त्याबद्दल ऐकण्याचें कर-अवधान देऊन ऐक कीं, यप्रमाणें ते दीक्षित हें साङ्ग यजन करून स्वर्गभोगासाठीं ' याचना ' करणारे होतात. (३१९)

असे ते स्वर्गभोग याचना करून मिळविलेले असतात : व आतां मी जेथें भेटणार नाहीं-जेथें मी नच भेटणारा-मी जेथें फवणार नाहीं असें जें एक पापरूप पुण्य, तेथेच तें सुरसत्व पाहून, आवडी घेऊन, प्रेमच भेटलें, लाभलें, लाधलें असे कदाचित् लोधणेंच एक झालें-व आतां स्वर्गास पुन्हां येणारे होतात : आवड ही जाड झाली, प्रेम हे लोभ असे आवडीचें होऊन त्यानें पुन्हा स्वर्गास येणारे हातात. (३२०)

तेथें अमरच आहोंत-हा देह म्हणजे अजरामरच असा वाटणारा-तशी बैसका घेऊन असणे होणारें : तेथें सरदारच जसे तसे चालणें-वाहनें पाहावींत तों ऐरावतच बसण्यास मिळालेला : प्रकाश हा जसा का भुवनांत तें धनीपण मिरविणारा-अमरावती हीच जशी एक भुवनास प्रकाश देणारी-धनीपणच एक हया इंद्राची जी नगरी तिचें. (३२१)

जेथ महासिद्धींचीं भांडारें। अमृताचीं कोठारें।
जियें गांवीं खिल्लारें। कामधेनूंचीं ॥ ३२२ ॥
जेथ वोळगे देवा पायिका। सैंघ चिंतामणीचिया भूमिका।
विनोदवनवाटिका। सुरतरूंचिया ॥ ३२३ ॥
गंधर्व-गायन-गाणीं। रंभेऐसिया नाचणी।
उर्वसी मुख्य विलासिनी। अंतुरिया ॥ ३२४ ॥
मदनु वोळगे सेजारें। जेथ चंद्र सिंपे सांबरें।
पवनाऐसें म्हणियारें। धांवणें जेथ ॥ ३२५ ॥
पैं बृहस्पति मुख्य आपण। ऐसे स्वस्तिश्रियेचे ब्राह्मण।
वाटियेचे सुरगण। विकार जेथें ॥ ३२६ ॥
लोकपाळ रायाचे। राऊत जियें पदींचे।
उच्चैःश्रवा खांचे। खोलणियें ॥ ३२७ ॥
हें बहु असो ऐसे। भोग इंद्रसुखासरिसे।
ते भोगिती जंव असे। पुण्यलेशु ॥ ३२८ ॥

(३२२) खिल्लारें = कळप. (३२३) वोळगे-ओळगे = राबतात देवा - देव पायिका = चाकर. विनोदवनवाटिका = मनोरंजनासाठीं कल्पवृक्षाचे बगीचे (३२४) नाचणी = नृत्य करणाऱ्या स्त्रिया. अंतुरिया-अंतौरिया = स्त्रिया. (३२५) मदन वोळगे सेजारें = मदन शेजघरांत सेवा करणारा सिंपे - शिंपे सांबरें = सडासंमार्जन. म्हाणयारे = सेवक (३२६) स्वस्तीश्रियेचे = आशीर्वाद देणारे. वाटियेचे-भाटिवेचे-ताटिये = स्तुतिपाठक, भाट विकार - बहुवस, पांतिकर (३२७) लोकपाळ रायाचे-रांगेचे=लोकपाळाच्या बरोबरीचे, मालिकेंतले राऊत=सरदार पदींचे-पदवीचे = मान्य. खोलणिये-खेवणिये = इंद्राचा घोडा हा जेथें कोतवाल घोडा हा पुढें चालणारा (खोलणी) आहे (३२८) भोगिती - भोगिजती

जेथें महासिद्धींचीं भांडारगृहेंच भरलीं आहेत : अमृत हें कोठारा कोठारामध्येंच भरून आहे : ज्या गांवामध्यें कामधेनूंचीं खिल्लारें आहेत. (३२२)

जेथें देव हा सहजच त्या पाईकास भेटणारा-देव हा पाईकच असा झाला जिकडे तिकडे चिंतामणीच्या भूमिका आहेत : मनोरंजनासाठीं कल्पवृक्षांचे बगीचे आहेत. (३२३)

गंधर्व हे तेथें गाणीं गात आहेत : रंभेसारख्या तेथें नाचणाऱ्या अप्सरा आहेत : मुख्य विलासिनी स्त्री ती रंभा-अशा स्त्रिया तेथें आहेत. (३२४)

तेथें मदन हा शेजघरांत सेवा करणारा : तेथें चंद्र हा सडासंमार्जनच एक करील आहे असा : वायु हा सेवक होऊन असणारा–वायु हा आज्ञाधारकच एक–असे तेथील धावणें होय. (३२५)

फार काय सांगावे ? तेथें बृहस्पति हा एक बोलका, असे तेथें आशिर्वाद देणारे ब्राम्हण आहेत. स्तुति करणारे भाटच जसे असे तेथे पुष्कळ आहेत. (३२६)

लोकपाळाच्या बरोबरीचे–लोकपाळाच्या मालिकेंतले–असे सरदार हे लोकपाळच जसे : इंद्राचा घोडा हाच जेथे एक कातवाल घोडाच पुढे नाचणारा–पुढे चालणारा आहे–उच्चैःश्रवाच्या बरोबरीचे जसे असे 'त्याचे खोलणीचे' (३२७)

असे हे पुष्कळपणानें असलेले इंद्रसुखासारखे भोग हे ते जोपर्यंत पुण्यलेश आहे, तोपर्यंत भोगून असतात. (३२८)

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥**

विशाल = विस्तीर्ण त्रयीधर्म = तीन वेद. अनुप्रपन्नाः = शरण असणें अथवा आसरा घेणें हें पुन्हा पुन्हा म्हणजे वरचेवर होत असणारें. गतागतम् = गेले व पुन्हा आले; मेले व पुन्हां जन्मले, येरझार; जा–ये कामकामाः = काम म्हणजे इच्छा हीच सकाम–कामुकतेची केली व तेच विषयकाम मिळणारे स्वच्छिद्रगोपन (रक्षण), परच्छिद्रान्वेषण (शोधन), मंत्रगोपन ही नीतीमधील त्रयी. अनु-प्रपन्नाः = अनु अनु प्रपन्न : सादृश्य, समीपतेचें जसे एक शरण आश्रय घेणारें, गृहच जसे तेथें अनन्यतेचें तें आता शरण असे म्हटल्याने, जसे का "असमौ शरण" म्हणजे गृह जे त्याचें आश्रय घेणारें असे शरण शरण असे हया देहरूपी साधनाचें तें जसे का.

ते तम् विशालम् स्वर्गलोकम् भुक्त्वा क्षीणे पुण्ये मर्त्यलोकम् विशन्ति, एवम् त्रयीधर्मम् अनुप्रपन्नाः कामकामाः गतागतम् लभन्ते ।

ते त्या विशाल असणाऱ्या अशा स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्य क्षीण झाले म्हणजे ह्या मर्त्य लोकास येतात ( विशन्ति ). असे ते धर्मत्रयीस आश्रय धरून असणारे ( त्यांचे दासीपणच पत्करून ) ते काम हें कामविले जाऊन–कामवासनेचे धरून–भोग हे भोगिलेले किंवा नवेपणानें येणारे ते भोगणारे होतात ( कामुक लोक, स्वर्गमृत्यूच्या येरझारा–जाणे–येणे करीत असतात ) तीन वेदांमधील धर्माप्रमाणे वागणारे त्यानीं जसें काहीं तेथील दासीपणच बरें असें समजून तेथीलच फक्त असे झाले. ( २१ )

**मग तया पुण्याची पाऊटी सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी उत्तरे ।**
**आणि येवों लागती माघारें । मृत्युलोका ॥ ३२९ ॥**
**जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग द्वारहि चेपूं न ये तियेचें ।**
**तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काइ सांगों ॥ ३३० ॥**
**एवं थितिया मातें चुकले । जिहीं पुण्यें स्वर्ग कामिलें ।**
**तयां अमरपण वायां आलें । अंतीं मृत्युलोकु ॥ ३३१ ॥**

मातेच्या उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं ।
उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मों मरती ॥ ३३२ ॥
अगा स्वप्नीं निधान फावें । तें चेइलिया हारपे आघवें ।
तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञांचें ॥ ३३३ ॥
अर्जुना वेद जरी जाला । तरी मातें नेणतां वायां गेला ।
कणु सांडुनि उपणिला । कोंडा जैसा ॥ ३३४ ॥
म्हणौनि । मज एकाविण । हे त्रै अकारण ।
मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ॥ ३३५ ॥

(३२९) पाऊटी = पायरी. उटी उतरे = तेज कमी होतें (३३०) कवडा = कवडीपर्यंत सर्व द्रव्य नाहींसें झालें म्हणजे ती दाराला बोटहि लावूं देत नाहीं (३३१) थितिया–थित्या = सर्वदा असणाऱ्या कामिलें – कामिले (३३२) उदरकुहरीं = उदररूप गुहेंत पचूनि = शिजून दाथरीं = उकाड्यात, थरात. जन्मजन्मों – जन्मजन्मोनि. (३३३) निधान फावे = ठेवा सापडतो (३३४) वेदु–वेदविद = वेद जाणणारा. उपणिला = वाऱ्यावर पाखडला. (३३५) त्रै–त्रयीधर्म = वेदोक्त धर्म.

आता तें पुण्याचें चालणें सरलें तेथें पुण्याची पायरी हीच सापडेना : ती जी कांहीं तेजस्विता–इंद्रपणाची–तेथील तेज कमी झालें व आता ते दीक्षित जे ते मृत्युलोकासच माघारे येऊं लागतात–येणारे होतात

मग मी न पाविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे ।
तेणें लाधलेनि सौरसें । स्वर्गा येती ॥

काय ह्या बुद्धीचें कौशल्य : मन हे चंद्रकला एक दास्याची केली–तेथें अनेक जन्मी केलेली जी काहीं ह्या मनानें प्रार्थना ती आतां मनास प्रसन्नपण दिले गेलें : तेथें ह्या (देह) नगरीचा ससार जसा काहीं अमरपदाने असणारा पाहविला जाणारा–तेथें सर्व सुखे हीं अगदीं हाताशींच असणारीं अशीं : ह्या देहधारींचें जे एक ह्या नरदेहाचें कौतुक तें आता मधील खंड ह्याच भरून काढला–तेथे स्वर ह्याच भूतसर्गांनीं नच पाहविला जाऊन, तेथे स्वर्ग असेच म्हटलें जाणारें तें ह्या देहानें अगदीं आरशा-सारखें असणें म्हणजे काय तेथें हीं इंद्रियें (मन, बुद्धि, इ ) ह्यांनीं ह्या उपस्थास आसनस्थ करून ह्या मानवी जीविताचें जे लिंगप्रामाण्यानें असणें तेच येथें जसे आरशामध्येंच ठेविलें असे सहजतेचें झाल्यानें, तेथें अनेक दिव्यें दिसूं लागलीं : बुद्धीने आपलें सर्व कौशल्य त्यात ओतलें–मनानें आपलें तृप्ततेचें असें जे विधान तें पाहू केल्यानें, त्यानें आपला सढळ असा दातृत्वाचा हातच पुढें केला व आता परम समाधान हेंच जसें तरंगत ठेवल्याने, तेथें हें जीवित म्हणजे एक पाण्यावर तरंगणारें असे–रंगत रंगत नवी अशी दिसणारी रंगतच त्यामध्यें आणून, हें जीवित अगदीं निखळ स्वर्गामध्येंच आहे असें : अनेक भोग, अनेक दिव्ये हीं जशीं काय तो स्वर्गच आता जसा मूळ स्वरुपापासून तुटून ह्या तरंगत असणाऱ्या स्वर्गाचा झाला–भूमीचा झाला : तेथें मनुष्यजन्माचें कौतुकच झालें : स्वप्नावबोध अथवा मनाचा जो एक कल–जेथें दिव्य अशी प्राप्त झालेली नरतनु ही पण कोठें तरी आपलें सर्व ऐश्वर्य हें पाहाणारी अशी आहेच तेथें काय मनानें केलेला–दिलेला–प्रत्येक वस्तूस–प्रत्येक प्राण्यास–जो एक थाट तो आपलें सर्व ऐश्वर्य हें प्रत्येकानें पाहाण्यास मिळाल्यानें, तेथें आतां काय हा चंद्रमा ह्याच सूर्यतेजासच पाहविणारा झाल्याने, तेथे मनःकला ह्या अति प्रसन्न झालेल्या–तेथें दिव्यें पाहावीं तीं अनेक : ही नरतनु ही जशी नगरीच एक थटविली गेली–अमरपण हेंच येथें ह्या मनानें पाहिलेलें की, आतां कांहीं आशा म्हणून उरली नाहीं व आता 'सुखसमाधानानें मरणें हें मागेंपुढें पाहाणारें नच झाल्यानें, तेथे स्थिरपणच

ते ह्या मनास आलें : अमृत हें काय कुठे हुडकण्याचें कारणच नाहीं–तें जिकडे तिकडे भरून असलेलें–तेथे देव हेच पाईकपण करणारे असे दिव्यतेचें एक स्वर्गैश्वर्य हें–मदन हाच तेथें शेजघरांत सेवा करणारा असल्यानें, तेथे चंद्र हाच तेथीलचें ( जे कांहीं सडा टाकणें अथवा ) सडासंमार्जन करणारा असा स्वच्छ, शुभ्र व निर्मळ–तेथे ' स्वस्ति असो ' असा आशिर्वाद देणारी जी बृहस्पतीची श्री हीच आपला आशिर्वाद हाच पुढे करून चालत असलेली असून, वाट जी आहे किंवा भाटपणाचें जें गाणेंच एक ह्या सुरगणानीं उचलिलेलें हें तेथे पुष्कळपणानें असणारें ! असे अनेक दिव्य भोग, दिव्य आनंद, दिव्य तनुधारणा, दिव्य सौंदर्य, दिव्य गृहें, दिव्य भुवनें, दिव्य वाहनें, असे असलेलें तें म्हणजे स्वर्ग जो तोच स्वतः मी कसा आहे तें पाहाणारा असा स्वर्गच तो स्वर्गाचा झाला : असा एक आपलेंच सौंदर्य आरशामध्ये पाहून तेथेंच मोहित झालेले–तेथे रंगणें बरें असे–तें ऐश्वर्य हें परम देवतांचें जे अमरपण–जेथे मरणेंच मुळीं नाहीं–असे तें पद काय दिव्यतेचें असे केव्हाहि ! !

असे ते पापरूप पुण्याचें केलेले दिव्य तें काय कोणी नको असे म्हणणारें होईल असे नाहींच !! कारण तें पापरूप पुण्यच प्रेम झालें, आवडूं लागलें, आवडतें झालें, आवडलें !! म्हणून येथें पापपुण्याच्या गोष्टी ह्या बोलण्यासारख्या नाहींतच (३२९)

वेश्याभोगी ( वेश्या ही भोग देणारी )–वेश्येचे भोग भोगणारा जो तो–त्याचेजवळ द्रव्य असेतों-पर्यंतच ते भोग ती देणारी असने : परंतु द्रव्यासाठींच तें, तें द्रव्य शेवटच्या कवडीपर्यंत–शेवटची कवडी संपेपर्यंतच–त्याच्याजवळचे तें द्रव्य नाहींसें झालें, म्हणजे ती त्याला आपल्या दारास बोटहि लावूं देत नाहीं जशी, तसे तेथें त्या दीक्षिताचें जिणें हे बहुत लाजिरवाणें होणारें–तें काय कितीहि सांगितलें तरी आणखी सांगणें राहातेंच असे (३३०)

मी सर्वदा असणारा–जो सदासर्वदा असणारा–सत्यपणानें असणारा–जो मी त्या मला ते अशा रीतीनें चुकले–ज्यांनीं पुण्य करून स्वर्गच इच्छिला–स्वर्ग कामाचा केला–त्याचें ते अमरपण हें व्यर्थच गेलें व अतीं मृत्युलोकासच त्यानीं येणे केले (३३१)

मातेच्या उदररूप गुहेंत विष्ठेच्या दाथरीं शिजून व नऊ महिनेपर्यंत उकडूनहि काहीं सोय न लाविता जन्मजन्मून मरणेंच केलें (३३२)

अहो, स्वप्नामध्ये ठेवा सापडतो, परंतु जागे झाल्यावर पाहावे तो काय तेथे कांहींच नाहीं : तसें हे जे ' वेदज्ञ ' आहेत त्यांचें तें स्वर्गसुख होय (३३३)

हे अर्जुना, जरी वेद हा वेद झाला, तरी मजला नेणण्यामुळे वायांच गेला : जसा का कोंडा हा वाऱ्यावर उपणिला, पाखडिला, कोंडाच नुसता वाऱ्यावर पाखडिला, तर काय तेथे कण हे आपोआपच यावेत ? ते काय कोठून येणारे होतील ! (३३४)

म्हणून मी असल्याशिवाय, मज एकाशिवाय, हे तिन्ही धर्म (धर्मत्रयी) ' अकारण ' असेच : म्हणून मजला जाणूनसुद्धा तूं मजला काहीं समजत नाहीं असेच म्हणत जा–' मजला जाणून नेण ' तरच ' तूं सुखिया होसी ' (३३५)

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥२२॥**

**न अन्य = दुसरें कसलें चिंतनच ते करीत नसल्यानें. पर्युपासते = उपासणें हेंच पुन्हां पुन्हां प्रदक्षिणेचें जसें काय अभियुक्त = एकसारखे युक्तच तेथें होऊन असलेले वहामि = चालवितो. योगक्षेम = चरितार्थ, उदरनिर्वाह योग = अप्राप्ताची प्राप्ती. क्षेम = प्राप्ताचें संरक्षण.**

ये अनन्याः चिन्तयन्तः जनाः माम् पर्युपासते तेषाम् नित्याभियुक्तानाम् अहम् योगक्षेमम् वहामि ।

'न अन्य' असे अनन्य, एकच स्वरूप जे माझे तें जाणून, माझ्या चिंतनात राहून, ( जे निस्पृह लोक तेच ते ) मजला उपासीत असतात, त्याचा योगक्षेम ( प्रपच व परमार्थ दोन्ही), ते तेथेच नित्ययुक्त असे मजठायींच झाल्याने, मीच वाहतो, चालविनो, करतो. (२२)

**पैं सर्व भावेसीं उखितें । जे वोपिले मज चित्तें ।**
**जैसा गर्भगोळ उद्यमातें । कोण्हाहि नेणे ॥ ३३६ ॥**
**तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटें जया नाहीं ।**
**मजचि नांवरूप पाहीं । जिणिया ठेविलें ॥ ३३७ ॥**
**ऐसें अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसातें मातें ।**
**जे उपासिती तयांतें । मीचि सेवी ॥ ३३८ ॥**
**ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिया वाहाणीं ।**
**तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥ ३३९ ॥**
**मग तिहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें आघवें ।**
**जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी जिये ॥ ३४० ॥**
**कां आपुली तहानभूक नेणे । तानिया निकें तें माऊलीसीचि करणें ।**
**तैसें अनुसरले जे मज प्राणें । तयांचेनि काइसेन मी न लजें ॥ ३४१ ॥**
**तयां माझिया सायुज्याची चाड । तरी तेचि पुरवी मी कोड ।**
**कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुयें ॥ ३४२ ॥**
**ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो पुढां पुढां लागे देवो ।**
**आणि दिधलियाचा निर्वाहो । तोहि मीचि करीं ॥ ३४३ ॥**
**हा योगक्षेमु आघवा । तयांचा मजचि लागे पांडवा ।**
**जयांचिया सर्वभावा । आश्रयो मी ॥ ३४४ ॥**

(३३६) उखितें = उक्ते, सरसकट, संपूर्ण वोपिले = अर्पिले, वाहिले गर्भगोळ = पोटातला गर्भाचा गोळा कोण्हाहि – कोण्याहि (३३७) नांवरूप – नामरूप जिणिया – जिणेया = जीवितांचे. (३३९) वाहाणीं = मार्गी, भजनीं. (३४०) अजात = जशी पंख न फुटलेल्या तान्ह्या पिलाच्या निर्वाहासाठीं पक्षिणी अहोरात्र झटते (३४१) निंके = चांगले, हितकर माऊलीसीचि – मायेसीचि तयांचेनि लजे – तयांचें सर्व मी करी. (३४२) प्रेम सुये = प्रेमभाव वाढवितो सूये = घालतों (३४३) निर्वाहो = रक्षण. (३४४) योगक्षेम = अप्राप्त वस्तु मिळवून देणे व प्राप्त वस्तूचे रक्षण करणे लागे – पडिला आश्रयो – आश्रय.

'शेत उक्तच दिलंय्'–म्हणजे तेथील मशागत, पेरणी, कापणी, इ त्या सर्वांसहित ते उक्तें दिले असे म्हणणें हें जसे, तसे येथे सर्व जीवभावासहित ते संपूर्ण चित्त चरणींच वाहिले असे : चित्त ह सरसकट भावासहित चरणींच अर्पिलें असें केलें : जसें का पोटांतील गर्भाचा गोळा हा कसल्याहि म्हणून उद्यमास जाणत नाहीं. (३३६)

त्याप्रमाणें चित्तच हें सर्व मजठायींच ठेविल्यानें मजशिवाय त्यांस कांहीहि गोमटें–आवडणारे–होतच नाहीं : ह्या जीवितास म्हणजे मजलाच जसें त्यांनीं नांव रूप हें ठेविलें आहे–तसे 'मी' वाचून दुसरीकडे त्यांचे पाहाणेंच नाहीं–मीच जेथें तेथें त्यांनीं पाहिला जाणारा. (३३७)

असे अनन्यगतिकतेचे चित्तानें ते मजला चिंतीत असतात-मीच त्यांच्या चितनांत चिंतनाचा विषय होऊन असलेला असतो : जे एकसारखे मजला उपासीत आहेत-मीच होऊन आहेत-त्याना आता मीच सेवीत आहे असे होऊन जातें-मीच त्यांची सेवा करणारा होतो. (३३८)

मीच त्यांची सेवा करणारा होतो असें तें त्यांचें अनन्यचित्त हें माझें सर्वथैव असे जेव्हां-ज्या क्षणींच झालें-माझीच सर्व कहाणी, उचलणी, पाहाणी अशी जेव्हा त्याची झाली, तेव्हा त्याची सर्व चिंता करणें हे मजवरच येऊन पडलें (३३९)

मग त्यानीं जें जे कांहीं करावे, तें मीच करणारा होतों-तें सर्व मजवरच येऊन पडतें-जसे का पंख नच फुटलेल्या तान्हया पिलाच्या हितासाठीं पक्षिणी ही अहोरात्र झटते : पक्षिणी ही केवढा तरी ओढा घेऊन जगते-आनंदते-झटते-काम करते : तेथें जीवच जगविला-जागविला-व सर्व जम आनदणेच (३४०)

स्वतः तर तेथे तहान लागली आहे किंवा (भुकेलेंपण) भुकेने जीव व्याकुळ होत आहे असे ती केव्हाहि म्हणतच नाहीं-तहानभूक विसरून जाऊन जें जे काहीं चागलें असे, तसेच हितकर जें जे, तें त्या पक्षिणीसच करणें पडतें-माऊलीसच करणे होतें : तसे जे मजला अनुसरले-ज्यांनीं तहानभूक विसरून जाऊन जे काहीं हितकर तेंच ज्यानीं करण्याचें आदरिले-जे जीवेंप्राणे माझ्या पाठीशीं आले-त्याचें कसलेंहि काम करण्याचें जरी, तरी मी न लाजता तें काम करितोंच-तयाचें सर्व काहीं मीच करितों-'तयाचे काइसेनहि मी न लाजे'-त्याचे कसल्याहि कामाचा मी होतों-न लाजता त्याचें कसलेंहि काम मी करतो-न लाजता करतो-तेथे लाज मी घेतच नाहीं-मी लाजतच नाहीं-असे सर्व जे काहीं त्याचें तें सर्व मी करितों (३४१)

सायुज्य पदवीची-मजमध्ये मिळून जाण्याची-मीच होऊन असण्याची-त्याना ओढच व ती त्याची चाड मी त्याचे कोड करूनच पुरवितो : अथवा सेवा म्हटली तरी तिजमध्ये त्या सेवारूपानें प्रेमच वाढवितो त्या सेवेमध्ये प्रेमभाव घातल्यानें ते सर्व प्रेमाचें असेच करून ठेवितों-करितों. (३४२)

अशा तऱ्हेनें जे मजला प्रेमाचे करतात-तसा त्याचा प्रेमभाव हा, जों जों ते पुढें करितात तों तों त्याना मिळणारा होऊन देवच भेटूं लागला असे होतें-आणि जे काय त्याना ह्या भावदेवरूपानें मिळालेलें त्याचे रक्षणहि पण मीच करितो (३४३)

असा तो त्याचा चरितार्थ व रक्षण हे मजवरच येऊन पडतें, म्हणून तें मी करितोंच. कारण त्याचा सर्व भाव माझे पायींच होऊन असल्यानें, माझ्या पायाचा आश्रयच त्याना शरण-गृहस्थान झाल्यानें, त्याचें सर्व काहीं योगक्षेमाचें काम मीच करून असतों-मीच करतों. (३४४)

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ।। २३ ।।**

अन्यदेवताभक्ताः = दुसऱ्या देवताचे भक्त अविधिपूर्वकम्=विधि सोडून निराळयाच मार्गानें केलेले ते

कौन्तेय, ये अपि अन्यदेवताभक्ता. श्रद्धया अन्विताः यजन्ते, ते अपि माम् एव अविधिपूर्वकम् यजन्ति।

दुसऱ्याहि देवताना जे श्रद्धेने भजतात-भक्त यजन करतात-तेहि पण मजलाच, हे कौंतेया, भजतात, माझेंच यजन करतात जरी ते निराळया तऱ्हेनें अथवा अज्ञानानें क्रम सोडून केलेले, तरी ते माझें यजन मजलाच पोहोचते. (२३)

आतां आणिकही संप्रदायें । परी मातें नेणती समवायें ।
जे अग्नि इंद्र सूर्य सोमा ये । म्हणूनि यजती ॥ ३४५ ॥
तेंहि कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें मीचि आहे ।
परी ते भजती उजरी नोहे । विषम पडे ॥ ३४६ ॥
पाहे पां शाखा पल्लव वृक्षाचे । हे काई नव्हेति येकाचि बीजाचे ।
परी पाणी घेणें मूळाचें । तें मूळींचि घापे ॥ ३४७ ॥
कां दाहीं इंद्रियें आहाती । जऱ्ही येकेचि देहींचे होती ।
आणि इहीं सेविले विषय जाती । एकाचि ठाया ॥ ३४८ ॥
तऱ्ही करोनि रससोय बरवी । कानीं केवीं भरावी ।
फुलें आणोनि बांधावीं । डोळां केवीं ॥ ३४९ ॥
तेथ रसु तो मुखेंचि सेवावा । परिमळ तो घ्राणेंचि घ्यावा ।
तैसा मी तो यजावा । मीचि म्हणोनि ॥ ३५० ॥
येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेआन ।
म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष व्हावें ॥ ३५१ ॥

(३४५) नेणती समवाये = मी विश्वात समवायीसंबंधाने नित्य भरून राहिलो आहे असे ते जाणत नाहींत (३४६) भजती उजरी नोहे-नव्हे = भजनाची सरळ पद्धत, उत् मार्ग नाहीं विषम पडे = चुकते, द्वैतभाव असल्यामुळे हलका पडतो (३४७) वृक्षाचे – रुखाचे काई नव्हेति – काय नव्हती. (३४८) दाहीं – दहाहि येकेचि – एकचि (३४९) रससोय = स्वयपाक बाधावीं–तुरंबावीं = हुगावीं (३५१) आनेआन = कांहीं तरी. व्हावे – होआवे.

आता येथें आणिकहि संप्रदाय आहेत परंतु ते मजला मी सर्व विश्वांत ' समवाय करून ' नित्य भरून आहे–भरून असलेलें एकसमयावच्छेदेकरून जे जाणले जाणे तें–तें जाणत नाहींत–ते सामाविले जाणारें, सामावून असणारे, माझे स्वरूप न जाणता तेथें मी जरी आहेच आहे, तरी त्याना तें उमगलें जात नाहीं व ते ' अग्नि–इन्द–सूर्य–सोमाय ' असे म्हणत म्हणतच यजन करीत असतात (३४५)

तें यजणें केलेले तें मजलाच पोहोचतें-माझेच तें होतें-असते, कारण काय तर मीच हे सर्व विश्व होऊन आहे–विश्वात भरून आहे : परतु तेथे काय कोठें बिघडते ते पाहिले, तर तें त्यांचें करणे हलके पडते : त्याची ती भजनाची भक्तपणाची तऱ्हा किंवा पद्धत ही सरळ नसते-' ते भजती उजरी नोहे, विषम पडे ' : देवभक्तीचा जो मार्ग तो ' उजू ' असा होत नसल्याने, तें चुकतें म्हण अथवा हलके असे होते म्हण, परतु ती भजनाची अथवा भक्तपणाची तऱ्हा ही सरळ अशी उजूच असावी–ती चुकूं नये व ' ती हलकी सलकी ' असेंहि तेथे होऊं नये, तेथें वैषम्य हे पडूं देऊं नये : परंतु तेथे विषमता ही येतेच (३४६)

पाणी हें मूळासच घातले जातें, कारण खांद्यांचें तसेंच पल्लवांचें असे ते वृक्षाने असणे हें खरं जरी, तरी ते पाणी घेणे हे ते मूळामधुनच घेत असतात (३४७)

दहा जरी इंद्रियें आहेत-हीं दहा जरी एकाच देहींचीं जरी असलीं तरी ह्या इंद्रियांनीं सेविलेले जे विषय ते एकाच ठिकाणीं जातात–पोहोंचतात (३४८)

तरी उत्तम स्वयंपाक करून तो कानांस कां बरें किंवा कसा बरें अर्पण व्हावा ? अहो, सुवासिक अशीं फुलें आणून तीं काय डोळ्यांना हुंगवावीं-काय ती डोळ्यांनाच फक्त दाखवावीं–डोळ्यांवरच तीं घ्यावीं–बांधावीं ? (३४९)

तेथें रस जो आहे तो मुखानें सेवन करावा-सेवन केला जातो सुगध, सुवास, परिमळ तो नाकानेंच घ्यावा, हुगावा-नाकासच हुगवावा लागतो. तसा मी जो आहे त्याचें यजन ' मीच ' म्हणून करीत असावे-करावे : " मी यजावा मीच म्हणोनि " (३५०)

मजला नेणता केलेलें भजन हें काहींतरीचें होते-ते वाया असेच होणारे होतं : या कारणास्तव कर्माचे डोळे जे आहेत ते निर्दोष असेच असावेत : ते डोळे म्हणजे ' ज्ञानच ' त विषम असे असूं नये-तेथे दोष ठेवूंच नये : ' मी यजावा मीच म्हणोनि ' तेथे ज्ञान हेच कर्माचे डोळे होय, व ते ज्ञान हें निर्दोष असेच असून असावे : येथें जाणतेपण हेच डोळस असावे : तेथे ज्ञानच एक. (३५१)

**अहं हि सर्व यज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥**

भोक्ता = उपभोक्ता प्रभु = स्वामी अभिजानन्ति = तत्त्व जाणणे, जाणण्यात मुरलेले. तत्त्वेन = तत्त्वदृष्ट्या च्यवन्ति = चळतात, अध्यात्मिक उन्नति बंद पडते.

अहम् हि सर्वयज्ञानाम् भोक्ता च प्रभुः एव च, तत्त्वेन तु माम् न अभिजानन्ति अतः ते च्यवन्ति ।

सर्व यज्ञाचा भोक्ता व प्रभु मीच आहे, परंतु मला जे जाणणे ते तत्त्वदृष्ट्या ' जाणते ' असे जर नाहीं ( जर तेथे तत्त्वदृष्ट्या मला जाणलं नाहीं ), तर तेथे माझ्या प्राप्तीमध्यें चळणेच होते (२४)

**येऱ्हवीं पाहे पां पांडुसुता । ययां यज्ञोपचारां समस्तां ।**
**मीवांचूनि भोक्ता । कवण आहे ॥ ३५२ ॥**
**मी सकळ यज्ञाची आदि । आणि यजना मीचि अवधी ।**
**कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवा भजले ॥ ३५३ ॥**
**गंगेचें उदक गंगेसीं जैसें । देती देवपितरोद्देशें ।**
**माझें मज देती तैसें । परी आनानीं भावीं ॥ ३५४ ॥**
**म्हणोनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा ।**
**मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले ॥ ३५५ ॥**

( ३५२ ) यज्ञोपचारा - यज्ञोपहारा = यज्ञातील पूजादि कर्मांतील हविषान्न, वगैरे ( ३५३ ) सकळ - सकळां यजना - यजना यया देवां = इंद्रादि देवताना ( ३५४ ) देती - अर्पिजे आनानीं - आनान = निरनिराळया.

एऱ्हवीं पाहिलें तर, हे पाण्डुसुता अर्जुना, ह्या सर्व हविष्पात्राचा मीच भोक्ता आहे-मजशिवाय दुसरा कोण बरें असणार ? कोण दुसरा काहीं काय तेथे मीवाचून आहे ? नाहीं. मीच तेथे भोक्ता व प्रभु असा आहे (३५२)

आदि-आई-मूळ ह्या सकळ यज्ञांचा मीच आहे, तसेंच ह्या यज्ञाची अखेरहि पण मीच आहे : परंतु ते चुकून जाऊन दूर-दुः-दुष्ट-झालेली आहे बुद्धि ज्याची असे जे दुरिततेचे झालेले ते इंद्रादिक देवाना भजले. (३५३)

उदकास गंगा म्हटलेलें-तेथे ती गंगा ही जगीं गंगेस दिली, तेथे उद्देश काय तर तो पितराचा एक, देवाचाहि एक, देवपितरोद्देश पुढे ठेवूनच तें गंगेचे उदक गंगेसच दिले . तसें माझे जे काहीं तें

मजलाच देतात, परंतु नेथे भाव हाच आन म्हणजे दुसरा करूनच : तेथें भावना किंवा भाव हा आन आन असा करूनच : तेथे जी काहीं श्रद्धा किंवा आस्था ही 'दुसरेंच एक तिसरे ठिकाणीं अर्पिलें' अशा तऱ्हेची होय-असते. (३५४)

म्हणून, हे पार्था, ते मजप्रत पावतच नाहींत : व असें झाल्याकारणानें मग जी आस्था त्यांनीं मनीं धरलेली असते, तेथींचे ते होऊन जातात : तेथेच राहातात : तेथीलचे सर्वथैव असेच होतात. (३५५)

**यान्ति देवव्रतान्देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

यान्ति = जातात, चे होतात. देवव्रत = दिव्य कर्म जे तेथे ते त्या दिव्यतेच्या कर्मामुळे व्रतच एक देवाचे घेतलें असे भूत+इज्याः = एरव्हीचे नुसतेच लौकिकाचे प्रजेचे या स्तुतीचे ते : आता अनुवृत्तीचे तेथे भूताना भाव्य करून, त्याना भूतत्त्वाचें यथार्थतेनें असण्यास जें लावणे तें, तेथें पूजाच केली जसें त्यास भूत+इज्या कृत-असे व्रत ज्यानीं घेतले आहे ते मत् याजिन. = माझें यजन करणारे ते : येथें वृद्धि हीच जशी यजन केली गेली : अनादिमत् जे ब्रह्म तेंच जसे बुद्धीनें-अक्कल हीच मोहित नच करून घेणे जे तें बुद्धीचें, यथार्थबुद्धीचे, भावबुद्धीचें याजिनः = यजन-याजन : यजित आहे यजन जेथील असे करणे ज्यानीं पत्करिलेले ते याजिनः : अनादि ते कसे हेच एक ज्यानीं यजन करण्याचें केलें-असे याजित झालेलें तें स्वरूप व त्याचे व्रतामध्येच ज्यानीं राहाण्याचें केलें असें याजिनः : येथें फरक तो कसा पाहाण्याचें होते तें म्हणजे वाजिन. म्हणजे घोडाच एक व त्यावर स्वार झालेले ते : तसें येथें ब्रह्म हें यजित झाले व तेच होऊन जे आहेत ते याजिनः असे. येथील 'व्रत' हे महान् भार पाहाणारे असते-तेथील प्रमाण हे प्रमाणाचें होतें.

**मद्याजिनः** = मत+याजिनः (यजन याजिते जनाः)

देवव्रताः देवान् यान्ति, पितृव्रताः पितृन् यान्ति, भूतेज्याः भूतानि यान्ति, मद्याजिनः अपि माम् यान्ति ।

येथें बुद्धीचे अनेक तरंग हे अज्ञानप्रांगनावर जसे उभारलेले . तेथे मतीसच मत् म्हटलें असे : देहभास हाच लपलेला होतो. ज्या मोहमदिरेमुळे तेथें मोहाचे जाळ हे अतिविचित्र असून तें ह्या देहभासास लपविंते व बडबड तसेच अनेक शब्दाना लपवून टाकते : तेथे बोलणे जें शास्त्राचे—अद्वैत इत्यादि-असे ते नुसते बोलण्यानें व्यर्थ हा देह वागविण्याचे होऊन तेथे अनेक टोप हे येऊ लागणारें होतात · तेथे 'डमरू' हेच का त्या महादेवाच्या हातामधील वाद्यच वाजणारे—म्हणून येथे बोलणे नको, सागणे नको व लिहिणे ते तरी कोठवर ? परंतु ते काहीं नको असें म्हणवतच नाहीं

सात्त्विक भक्त देवलोकाला जातात, इतर देवतांची उपासना करणारे त्या त्या देवाच्या स्थानापर्यंत जातात, आणि माझे भजनपूजन करणारे ते मला येऊन मिळतात (२५)

**मनें वाचा करणीं । जयांचीं भजनें देवांचिया वाहाणीं ।**
**शरीरजातीये क्षणीं । देवचि जाले ॥ ३५६ ॥**
**अथवा पितरांचीं व्रतें । वाहाती जयांचीं चित्तें ।**
**जीवित्व सरलिया तयांतें । पितृत्व वरी ॥ ३५७ ॥**

**कां क्षुद्र देवतादिकें भूतें । जयांचीं परम दैवतें ।**
**जिहीं अभिचारिकीं तयांतें । उपासिले ॥ ३५८ ॥**
**तयां देहाची जवनिका फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति झाली ।**
**एवं संकल्पवशें फळलीं । कर्में तया ॥ ३५९ ॥**
**मग जिहीं डोळां मीचि देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला ।**
**मनीं मीचि भाविला । वानिला वाचा ॥ ३६० ॥**
**सर्वांगीं सर्वां ठायीं । नमस्कारिला मीचि जिहीं ।**
**दानपुण्यादिक जें कांहीं । तें माझियाचि मोहरा ॥ ३६१ ॥**

(३५६) मनें – मन. जयाचीं भजनें – जयाचिया भजनीं वाहाणीं = मार्गीं (३५७) जीवित्व – जीवित (३५८) देवतादिकें – देवतादि. जयाचीं – तियेचि ज्याचीं अभिचारिकीं = जारणमारणादि कर्मांनीं (३५९) जवनिका फिटली = पडदा दूर झाला, मृत्यु आला कर्में तया – कर्में तिये (३६०) वानिला = स्तविला, गाईला. (३६१) जिहीं डोळा मीचि – मीचि डोळा सर्वांगे – सर्वांगीं मोहरा = उद्देशानें, माझ्याप्रीत्यर्थ

मनानें ( सर्व मनच एका मनाचे केले ), वाचेन व इंद्रियानीं-ज्यानीं सर्व मनंकरुन, वाचेने व इद्रियानीं एक देवाचें वाहाणें केलेलें-देवत्वच पाठीवर घेऊन ज्यानीं वावरणे केले-ते जेव्हा शरीर ह जातें, तेव्हा देवच होऊन गेले· ते शरीर जातेक्षणीं देवच झाले. (३५६)

. ज्याना म्हणून तर्पण केले जात, असे जे पितर जे ‘ अथातो धर्मजिज्ञासा ’ ‘ अथातो ब्रम्हजिज्ञासा ’ असे म्हटलेले जे ब्रम्हयज्ञामध्ये, तेथे ज्याना पाणी दिले जातें, त्या तेथील जे पितर त्यांचंच सर्वथैव ते चित्त झालेले असल्यान, तथे जीं काहीं व्रत, उद्यापने नेहमीं चालत असलेली, तीं म्हणजे एक सर्व साधारण दिनचर्याच-जे काहीं रुढीवर चालत आलेले तच हाडीं मासीं खिळून गेलेले तेथेच जे चिकटून असतात, ज्यानीं पितृत्वच वरिले, ते त्या पितराचे-सर्वथैव त्याच कुळाचे-असे होऊन असतात

आता येथे असा जर प्रश्न घेतला कीं, इतर ज्या काहीं कुळी त्याचे करमे येथे सहकारणे ते पाहा ण्याचें जर केले, तर असे लक्षात येत कीं, जे काहीं गृहाचे पुराणे जुने असे झालेले त्यानीं येथे जर ऊर्जितावस्थेस येण्याचें केले, तरीहि काहीं हरकत ही नाहींच : कारण तेथं फरक हा फक्त-तींच व्रते, उद्यापने, वगैरे तशींच राहून असलेलीं अशींच असून, फक्त तेथे एक तऱ्हेचे हया जीविताचे ज शील, वृत्ति, चर्या, हयानीं तें मनुष्यदेहधारण हेच एक उत्तम अशा नागरिकास बहुश्रुतनेचा जो एक सगुण भार-जो हया मनुष्यलोकाचा व्हावाच असा आग्रह घेऊन असलेला- व धर्मग्रथहि पण तेच परोपरीनें सांगत आलेले कीं, हा देहभार हा उजविलेला असाच असावा. तेथे अक्षर, सगुण, वृत्तिभार हा पोष णादि व्यापारानीं उत्तम असाच एक व्यवहाराचा होऊन, तेथे जीवित्व हे कसे उभे असलेलें किंवा आधा राचें असे, असेच अनुलक्षून असावें तेंच पुढे करून हया मनु यभारासच कर्म बाजूस करून धर्मधारणेचा भारच घेतला व मग हा जसा एक धर्मच प्रतिष्ठेस आला असेच होऊन जातं : तेथे व्यवस्थितित्व हेच हया देहवृत्तीस अथवा सगुण भारास आणल्याने, तेथे व्रत हें जसे एक सर्वमान्यतेचे महान असे , तेथेहि पण तीं जीं सांगितलेलीं तर्पणादि लक्षणें तीं सहजतेनं उगविलीं जाणारीं अशीं असून, तेथें कर्म-योगच जसा आतां निष्कामतेनें पाहिल्यामुळे आपल्या स्थितीसच आला असें होय देव होणे अथवा धर्म जिज्ञासा ही अनुवृत्तीने यथालोकोपचाराची झाली हें माघ येथे नुसते पाहाण्यासारखे नव्हे, तर तेथे इतर कुळी हयाहि पण जशा वर येऊन त्यानीं मैत्रीच केली-संगनमत केले-असे एक नाविन्यच जसे

ह्या 'विज्ञ' व 'ज्ञ' चा परस्पर विनियोगच करीत आहे असे दिसणारें होऊन असते : असे तेहि पण जीवित्वाच्या अंतीं पितृत्वाचे होतातच (तर्पयन्ति असौ पितॄन् = पितृत्व)

संतर्पण असे जे सम्यक् तर्पण ह्या पितरांना द्यावें लागणारें, तेथे पालनपोषणादि जे भार ते व्यवस्थितपणानें उचलिले होत असावेत असे तीर्थच एक त्यांना अर्पण केलेलें असें तें होय : तेथें आता काय तीं तीर्थंच जशीं ह्या सगुणभाराच्या मुळाशीं असलेलीं अथवा अंगुलीच्या तळीं बसलेलीं अशीं तींच प्रार्थ् आदरिलेलीं कीं, हे जे पालनपोषणादि व्यवहार हेच स्वत च्या भारानें तेथेंच दृढ केले गेलेले अथवा ते तसे दृढ व्हावेत असेच एक त्या व्रतास पाहाणे हें पितृत्व म्हणजेच पुरुषलक्षणाचा भार घेऊन असलेलें जे पुरुषलक्षण तें होय : (बिभर्ति यत् विश्व सः पितरः) तसेंच मातापितरौ म्हणजेहि पण एकाच 'पितरौ' ह्या शद्वांत दोन्ही अर्थ गर्भित असे : दोन्ही अर्थ वेष्टित असे होऊन असलेले. (३'९७)

त्याचप्रमाणे (दारकर्में जीं त्याजकरिता) हीं भूतंच त्यानीं देवता करून त्यांनाच ह्या जारण-मारणादिकरितां उपासण्याचे केलें : तेथे त्यानीं तें परम दैवतच एक असे करून, तेथेंच ते उपासना करून त्याचेच झाले : त्याना जेव्हा का मरण येंत, तेव्हा त्या देहावरील पडदा दूर झाल्यामुळे तीं भूतत्व होऊन राहानात, येथे त्यानीं संकल्प करूनच केलेले जे तेंच फळणारे होऊन असल्याने, तेथें आतां भूतताप हेंच एक उपासनेस योग्य होय असेच त्यानीं म्हणू केलें

येथें काय कोणी म्हणणार होईल कीं, हे जे बोलिले कीं-'क्षुद्रदेवतादिके मूतें' हींच परम दैवतें उपासण्याचीं-उपासना तेथे केली, त म्हणणे कसे ते पाहूं केले जर, तर असेच दिसणारे कीं, ह्या पंची-करणानें साम्ययोग जो पाहिला जातो, तेथें हा योग जो बोलिला तो त्याचाच अंश असून, येथें एकच भूत जसे वेगळें केलें व त्यानें बाकीच्या भूततत्त्वाना आपल्या कह्यात आणून त्याशीं मैत्री करून- तीं जीं काहीं दारादि क्षुद्र कर्में हींच संकल्पमात्रानीं आदर दिलेलीं तींच आतां फलित अशीं झालीं.

मेल्यानतर स्वर्ग हें जे काहीं म्हणणें तें त्याना भूतत्वाचे होणें हेंच प्राप्त झालें- जेव्हा या देहावरील पडदा-स्थूलदृष्टीवरील पडदा-बाजूस झाला-मरण आले-तेव्हा तेंच त्यानीं तें क्षुद्र कर्म हेच परम दैवतच एक असे घेऊन तेथेच भूतत्व' प्राप्त करून घेतले भूतत्व म्हणजे जे काहीं एक ह्या कर्मांनीं अथवा कर्माच्या व्यापांनीं घेतलेलें, व्यापलेलें हें देहक्षेत्र तें मुळींच न ऐकणारे असें झाल्याने, तेथे व्यव-हार हे आपल्या मूळात बसतच नाहींत. असे जेव्हा का होऊ लागतें, तेव्हा तेथे एक शद्व हाच भूतत्वाचा होऊन भूतच बोलिलें असें झाल्यानें-सर्व देह हा त्या 'भूतच एक बोलिले' अशा अर्थाचें-तेथें हें जे देह-बुद्धि-मन हें जेव्हा का मोकळेच असत-तें कुठेहि टेकलेलें अथवा चिकटलेलें नसले म्हणजे मोकळेच एक असें-तेथे हा जो श्वासभार हाच त्या देहास उचलीत असल्यानें, सर्व एक जडत्वच भासूं लागल्यानें, तेथे जडत्व हेंच पुढे झालेलें : विद्या, बुद्धि, व्यवसाय, शिक्षणादि क्रम हे तेथे नसलेले अथवा असलेले जरी, तरी हा देह जो प्रारब्धक्रियमाणादिनीं वागविला जाणारा तो एका विशिष्ट देवतेनें विशिष्ट अशा कर्माच्या साखळींत बाधला गेल्यामुळे, तेथें त्या देहामधील अणुरेणुहि त्याच कर्मबीजाचें होऊन, तेथील बांधणी ही उचलावी असे त्या देवतेचें मनोगत असल्यानें,विशेष अशी एक परम देवताच ती त्या देहास परम अशा लोकात नेऊन, अथवा देहामधील अणुरेणूंना एका विशेष अशा कर्मानें खिळिला गेल्यामुळें तेथें दिव्य अशीं गृहेंच पुढें आलीं व त्यानीं नैष्कर्म्य तत्त्व हें पुढें करून तेथील कर्माची रेखाटणी हीच मोडून काढली : असे होत असतांना जे कांहीं एक त्या देहाशीं व्यवहारणे होणारे तेंच जसे एक भूतत्वच तेथे वागणारें असे असतें : म्हणून येथे कर्में हींच नैष्कर्म्यतेस आलीं-निवृत्त झालीं : असे एक जे कांहीं होत असणारे ह्या देहामधील अणुरेणूंना, तेथे असला हा प्रवासच एक पाहविला जात असल्यानें, तेथें मधील जो प्रसंग तोच जसा ह्या भूतांना पाहाणारा असून, तेथें तें भूतत्वच

बोलणारें-असें गृहच एक त्या जीवदशेनें मूतत्वास पाहूं करून तेथें शब्द हा व्यापक झाला-तो बाहेरहि वागूं लागला व आंतहि पण पाहूं लागला. (३५८, ३५९)

आतां माझें यजन करणारे जे त्यांचें मजला पावणें, मजप्रत येणें तें केलेलें सांगतों : तेथें आता जगी एक 'आकाशवाणी' असा शब्द तो झाल्यानें, मीच 'तो देहबुद्धीवरील पडदा दूर झाल्यामुळें' दिसूं लागला-कानानेंहि मीच ऐकिला, मनामध्येंहि पण मीच भाविला गेला, व मग वाचेनें जें बोलणें तें त्याजविषयीं म्हणजे मजविषयींचें होणारें, होतच असणारें हें केव्हाहि : तेथें डोळा, कान, मन व वाचा हीं मजला जाणूनच असतात-जाणणारीं होऊन असलेलीं (३६०)

असे तें ह्या आकाशवाणीसारखे बोलणें हें सर्वांगामध्ये मुरलेलें असे झाल्यानें, तेथीलचीं सर्व अंगें हीं हात जोडूनच आहेत अशीं असणारीं : जेथें जातील तेथें, त्या त्या ठिकाणींचाहि पण मीच आतां होऊन असल्यानें, तेथें एक मीच जसा नमस्कारिलों गेलों : मजला पुढें करून-माझ्या आश्रयानेंच ते त्यांचें होणारें जे काहीं दान तें मजला पुढें करूनच झाल्यानें, तेथें पुण्य हें मजमध्येंच जसे केलें असे तें आता होऊ लागलें : मजप्रीत्यर्थच ते-मीच तेथें उद्देश होऊन असलेला असा-अथवा जो काहीं एक उद्देश तेथे आलेला तो आता मजमध्येच वावरू लागल्यानें, तेथें मजला पुढे करूनच तें होत असणारें असे : दान-पुण्य-नमस्कारणें-डोळयाचें पाहाणें-कानाचें ऐकणें-मनाचें भावणें-वाचेनें जें गाईलें जाणारें, प्रेमास येणारे-तें सर्व आता मीच होऊन आहे असें ते होऊन जातें-होऊन असलेलें. (३६१)

**जिहीं मातें अध्ययन केलें । जे आंतु बाहेरी मियांचि धाले ।**
**जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ॥ ३६२ ॥**
**जे अहंकार वाहात आंगीं । आम्ही हरीचे भूषावयालागीं ।**
**जे लोभिये येकचि जगीं । माझेनि लोभें ॥ ३६३ ॥**
**जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम ।**
**जे माझिया भुलीं संभ्रम । नेणती लोकु ॥ ३६४ ॥**
**जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडे जयांचेनि मंत्रें ।**
**ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ॥ ३६५ ॥**
**ते मरणाऐलीकडे । मजसी मिळोनि गेले फुडे ।**
**मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं ॥ ३६६ ॥**
**म्हणोनि मद्याजी जे जाले । ते माझिया सायुज्या आले ।**
**जिहीं उपचारमिसें दिधलें । आपणपें मज ॥ ३६७ ॥**
**अर्जुना माझिया ठायीं । आपणपेंविण सौरसु नाहीं ।**
**मी उपचारीं कवणांहीं । माकळे गा ॥ ३६८ ॥**

(३६२) धाले = समाधान पावले. (३६३) आम्ही हरीचे " = हरीची गुणकीर्ति पसरविणारे भक्त आम्ही हाच ज्यांना अहंकार (३६४) संभ्रम - सभ्रम = व्याकूळ (३६५) चेष्टामात्रें = सर्व व्यवहारांत (३६६) फुडे = खरोखर. (३६७) जाले - जाहले. मद्याजी = माझे यजन करणारे. उपचारमिसें = सेवेच्या हेतूनें. पंच उपचार - गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य. आपणपें = स्वतःला, सर्वस्व. (३६८) सौरसु = गोडी, प्रेम नुसत्याच उपचाराच्या चेष्टांनीं - तेथें स्वसर्वस्व वागविलेलें जेव्हां तेव्हांच यथाशक्ति होणारें: मनांत वागविलेला हेतु हा कार्यकारी महत्त्वानें वागविला नाहीं, तर तें नुसतेंच बाह्यचेष्टांचें तें.

तेथें लोभच एक ह्या देवपणाचा केला-आम्ही जे जगत आहोत तें फक्त ह्या देवत्वास-श्रीहरींचें जे प्रेम त्या प्रेमासच-नीटनेटके करून तेथे भूषणास्पदतेचें एक असेच जीवित जगावें-असावें-असाच त्यांनीं आपला बाणा करून, तेथेंच लोभ करूं लागल्याने, तेथें अहंभाव हा सर्वांठायीं-सर्वांगीं-ह्या एकाच प्रेमाच्या लोभानें असलेला असा-ह्या लोभाची गोष्ट घेतली, तर तेथे अनेक गोष्टी ह्या घरादाराच्या, दिनचर्येच्या, दीनदुबळेपण हे आधाराचे केलें अशा निराधाराचें न राहातां, त्यांनीं अतिलोभाचे असेच ह्या श्रीहरीचे एका लोभाचे होणें हे अंगोअगीं तोच छंद मुरवून घेऊन तेथेंच राहिले-त्याचेच झाले. (३६३)

माझाच एक छंद घेतल्याने-घेऊन-त्यानीं आता ह्या मनास उगीच काहींबाहींचें असे होऊंच दिलें नाहीं, तेथे काम अथवा इच्छा हीच पुरुषार्थास पाहाणारी झाल्यानें, तो काय आतां जसा पुरुष भारच घेऊन असलेला, तेथें धर्मच नांदूं लागला : सकामतेचे ते लक्षण हे प्रसन्नचित्ताचे असेच झाले, त्याना हुरहुर ही केव्हांहि वाटेच ना. राहाण्यास जागा मिळाल्याने प्रेम हेंच कामाचे झाले-काम म्हणजे प्रेमच एक उगवणारे असे सकामतेचें-तेथे लोक हाच प्रेम झाला-तेथे काम हे प्रेमाचे झाले-काम हच तेथें सकाम म्हणजे भरपूर कामाचे असे होऊन आले : आता येथे हें प्रेमाचे काम झालेले अथवा कामच प्रेमानें पाहिलें असे मीच होऊन असल्याने, तेथे मुलामध्ये जे कांहीं 'भ्रमित चित्ताचें असे,' 'कांहींच मजला समजत नाहीं असे,' 'मजला भुलणेंच एक असे' तें जे ह्या जीविताबद्दल काहीं का आधाराचे असणे असे नाहींचः तेथे लोकच माहित नाहीं-भ्रमच एक पदरात घेऊन मायाच जशी मोहून टाकणारी नेहमीं-असे ते भ्रमाचा भोपळाच एक-तेथे काम नाहीं, प्रेम नाहीं, लोभ नाहीं, भूषण नाहीं, काहींच नाहीं-असे जें भरमणें ह्या चिताने घेणे तें जसे का माझ्या स्वरुपानें अडविले असेच जीवित !

असे ते भ्रमाचे-भ्रमिस्त असे-ते जीवित न करतां,, तेथे लोक जाणला, लोक पाहिला, प्रेम लोकांस आलें, लोकणे, आलोकणे हे प्रेमाचे झाले-तेथे काम हे परि परि घेऊन परोपरीची कामे ही होऊन आलीं, तेथे मीच आता तीं झालो : जीवित हे जगण्यास योग्य आहे असे एक लोक आनंदाने घेऊन आले व आता तें नांदूंच लागलें (३६४)

तेथे शास्त्रजातें हीं मजविषयींच बोलूं लागलीं-त्यानीं प्रेम हे वाखाणं केले : काम हे 'लोभाने' सकाम करावे व प्रेमच एक तेथे कसे जे त्या प्रेमाचें आपण व्हावे एवढेच त्यानीं सागूं आदरिले-मोठा आदर देऊन एवढीच गोष्ट त्यानी बोलण्याचें केले : त्यानीं आता जो काहीं कानमन्त्र-'तुझे प्रेम मजला दे,' 'मी तुजवर प्रेम करीत आहे,' 'माझे प्रेम तुजवर आहे,' 'तुजवर माझे प्रेम आहे'-देण्याचें केले ते मजला जोडण्यासाठींच . अशा व्यवहारानीं जे नेहमीच जसे का माझे भजनामध्येच आहेत असे, त्याचें ते जीवित हें सर्व एक (ईश्वर) भजनीं लागले असेच-भजनीं लागलेले असे (३६५)

ते मरण्याच्या अगोदरच मी होऊन असलेले होत : येथे खचित खचित असे ह माझे बोलणे कीं, ते मीच प्रत्यक्ष होऊन असलेले होत : मरणाच्या अगोदरच त्यांनीं मी होण्याचें केले-मीच झाले-ऐलीकडे म्हणजे अगोदरच ते मी होऊन आहेत असे असल्याने, तेथे काय मरणानंतर ते दुसरीकडे कोठे जातील-किंवा जाणारे होतील हे केव्हांहि नाहीं : खचिततेची ही गोष्ट आहे- जीविताने असताना त्यांनीं खरोखर मजमध्ये मिळणेच केलेले असे ते होत : काय आतां मीच होऊन असलेले ते मरणानंतर आणिकाकडे जातील-आणिकांचे होतील असे नाहीं; कां बरे ते आणिकाचे होतील ? दुसरीकडे जातील ? जे मिळूनच मजला असलेले, ते मला मिळून असणारे असेच केव्हांहि !! (३६६)

माझें यजन करणारे माझ्या सायुज्यतेचे झाले : त्यांनीं सेवेच्या हेतूनें आपले सर्वस्व मजला दिलें ; मद्याजी असे जे त्यांनीं यजन हेच यायाचें केले : तेथे योग हाच ते होऊन आले : त्यांनीं

सेवा घ्यावी असेंच मागणें केलें व त्या सेवेमध्यें राहूनच त्यांनीं आपलें सर्वस्व मजला दिलें ! सर्वस्व जें त्यांचें आपलेंपणाचें असें-निजरूपाचें-स्वतःचें असे तेंच आपणांस अर्पण असो असें म्हणून सर्व सेवेचें तें जीवित व्हावें असेंच त्यांचें तें देणें हें काय सर्व पिसें म्हणून जीं आहेत त्याहिवर मात करणारें-त्यांनाहि मात देणारें असे होय : ' निजरूप-सर्वसेवा-अर्पण ' हेंच सायुज्यतेनें मुक्त, मनमुक्त असें जें मत्-यजन याग हेंच सर्वयोग घेऊन तेथें कलाकौशल्य, हें कुशल आहे ना असे विचारीतच आहे ! तेथे काय कोठे अंतर असे त्या निजरूपामध्यें व त्यामध्ये असें मुळींच नाहीं : तेथें स्वरूप एक निखळ असेंच तें 'मद्याजीचें '-तेथे देहच लपला व एक योगरूपच पुढें झाले

ह्या देहाला होणारे जे उपचार-तेथें देहच मुळीं सर्वस्वीं मीच असा-असा त्यांनीं तो देह आतां सेवेसाठीं म्हणून-त्या देहाला होणारे जे सर्व उपचार त्या उपचाराच्याकरितां-ते उपचार आम्हांकडून व्हावेत-आम्हीच ते उपचार होऊन असावें अशी एक सेवासंधि-त्या सेवेकरितां म्हणून त्यांनीं आपलें निजरूप, सर्वस्व, स्वतःला – मजला देऊन टाकलें : ते त्या यजन-याग-योगाचे झाले : सायुज्यतेस आले: स्वतःस उपचाराचे केले व सर्व जें निजरूप तेंच ते झाले-त्यांनीं निजरूप मजला देऊनच टाकिले: आम्हीं उपचाराचे व्हावें-अशीच एक सेवा आम्हांकडून घ्यावी अशी इच्छा ही पुढे होऊन तिनें आपलें सर्वस्व मजला अर्पण केलें. (३६७)

परंतु, हे अर्जुना, हे केव्हाहि कीं, आपण स्वतः तेथें असल्याशिवाय त्या मजला प्रेम हे येतच नाहीं-आपण जो कोणी स्वतः तो तेथें असल्याशिवाय मजला तेथें गोडी ही वाटतच नाहीं : म्हणून नुसते उपचार जसे पुढे घेतले, तरी तेथे स्वतःचे स्वतः असे जे एक आपलेंपण तें जेव्हा कां असेल, तरच तेथें गोडी, तरच तेथें प्रेम, तरच तेथें आपलेंपण ! येथें काय नुसते वरवर उपचार करून, नुसत्या उपचारानीं का मी कळणारा असेन-किंवा आकळणारा असा ! अहो, कळवळा हा पोटचा जेव्हा, तेव्हाच तेथे उपचार हेहि पण तो कळवळाच एक आपलेपण हें उगवूं देतो: म्हणूनच तेथें उपचार हे अनंत केले, ते जसे कां आपलेपणाचे असे जीवित जर नाहीं, तर ते जसे काय एका शवासच ! म्हणून चैतन्यनाथ जो मी त्याचें असणें हें आपलेंपणच एक गोडीचें असे व मग तेथें उपचार हे कसे बरें जीवितच जीवितावर उभे केलें-जीवितानें जीवितासच जीविताचा साज केला-जीवितानें जीवितास प्रेमाचा हो, गोडीचा हो असें म्हणूं केलेलें होय काय तेथे आपलेंपणाचें कसे तें नच कळणारें-काय तेथे सर्वस्व म्हणजे तें काय हें नच समजणारें-काय तेथे निजरूप हें चैतन्यनाथच एक ह्या जीवितानें जीविताच्या आपलेपणाच्या गोडीचा झाला-प्रेमच एक असा तो.

तुरंत किंवा त्वरित असेंच तें उपचारणे तें काय उपकाराचें का कसे-तेथें स्वजीवितच गोड झाले असे : स्वफळयानच साधलें असे : उपकार असे कोणीच म्हणत नाहीं, ते कां किंवा कोणी म्हणत असल्यास तें उतराईच एक अशी

**उपचारः**-( हा काय उपकार म्हणून आभार मानणें व तसलेंच कवतिक हा अधिकार का ऋणच एक ):-

' पादाति चालती नव्हे गणना तयाची ।
कीं काढिली वरुनि कांति हिमालयाची ॥

पायी चालणें, पादचारी, पाईकपण, इत्यादिनीं जें स्वामीचें स्वामीपण हेंच उचलून घेऊन तेथें तें अति उत्तम असेंच एक स्वामीपण स्थिर केलें, पटविलें, शृंगारलें, महत्वाचें केलें, अभिमानास्पदतेच्या पदास उभारले, देवतुल्य असे तें केलें : काय तेथें पाइकपणाचें काय कौतुक म्हणावें, कां महिमान म्हणावें, कां जीवितच सर्व आपलें त्यांत ओतून, सर्व कांहीं जे ह्या मनुष्यजन्माचें ' धन्य धन्य ह

नरदेह' असे ते धन्यवाद गाइलेले, तेथें 'धर्मसाधन' हेंच सधन केलें-हा जन्म हा संपन्न केला, सधन केला, धन्यतेचा केला-तेथें धर्मासच सर्व उपचार करून तेथें हा जो मनुष्यभार हा देवतेच्या बरोबरीचा केला : तेथें काय कसे तें उपचारणें केलेलें तें काय कोणी कांहीं जाणणारा आहेच आहे, तसेच नाहीं पण, कारण ह्या माझिया भुलीं सभ्रमतेचें जे अंग तेंच दडपलें गेल्यानें, तेथे लोक हें काय पाहाणे ते व्यापकतेचें कसे हें त्या तेथीलच्या तीनगुणामुळें एकमेक एकमेकापाठीमागे लपलेच व तें पाहाणें हें भुलविलेच गेले जसे.

म्हणून येथें अनेक गोष्टी बोलल्या गेल्या-अनेक तऱ्हा प्रकाराच्या कशा तें सांगितले-लोकांचे जें कांहीं प्रकारानें असणें तें अनेक प्रकार पुढे करून, ह्या प्राण्यास कसे नादींच लावून, तेथें कांहीं जे उपचारात्मक करणें तें मुळीं माझे असे होईच ना.

म्हणून ह्या तृणतुल्यतेनें पाहिलेला हा जीवितधडा हा काय तेथे कसा पाहिला जाणारा हें कांहीं कां काय सागून मनात उतरणारें होईल असे नाहीं

तेथे मीच 'उपचारी' झालों असा असल्याने, तो जो मी तो कोणास सहज सांपडणारा होईल असे कसे तें बरें ?

काय हें कांहीं बोलण्यास येण्याचें करीच ना ! तेथे उपचार हे कसे व ते कोणीं करायचे हे काहींच आपल्या स्पष्ट समजुतीस न आल्या कारणानें, तेथें फक्त एवढेंच आतां बोलणं करू कीं, ते जेथल्या तेथे बसावेत, ते आपल्या योग्यतेंन योग्य असेच होऊन यावेत.

सर्व व्यवहारांतहि पण त्यानीं ते म्हटलेलें जे 'ऐसे जे चेष्टामात्रे भजले मज' तेहि पण तेथेंच अधिष्ठित होणारे असेच होत

म्हणून येथे एवढेच पाहाणे पाहिलें जातें कीं, 'माझे ठायीं आपणपेंविण सौरसु नाहीं । मी उपचारीं कवणांहीं नाकळे ॥' असे ते जे उपचार हे एक तर प्रकृतिधर्म हाच सर्वार्थतेनें पुरुषधर्मधारणेचा करणें हेंच मुख्य अंग होय : तेथें उपचार ते म्हणजे जसं काहीं ह्या देहास एक तारुण्यच उपजवून तेथे ते तारुण्य नुसत्या तरुणपणाने नव्हे, तर तेथे अनुस्थितीने एक ते जियालेपण हेच देवत्वच नटलेलें असें : तेथें त्यास इतकें कांहीं नटविलें कीं, तें युगायुगानाहि पुरुन उरणारें असेच ते औपचारिकतेचें रहस्यबीज

आतां 'उपचार' हे किती वळणे घेऊन येतील ते पाहू:--(१) गुरु-सेवा-विधान, (२) स्वामी-सेवक-संबंध, (३) षोडश उपचार, (४) औषधी उपचार, (५) त्वरिततेचें एक प्राथमिक, (६) उपचाराचें एक विरुद्ध तें जसे दोन व्यक्तिव्यक्तींचें जे परस्पर सेवाविधान ते कितपत तगणारे किंवा दम घेऊन असणारें, तेथे डावच एक अथवा द्वंद्वच जसे लागलेले, तें विजयी कोण बरे होईल ते पाहूं म्हणणारें होय :

(१) आतां गुरुसेवाविधानाचें जे अंग तें म्हणजे तेथील सर्व कांहीं आपण होऊन असणें-ते केवढया तरी महिमेचें : सेवेचा हेतु हा तेथील सोळा जे उपचार-प्रकार तेहि पण स्वतःच ते होऊन असणें असे जें उत्साहाचें तें : तेथें जणूं काय गरिबानें द्रव्याचा ठेवा पाहावा : आंधळयाचे डोळेच यावेत-उघडावेत : इंद्रपदच प्राप्त होत आहे : असे तें करण्यामध्यें जो एक महत्त्वसंपदारूपी आभार तोच पुढें झाला : गाईच्या पोटीं वासरूं जन्मलें असें प्रेमाचें एक : एकुलतें एक असेच मायेचें : तेथें सर्व परिवार होऊन असणें : उपयोगाचीं पूजापात्रें हीं पण आपणच झाला : तेथें विंजणा आपणच झाला :

पादुका आपणच झाला, आपणच त्या लेवबूं लागला : छत्रधर आपणच झाला, छत्रहि आपण व तेथील वारीची किंवा पाळीची चाकरीहि पण मीच करीन : चवरधर मीच, वाटाड्या मीच, सागळा म्हणजे झारी धरणारा मीच : नेपाळा म्हणजे चूळ भरायला पाणी मीच होईन व चूळहि पण मीच होईन : सुआरू म्हणजे आचारी मीच होईन : ताट काढणें, सेज झाडणें, चरणसंवाहन करणे, सिंहासन होणें : स्वामीचें मन ज्यास लक्ष देईल तेथील श्रवणाच्या अंमपामध्यें शद्वाच्या अक्षौहिणी मीच होईन : ह्या शरीरांची माती त्या क्षितीमध्यें म्हणजे पृथ्वीमध्यें मेळवीन, जेथे श्रीचरण हे उभे आहेत : चवरी, विंजणा, इ. होऊन प्राणाचा लय करीन–तेथें रात्र दिवस असें कांही जाणणे नाहीं, थोडे फार असे म्हणणेंच नाहीं : आज्ञा केली असता उत्साहयुक्त होऊन सज्ज होणें तं असें करण्याने–तेथील पोष हे सपोष–गुरुकुळे सुकुलीन–सेवाव्यसनें सव्यवस : एकादे वेळीं ह्या जीविताचें लोणच केलें असेहि करीन . गुरुसेवकास सहोदर असें प्रेमानें गाजेन : कैवल्यसुखाकरिता पायाची धूळहि घेईन (चालत असताना जी मागे उडणारी होते ती) : सेवा हीच गोड : ह्याचविषयीं कोड : भक्तीची चाड . तत्वज्ञानाचा वाव झाला : ज्ञान हें तेथेंच देव असे ज्ञानभक्त : सेवेच्या प्रेमाकरिताच हें स्थूळ पोसणे.

आपणच तें भूत झाला : आपणच भाव्य करूं आला : आपणच ते भाव होऊन तेथे उपचारांनीं ते व्यवस्थित असं केले : तेथें प्रेमच नटले : काय ह्या प्रेमास दृष्टिच लागेल असे ते भाव्य भाव हे एक ह्या देहाचें परम कौतुकास्पदतेचे असेच त उपचारणें हें होय : अहो, पूजा, सुपूज्य, पूज्य असे जे भावणे तें काय नुसतें भावण्याने का कुठे स्थिर होणारे ! तेथे ज्या भूतभाव्याचं जसे एक पायधरणे केलेले असे तं भूतभाव भूतेंगाचें रूप तेंच जसे सर्वलोप्रकारें करून आपणच तेथे रात्रदिवस खपून तेच झाला . तेथे आता तं जागतेपण हेच अनेक अशा वस्तूनीं–व्यक्तींनीं आपले समुणत्व हेंच लेवविलें : तेथे अवयव हेच अवयवांना साजे असे रूप दिले व आता तें सर्व जसे उभेच झालें : तेथे पूज्य भावना ही सगुणतेची तीच अलंकारांनीं, पुष्पाजलीनें, गंधपरिमळादि द्रव्यांनीं सुशोभित केली : तेथें भाव हा सर्व विश्वाचा झाला देवच विश्व व्यापून आहे असा भासला–पाहिला : आता त नैवेद्यसमर्पण हेहि पण उपचारात्मक असल्याने, तेथें तो नैवेद्यहि समर्पण करणे हे जसे ह्या देहासच एका पोषणाच्या क्रियेस भावदेवतेनें अंगबळ देऊन केले : असे तेथे अनेक जे उपचार ते आपणामधूनच देऊं केलेले होत : तेंथे आपलेंपण हेंच गोडीचे होतें–प्रेमाचें होते–तेथें सुरसत्व हें अनेक उपचारांनीं देवत्वास पाहूं केलें असे होय

म्हणून ह्या उपचारासंबंधीं बोलणे हे महत् घनतरतेचे असें आंगणच एक, तेथे एकच उपमा त्यांनीं पुढें केली- ती म्हणजे काय ज्यानें जीवित तृणवत् मानून प्रकाशास पाहूं केलें तो कुठे व तो जो ह्या यज्ञदानतपादि हुटहुटीचा झालेला जो तो कुठे ? कुठे काय ह्यास मेळ हा बसणारा ? हे परस्पर विरुद्ध असेच होत एक तर सर्व डोळाच झाला व दुसरा तर तेथे डोळा म्हणजे कशास म्हणावें तें नच समजणारा : असें ते अंतर काय कुठें एखादी आणीके दुसरी अशी उपमा–कोटी नाहींच ! नाहीं–केव्हांहि नाहीं !

म्हणून ह्या उपचाराच्या ज्या आती त्या सांगितल्या : त्या जेथील तेथें बसल्या म्हणजे विशेषतेनें शोभूं लागतात : नेमकीच नेमके ठायीं असावी, तरच तेथे सर्व शास्त्र हें दोषमुक्ततेचें असे एक मीच तें : तेथें मुक्ततेचा वळसा हा मनास चेव देणारा असा असून, तेथें दिव्यच एक आचरलें : आनंदच उत्साहास आला व सर्व औपचारिकतेचें रहस्य हेंच परम उपचारात्मक होऊन त्यानें मीच आकळलों येलेला होणारा असेंच केव्हांहि ! ! (३६८)

येथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेंपण मिरवी तेंचि उणें ।
आम्ही जालों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नोहे ॥ ३६९ ॥
अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपें हन हुटहुटी ।
तें तृणा येकासाठीं । न सरे येथें ॥ ३७० ॥
पाहे पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदांपासूनि आहे आगळें ।
कां शेषाहूनि तोंडागळें । बोलिकें आथी ॥ ३७१ ॥
तोहि आंथरुणातळीं दडे । वेदु नेति नेति म्हणोनि बहुडे ।
तेथ सनकादिक वेडे । पिसे जाले ॥ ३७२ ॥
करितां तापसांची कडसणी । कवणु अवळा ठेविजैल शूलपाणी ।
तोहि अभिमान सांडूनि पायवणी । माथा वाहे ॥ ३७३ ॥
ना तरी आथिलेपणें सरिसी । कवण आहे लक्ष्मीऐसी ।
श्रियेसारखिया दासी । घरीं जियेतें ॥ ३७४ ॥
तियां खेळतां घरकुलीं केलीं । तया नांव अमरपुरी ठेविली ।
तरी न होतीं काय बाहुलीं । इंद्रादिक तियेचीं ॥ ३७५ ॥

(३६९) जाणीव करी=ज्ञानगर्व धरील. आथिलेंपण ......उणें = कृतार्थपण, मोठेपणा मिरविणें हेंच गौणत्व. जालों – जाहलो = पूर्णता पावलो. कांहींचि नोहे – कहींचि नव्हे. (३७०) यज्ञ न सरे येथें = यज्ञदानतप करणारे आम्ही असा जे डौल मारतात त्याना माझ्या स्वरुपीं तृणाइतकीहि किंमत नाहीं येथें – येथ (३७१) आहे - असे. आगळे = श्रेष्ठ तोंडागळें – तोंडाळें. बोलिके – बोली के. (३७२) तळीं – तळवटीं. शेष ज्याचें आंथरुण होतो व वेद ' नेति नेति ' म्हणून मागें सरतो ( बहुडे ). (३७३) कडसणी=विचार. ठेविजैल -ठेविजे. शूलपाणी-शूळपणी (३७४) आथिलेपणें=संपन्नतेनें. सरिसी = बरोबरीची कवण-कवणी. लक्ष्मीऐसी – लक्ष्मियेऐसी. (३७५) घरकुलीं केलीं – करितीं घरकुलीं तियेचीं – तयांचीं.

येथें जो 'जाणीव करतो'-जो म्हणतो कीं मी हे सर्व जाणत आहे, जाणता आहे, त्यास तर काहींच समजत नाहीं : अहंपणानें-आथिलेपणानें जो मिरवत असतो-आथिलेपण जो मिरवतो-तो तर स्वतःचे सर्वस्वास हारच देतो-निजरूपच एक हरवून बसतो : कृतार्थपणा जो मिरवतो-मोठेपण मिरवणे जे तेंच त्याचें गौणत्व होय व 'आम्ही पूर्णता पावलो आहो' असे जो म्हणतो, तो तर कांहींच नसतो : तो तर कांहींच नसूनहि नसतो.

ह्या निजरूपाची गोष्ट, ह्या आत्मरूपाची गोष्ट इतकी कांहीं विलक्षण आहे कीं, तेथें जो जो तें आत्म आत्म असे बोलणें करावे, तों तो तें रूपच मुळीं आकसून जातें-आळून बसतें-व मग उपासच एक काढणे : नेहमीं तें कसें असेल असें तें उपवाशी राहाणें असेच-तें काय कुणी ह्या गोष्टीस जाणणें तें जसें नेणणेंच एक जाणण्यावर धक्के देत राहून नेणणेंच वाढवीत राहातें : म्हणूनच तें मी जाणता असे म्हणणे म्हणजे केवळ नेणणेंच जे तें आणीक नेणण्याचे करणे असे होय : तो काहींच असत नाही (३६९)

'यज्ञ, दान, तप करणारे आम्ही' असा जें डौल मारतात, गर्व वाहातात, त्याना माझ्या स्वरुपीं तृणाइतकीहि किंमत नाहीं.

सारखी हुटहुटच लाविली, डौलच मिरविणें एक : व्यर्थताच एक बडबड करूं लागली : काय ह्या विश्वानें घेतलेला जो कांहीं ह्या चित्तानें आक्रमिलेला असा खटाटोप, तेथे यज्ञ-ज्ञान-तप-इ. नीं

हे अर्जुना, एक चित्तच नुसता सूर्यच-भडक असा-तेथें डोळेच नाहींत-तेथें नुसता अग्निच ! तो काय जसा एक तृणच मागणारा असा, तेथें त्यास ती काडी-तृणकाडी-न सापडल्यानें, तेथें मग तें चित्ताचें भडक असे केव्हांहि संपणारें नव्हेच !

तेथें यज्ञ-दान-तप-'यज्ञो दान तपश्चैव पावनानि मनीषिणाम्'-असें जे पावन ते तर तेथें कसें पाहाणें करीत असत बसलेलें अंग : तेथें चित्तच जाग्यावर येईना व एकसारखी डौल मिरविणारी ऐटच ! म्हणून ते काहीं जे एक 'दर्भकाडीचें' असे ते सापडल्याशिवाय ती ऐट ही संपणारी होतच नाहीं : तेथ जीवित हे तृणवत् असे जें योद्ध्याचें अंग त काय कसे येथें निपज घेऊन असतें कोण जाणे.

तेथें जीविताचा अभ्यासच नाहीं-ते जाणलेंच नाहीं-तेथें चित्तच सापडलें नाहीं व नेहमीं ह्या बोलण्याच्या अशा ह्या गोष्टीच ह्या यज्ञ दान-तपाबाबत ! काय तेथे 'जीवित हें तृणवत्' असे बोलणे ह वरील बोलण्यास काय 'बरोबरीचें आहे' असे म्हणावें ! वरील बोलण्यानें तोललें जाणारें असें !! एका तृणाचीहि ज्यासच किंमत माझ्या स्वरुपीं येणानें होणारी ! 'जीवित तृणवत' हें जसे सर्व प्रकाराचें एक, तेथे वर सांगितलेले जे डोळेच मुळीं नाहींत असें-जीवित हें प्रकाशलें नाहींच असें-काय हीं दोन्ही बोलणीं कधीं एकमेकांस पाहाणारीं अशीं ! महद्‌तराचीं अशीं ! (३७०)

ही जाणीव जी आहे, तेथें केवढें बळ ह्या वेदानीं वागवून असण्याचें आहे बरें ? वेदापेक्षा दुसरें श्रेष्ठ असे नाहींच जे ती जाणीव ही जाणून आहे : अहो, हजार तोंडानीं बोलणारा जो शेष त्यापेक्षा आणखी एखादे दुसरें अधिक तोंडाळ असणेंच नाहीं . परतु येथे तो शेषहि पण अंथरुणाच्या तळीं दडून बसला तो अथरुण झाला : व वेद जो तो किती तरी जाणणें करून करून दमला, व शेवटीं 'नेति नेति' असे म्हणूं लागून त्यानें आपलें बोलणें पुढे कांहीं काय करणेंच नाहीं असें म्हणूं लागला : व असें झाल्यानें तथे तो मागे सरला (बहुडे) : असे जे माझें स्वरूप ते काय जाणण्याचें असे नव्हेच ! तेथें सनकादिक जे तेहि पण वेडेपिसे असेच होऊन गेले-शुद्ध वेडेच असे व आपले पिसेंच त्या स्वरुपानें लावून ठेविलेले असेच ते झालेले आहेत (३७१-३७२)

अहो, तपःसामर्थ्याचा विचार केला असतां काय तो तपोनाथ जो शूलपाणी तोहि पण सर्वांहूनहि श्रेष्ठ असा-तो काय कुणाचा बरोबरीचा असा नसून, तो सर्व श्रेष्ठ जरी तरी सुद्धा त्यानें ह्या 'माझ्या' पायवणीसच माथा वाहाण्याचें केलें : तपच एक शुद्ध किंवा किडाळ हेंच जर पाहू केले-हेंच जर पाहूं करूं असे म्हणून जर कोणी त्या तपःसामर्थ्याची तुलना, बरोबरी अथवा शुद्ध भेसळ असे जें म्हणणे कदाचित् होणारे, त्यानें तो जो शुद्ध असा असलेला शूलपाणी महादेव त्यानेहि ते तपःसामर्थ्याचें अभिमानानें असणें हे सोडून देऊन, एक पायाचें तीर्थच मस्तकीं धारण केले

अपरंपारपण-अपार अशीं अंतरे ( अपारांतरें ) : तपामुळें ऐश्वर्य पाहिलें आणि म्हणूनच त उमपण हें नाहींसे झालें : म्हणून तपसाधनाकरिता काय राहिलें तर ते म्हणजे 'अपारांतरें'-अशीं दूर राहिलेलीं अंतरेंच होत.

'तापसांची कडसणी'-तापस-जो तापांना त्रितापाना 'स' म्हणजे जन्म देणारा-ज्याच्यापासून त्रितापाची धग लागते असा-संत, संताप, संतापासी, संतापाचा, संताप, सन्निपात-असेच तेथीलची ठेवण ही कधी पाहविली जाणारी-तेथें काय संकल्पसन्नितापाचें लक्षणच एक जसे पुढे चालत असणारें; म्हणून येथे पायां पडणें हेंच भाग्य देणारें !! तरच सोडवणूक ह्या संकल्पापासून !! (३७३)

अहो, संपन्नतेने लक्ष्मीच्या बरोबरीची अशी दुसरी कोणीच नाहीं ! सिद्धीसारख्या दासी लक्ष्मीच्या घरीं असणाऱ्या होत. (३७४)

त्या सिद्धी ज्या, त्या 'श्री'च ज्या, त्यांच्या खेळण्यामध्यें-मुलींचा खेळच जसा एक घरकुल करणारा-तेथें घरकुली करूनच मुली ह्या खेळणाऱ्या : सर्व माझेंपण- माझें सर्व जें कांहीं तें-घरच एक होय असे जे विचार-तेथे ह्या विचारांनीं घरकुलेंच केलीं : त्यांना तीं अमरपुरें होत असें जरी म्हणूं केलें, तरी काय त्या घरांत वावरणारीं जीं इंद्रासारखीं महत्त्वे हीं तेथीलचीं खेळणीं नव्हत ? बाहुलींच तीं तो खेळ खेळणारीं-अशीं जीं इंद्रपदें तीं ह्या दासींचें एक बाहुलाबाहुली खेळणेंच होय. (३७५)

ते नावडोनि जेव्हां मोडिती । तेव्हां महेन्द्रांचे रंक होती ।
तियां झाडां जेऊतें पाहाती । ते कल्पवृक्ष ॥ ३७६ ॥
ऐसी जियेचिया जवळिका । सामर्थ्यघरीं चिया पाईका ।
ते लक्ष्मी मुख्य नायिका । न मनेचि येथें ॥ ३७७ ॥
मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमान सांडूनि पांडवा ।
तें पाय धुवावयाचिया दैवा । पात्र जाली ॥ ३७८ ॥
म्हणौनि थोरपण पऱ्हां सांडिजे । व्युत्पत्ति अवघीचि विसरिजे ।
जैं जगाधाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥ ३७९ ॥
अगा सहस्रकिरणाचिये दिठी । पुढां चंद्रहि लोपे किरीटी ।
तेथ खद्योत कां हुटहुटी । आपुलेनि तेजें ॥ ३८० ॥
तैसें लक्ष्मीयेचें थोरपण न सरे । येथ शंभूचेंहि तप नुपुरे ।
तेथ प्राकृत हेंदरें । केवीं जाणों लाहे ॥३८१ ॥
यालागीं शरीरसांडोवा कीजे । सकळ गुणांचें लोण उतरिजे ।
संपत्तिमद सांडिजे । कुरवंडी करूनि ॥ ३८२ ॥

(३७६) ते - तिया. झाडा - झाडाकडे. (३७९) पऱ्हा = पलीकडे, दूर अवघीचि=आघवी, अवघी. जवळीक = सन्निधता. (३८०) सहस्रकिरणाचिये दिठी = सुर्याच्या दृष्टीपुढे. हुटहुटी = गर्व वाहावा. (३८१) नुपुरे - न पुरे. हेंदरें = क्षुद्र, वेडसर. (३८२) शरीरसाडोवा = देहाभिमानाचा त्याग.

त्या दासींचीं हीं इंद्रपदें हीं बाहुलींच नव्हत काय ? तीं जीं बाहुलीं हीं जेव्हां नावडणारीं होतात, तेव्हा तीं मोडलीं गेल्यानें तेथें आता ते महेन्द्र हे रंकच झाले, व त्या दासींनीं ज्या ज्या म्हणून , झाडाकडे ' पाहूं आदरिलें, ते कल्पवृक्ष असेच होऊन बसले. (३७६)

असे सामर्थ्य जिच्या घरीं असणाऱ्या सेविकेस अशी ती मुख्य नायिका जी लक्ष्मी तीसुद्धा येथे मानेंच घेते-तीसुद्धा येथें मानिली जात नाहीं-गणनेस येत नाहीं. (३७७)

या कारणास्तव आपलें सर्वस्व तिनें अर्पण करूनच निरभिमानें सेवाच एक स्वर्गतुल्य असें म्हणूं करून, तिनें जे महत् असे दैवाचें एक तें काय तिनें पत्करिलें व ' पाय धुवावयाचे असे ' दैवाची ती झाली-पाय धुवावे हेंच बरें व तें सदैवतेचें असे एक दैवच नित्यतेचें तेंच तिनें घेतलें. (३७८)

म्हणून थोरपण हें जरासें दूर ठेवावें-व्युत्पत्ति (पाण्डित्य) ही अवघी विसरावी व जगाहूनहि लहान होऊन, सर्वत्र नम्रता पत्करून जेव्हां असावें, तेव्हांच माझें जवळचें असें होणें होतें : मी तेथें जवळच सांपडणारा होतो-असतो : तेथें माझी सन्निधता ही नित्य सान्निध्याची अशी असते-अशी होय. (३७९)

अहो, सहस्रकर जो सूर्य त्याच्या दृष्टीपुढें चंद्र हा तर कोठेंच लपून जातो : तेथें खद्योत जो त्यानें आपल्या तेजाचा व्यर्थ गर्व करावा ? तेथें तें तेज असें म्हणूं करणारें कोणीच नसून ती एक व्यर्थ अशी हुटहुटच. (३८०)

म्हणून जेथें लक्ष्मीचें थोरपण हें कांहीं बरोबरी घेतच नाहीं-थोरपणाच्या बरोबरीनें थोरपण वागवावें असे तें थोरपण होतच नाहीं : त्याचप्रमाणें श्रीशंभु जो महादेव त्याचें तपहि पण-कर्मकाठी हातीं घेऊन थोर असें निर्कोपप्रकृतीचें जें-ती गायच मुळीं त्या पांचांमध्यें वळवून तेथें तेज कसें पुञ्जाळलेलें असे, तेथें वेणुनादध्वनिच ऐकण्यास येऊं केला असे तें तप तें काय येथें पुरतें होणारें आहे असें ? व असे असतांनाहि त्या प्राकृतिकानें जें आपलेंच क्षुद्रतेचें असें वेडसर असेंच जें लेणें तें घेऊन असणें तें प्राकृत काय येथे जाणण्याचें कांहीं करील ? त्यानें तेथीलचा भार-ज्ञानभार-हा जाणण्याचें हें केव्हांहि नच होणारें होय. (३८१)

म्हणून, अरे बाबा, येथें देहाभिमानाचा त्याग कर-गुणसंपन्नता जी आहे, तीवरून ओवाळून जा-संपत्तीचा अभिमान हा सांडून टाक-वाहूं नको : तेथें काया ही कुरवंडी करून सांडिली असें कर; तरच तें निरभिमानत्वेकरूनच एक स्वरूप तें पाहाण्याचें होईल (३८२)

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

प्रयच्छति = दान देतो. भक्ति + उपहृतम् = भक्तीनें जवळ केलेलें, घेतलेलें, आणलेलें, भक्तीनें घेऊन अश्नाभि = मुखींच घालतों. प्रयत + आत्मनः = आत्म्याचें यत म्हणजे आयत असें एक आत्म्याप्रत आलेलें शुद्ध चित्त मनुष्याचें, पवित्र अंतःकरणाचें.

यः पत्रम् पुष्पम् फलम् तोयम् मे भक्त्या प्रयच्छति, प्रयतात्मनः भक्त्युपहृतम् तत् अहम् अश्नामि ।

पत्र, पान, फूल, फल, पाणी जो मला भक्तीनें दान करितो, तें मी भक्तीनें घेऊन, आत्माच तो जसा प्रेमाचा—असें करून ते मुखींच घालतों. तात्पर्य असे कीं, निर्मळ चित्त, निष्कलंक, शुद्ध भक्तिप्रेम पाहिजे. (२६)

**मग निस्सीम भावें उल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें ।**
**फळ येक आवडे तैसें । भलतयाचें ॥ ३८३ ॥**
**भक्त माझियाकडे दावी । आणि मी दोन्ही हात वोडवी ।**
**मग देंठ न फेडितां सेवी । आदरेंसीं ॥ ३८४ ॥**
**पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें ।**
**तें लेखें तरी म्यां तुरंबावें । परी मुखींचि घाली ॥ ३८५ ॥**
**हें असो कायसीं फुलें । पानचि येक आवडतें आलें ।**
**तें साजुकही नव्हे सुकलें । भलतैसें ॥ ३८६ ॥**
**परी सर्वभावें भरलें देखें । आणि भुकेला जैसा अमृतें तोखे ।**
**पत्रचि परी तेणें सुखें । आरोगूं लागे ॥ ३८७ ॥**
**अथवा ऐसेंहि करूं घडे । जे पालाहि परी न जोडे ।**
**तरी उदकाचें तंव सांकडें । नव्हेल कीं ॥ ३८८ ॥**

तें भलतेथें निमोलें । न जोडितां आहे जोडलें ।
तेंचि सर्वस्व करूनि अर्पिलें । जेणें मज ॥ ३८९ ॥
तेणें वैकुंठापासूनि विशाळें । मजलागीं केलीं राउळें ।
कौस्तुभाहूनि निर्मळें । लेणीं दिधलीं ॥ ३९० ॥

(३८३) निस्सीम भाव-भावे उल्हासें = उत्कट भक्तीच्या उल्हासाने. आवडे तैसे = हवे तें भलतयाचें – भलतयाचें हो (३८४) फेडितां = तोडतां. वोडवी = पुढें करतों (३८५) लेखें = वास्तविक पाहातां तुरंबावे = हुंगावे. (३८६) नव्हे – न हो. (३८७) आरोगूं लागे = खाऊं लागतो. (३८८) करूं – एक साकडें = संकट. (३८९) निमोलें = मोलावाचून

मग निःसीम म्हणजे उत्कट भक्तीच्या उल्हासानें-मजलाच अर्पण करावयाचे असा एक उल्हासच येऊन (आलेला) हवें तें एक फळच सेवितों :

तें मजकडेस दाखवून-दाखवूं केल्याने-मी दोन्ही हात पुढे करतो व मग त्याचा देठसुद्धा न काढता तसेच पण आदरानें सेवन करतों : एक, कसलेंहि एक हवे (आवडे) ते फळ भक्तीचा उल्हास घेऊन मजला 'अर्पण असावें!' असे म्हणून मजला दाखवूं केल्यानें, मी दोन्ही हात पुढे करुन तें अतिआदराने-त्याचा देठहि पण न काढतां-सेवन करितों : हें काय (भक्ति) भावाने असेच एक उल्हसित अंत करणाचें जें येणे तें मी ग्रहण करून असतों, ग्रहण करतो : काय येथे भावमहिमा कसा आदरास आणिलेला आहे-आदरानें ग्रहण केला आहे-असाच तो होय : म्हणून भाव हा आदराचा असाच. (३८३, ३८४)

तसेच, अगा हे अर्जुना, भक्तीच्या नांवानें मजला एक फूल हें देण्याचें करावे : तें फूल वास्तविक पाहता म्या हुंगावे किंवा मस्तकीं खोवावें, परंतु तें तसे न करिता मी तें मुखामध्येच घालतों-ग्रहण करतों-सेवन करतों (३८५)

हें असो; परंतु फुलाचेंच तेवढे एक काय तें घेऊन बसलास! पानहि एक जर मजला आवडत झालें-तें साजुक असेहि नसो-किंवा सुकलेले असेहि असो-असे तें भलतसे जरी असलें : (३८६)

परंतु खरें पाहिलें असतां तें पान जर पाहूं केले, तर ते कसे असतें म्हणशील, तर तें म्हणजे सर्व भावानें तुडुंबतेचें भरलेलें असेच असल्यानें-ज्याप्रमाणें एखादा उपाशी भुकेला प्राणी जसा अमृतानें संतोषित होतो, तृप्त होतो-तसा मी जरी तें एक पान तरी पण त्या पानाच्या खाण्याच्या सुखानें-तें पत्र जे दान केलें त्या पत्राच्या दानानें-मी सुख पाहणारा होऊन तें पान मी खाऊं लागतो.

जसा कांहीं एक सुखाचा आस्वाद हा अमृत पिण्यानें सर्व देहभर रसरसून जातो-घालेंपण हें अंगोअंगीं समरसून जातें-तसे येथे त्या एका पानानें मी तृप्त कसा जाहलों म्हणशील, तर जसें का एकाद्या बहुत दिवस आरोगण न केलेल्या मारुतीस अथवा गणपतीस एक माजणेच केलें : सर्व देहभर त्याचा तो आस्वाद हा पसरून गेल्यामुळे मी कसा आतां दिसूं लागलो, तर तें जसे एखादे देवतेचे माजणेंच केले, माखणें झालें असें होय. (३८७)

परंतु असेंहि कधीं होतें की,-असेंहि कधीं काळीं जर झालें कीं, पाला हा सांपडतच नाहीं, तर मग येथें निदान पाण्याचें (पाणी देण्याचें) तरी काय (कोणास) संकट असें असणारें असें नव्हेच : पाणी मिळण्याचें किंवा मिळवावयास काय कांहीं एक संकट स्वतःवर ओढून घ्यावें लागणारें असे नाहीं-व तसें राहावें तें कां-कारण पाणी हें तर केव्हांहि मिळणारें असतेंच : म्हणून तसें तें पाणी तरी निदान

मजला घालण्याचें करावेंच-देण्याचें करावें! 'पाला' जरी न जोडला गेला, असेहि जरी घडलें, तरी काय तें पाण्याचें तरी संकट नसणार ना ? (पाला = रूप : छंद)

सर्वस्व=मोलावांचूनहि मिळणारें असें सहज किंवा फुकटचें जें मिळणारें असे पाणी तें : तेथें द्रौपदीनें पत्र, गजेंद्रानें पुष्प, शबरीनें फळ व बळीनें तोय दिलें, तसली भक्ति हवीच हवी : उदक हें भलत्याहि ठिकाणीं सहज मिळणारें असल्यानें, तें न जोडितांहि जोडलें जाणारे असें व तेंच 'सर्वस्व' करून मजला अर्पिलें. (३८८)

आपण भलते ठायीं असलों तरी काहीं मोल दिल्याशिवायच तें मिळूं शकत : तेथें तें पाणी हें तर सहजतेची एक किंमतच घेऊन असलेलें-तें आता फिरून किंमत देऊन जोडण्याचें करायचें असें नव्हे. म्हणून ज्यानें तें पाणीच मुळीं आपलें **सर्वसर्वस्व** आहे-सर्वस्वाचें करून जर मजला अर्पण केलें : (३८९)

(तरी येथे काय बहु बोलणें करूं घरें कीं) त्यानें मजकरिता वैकुंठापेक्षाहि विशाळ अशीं (देवांचीं राहण्याचीं जीं देऊळे त्यांचीं) आवारेंच बाधलीं-आवारेंच करून ठेविलीं-व कौस्तुभापेक्षाहि विशेष निर्मळ अशीं लेणीं लेवविलीं : तेथें देव, आत्मा, देऊळ, राऊळ, सगुण, श्रीमंत, सौभाग्यलक्षणाचें त्यानें मजला केलें असे म्हटल्यास तें बोलणे विशेष असे नाहींच असे होणारें-असे असणारें. (३९०)

**दुधाचीं सेजारें। क्षीराब्धिऐसीं मनोहरें।**
**मजलागीं अपारें। सृजिलीं तेणें ॥ ३९१ ॥**
**कर्पूर चंदन आगरु। ऐसिया सुगंधाचा महामेरु।**
**मज हातीं लाविला दिनकरु। दीपमाळे ॥ ३९२ ॥**
**गरुडासारखीं वाहनें। सुरतरूचीं उद्यानें।**
**कामधेनूचीं गोधनें। अर्पिलीं तेणें ॥ ३९३ ॥**
**मज अमृताहूनि सुरसें। बोनीं वोगरिलीं बहुवसें।**
**ऐसा भक्ताचेनि उदकलेशें। परितोषे गा ॥ ३९४ ॥**
**हें सांगावें काय किरीटी। तुम्हींचि देखिलें आपुलिया दिठी।**
**मी सुदामायाचिया सोडी गांठी। पव्हयालागीं ॥ ३९५ ॥**
**पैं गा भक्ति येकी मी जाणे। तेथ सानें थोर न म्हणे।**
**आम्ही भावाचे पाहुणे। भलतेया ॥ ३९६ ॥**
**येर पत्र पुष्प फळ। तें भजावया मिस केवळ।**
**वांचूनि आमुचा लाग निष्कळ। भक्तितत्त्वा ॥ ३९७ ॥**
**म्हणोनि अर्जुना अवधारीं। तूं बुद्धि येक सोपारी करीं।**
**तरी सहजे आपुलिया मनोमंदिरीं। न विसंबे मातें ॥ ३९८ ॥**

(३९१) शेजारें=शेजघरें (३९२) हातीं-हातिवा = काडवात. दीपमाळे=त्यानें कापूरचंदनादि सुगंधाच्या मेरुतुल्यराशी मला वाहिल्यासारखें आहे. दीपमाळेवर सूर्याची काडवात लावल्यासारखें आहे (३९४) बोनीं वोगरिलीं बहुवसें = पुष्कळशीं पक्वान्नें वाढलीं. (३९५) तुम्हींचि – तुवांचि. लागीं – साठीं (३९७) मिस = निमित्त. आमुचा लाग – आमुचिया लागीं = वास्तविक आम्हांला पूर्ण भक्तिच पाहिजे. *भक्तितत्त्वा – भक्तितत्त्व* (३९८) सोपारी = सोपी, स्वाधीन.

'दूध ठेवण्याच्या जागा-जशीं दुग्धाचीं सेजारें-सेजबाजच त्या दुग्धाच्या जागा-मजकरितां त्यानें करून ठेविल्या-क्षीराब्धीसारख्या, क्षीरसमुद्रासारख्या मनोरम्यतेचीं सौंदर्येंच त्यानें निर्माण केलीं. (३९१)

कापूर, चंदन, अगरू, इ. चा जो सुगंध त्या सुगंधाचा एक महामेरुच मजला वाहिल्यासारखें आहे : त्यानें कापूरचंदनादि सुगंधाच्या मेरुतुल्य राशीच मजला वाहिल्यासारखें आहे : दीपमाळेवर सूर्याची काडवात लाविल्यासारखे आहे

कापूर घेतला तर तेथें 'सुवास, शुभ्र, दीप्ति,'-म्हणून तेथें दीप्तिच एक त्या शुभ्रतेस तसेच सुवासास घेऊन आहे-तेथे जसा कांहीं ह्या दीप्तीमुळें तो जठराग्नि हाच सर्व तप झाला व त्यानें ह्या देहधारीपणाचें लोणच उतरलें : तेथें काय आतां एक देहीचें जसें तेज-दीप्तीचें एक जे दिव्य-तेंच पुढे झाल्यानें, तेथें हें जन्मजन्मून मरणें, पचणें इ जें तेंच संपुष्टांत आणलें गेलें : व आता तेथें काहीं एक ह्या जात विवरण्याचें जें काहीं संभाळ करणें तेंच कसे काय जें सर्व दीप्तीचें एक हें विश्व : तेथे एक महामेरुच-प्रदक्षिणाच एक ह्या देहास केलेली-तेथे हा सूर्य हाच आपला-हाताचा-हातींचा-असाच झाला-आपल्या हातचा असाच एक ह्या हातच्या काडवातीनें करून ठेवला : तेथें आता ही देहदीपमाळाच जशी ह्या हातच्या काडवातीनें सूर्यासच पाहूं करणारी-अथवा सूर्यासारखे असे तें ज्ञानानें (सूर्यासारखें) होणें हें दिलेलें : तेथें जसे कापुरानें केलें, तसेच चंदनानेंहि, त्याचप्रमाणे आगरूनेंहि पण, काळया चंदनानेंहि पण (३९२)

ज्ञान हें सडोळस झाल्याने आतां त्यास गरुडासारखीं वाहानेंच मिळालीं : नंदनवनाप्रमाणें बागा विहरण्यास मिळाल्या : कामधेनूसारख्या त्वरित अर्थ पुरविणाऱ्या अशा धेनूच मजला अर्पण केल्या (३९३)

अमृतापेक्षाहि सरसतेचीं अशीं उत्तम रसपाकानें सिद्ध असलेलीं अनेक पक्वान्नें मजला जेवणास वाढलीं : असा मी भक्ताच्या सर्वसर्वस्व हेंच कोणी एक उदक देण्यानें परितोषतोंच तोषानें संतोषाचा होतों-संतोषास पाहून पुन्हा पुन्हां त्या तुष्टीप्रत येणारा होतों. (३९४)

हें एकएक किती सांगावें ! तुवां तर प्रत्यक्ष आपल्या दृष्टीनें पाहिले आहेसच कीं, मी सुदाम्याच्या पोह्याकरितां-त्यानें नीट अगदीं जीव कीं प्राण असे करून ठेविलेले जे पोहे ते घेण्याकरितां-त्या फाटक्या तुटक्या वस्त्रामध्यें गाठीवर गांठी देऊन जपजपून ठेविलेले जे त्याचे पोहे ते खाण्याकरितां-मी किती उत्सुक होतों : मी त्याच्या गांठी सोडून ते प्रेमाचे पोहे खाल्ले : हें तूं प्रत्यक्ष आपल्या दृष्टीनें पाहिलें आहेसच. (३९५)

परंतु येथें एकच जे जाणणें तेंच बरें कीं, एक भक्ति हीच मी जाणतों, तेथें थोरपण किंवा सानपण हें पाहातच नाहीं. आम्ही म्हणजे भलत्यांतहि भाव जर असला, तर आम्ही तेथें पाहुणे म्हणून जेवण्यास जाणारच जाणार : भलताहि जरी असला, तरी जेथें पाहुणेर हा भावच एक आम्हास दिला-तेथें आम्ही पाहुणे जाणारच-पाहुणेच आम्ही होणारे (मी मोर तूं मोरिन हें कसे ? पावन सुमन उपाय.)

भलत्यानेंहि, आम्ही असावें तेथें, भाव हाच पाहुणेर आम्हांस केल्यानें, तेथें भाव हाच एक असे आम्हीच.

आतां पान, फूल किंवा फळ हें म्हणजे भक्तीनेंच भक्तीच्या भजनीं लागावें-भावानें आपल्या भजनीं लावावें-असें एक मिसच केवळ होय : हा भाव जर नाहीं, तर आम्ही जें भक्तितत्त्वानें असणें

तें आमचे असणें हें सांपडणारें केवळ नाही ः आम्हांविण आमचा लागाबांधा हा सांपडणारा होईल असें म्हणून तसा जर कोणीं यत्न केला, तर तो त्याचा प्रयत्न हा भक्तितत्त्वाशिवाय निष्फळ होणारा होतो

हेंच भक्तितत्त्व आहे ः तें पुन्हा सागणमाचें म्हणजे भावानेंच आम्ही पाहुणेर केलों मेलों असे मळल्यासहि सांपडणारें होतों ः तेथें पावनत्व हेंच पुढें होऊन आलेलें असतें ः म्हणून येथें 'भावा'शिवाय 'आम्ही' होण्याचें जर एकाद्यानें मनास आणलें तर-तेथें आमचें जें भक्तितत्त्व आहे तेंच तें एक निष्पन्नतेचें असें तेथें असल्यानें-तेथें तें तत्त्व भावाशिवाय सांपडतच नाही.

' वांचूनि आमुचियालागीं निष्फळ भक्तितत्त्व.'

वास्तविक पाहाता आम्हाला पूर्ण भक्तिच पाहिजे-भक्तितत्त्वावाचून आमच्या लागी येणें हें शक्यच नाहीं-आमचा लाग हा पूर्ण भक्तीनेंच सापडणारा होतो . म्हणून एक पूर्ण भक्तीच तेथें पाहिजेच असते ः आमच्या उपयोगीं येणारें फक्त एक निखळ भक्तितत्त्वच आहे-आमचा लागाबांधा सांपडणें हें फक्त एक निखळ भक्तितत्त्वानेंच-त्या भक्तितत्त्वाशिवाय आम्ही केव्हाहि सापडणारे नव्हतच ! !

एखादे पटावर म्हणजे वस्त्रावर हत्ती, घोडे, हरिण, सिंह, इ. चित्रें काढलीं, तर तो पट असा चित्रविचित्र रंगाचा दिसतो, त्याप्रमाणें परस्परांत मेळ नसलेल्या पंचमहाभूतांचें हें शरीररूपी गुजराथ्या-सारखें लुगडे आहे ः त्या शरीररूपी लुगडयाचा पालव म्हणजे धागा धरून मी श्रीकृष्णाकडे मिरवीत जाईन आणि त्याचे ठिकाणीं असलेल्या भक्तिरूप शेल्याचा पदर धरून राहीन ः रखुमादेवीवर बाप जो सांवळा श्रीविठ्ठल त्यानें मला ही विचित्र रंगाची शरीररूपी पैठणी दिली आहे, असे श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात (ज्ञा गा ७७२) (३९७)

म्हणून, हे अर्जुना, एक-अवधानतेनें धारण करून ऐस कीं, तूं आपली बुद्धि ही - शुद्ध बुद्धीचा एक सोपान लाविला आहे अशी कर - त्या करण्यानें तुझ्या मनोमंदिरामध्यें-मनोदेवतेमध्यें-असणारा जो मी त्यास क्षणभरहि विसंबण्याचें करूं नको. मनोमदिरामध्यें मजला स्मरून अस ः मजला विसरूं नको. बुद्धि हीच एक शुद्धतेची-ज्ञानचर्येची-ज्ञानकलेची-अशी केल्यानें (स्वर्गसोपान पद्धति घेऊन आहे करितां) सहजपणेंहि पण मी मजला मनानें आठवत असणारा. (३९८)

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

| | |
|---|---|
| करोषि<br>अश्नासि<br>जुहोषि<br>ददासि<br>तपस्यसि | करणें, खाणें, यज्ञ करणें, देणें, तपणें हें सर्व मजला अर्पण करीत जा. |

कौन्तेय, यत् करोषि, यत् अश्नासि, यत् जुहोषि, यत् ददासि, यत् तपस्यसि, तत् मदर्पणं कुरुष्व ।

जें कांहीं करतोस, जें कांहीं खातोस, जे कांहीं यज्ञानें यज्ञ करतोस, जें कांहीं देतोस, जें कांहीं तपतोस, तें सर्व मजला, हे कौन्तेय, अर्पण कर. (२७)

जे जे कांहीं व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी ।
अथवा यज्ञीं यजिसी । नानाविधीं ॥ ३९९ ॥
ना तरी पात्रविशेषें दानें । कां सेविकां देसी जीवनें ।
तपादि साधनें । व्रतें करिसी ॥ ४०० ॥
तें क्रियाजात आघवें । जें जैसें निफजेल स्वभावें ।
तें भावना करोनि करावें । माझिया मोहरा ॥ ४०१ ॥
परी सर्वथा आपुलिया जीवीं । केलियाची से नुरवावी ।
ऐसीं धुऊनि कर्में द्यावीं । माझिया हातीं ॥ ४०२ ॥

(४००) पात्रविशेषें – पात्रविशेषीं जीवनें = निर्वाहासाठी वेतनें. (४०१) माझिया मोहरा = मत्प्रीत्यर्थ. (४०२) से – शंका = आठवण नुरवावी – नुरवी धुऊनि – धुवोनि = अहंकारानें व कामनेनें न विटाळलेलें, निर्मळ.

जी कांहीं हालचाल (चेष्टा–व्यापार) करितोस किंवा भोग भोगितोस अथवा यज्ञामध्यें यजन जें करितोस, असे नाना प्रकारचें जे तें : (३९९)

तरी पण दानानें पात्रविशेषाचें असे–सेवकांस दिलेलीं जीं जीवनें–जीवनयात्रा चालण्याकरिता म्हणून दिलेलीं जीं भूमिदानें–जपजाप्यादि जीं साधनें अथवा व्रतें तूं करतोस, करीत असशील तीं : (४००)

तीं सर्व क्रियाजातांचीं तीं–जशीं काय स्वभावानें निपजत जातील तशीं तीं–माझी भावना करूनच करावीत अशीं आहेत–माझें मोहरेपणच पुढें घेऊन तीं करीत असावींत (४०१)

परंतु कांहीं कर्म केलें आहे अशी आठवणच मुळीं न राहूं देऊन मजलाच तीं अर्पण करावीं, माझे हातीं तीं कर्में धुऊन द्यावीं : धुतलेलीं कर्मेंच माझे हातीं द्यावीं : केलेल्या कर्माची आठवण नच उरवूं द्यावी, म्हणजेच तीं जशीं आतां धुतलेलीं अशींच माझे हातीं देण्याचीं करावींत. (४०२)

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

मोक्ष्यसे = सुटका होईल विमुक्त = मुक्त होऊन उपैष्यसि = जवळ येशील, मजला मिळशील.

एवम् शुभाशुभफलैः कर्मबन्धनैः मोक्ष्यसे; संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तः माम् उपैष्यसि ।

असे केल्यानें शुभ अथवा अशुभ अशीं जीं फळें–जीं कर्मबंधनास कारण होणारीं–तींच आतां त्या कर्मापासून–बंधनापासून–सोडवणारीं झालीं असा एक संन्यास ( कर्मफलत्याग ) योग तुजला साधलेला झाल्यानें ( असल्यानें ), तूं मुक्त होऊन मजला येऊन मिळशील. (२८)

मग अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे जेवीं मुकलीं ।
तेवीं निफळतींचि मज अर्पिलीं । शुभाशुभें ॥ ४०३ ॥
अगा कर्में जें उरावें । तें तिहीं सुखदुःखीं फळावें ।
आणि तयातें भोगावया यावें । देहा येका ॥ ४०४ ॥

तें उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म ।
जन्मासवें श्रम । वरचिलहि गेले ॥ ४०५ ॥
म्हणोनि अर्जुना यापरि । पाहेचा वेळु नव्हेल भारी ।
हे संन्यासयुक्ति सोपारी । दिधली तुज ॥ ४०६ ॥
या देहाचे बांदोडीं न पडिजे । सुखदुःखाचिया सागरीं न बुडिजे ।
सुखेंचि सुखरूप जडिजे । माझियाचि आंगा ॥ ४०७ ॥

(४०३) अग्निकुडीं – अग्निकुंडें निफळतीचि – नफळतींचि (४०४) कर्मे – कर्मा (४०५) उगाणिलें = समर्पिलें वरचिलहि = पुढचे (४०६) पाहेचा = उद्याचा संन्यासयुक्ति = कर्मफळत्यागाची. सोपारी = सोपी. (४०७) देहाचे – देहाचिये बादोडीं = बंदिखान्यांत. जडिजे – घडिजे = मिळून जावें

असे करण्यानें जशीं काहीं बीजें हींच अग्निकुंडामध्यें घातलीं व त्यामुळे त्याला अंकुर येणेंच नाहीं–त्याची अंकुरदशा हीच मुरडिली गेली–त्याप्रमाणें मला अर्पण केलेलीं शुभ व अशुभ अशीं दोन्हीहि कर्में फळ देणारीं होतच नाहींत–परिणामफळाचीं होत नाहींत (४०३)

कर्म उरलें कीं, तें सुखदुःखाचे परिणामरूपानें राहतें व असे तें राहिलें म्हणजे तें भोगण्याकरिताच म्हणून ह्या देहबुद्धीवर यावेच लागतें–ह्या देहधारणेचे व्हावे लागतें–देहच घेऊन यावे लागतेंच (४०४)

ते कर्म पार झाडून मजला अर्पण केलें जेव्हा, तेव्हाच हें जन्मणें व मरणे हें पुसूनच टाकले गेले–व आता त्या जन्माबरोबरच ते वरील श्रम, वरकड इतर श्रम हेहि गेलेच; जेथें जन्मणें झालें तेथेंच ते श्रम मेले : येथें तर जन्मणेंहि नाहीं व मरणेंहि नाहीं असे तें कर्म पारचे पार झाडून टाकिलें–पुसून टाकिलें (४०५)

अशा तऱ्हेचें हे असल्यानें–काय उद्या पाहायाला येईल–किंवा मग पाहूं–त्यात काय आहे ! असें टोलवाटोलवीनें हें अनुशीलतेचे अंग जें ते वागवूं नको–तें लगेचच्या लगेच उरकून घेत जा : उद्याचा वेळ जर–पाहू उद्यां, उद्या पाहूं, पाहायला येईल उद्या असें जर म्हणत बसशील–तर तो वेळ हा काय आताचा, काय मगचा, काय उद्याचा असा भारीपणाचा जडच होउन जातो व मग काहींच पदरांत पडणें होत नाहीं : म्हणून त्वरिततेनें कर्मी लाग–अनुस्थितीनें अस–हीच ' सन्यासयुक्ति ', हिला ' ज्ञानचर्या ' म्हणतात ' ज्ञानकला ' म्हणतात : व ही तूं वागवून ऐस . ही सोपी निराळीच एक युक्ति ही तुजला दिलेली आहे, ती तूं वागवून असण्यानें अस. (४०६)

बादवडी–जसे का ह्या देहाचे जडत्वासच ऐकणें, त्याचेंच होणें, आळसाने असणें हें मनावर घेऊं नको : ह्या देहाचें कांहीं ऐकूं नको–त्याच्या फंदांत फसूं नको, आळस टाकून उभा राहा : आपलें काम पाहा–आपल्या कामास लाग : हें काम करतांना तेथें वर दिलेली जी युक्ति तिनेंच असत जा : ह्या देहाचे बुद्धीचा होऊं नको : तेथें–बंदी म्हणजे पवाडाच गाईला जाणारा ह्या देहबुद्धीचा–बंदीखानाच जसा गाणारा असून त्याचा तूं होऊं नको : त्यामुळें होणारें सागराएवढे दुःख हें असतें व त्या दुःखात कां बरे उगीच पडून जाण्याचें ! म्हणून सुखानें रूपच घडितच ऐस : सुख ' रूप ' असे जें एकरूप तेंच मजला देत जा : मजला सुखाचें अंग देऊन तेथें रूपच एक घडलेले असें करून असत जा : रूप घडीत राहा–तें एक माझ्या अंगाचें असेंच मय होण्यारें. (४०७)

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥

समोऽहम् = समसाम्य, समभाव, समपदाचा.

अहम् सर्वभूतेषु समः; न मे द्वेष्यः अस्ति न प्रियः (अस्ति), ये तु माम् भक्त्या भजन्ति ते मयि तेषु च अपि अहम् ।

मी सर्व भूतमात्राच्या ठिकाणीं वस्तुमात्रामध्ये 'सम' सारखाच असतो : मला कोणी द्वेष्य (द्वेषास्पद) आहे असे नाहीं व कोणी प्रिय आहे असेंहि नाहीं . जे मजला भक्तीनें भजतात ते मजमध्यें येतात व मीहि त्यांच्यामध्ये असतो : (मजमध्यें ते असल्याने त्याच्यामध्यें मी तर असतोंच असतो.) (२९)

तो मी पुससी तो कैसा । तरी जो सर्व भूतीं सदा सरिसा ।
जेथ आपपर ऐसा । भाग नाहीं ॥ ४०८ ॥
जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडुनि ।
जे जीवें कर्मे करूनि । भजती मातें ॥ ४०९ ॥
ते वर्ततां दिसती देहीं । परी ते देहीं ना माझियाचि ठायीं ।
आणि मी तयांच्या हृदयीं । समग्र असे ॥ ४१० ॥
सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजीं असे ।
आणि तो बीजकणु वसे । वटीं जेवीं ॥ ४११ ॥
तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेर नामाचीच अंतरें ।
वांचूनि आंतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥ ४१२ ॥
आतां आयाचें जैसें लेणें । आंगावरी आहाचवाणें ।
तैसें देह धरणें । उदास तयांचें ॥ ४१३ ॥
परिमळु निघालिया पवनापाठीं । मागां वोस फूल राहे देठीं ।
तैसें आयुष्याचिये मुठीं । केवळ देह ॥ ४१४ ॥
येर जो अवष्टंभु आघवा । तो आरूढोनि मद्भावा ।
मजचि आंतु पांडवा । पैठा आला ॥ ४१५ ॥

(४०९) कुरुठा=घरटें भजती मातें = मातें मजले (४१०) वर्ततां - वर्तत. देहीं ना - देहीं ना. (४११) वटत्व = वटवृक्ष. (४१२) आंतुवट = आंतील ब्रह्मत्वाच्या बाजूनें. (४१३) आयाचें = दुसऱ्याचे उसने आणलेले अलंकार अंगावर असले तरी त्याविषयीं आसक्ति नसते उदास - सदा (४१४) पवनापाठीं - पाठीं. मागा - मागें. (४१५) अवष्टंभ = गुणोत्कर्ष, नेट, अहंकार, दंभ. पैठा जाला-आहला = मिसळला, प्रविष्ट झाला.

तो मी कसा हें जर विचारशील, तर तो सदासर्वदा सर्व भूतमात्रीं सरिसा आहे, सारखा असतो : जेथें आपकी व पराव्याचें-आपपर असें भागाचें होणें नाहीं, नसतें : भाग हा तेथें फिटलेला असतो- तेथें माझ्याच वांटयाला ही कटकट काय आली आहे असें नशिबास दोष देणें होणारें जें तेंच नाहींसें होतें-तेंच नसतें : व त्यायोगें जें शिणणें-जें ह्या जीवितास फारच माडमेदीनें करून ठेविलें-तेंच नसतें : आपपर-माझें तुझें-आपलें परावें-असें भागबद्ध होण्यानें शिणणेंच नाहीं (४०८)

ते, मी असा आहे असें समजून, अहंभावाचा ठावच मोडून काढतात : असा अहंभावाचा ठाव मोडला म्हणजे जीवच तेथींच्चीं तीं कर्में करणारा झाल्याने, तो जीव हा नेहमीं आपल्याला आवडणारे असे प्राणापेक्षांहि प्रिय जे तेच पुढे घेऊन असतो, त्यातच रमतो-व असेच त्याचें भजन आहे-असे ते मजला भजतात : येथें बोलण्याची परी पाहावी तों एक घरच जसे ह्या जीव-अहंभावानें करून ठेविलें-जसे काहीं एक काटा मोडण्यान झालेलें कुरुप त काय वरती येणारे-तेथील कांटा आत जों रवून बसला ता त्यानें आपले घरच तेथे केलें : तो काटा पाहावा तो वर्षांनींहि जरी जाणे केलें, तरी तो काटा आपल्या कुरुपातच, वरटयातच राहाणारा असा झाल्यानें, तेथें अति विचित्र जें कुरुठपण तें ह्या अहंभावाचें रूप हें आहे-त अगदीं तोलले न गेलें ह्या उपमेनें म्हणून तें नीटसे समजेत आलें तर बरें-समजेत येणारें होतेंच होते ! ! (४०९)

देह वर्तवीत असता ते देहींच जणं आहेत असें दिसतात. परतु ते तसे देहामध्ये नसतातच-ते माझ्याच ठिकाणीं असतात-आणि मीच त्याच्या हृदयीं समग्रपणाने असतो-' समग्र ' असें ब्रह्मच (परब्रह्मच) ! (४१०)

आपल्या सर्व विस्तारासहित जसें वडानें त्या पारबीमध्ये असावे, वसावे व ती पारंबीहि पण जशी काय सर्व विस्तारच एक वटाचा अशी (बीजकणिका-पारंबी) (४११)

तसें आम्हाला व त्याजला परस्पर अतर त फक्त एक नावाचें होय : त्याचें नाव फलाणे व माझे नाव अमके असें जे अतर-ज्यास 'बाहेरचें' अंतर असें म्हटलेले-तेथें अंतर हें नसतेंच, फक्त एक नावाचेंच असें त अतर होय : परतु अंतुबट (घनवट) असणारी अशी जी वस्तु-मीतूंचा अंतच झाला-दोन्ही एकच असें जे ते घनवट असें दाटपणाचें जे वस्तु-तेथींचा विचार जर घेतला, तर मीच ते होऊन असतो . मीच त व त मीच असेंच असत. (४१२)

उसने घेतलेले असे-उसने आणलेले असें व तें परत करण्याचें आहेत असे जे अलंकार-लेणीं-दागिने-ते जसे उगीच असें, वरकरणींचें असें, वरवर पाहाता असे-वरकरणींचे जसे अंगावर दिसते-तसें हे त्याचे देहधारण उदास असेच ! तेथे ते उदासपणानेंच हा देह वागवीत असतात ! (४१३)

सुवास परिमळ हा फुलामधून निघून पवनापाठीमागे गेला, पवनानें वाहून नेला-व मागे काय राहिलें तर बोस झालेलें असेंच ते फूल देठाला लागलेले . तसें आयुष्याच्या मुठीमध्ये हा देहच एक केवळ . फक्त देहच त्या आयुष्याच्या मुठींत असतो (४१४)

एरव्हींचा जो कर्तेपणाचा अभिमान तो माझ्या भावानें वागविला जात असल्यानें-भावावर आरूढ होऊन असल्यानें-भाव तोचि देव असेच त्या कर्तेपणाच्या अभिमानाने घेतलेले असल्यानें-तो मज मध्येच, हे पाडवा, स्थिर झालेला असतो-होतो : तो तेथील त्याचा कर्तेपणा हा मजमध्येंच प्रविष्ट होऊन असतो-मजमध्येंच ठाण घेऊन असलेला असतो-कर्तेपणा हा पैठा-स्थिर भावाचा होऊन-स्थिर झाला-'ठाण' केलेला असाच झाला (४१५)

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

अपि चेत्=अगोदरचा जरी तो सुदुराचारः = आचार हा दूर झालेला तो. अनन्यभाक्=विश्वास वचनाचा सहज योगास येणारा (जरी तो अगोदरचा लांब गेलेला असा). साधुः एव = सत्पुरुषच. सः मन्तव्यः = मानावा सम्यक् व्यवसितः हि सः = व्यवस्थित असाच सर्व, उत्तम व्यवस्थित असा.

दुराचारः अपि चेत माम् अनन्यभाक् भजते सः समग् व्यवसितः सः साधुः हि एव मन्तव्यः।

जरी कदाचित् एखादा सुदुराचाराचा असलेला आता माझा अनन्यभाक् असा झाला, तर तो साधुच होय, तो साधु असाच समजावा--कारण तो ज्ञानकलेतच व्यवस्थित असतो म्हणून

पूर्वी अत्यत दुराचारी असताहि मला अनन्यभावाने भजू लागला, माझे भजन करू लागला, तर तो साधुच मानणे योग्य आहे; कारण तो चागल्या मार्गाला लागला. (३०)

**ऐसें भजतेनि भावें । जया शरीरहि पाठीं न पवे ।**
**तेणें भलतेहि व्हावें । जातीचे गा ॥ ४१६ ॥**
**आणि आचरण पाहातां सुभटा । तो दुष्कृताचा कीर सेलवांटा ।**
**परी जीवित्व वेंचलें चोहटा । भक्तीचिया कीं ॥ ४१७ ॥**
**अगा अंतींचिया मतीं । सांचपण पुढिली गती ।**
**म्हणोनि जीवित्व जेणें भक्ती । दिधलें शेखीं ॥ ४१८ ॥**
**तो आधीं जरी दुराचारी । तऱ्ही सर्वोत्तमचि अवधारी ।**
**जैसा बुडाला महापुरीं । न मरतु निघाला ॥ ४१९ ॥**
**तयाचें जीवित्व ऐलथडिये आलें । म्हणौनि बुडालेंपण वायां गेलें ।**
**तेवीं नुरेचि पाप केलें । शेवटिलिये भक्ती ॥ ४२० ॥**
**यालागीं दुष्कृति जऱ्ही जाहाला । तरी अनुतापतीर्थीं न्हाला ।**
**न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावें ॥ ४२१ ॥**
**तऱ्ही आतां पवित्र तयाचें कुळ । अभिजात्य तेंचि निर्मळ ।**
**जन्मलेयाचें फळ । तयासीचि जोडलें ॥ ४२२ ॥**
**तोचि सकळ पढिन्नला । तपें तोचि तपिन्नला ।**
**अष्टांग अभ्यासिला । योगु तेणें ॥ ४२३ ॥**
**हें बहु असो पार्था । तो उतरला कर्में सर्वथा ।**
**जयाची अखंड आस्था । मजचिलागीं ॥ ४२४ ॥**
**अघवियें मनोबुद्धीची राहाटी । भरूनि एकनिष्ठेची पेटी ।**
**जेणें मजमाजीं किरीटी । निक्षेपिली ॥ ४२५ ॥**

(४१६) भावे – प्रेमभावे पाठीं = पुन्हा भलतेहि – भलतयाहि (४१७) सेलवाटा = शेलक, उत्तम वाटा चोहटा = मार्गावर, चवाठयावर (४१८) पुढिली – पुढिले. शेखीं – शेषीं = शेवटीं पहिला दुराचार सोडून (४१९) आधीं – आधी (४२०) जीवित्व = तो वाचून अलीकडच्या काठावर आला. शेवटिलिये – शेवटलिये भक्ती = अनुताप झाल्यावर केलेल्या भक्तीनें (४२२) अभिजात्य – आभिजात्य = कुलीनपणा; अभिजन = सत्कुल (४२४) हें बहुत असो - हें असो बहुत. उतरला = सुटला (४२५) मनोबुद्धीची राहाटी = मनोबुद्धीचे सर्व व्यापार एकनिष्ठेच्या पेटींत भरून. निक्षेपिली = ठेविली

असें प्रेमभावानें भक्तीचे होणें, त्याच्या शरीरहि पाठीस लागणारे होत नाहीं-देहधर्म-शरीरधर्म त्याच्या पाठीस लागत नाहींत-त्यानें भलत्या जातीचें जरी होऊन असलें, तरी हरकत नाहीं : तेथें काय ती जाति पाहिली जाते ? नव्हे ! तेथें काय तो देहबुद्धीचा असतो ? नाहीं ! तो एक प्रेमाचा-प्रेमभावाचा असाच ! तेथें प्रेमास जाति आली, प्रेम जाति झालें : जातीचेनि वाटे प्रेम । पक्षी स्मरे राम राम ॥ तें कसें बरें ! ( जातीचिया = पदार्थजात, भूतजात, वस्तुजात, जाति, पुण्यजाति ) तेथें आतां जाति ही ' प्रेम-भाव भजन ' अशीच (४१६)

त्याचें आचरण पाहिलें असतां अगदीं (सुकृत) दुष्कृताचा शेलका वाटाच त्यानें घेतला आहे असें परंतु त्याचें जीवित हें वेचलें गेलें आहे कशामध्यें तर भक्तीमध्येंच चोहटा म्हणजे चार रस्ते जेथे फुटले आहेत असा चौकच एक-जेथें हीं घरचीं अवास्तवे हींच त्या चार रस्त्यावर येऊन पडलीं, कशाकरितां तर तेथे एक सुकाळच व्हावा तेथीलच्यांनाः असे वस्तुतः असलेलें-परतु येथें तर भक्तिच एक शाळाच ती झाल्यानें, तेथें आतां तें जीवित-तें दुष्कृताचें आचरण-हें म्हणजे एक भक्तिच झाली : दुष्कृत म्हणजे जेथें सुकृत असे जें वाचाशुद्धीकरिता केलेलें, संकृति पाहाणारें जे पठण तें जेथे नाहीं तें : म्हणजे एरव्हीचे प्राकृतच तें म्हणावयाचें ! (४१७)

'अंतीं मति तेचि गति' असे असल्यानें, तेथें आतां त्यानें भक्तिच एक आपलीशी केलेली असल्यानें, गति ही जी येणारी किंवा होणारी, त्या प्रयाणकाळाचे समयीं तीहि पण भक्तिच एक जशी आता मतीची झाल्यानें, तेथे काय ती मति ही आपला रंग हा बदल करणारी नव्हेच : अंतकाळीं जी मतिबुद्धि ही साचेपणानें येईल-तेथील बुद्धीचे ढग हे निवारून जी कांहीं एक साचेपणानें साच अशी असणारी तीच पुढील गतीचा निवाडा करणारी असल्यानें, तेथें जीवित हें भक्तीसच दिलेलें असल्यानें, तेथें शेष उरलेलें जे आयुष्य-आयुष्याच्या शेवटींची-शेखींची-जी एक आयुष्यसीमा ती भक्तीची सर्वथैव अशीच केली : तेथे काय आनंदच शेखी घेऊन एका भक्तीसच सर्व काहीं आपलें देऊन टाकणारा झाल्यानें, तेथें काय तरी एक मिरवणेंच-डोलणेंच-शोखच जसा काहीं आपला वळसा हया भक्तीसच देऊन असल्यानें, तेथे आता अंतकाळीं जी कांहीं एक बुद्धि-मति-ती काय म्हणजे अहो ! ती सर्वथैव भक्तीची अशीच केव्हाहि असणारच ! तेथें काय बोलणे हे करणें म्हणजे जसा काहीं त्यानें एक शोखच केला-शोकीच जसा एक आपले तन-मन-धन हें आपल्या शोकासच देऊन असणारा-तसा येथें तो जो ज्यानें भक्तिच एक-देवाजीसच सर्व काहीं आपलें तन-मन-धन हें अर्पण करून तेथेच त्याने आपलें ठाण हें दिले, तेव्हा येथे काय तो शौख म्हणावा ! परंतु वैचित्र्यच एक हया आरभमाराचें झाल्याने, तेथे तरी म्हणणे हेंहि पण एका श्रृंगाररसासच थटविणारा असा परम गतीचा उल्हासच भक्तीच होऊन असणारा होय : असे म्हणणे येथे पुरतं होणारे असेच ! परंतु येथे रगीला असा शद्बच मुळीं पुढे न येणारा ! यदाकदाचित् त्यानें येणे केलें तर काहीं तें पुरतें होणारे नव्हे ! तेथे डवचणेच एक पुढें येते : आता थट्टाच एक चव्हाटयावर आलेली असल्याने, तेथे सज्जनपदास ते महिमान पाहाणारे क्वचितच् : म्हणून येथे रंगेल सुरेल पर्क्षाच जसा एक हया गाण्याचा रग उचलणारा : परंतु काय कदाचित् तो गृहस्थधर्म जो आहे तो तेथीलच्या गार्हस्थ्यास पुरून उरणारा असा असेल नसेलहि : म्हणून येथे सज्जनपद हेच तेथीलची अथवा तेथची जी महत्त्वसंपदा ही आपल्या भाराने असावी अशीच !! (४१८)

तो अगोदरचा जरी दुराचारी असा दुर्वृत्तीचा जरी असला, तरी आता तें त्याचे दुर्वृत्तिपण हें जसे लाब पळालें व सुसंगतेचें सुबद्ध असेच त्याचे वागणें झाल्यानें, तेथें तो दुराचारी असे कोणीहि म्हणण्यास धजेना : जो तो त्यास सुबद्धतेचा असाच पोशाख करूं लागल्यानें, तेथें जो तो त्यास जणूं काहीं एक सुसंगतेचे असे-सज्जन असेच त्यानें असणे-हें एक जणूं त्याचेवर शिक्काच दिला जाणें किंवा त्याच्या माथ्यावर जसे का एक शिफारस पत्रच डकविलें गेलें असे झाल्यानें, तेथें सगुण अथवा सगुणत्व हेंच परिणाम करूं लागतें : तेथें सर्वोत्तमतेचें असे एक उत्तम लक्षणच हया पुरुषानें घेऊन असणें-पुरुषाचें असेच एक सर्वश्रद्धेचें अंगच तें दिसूं लागल्यानें, उत्तम लक्षणानी तें सर्व प्रकारें आपलें असे करून 'उत्तम असेच असणें' घेतल्यानें, तेथे आतां त्याचें दुराचारीपण हें काय जसे पडतया पृथ्वीच धांवून आली व तिनें त्याला सरसावून धरिलें जसे : तसा हा पडणारा हा आपला तोल सांभाळून तोंडघशी न पडतां पायावरच उभा राहिला व त्यास कोणतीहि म्हणून दुखापत ही झाली नाहीं : तेथें तोलच सांभाळल्यामुळें त्याची पूर्वजन्मींची पुण्याई उभी राहिली व

त्यास काय नवलच एक असे महिमान येऊन, ह्या मनुष्याच्या मनावर केवढा तरी परिणाम करणारे असे ईश्वरजन्य असे स्थान म्हणजे सौंदर्यभरण हे पुढे करून, ह्या मनुष्याच्या मनास अतिउत्तमत्तेचा असा ह्या स्वभावाचा धडा देऊन, तेथे अतःकरण हे दया-सहृदयतेचे जे कोमल असें अंग तेच उगवूं लागते : तेथे ह्या मायापुराने वाहविला जाणारा अथवा ह्या मायापुरात बुडणारा जो त्यास या संसारसागरामधील लाटांनींच दैवभार हाच एक जणं अलंकार घातला : व तो जो त्या पुराबाहेर फेकला गेला तो नेमकाच ह्या सज्जनसगतीमध्ये येऊन पडल्याने, तेथे मरणे हे न होता मरणेच मेले हे एक होऊन, तो आतां त्या पुरास तरूनच गेला-न मरता बाहेर निघून आला व सर्वोत्तम असे जे साधुलक्षण-जे ह्या स्वर्गास अलंकृत करणारे-तेथेच तो नेमका पोहोचला व एक भक्तीचे जसे रूप झाल्याने, तेथे अनन्यभाक् असे सहज भक्तीच एक तेथे सम्यकृतेन व्यवस्थित असा ह्या व्यवहाराचा पुतळा होऊन, तेथे मातच त्याने ह्या मनःप्रसादाच्या ज्या बाजू त्यावर केली व आतां तेथे व्यवस्थितपण, सम्यक् सहज ज्ञान, साधुलक्षण हेच ज्यास त्यास त्याजमध्ये दिसं लागल्यान, तो सर्वांस प्रिय होऊन आला. आचार हा त्याने अगोदर पाहिलेलाच नव्हता . तेथे तो दूरच लोट-लेला असाच त्याने करून ठेविलेला तो जो आचार तोच जणूं हा पाहू लागल्याने, तेथे आचार सुविचारी असाच तो झाला-त्याचे प्रत्येक काहीं कामकाज करणे हे आचारासच जण एक भूषण असे झाल्यानें, तेथे काय आचार हा प्रत्येकास जणूं आपलासा करू लागल्याने, जो तो त्याजकडे ओढ घेऊ लागला . जो तो त्यास आवडून घेऊ लागला, प्रिय करून घेऊ लागला . तेथे आता त्याचे लक्षण हैं उपजीविकेचे एक असे आपले होणे होईल असे प्रत्येक महात्म्यास वाटू लागून, प्रत्येक व्रत आचरणादि ज्या मूर्त रूपानें असणाऱ्या व्यक्ति त्याना पाहूं लागून, तेथे तोच जण ह्या सर्वांना आपले असे होऊन त्यास भूषवीतच आहे असे ते त्याचे लक्षण हे ईश्वरी कृपाच त्याजवर झाली कृपादृष्टि हीच त्याजवर वरदहस्तच जसा काहीं त्याचे मस्तकावर पडला असेच झाल्याने, तेथे तो ह्या अनेक अशा आचारशीलतेच्या महिम्याना आधारभूत झाल्याने, तो देवच एक का नव्हे बरे ? (४१९)

आत्मनिवेदन हेच तेथे पुढे झाले : तेच तो झाला तेथे भक्तीची सीमाच झाली त्याचे जीवित हे मायापुरात नच बुडता त्याने पलीकडील तीरच पाहिला व ते त्याचे ज एक होणारे बुडणे -ते बुडणें कसचे आता ! आता ते वायाच जसे गेलें नव्हे का ! तेथे केलेले जे पाप ते पाप असे नच राहता-होता-तेथे आत्मनिवेदन हेच जेथे भक्तीची परम सीग तीच तो झाला व भक्तकोटीची जी कैवल्यसीमा तीसच त्यानें अलंकारिले (४२०)

म्हणून 'दुष्कृति' असा तो जरी-त्याची कृति ही जरी त्यास दूरदूर लोटणारी अशी जरी-तरी त्या कृतीमुळेच त्यास 'अनुताप झाल्यामुळें, तेथे ती कृति ही आता-'मज-आतु आला' म्हणजे माझेमध्य येण्यानें-तनमनधनेंकरून त्याने मजमध्येच येण्यानें-मीच होण्याने-'पश्चात्तापेन शुध्यते' असे ते त्याच अनुतापाचे होणें हे तीर्थच एक त्यानें स्नानास घेतले-तेथेच स्नान झाल्याने-तो पावन होऊन आला : पोटीं अनुताप जर नच आला, तर ते एक व्यर्थतेचें जिणें होय : परंतु हा अनुताप हाच जर सर्व प्रकारेंकरून-सर्व भावाने-एकतानता पाहिलेली असा तो आता मायेचा, प्रकृतीचा असा आकळलेला असा नच होतां, त्याने पंचभूतांना पचप्राणानीं आकळून तेथे ज्योतच लाविली व ह्या जीवदशेस जणं एक ज्ञानदीप्तीचे केले-तेथे ज्ञानदिवा हाच लागल्यामुळे तो सर्व प्रकारे तोच झाला-ती सुकृतशताचे नवलाघवास आली व तीर्थरूपच झाली.

ह्या पृथ्वीतलावर अनेक कोटी तीर्थे जरी असलीं, तरी त्याना ह्या 'अनुताप'तीर्थाची सरी-बरोबरी-ही केव्हांहि होणेच नाहीं ! ! काय येथे ते तोलले जाणारे जे स्वामीसेवासंबंध ते कोठच्या कोटींत

जाऊन बसणारे बरे ! ते कोण जाणे ! येथे एक परस्परविरोधी असाच अनुक्रम ह्या जीविताचा : ह्या भूतलावर जे जे जन्मणे, जगणे, वावरणे हे एकाने तर ते स्वर्गच असे करून ठेविले, तर दुसऱ्यानें तेच जसे आता दूर करून-डोळ्याआड घेऊन-त्यास डोळ्याआड करून-त्यापासून दूरदूर जाऊन-ते जे एक गृहस्थाचे अंग (सर्व काहीं बाबतींत जसा तो ह्याच) ते आता त्या मूळाहूनहि मूळच्या स्वरूपास येण्याचे करून-स्वरूपास पाहाणे करून-तेथे ते जे वर दिलेले गृहस्थाचे कौशल्य अथवा लोक-लाघव हेंच आता मूळासच आल्याने, तेथे अनेक गोष्टी ह्या पुढे झाल्या : तेथे जे काहीं त्या ईश्वराचे दानकौशल्य-जेथे 'यावे तेव्हा घ्यावे इतुका असली उदार' हेच तत्त्व डोळ्यात झणझणित अंजन घालणारे झाल्याने, तेथे ते जे देणे-ते जे कन्यागौरव-ते जें तपस्थानाचे अंग-हें लपले ते का व येथें तो जो अक्षरभार हा काय भूमिभाराचा तसेच लोकभाराचा नव्हे काय असे विचारू लागून, तेथे उपायाचे अंग ते काय कसेहि पण पुढे येणारें होतच नाहीं . म्हणून येथे आता देवत्व जे आहे, किंवा प्रकृतीचे ते प्राकृतिक झाल्याने, तेथे आता भूताचा माराच त्यावर झाल्याने, तेथे देव-अंग हे आंत मुळींच डोकावून असेना . येथे तो तपोभार ह्या अक्षराने अटविला . योगिनींनें ते आपले स्वतःचे पटुत्व तेच लपविले : म्हणून येथ ते तपच मुळीं देवास पाहीना-देवत्वच ते घेईना : तेथे जेव्हा तेव्हा ह्या भूतांचा माराच झाल्याने, तेथे एक आकाशच जणू आत आत डोकावीत असणारे-ते कोठचा तरी प्रवास तेथे स्थिर करून असणारे असे नसल्याने, काय तेथे अनुताप, काय तीर्थ, काय सेवा, काय स्वामी हे काहींच मुळीं पुढे येऊ देणे होत नाहीं . आता तेथे एक मज्जावच ह्या योगिनींने आपले रहस्यास आणून, तेथे ह्या भूतजाताचीं-ह्या देहबुद्धीचीं-ह्या घरदारबायकापोरांचीं जीं काय खातर जमेने असणारीं अशीं विश्वासघाताचीं चिन्हे तीच आपलीं स्वतःचीं आहेत असे करून, ह्या प्राण्यास मात्र काय तपोनिधीचें, काय ते गुरु का साधक का बाधक का अनुतापाचे चिन्हच तेथे ह्या पायाळाच्या पायानीं सूर्यच मुळीं लपविल्यामुळे, एवढे तरी एक कौशल्याचे धिटाईपण सावरून धरून असणारे ते जीवित हे महत्त्वाचे असेच केव्हाहि असे म्हणत राहून, तेथ देवत्व हे काय दुसरे तिसरे किंवा दुसऱ्या तिसऱ्याचे नसून, ते आमचेच अंग स्वतःचे एक निधानच ! तेव्हा आता ह्या अनुतापाची मातब्बरीच नाहीं, आणि म्हणून तर हे तर काय एक साधणेच ह्या बुद्धीचे ते विषयलोलुप्यत्वाने एका दंडास केव्हा बरे येणे होईल असे ते विषयाचे ते काय विचित्रच एक रूप होऊन, तेथून आता काय कशी सुटका ही !

म्हणून 'अनुताप' हा काहीं महत्त्वच मुळीं घेत नाहीं-जोपर्यंत तो श्रीगुरूंनीं आपल्या महिम्याचा करून नाहीं-तो नुसता एक शब्दच मायावैचित्र्याचा महिमाच आपला रगाडा ह्या प्राकृतिकावर चढवून असल्यानें, तेथे काहींच उगवणारे होतच नाहीं

काय तेथे अक्षराचे महत्त्व ! का प्रकृतीचे मेहनतीस येणे जे ह्या व्रतोपचारानीं त्या अनुतापाजवळ येण्याचें करून असणे हे बरे असेच होय : ज्याप्रमाणे हे मन काय एकदम आवरणारे नव्हेच, तसेच येथे हे अनुतापाचे वारे हेहि पण हलके हलकेच व्रतदानादिनीं विषयाच्या आवरण्यानें-पारायणपरायणींनीं-यात्राप्रसंगानीं-अथवा एक बुद्धिच तेथे सहज गभीर जर झाली, तर ती मात्र ह्या प्राण्यास त्याचे गमावलेले ऐश्वर्य हे देणारी होतेच . तेथे मूळ म्हणजे ह्या श्रीगुरूंचे चरणीं विश्वास हाच अनेक अशा संकटातून तरून जाण्यास, तरून नेण्यास, समर्थ असा कारणीभूत असाच होतो (४२१)

असा हा अनुताप अति परिणाम करणारा असून, तोच देव की नव्हे-तो जसा देवच पुढे झाला व त्याने सर्व भावेंकरून एकतानता हीच उत्पन्न केली तेथे एकविध भक्ति हीच आली व आता तीच तो झाला-आता त्याचें सर्व काहीं पवित्र असे झाले-त्याचे कुल हे पवित्र असेच ! तो कुलवंत असाच !

जन्मतांच त्यानें आपलेबरोबर आणलेलें जें कांहीं तें अति निर्मल असेच पुण्य असून–तेथे केवढी तरी स्वच्छता, राहाणी, देखणी, बोलणी, स्वभावाची दिग्दर्शना इ. सर्व कांहीं त्यानें अति निर्मळ अशा–अति निर्लेप अशा–स्वभावाचें झाल्यानें, तेथें आता खरोखरीच हा मनुष्यजन्म आतां आपल्या यथार्थतेच्या–' धन्य धन्य हा नरदेहो ! याची अपूर्वता पहा हो ! ! ' हें म्हणणें आपल्या ' अक्षरशः खरें ' अशाच-विधानास आल्यानें, तेथे सफळ असेच ते जन्मणें–ह्या जन्मास आल्याबद्दलचें सर्व फळ त्यासच प्राप्त झालें–त्यासच मिळालें : फळ हे जोडून घेऊनच असलेला असा वृक्ष हा नेहमींच आपले लेकुरवाळेंपणच पुढें करतो, तसा हा जन्म अति प्रसन्नतेचा एक मधुर भावच अथपासून तेथें राहाटत असलेला तो काय कसाहि वर्णनास घेतला, तरी तेथीलचे अपारपणाचे सौंदर्य अथवा नेटकेंपण हें कांहीं केल्या कदाचित्‌च आपल्या इत्थंभूततेस येणारे ! ! असे ते जोडले गेलेले जन्माचें कृतकृत्यपण हें सर्व इच्छा ही तें फळ पावल्यामुळें अति प्रसन्न अशी प्रसन्न–शात ! (४२२)

असा तोच सर्व काहीं शिकलेला असा, सर्व तपें हींच त्याने आचरिलीं, तसेच तपिन्नलीं, केलीं व योगहि पण तेथीलच्या आठहि अंगाना अभ्यासात घेतलेला असाच दिसूं लागला. (४२३)

हे बहुत काय लिहिणे ! परंतु, हे अर्जुना, खरोखरीनें पाहाता तो कर्मबधातून मोकळा झाला-तो कर्मापासून सुटला–कर्में हीं जीं अतिविस्तीर्ण असा भर किंवा जडत्व घेऊन असलेलीं, तेथे मुळीं ह्या ज्ञानास पाहाणे हें होणारें नव्हेच ! अहो काय, ह्या कर्माबाबत काहीं एक दोन शद्वात तें बोलणें होणारे नव्हे ! हीं कर्में ह्यानीं जसे काहीं ह्या गंधर्वनगरावरच आपला मोर्चा उभारून तेथेंच त्यानीं आपली वस्तीच जशी केलेली . ह्या देहबुद्धीचे जडवत् मुळीं आत पाहाणेच नाहीं असे वैलक्षण्य नेहमीं 'कृतकर्म' किंवा ' पश्चात्ताप ' ह्यामधील द्वितीयास नच टेकणारे होऊन, तेथे जेव्हा तेव्हा ह्या कृतकर्माचा माराच पार ह्या देहास, मनास, जर्जर करून, तेथे ' वरच पाहाणे ' हे होत राहिल्यानें, नेहमीं कर्म हेच पाठीस लागलें आहे असेच चालणें होणारे ! तेथें ' त्राहि त्राहि ' असा जो ह्या मनाचा–चित्ताचा–देहाचा झालेला मारा हा त्या कर्मांवरच पुन्हा पुन्हा पुटे चढविणारा झाल्यानें, तेथे ' पश्चात्तापेन शुध्यति ' असे बोलणेंच पुढे होईना व त्यामुळे तेथें हीं कर्मेंच पाठीं लागलेलीं जीं किंवा त्यानींच आपलें गौरवाचें निर्बळ असे एक मजल्यावर मजले करून असल्यानें, त्या कर्मांतून खालीं उतरणे हे होईचना–त्यापासून सुटका हीच मुळीं होणारी नव्हे : परतु तेथे आतां पाहावे तों ह्या योगाचा तो झाल्याने, तेथे कर्में हींच उतरलीं–कर्मांची धुंदी ही निरसली : झणझणीत अंजन डोळ्याना पडल्याबरोबर ती जी कर्मांची निशा हीच उतरली होऊन, तेथे योगच तो आतां योगास आला–योगच तेथे उगवला व सर्व काहीं योगानुरूप असेच होऊं लागलें : तेथें आस्था ही अखंड अशी माझीच ठेविल्यानें, मीच तेथे त्यास त्या दुस्तर कर्मांपासून सोडवून तेथे अखंडैकरस असेच त्याचें ते आस्थेने वागणे हें करून ठेविलें–तो आतां योगीच एक असा झाला व सर्व कांहीं त्याचें जें करणें त एकरसाचें असे अखडधारेचें असेच मजला पाहाणें झाल्याने, आतां मीच तो नव्हे काय ! मीच तो झाला ! ! (४२४)

त्याचे मनोबुद्धीचे व्यापार हे बुद्धिच एक आपलें अपारपण घेऊन आलेली अशी झाल्यानें, आता तो एकनिष्ठ सेवकच एक ! हे किरीटी अर्जुना, त्याचे सर्व व्यापार हे एकनिष्ठेचे होऊन ते सर्व ह्या पेटीमध्येंच–हृदयकरंडयामध्येंच-भरून असलेले ते मजला अर्पणच झाले–केले : त्याचें बुद्धीचें निक्षेपण हें नेहमींच तेथें एक अंतःकरणच एकाग्रतेचें असेंच झाल्याने, त्याचे सर्व व्यापार-व्यवहार हे बुद्धीनें ह्या मनास आकर्षण करणारे असे होऊन, तेथं बोलणेंचालणे इ सर्व व्यवहार-व्यापार हे एकाग्र अंत.करणाचे झाल्यानें, आता थोडक्यांत सामावयाचें म्हणजे त्यानें ते सर्व एकनिष्ठतेच्या पेटींत भरून ती पेटी मजला वाहाणेंच केलें : मजला अर्पणच ती पेटी त्याने केली : माझे चरणींच ती पेटी त्यानें निक्षेपिली :

बुद्धीचें जेवढें म्हणून राहाटणे तें सर्व मजमध्येंच होऊं लागून, ती हृदयाचें-अंत करणाचें-एकतल्लीनतेचें-मनास आकर्षण करणारें-तल्लीन करणारे परम हृदयाचे असे दैवतच एक तेथे वागत आहे असे कीं त्याचें व्यवहारणें, बोलणे, राहाणे, राहाटणें हें एक उच्चारानें, बोलण्यानें छापच पडणारी होऊन, तेथे मीच-मजला तें सर्व त्याचें मनोबुद्धीचें करणें हे झाल्याने, माझे चरणाचा असाच तो झाला : मजमध्येच त्याचें तें व्यवहारणें असे होत असल्याने, काय तेथे दुसरे तिसरे कांहीं न बोलता असेच म्हणावे लागत आहे कीं, हा प्राण ह्यच जेथे सर्व व्यवहार करणारा तोच उच्चाराचा होऊन, तेथे सर्व लयच त्या क्रियाचा, व्यवहाराचा, व्यापाराचा मजमध्ये होऊन असलेला (४२५)

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

क्षिप्रम् = लवकरच. धर्मात्मा = पुण्यात्मा शाश्वत् = चिरतन निगच्छति = प्राप्त होतो. प्रतिजानीहि = निश्चयानें जाण. न प्रणश्यति = नाश पावत नाहीं कौंतेय = कुंतिसुता

सः क्षिप्रम् धर्मात्मा भवति, स. शाश्वत् शान्तिम् निगच्छति. कौंतेय, मे भक्तः न प्रणश्यति प्रतिजानीहि ।

हे कौंतेया, हे पक्के जाणून ऐस कीं, माझा भक्त हा केव्हाहि नाश पावत नाहीं—तो सत्वर धर्मात्मा असाच आता होऊन जातो व शाश्वत अशा शांतीला पोहोचतो

असा तो सन्मार्गी लवकरच पुण्यवान् होतो, अखड समाधान वृत्तीचा होतो, हे अर्जुना, माझा भक्त केव्हाहि नाश पावत नाही (३१)

**तो आतां अवसरें मजसारिखा होईल । ऐसा हन भाव तुज जाईल ।**
**हा गा अमृताआंतु राहील । त्यासी मरण कैचें ॥ ४२६ ॥**
**पैं सूर्य जे वेळे नुदैजे । तयाचि नांव रात्र म्हणिजे ।**
**तेवीं माझिया भक्तीविण जें कीजे । तें महापाप नोहे ॥ ४२७ ॥**
**म्हणोनि ज्याचिया चित्ता । माझी जवळिक आली पाण्डुसुता ।**
**तेव्हांचि तो तत्त्वतां । स्वरूप माझें ॥ ४२८ ॥**
**जैसा दीपें दीपु लाविजे । तेथ आधिल कोण हें नेणिजे ।**
**तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके ॥ ४२९ ॥**
**मग माझी नित्य शांती । तया ते दशा तेचि कांती ।**
**किंबहुना जीती । माझेनि जीवें ॥ ४३० ॥**
**येथ पार्था पुढत पुढती । तेंचि तें सांगों किती ।**
**जरी मियां चाड तरी भक्ति । न विसंबिजे गा ॥ ४३१ ॥**
**अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । अभिजात्य झणें श्लाघा ।**
**व्युत्पत्तीचा वाउगा । सोसु कां वाहावा ॥ ४३२ ॥**
**कां रूपवयसा माजा । आथिलेपणें कां गाजा ।**
**येक भाव नाहीं माझा । तरी अवघें पाल्हाळ तें ॥ ४३३ ॥**

(४२६) अवसरें = कांहीं काळानें. इन = कदाचित् त्यासी-तया (४२७) जे वेळे-जो वेळु. नुदैजे = उगवत नाहीं, उद्याचा करीत नाहीं तयाची नाव रात्र – तया वेळा कीं रात्री (४२८) ज्याचिया तयाचिया. जवळिक जाली-जवळिक. (४२९) आदील = आधींचा नेणिजे = वोळखिजे (४३०) दशा = माझी स्थिती (४३१) मिया चाड = माझी आवड न विसंबिजे = विसरतां कामा नये (४३२) चोखटपणा = उत्तमत्व न लगा = जरूरी नाहीं (४३३) का रूपवयसा-रूपे वयसा-माजा = रूप, वय, संपन्नता याची प्रतिष्ठा काय कामाची? पाल्हाळ = व्यर्थ.

तो आतां कांहीं काळानें मजसारिखा होईल असा भाव कदाचित् तुझा होईल : परंतु हे पाहा कीं, जो अमृतामध्येच राहणारा त्यास मरण हं कोठूनहि येणार नाहीं : हे जे एवढें सांगण्याचें केलें तेथें अशी एक शंका तुजला येणारी होईल कीं, अगोदरचें जें काहीं एक असणें तेथें जी काहीं किंमत-योग्यता-ही कशावर बरें टेकणारी? तेथें जे काहीं एक भावाचें होणें न होणें हे तेथें आता देवत्वच एक मी घेऊन असलेला-तेथें कदाचित असेंहि होणें कीं, तं देवत्व हें पुढें घेतल्यानें, तेथें भाव हाच नाहींसा होणारा किंवा कदाचित येणारा न येणारा-तेथें किंमत ती काय राहणारी अथवा योग्यता ही कशी काय येणारी ती देवपणानें होणारी ती काय ह्या नुसत्या भावानें होणारी किंवा येणारी नव्हे : परंतु तसें कांहीं समजू नकोस तेथें भाव हाच मुळीं देवत्व असें असून, तेथें जर तो भावच पुढें झाला, तर तोच मुळीं ह्या देवपणाचा असा : म्हणून जर मी देव झालो किंवा देवत्वातच राहिलो, तर भाव म्हणून जो आहे, योग्यता जी आहे, किंमत जी आहे, ती नाहींशी कदाचित् होणारी ह्या देवपणामुळें असें असेल : तर तें तसें नव्हे तेथें भाव हाच मुळीं महत्त्व घेऊन असतो व आता तोच मुळीं अमर असा झाल्यानें-असल्यानें-तेथें सहजच अमृतामध्येच राहणें झालें स्वभावसुंदर असें तं झालें

मजला एकसारखा तोलून धरील तेथें एक बाजू कमी व दुसरी बाजू सरती किंवा कलती असें नच करिता मजला अगदीं उत्तमत्वानें-सरिसेपणानें-सरस असा-' इन ' सरस असा-सारखेपणानें तोलून धरील असें तुजला वाटत असेल, परंतु येथ एक मोज जी अत्यंत पराकाष्ठा ह्या स्वभावास येऊन असलेली असते, ती तुजला सांगतो . जे काहीं ह्या मनानें भावनाप्रधान असणें, तेथें एक विचित्र रंग ह्या मनावर उमटूं लागून तेथें तं मन कचरतें त्यास असें वाटतें कीं, काय हे म्हणजे एकदोन दिवसा करिता उसनें आणलेलें असेंच धन तें काय केव्हाहि परत हं करावें लागणारच व अशा ह्या वृत्तीमुळें तें उदास होऊन असल्यानें, तेथें त्यानें तें भावन घेणें हं धक्केच घेत असतं : आंदोलन जे काहीं तेथें होणारें तं ह्या भावनेस कोणी जाया असेंच म्हणतो, तर कोणी ते अवयवाचें लेणें कदाचित तें जायबंद किंवा जायबंदी एका अवयवास देऊन दुसऱ्या अवयवास सजवितो कोणी म्हणतात उसनें घेऊनहि पण थटणें किंवा महत्त्वानें आहोंत असें वाटणं हं काय एक लाजच मुळीं निलाजरी झाली असें म्हणतो तर कोणी म्हणतो हे काय वायाच वायच-मुळीं जाणारें, तें काय काहीं कामाचें नव्हे : असें ह्या बुद्धीवर धक्के चपेटे, बसून तेथें त्या बुद्धीस काहींच सुचेनासें होऊन फिरफिरून, पुनः पुनः, ती आपल्या त्या अभावनेची अथवा अयुक्ततेची होणारी होते म्हणून हे जे काहीं देहबुद्धीचें, धनंतर असें बुद्धिवादाचें, एक ' वादे वादे जायते तत्त्वबोधः ' असें ते तेथें म्हणूं लागून त्यानें तं उसनें आणलेले लेणें-भावना-जें उसनें आहे असें तें-ह्या देहधारणेस लावण्याचेऐवजीं तं त्या भावनाप्राधान्यतेस लावीत गेल्यानें, तेथें तं जे ह्या देहासंबधीं उदास होणें हेंच मुळीं पदरात पडेना व आता हे नुसतें वरवरचें असें हे देहधारण नसून, तें म्हणजे जसें काहीं चिरजीवितानें असणारें असेंच तं अंगावर घेऊन असल्यामुळे, तेथें ह्या भावनेस मुळीं काहीं किंमतच येईना-महत्त्वच मुळीं ही भावना घेईना . योग्यतेची ती काय असेच ह्या देह धरणाऱ्याच्या मनाचा कल कलल्यानें, तेथें आता ते भाव हे जसे काहीं एक जायाच जशी ह्या सर्व देहास आलिंगून असणारी तीच मुळीं ऐक्य साधणें हें करूं लागल्यानें, तेथे आता असेंच वाटूं लागलें कीं,

हें तर बाहेरच जात आहे, वायाच जात आहे : एका ह्या देहासच मुळीं तें प्रसरवीत आहे असें मासूं लागल्यानें, तेथें ते भाव हे पोषक न होतां जणूं जाणारे होऊं लागले म्हणून हें नीटसे समजून घे कीं, हें जें एक देवत्व देवभावन-देवप्राधान्यतेनें भावनारूप होणें हेंच मुळीं देवत्वच एक ह्या पोषणास आधार देत असलेलें तेथें तेंच मुळीं प्रधान अंग होय : म्हणून जाया-जाईल जायेचें होणें-प्रियेचें होणें जायजणें असे-अथवा वाया होईल असे जे देवलक्षण ते अनेक देहादेहानीं जोडणें करीत असल्यानें, तेथें तीच भावना अथवा भावघटना हीच देव होऊन असते : तिजला येथें देव असे म्हणणें हें जर त्याचे अगोदर असणारे भर्तृपण हें जसे ह्या देहाच्या गरजा पुरविणारें-अथवा ह्या मनोबुद्धीच्या गर्भास एक उत्तम साज करून जर असली तर तोच भाव हा देवच जसा : म्हणून येथे हेंच अमृत कीं, त्या देवभावनेंत किंवा भावदेवात वावरणें जे तेंच ह्या देहबुद्धीस दूर करून योगभावाचें अंगच पुढे झाल्यानें, ह्या देहासबधीं उदास असणे असाच देवभावसबध पुढें होतो, व तो तसा पुढें झाल्यानें, तेथे देवच एक, भावच एक मुळीं जसा काय, जायाभावच योगभावाचें आप्तपण साधून असेल व असे असणे असे होऊन असणे-हें काय अमृतातच राहणें होय : व जो अमृतानें अमर केला गेला, तो काय मरणाचा होणारा असा केव्हाहि नाहींच

एक पातळीचा मीच जसा-समान धर्म साम्य घेऊन आले असे सारिखेपण ( नाम )-जेथें गुणधर्म, व्यवहार, इत्यादि अगदीं माझ्याच तोलाचे झाले-मजसारिखेच अगदीं सर्व ओळखीचे तेथे-(पारखेंपणच मुळीं तेथे नाहीं)-माझ्या तोलास तोललें ज्या ३६ गुणानीं-तेथें ३६ गुण उतरले असेच बोलणें असून, तेथे जे ते भावाचें, भावपणाचें होणें-भावानें मजमध्ये येणे जाणें करणे-हें होत असल्याने, तेथें जे जाणे ते येणेंच होते, तेंच मुळीं तसे देहबुद्धीस पाहणारें होतें : म्हणून ते जाणे येणें हेंच नीटसे समजेस घेऊन तेथे विनियोग अथवा वियोग अथवा योगिनीने विनियोगिनीचें होणे ते कसे ते स्पष्ट करून सांगितले : करिता ह्या देवास देवभावास अथवा भावदेवास-जे काहीं एक 'भाव' या एकाच शद्बानें पाहविलें गेलें-तोललें जाणे तेच मुळीं देवत्व असेच एक राजणेंच ह्या प्रकृतीस प्रसन्न करून असणारें होय : अधिराजन् असे महत्त्वच तेथे असते (४२६)

म्हणून तेथे भक्ति हीच जसा दिवसच एक सर्व दिवस होऊन आली-तेथे दिवसच मुळीं म्हटलेलें ते डोळसपणाचें ह्या बुद्धीनें असणें ते पाप म्हणजे नसतेपणाचें जे अभावानें असणें ते असून, तेथे मुळीं दिवसच लपला असे झाल्यानें, ते पापच एक अज्ञानाधकार रात्रीचा-तेथेच रात्रच मुळीं-तेथे दिवसाचा-बुद्धीचा-भावाचा-देवाचा-प्रकाशच नाहीं म्हणून हा भावसूर्य अथवा सूर्य हा जी वेळा ही उदयाची करीत नाहीं, तेथे उदयच नाहीं, तर तो दिवस तरी कसचा ! ती रात्रच तो वेळ किंवा ती वेळ ही रात्रच एक.

म्हणून हा सूर्य न उगवलेल्या वेळेसच रात्र म्हटलें गेले : तसे जेथे भक्तीचा उदय नाहीं, जें भक्तीशिवाय केले ते पापच असे : तेथे भक्ति-सूर्यानें ती वेळा ही उदयाची केली नाहीं, म्हणून सूर्य हा-भक्ति-सूर्य हा-भक्तीनें उदयाचा होणारा, तेथे सर्व वेळा ह्या उदयच ह्या सूर्याचा-प्रकाशाचा-भक्तीचा-माझे ठायीं दृढ भक्तीचा, जसा सूर्यच सामोरा झाला असा. (४२७)

म्हणून त्याच्या चित्ताला माझी जवळीक झाली-मी अगदीं जवळच असेच त्याचें चित्त झालें : हे पंडुसुता, अशी जेव्हां ती जवळीक ही झाली, तेव्हांच तो माझेंच स्वरूप होय : तत्त्वतः तो मीच होय . माझेंच ते स्वरूप असा तो. (४२८)

जसा दिवा दिव्याने लाविला-तेथें दिवा हा, दुसराहि पण, दिवाच पाहाणारा झाल्यानें, तेथे दोन दिवेच ! आतां येथे काय बरें महत्त्व कीं, अगोदरचा कोणता व नंतरचा तो कसा : आदील म्हणजे पहिला जो दिवा तोच दिवा, का नंतर लाविलेला तो दिवा-हें जसे ओळखण्यांत येत नाहीं, तेथें दोन्ही

दिवेच असल्यानें, ज्या दिव्याने लाविलेला दिवा तो आदीलचा असा हे ओळखण्यातच मुळीं येत नाहीं : तसे ज्याने आपलें सर्वस्व-आपले स्वभारसर्वस्व-हेच माझे भजनीं लाविले, तो मीच होऊन असतो-तो मीच झाला-तो मीच होय. (४२९)

तेथे आता स्व-सर्वस्व हेच अनन्यभाक ! ' भजनीं लाविल्याने '-भजनीं लागल्यानें-माझी जी नित्यता ती त्याजमध्ये वास्तव्य करून असल्याने, ती शांति शक्तिच जशी कांति होऊन आली तप्त झालेले सुवर्ण-तप्त केलेले सुवर्ण-काय तेथे कांति ही दशाच एक उत्तमत्वाची पाहिल्याने, ती शक्तिच झाली-तेथे माझा जीवच लागून असलेला, तेथे जगत असलेला : माझ्या जीवप्रेमाचे असेच ते त्याचे जगणे हे काय परम दिव्यतेचे-दिव्य देवतेचे-असे डोळे दिपविणारे असे भक्तीचे एक रूपच ! एक दशाच तेथे ह्या स्वभावास आलेली-भावसुंदर अशी ह्या मनुष्यप्राण्याची जी जीवित जिंकण्याने-निंबलोण केल्याने-जीवित जगण्याने प्रेमच ते झाले . भावाचे असेच ते होऊन आहे, देवच ते असे . सौंदर्यास तेथे उणेपणा नाहीं . सर्व सुंदर असेच ते !! (४३०)

माझाच जीव त्यानीं जगविण्यास-आपल्या स्वतःच्या जगण्यास किंवा जागण्यास घेतलेला-लाविलेला, तेथे त्याचें जीवित हे कसे म्हणशील तर माझ्याच जीवाने जगणारे असे असल्याने, तेथे ते जागणें हे पदरात पाडून घ्यावे, त्या जागण्याचे आपण व्हावे असे होईच ना : ती मायासृष्टी ही दृष्टीसच एक वेध देऊन असणारी, तेथे ही वाचाच मुळीं आपला बंधच तुडवून घेणारी म्हण अथवा तोडून-तोडवून-घेणारी म्हण अशी असते, व त्यामुळे हे माझे स्वरूप हे नेहमीच हरवू लागणारे होते : म्हणून जर माझी प्राप्ती हीच महत्त्वास पाहून तुजमध्ये असावींच-आहेच-असे करशील, तरच ती तेथ एका भक्तीची अशी-एकनिष्ठेची अशी-झाल्याने, ती इतर ज्या गोष्टी त्याना आपले महत्त्व न देता आपल्यातच भरून राहाते-हरप्रयत्नेकरून आपल्यातच भरून राहाणारी अशी होते-अशी करावी लागते : व असे तें एक स्वरूपच माझे निखळ तेच पुढे होऊन तेथे भेदच मुळीं नाहींसा होणारा-नव्हे, तर तेथे जे जागणे हे ते भावाचे असेच केल्याने, तेथे मी भावरूपाने म्हण जागाच असा असलेला म्हणून मी-जो ह्या जीवप्रेमानें असलेला-तेथे ह्या जीवदशेस जी अत्यंत आवडणारी अशी जी गोष्ट तीच मुळीं माझ्या मनींचें गुजच जसे-काहीं कानातच सांगणारे असे-हळूच बोलणारे असे ते प्रेमाचे-ती गोष्ट ही मला आवडते-मला आवडणारी अशी असल्याने, तेथ तूं आपल्या भावाने-प्रेमाने-आवडणारे जे बोलणे-ऐकणे त्यानेच असत जा-तोच भाव होय : तेथ जे काहीं एक विश्वाकारास आकारास आणणे होते, तेहि पण ह्या मुळातच बसणारे केल्याने, तेथे प्रेम हे हरवत नाहीं ' असे जे त्यास 'भक्ति' सरस्वतीच जशी एक ह्या जीवदशेस अक्षरास आणिलेले असे ते रूप होय . असे हे किती वेळा, कितीदा तरी, मी हे सांगण्याचें करूं बरे : पुनःपुन्हा तेच ते सांगण्याचे जरी मी करीत आहे, तरी एका ह्या प्रेमाचीं हीं बोलणींच असल्याने, तेथे हे कानास गोडच लागणारे असे बुद्धीस आवडणारे असे आहे. म्हणून तेंच ते पुन्हा सांगत आहे कीं, 'सगुण भाव' हाच आवडून घे व भक्तीसच लागणे असेंच होऊन ऐस-हें विसरूं नको (४३१)

म्हणून येथे भाव हाच देव असे निश्चितपणानें बोलणें केलें : परंतु ह्यासच मुळीं जे काहीं हादरविलें जाणे तेंच पुढे पुढे होऊन असतें : म्हणून हा भाव हा विसरूं नको : रात्रंदिवस आठौप्रहर त्यातच वागत ऐस : तो जीवच एक आपला असा आहे-तोच देव असे म्हणणे होतें-तो भाव हा देवच आहे असेच होय : म्हणून जर का ह्या मुख्य गोष्टीस-प्रेमास-जागण्यास-जगण्यासच जर डावलून असशील, तर काय तुझें तें कुलवंत असे असणे तें कांहींच कामाचे नाहीं, तें मुळींच येथे उपयोगाचे होत नाहीं : तें भावानें वागवावे तरच एक ते तेथीलचें माझें असणें हें स्पष्ट असे होणारें : जर ते भावाने

वागविलें नाहीं, तर ते मोठे कुळाचें असणें हें व्यर्थच होय [ कुलाचिया चोखटपणा न लगा – वंशाच्या शुद्धपणाचे महत्त्व पाहूं नका वंश = बांश = कळकच जसा आकाशावर उभा केला आहे असे ते असणारे ! जरी तेथें एक कथाच गाजणारी कीं, ह्या जुनाट अशा कळकाच्या बेटाखालीं मोत्ये हीं सापडणारीं होतात-काय तें खरें तरी कुणीं मानावे, कारण मोत्ये हीं तर समुद्रांतूनच निघणारीं असल्याने, तेथें काय कशी ही व्युत्पत्ति लावावी हे काहींच एक नसणारे असे खरें. नाळ = धागा, लोचन ] म्हणून मोठे, आम्ही मोठे, आम्ही मोठे असे उगीच देव्हारे माजविणे-ताशेगच-आपल्या पाठीमागे लावून घेऊ नको : मी काय जन्मलो तेव्हाच मुळीं ह्या जन्मण्यानें तें सर्व मोठेपण हे मजबरोबरच आलेले आहे असे म्हणणे काहींच उपयोगाचें नाहीं-जर ते भावभक्तीने वागविलें नाहीं : काय येथे ह्या बुद्धीचे तरंग हे कसे मजेदार आहेत असे समजून त्यातच फसणे-ते काय तुजला उपयोगीं होणारे नाहीं येथे एकाच रागेत ह व्युत्पतीचे आग व मोठा जन्म हा बसविला गेला : तेथे कशी मजेदारशी गोष्ट आपल्या रोजच्या पाहण्यात येणारी अशी असून, येथ स्वभावाचें परम वैचित्र हे पक्षपात न करता बोलत असल्याने, न कोणाला घटकोघटकीं ह्या विचारात टाकून तेथील स्वभाव हे परीक्षणाचे कसे होणार बरे ते सांगतच आहे : ' म्हणून व्युत्पत्ति ही आपले सवस्व असे न करिता भावबळ पुढें घे-तेच बळ होय-तेच ह्या जन्माचे सार्थक होय . असा हा कुळाचा सोस-' मोठे ' असे आम्ही जन्मलो असा सोस-तसेच पाण्डित्याचा सोस-अहो ! सोसच नुसता ता-तो काय स्वत.स हरविणेच एक तेथे-जसा सोसाट्याचा वाराच पार ह्या जीवदशेस हालवून चीत करणारा असा असल्यान, तेथे न फसता ह्या भावास-भावबळास बळ देणारा जीवप्रेमास प्रेमाचे बोलण्यास बोलणारा-जीवप्रेमास प्रेमाची गोष्ट ऐकण्यास ऐकविणारा-ह्तिगुज आपले आपणच पाहून असावे असे त करणारा-असेच घे, असाच हो तरच बरेत प्रेमच एक महत्त्वाचे आहे (४३२)

वयस्य ह्या पदाने-तारुण्याच्या भरान-मित्रच एक जसा गाजणेंच करवीत असलेला-तेथे मित्रत्व हच मुळीं गाजविणें नच करिता जर आपल्या खऱ्या प्रेमाच्या धाग्याने असेल तर बरे, नाहीं तर मित्र भित्र हे तरी काय नुसते गाजणे वाजणे हेच करविणारे जर झाले, तर त मित्रत्व नव्हेच : म्हणून ह्या वयोमानाने ज एक भर पाहणारे असे मोकळे त पाहूं नको-घेऊं नको : मी आहेच आहे म्हणजे काय ह्या एका बुद्धीनेच जसे असण त होणारे-पुढे येणारे-असल्याने, तेथे श्लाघ्य असेच तें निंदेचे होणारे होते : म्हणून भाव विसरूं नको ' एरव्हीं या भावाशिवायचे जे जगणे ते निव्वळ पाल्हाळच : पाल्हाळाचे असे होणे त काय काहींच उपयोगाचे नाहीं-ते तुजला कसल्याहि तऱ्हेने भावाचे करील असे वाटणे-असेच एक कदाचिततेने त पुढे मागे आपोआपच भावाचे होईल असे वाटणे-हे काय काहीं कामाचें विचारणे नव्हेच : म्हणून एरव्हींचा सर्व पाल्हाळ-तोंड उघडणे हेच मुळीं अगोदर-भावासच पाहून-देवत्वास पाहून ऐस : एरव्हींचा सर्व व्यवहार हा म्हणजे जर तो भावाने साजरा नाहीं, तर पाल्हाळणें असेच त-हळहळणे हेच तेथे पुढे येऊन असते : करिता भावास जप-त्याचेच बळ घे-तोच देव होय-व तोच मी-हेच पुन्हा पुन्हा तुजला सांगण्याचे करीत आहे. (४३३)

**कणेंविण सोपटें । कणिसें लागलीं येकदाटें ।**
**काय करावें गोमटें । वोस नगर ॥ ४३४ ॥**
**ना तरी सरोवर आटलें । रानीं दु:खीया दुःखी भेटलें ।**
**कां वांझ फुलीं फुललें । झाड जैसें ॥ ४३५ ॥**
**तैसें सकळ तें वैभव । अथवा " कु " ज्ञाति गौरव ।**
**जैसें शरीर आहे सावेव । परी जीऊचि नाहीं ॥ ४३६ ॥**

तैसें माझे भक्तीविण । जळो तें जियालेंपण ।
अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ॥ ४३७ ॥
परी हिंवराची दाट साऊली । सज्जनीं जैसीं वाळिली ।
तैसीं पुण्यें डावलुनी गेलीं । अभक्तातें ॥ ४३८ ॥
निंब निंबोळियां मोडोनि आला । तरी काऊळियां सुकाळ जाला ।
तैसा भक्तिहीन वाढिन्नला । दोषाचिलागीं ॥ ४३९ ॥
कां षड्रसु खापरीं वाढिले । वाढूनि चोहटां रात्रीं सांडिले ।
तेथें सुणिया ' चा ' ऐसें जाले । जियापरी ॥ ४४० ॥
तैसें भक्तिहीनाचें जिणें । कां जैं स्वप्नींहि सुकृत नेणें ।
तेणें संसारदुःखासी आवंतणें । वोगरिलें गा ॥ ४४१ ॥

(४३४) कणेविण सोपटें = दाणे नसलेलीं फोल कणसे येकदाटें – घनदाटे (४३५) 'कु' ज्ञाति – कुळ जाति जीऊचि – जीवचि (४३७) जियालेंपण = जीवित व जगणे (४३८) वाळिली = निषिद्ध म्हणून टाकली (४३९) मोडोनि आली = लवला काऊळिया – काऊळियासीचि (४४०) रात्रीं सांडिले – ठेविले. सुणिया ' चा '-सुणियाचिया-सुणियान्या उपेगा = कुत्र्याचे झाले, कुत्र्याच्या उपयोगाचे झाले (४४१) का जैं स्वप्नींहि – जो स्वप्नींहि परी आवंतणे-भाणे-वोगरिलें = ताट वाढले

नुसतेच अवयव उभे केले-हा देह हाच तेथे ह्या अवयवानीं असलेला, परंतु तेथे भाव पाहावा तो काहींच नाहीं-त्या यमदेवतेसहि पण असाच एक इशारा कीं, हा जो भाव तो जो घेऊन असेल, त्याचे वाटेसच मुळीं जाऊं नये : म्हणून येथे तो भाव हा सर्व बाजू ह्या मनान्या होत : हे मन हेच मुळीं कसे आवरले जाईल-तें कसे पाहविले जाईल-असे मनात जर घेतले, तर तेथच हा भव म्हणजे मनच एक एका उद्योगास लाविलेलें असे असून, तेथें तेच हे विश्वाकाराचे होणारे असे होते : व आता बुद्धीचें काहीं प्रमाणात तेथेच जर पर्यवसन-स्थैर्य-हें होत राहील, तर तच एक व्रत हे व्रतास पुढे ये म्हणणारें असून, मग मात्र ह्या अवयवानीं नटलेले जे मनुष्यलक्षण त आपल्या यथा अर्थाचे असे पाहाण्यास मिळतें

परंतु जर का नुसतीं ताटेच उभीं असलेलीं तीं-जशीं का (केळीचीं) सोपटेंच-फोफसे फोस-उभीं असलेलीं अशीं तीं-कणाशिवाय असलेलीं दाट अशीं कणसे-तीं जरी घनदाट अशीं लागलेलीं असलीं तरी-चावणेंच एक जे तेथे, खाऊनहि नच खाल्लें : चघळणेंच एक जसे तेथे, जेवून नच जेवलें : मनच तेथे नाहीं, करून नच केलें ! श्रमभारच व्यर्थतेचा ! काय सोपट केळीचे जे त केव्हाहि कणाचें नसल्यानें, दाणेदार नसल्यानें, उभे नच राहाणारे : आंतील गर्भ जर नाहीं-नाममात्रा जर नाहीं -सूत्रतंतु जर नाहीं-तेथे उभे मुळीं राहाणे नाहीं : प्रेमदोरा हा आत ओविलेला जर नाहीं-तेथे उभे मुळीं राहाणें नाहीं ! तेथे सोपटच एक-काय ह्या सोपटास का कधीं कण, कणदार, कणखर असे म्हटलें जाणारें : तेथे दाणाच नाहीं-कणच नाहीं-दाणेदार, टपुरेदार असे होणेंच नाहीं : ज्या ताटावर हें कणीस येणारें तेथे पिशाच नुसत्या लागलेल्या : पिशपिशित असेंच तें : काय त्यास आता सोपट असें नच म्हणावे ? हा रंभागर्भ हा आकाशावर टेकणारा, तेथें तो सापडणारा नव्हेच : तसे हे सोपट खाल्लें तर नुसतें रवथ, चघळणेच एक, तेथें रस नाहीं, गोडी नाहीं : व जर कां तें चघळणें केलेच, तर तें जें काहीं एक हलाखी करणारे असे त्या मुखाचें म्हणा, कां जिव्हेचें म्हणा, का जीविताचे म्हणा-तेथें जीव किंवा प्राण हाच आडकविला गेला-तेथें घाबरणेंच एक : काय अहो हें चघळणें संपणार तरी

केव्हां ? असे विचित्र असें ह्या मुखाचें किंवा जिव्हेचें, काय वाचेचें नव्हे असें तें म्हणावे ? येथें तो जो आकाशावर-टेकणारा-जसा कदाचित् खेचरच ! तो काय ह्या जीविता मध्ये येऊन असणारा होईल ? काय तेथे श्रम हलका होईल ! काय तेथे जीविताप्त गोडी येईल ? अहो, तेथें काय ह्या प्रेमाची एखादी नांवनिशी ही, अहो, ती तर मुळींच होणारी नव्हे !! म्हणून यथें कणदार असे कणीस पाहिजेच ! सौंदर्य हें असे थरावर थर घेऊन सौंदर्यास येतें, तसे येथे तें कणसाचे दाणेदार हें ह्या डोळयातील बाहुलीसच गोड दिसणारें असे असून, तेथे मन हें कदाचित् येथे माझे रंजन होईल असे म्हणून, बुद्धीस जागे करण्याचे करून, तेथे गोडी ह्या जीवप्रेमास याबी असे करून असणारे होत : म्हणून जथे तें सगुण हें लावच्या लाव आकाशावर आहे असे समजणारे-करणारें-नाहींच असे लिव लिबित-काय तें आपला भाव घेऊं शकेल ? नाहीं वृत्ति नाहीं-वृत्तीवर येणे नाहीं-शील नाहीं-शीलाचें परिशीलन नाहीं : भाव्य नाहीं, भावावर येणे नाहीं . स्थिति नाहीं, स्थितीचें होणे नाहीं : जर मुळींच तेथे वृत्ति ही अनुसधान घेऊन नाहीं, तर ते म्हणजे एक सोपटच जसे ह्या निकणाच्या कणसास पिशीचें जसे एक : तसेच वागवीत असलेले असे जीवीत त नकोच असतें-तेथे गोडीच मुळीं नाहीं : आंतील पेशी ह्या मुखाच्या अशा मुळींच नाहींत : तेथे वाळलेले असेच एक निर्मुख-तेथे भाव कसचा न् काय !!

सोपटः—कणसास कण नाहीं, एक सोपटावर तें कणीस उभे असलेले, तेथे ते सोपट उभे तरी कसे राहाणारे बरें ? कण किंवा दाणा हा कणसास पाहिजेच-जर कण नाहीं, तर तेथे सोपटच जसे एक, तें कसे काहींच उभे राहणारे नव्हे .

पाबुरण्यानें गर्दीच, दाटीच केली : तेथे गजबजलेला जीव हा केळीचा गाभाच साडून टाकतो हातावर लोंबणारें आकाशच तेथे हरवले : तेथे मग वाचाच मुळीं बंध तुटल्यामुळे नाहीं म्हणून येथे शब्द हाच स्थिर जेव्हा, तेव्हा तोच विष्णु, आणि मग तेथे जीवित्व हे उभे राहून आपले पोषणपालनादि व्यवहार करणारे असे भर्तृत्वच एक :

म्हणून वल्लभ किंवा भर्तृपण म्हणजे शब्दविष्णु हा जर नाहीं, तर तेथे कुंकू लावणें हे होतच नाहीं ( किंवा अविभवापण हेच कसे येणारे ) : तेथे केळीचा गाभा म्हणजे हातच एक जेवण घेईना : तेथे उपाशीपणच-जेवले कसचें, न जेवूनच तें गेलें-तेथे जेवण न जेवताच नुसतें ते गेले : केळीचे गाभेच जसे ह्या देहावरील वेष्टणें जर ह्या वल्लभासहित काढून घेतलीं, तर तेथे गाभेच खाल्ले गेले व आता ' न जेविताच गेले '-वल्लभच नाहीं-उभाच नाहीं-गाभाच खाल्ला गेला :

तेथे जर हा भाव नाहीं-मनाचें रंजविणें नाहीं-ह्या मनास प्रफुल्लितपणास आणण्यास उपाय जर काहीं होत नाहीं-हें मन हें नसते उदासपणच घेऊन असेल : ह्या देहाचें जे रंजन तेथे मन काय चाहतें-बुद्धि कशी नटते-देहादेहानीं रंजविणे केलेले तें कशावर उभे असतें-कशाचा आधार घेऊन ह्या मनास मोठेंपणास येऊ केले-त्याचें महत्त्व त्यास देऊ केलें : धर्म जो ह्या मनुष्यास पाहतो तेथे ह्या मनुष्यानें कसें ते मुलाचें अथवा स्त्रीचें आपल्या भावभारास येणें होईल-अथवा स्वभावभाराचे तें होईल : तेथे मनाचा मात्र हा हरघडी तुटून पडणारा तो कसा आकळिला जातो : पदार्थमात्रामधील जे कांहीं संपन्नपण तेच येथें ह्या मनानें पुढें घेतलें जाणारे असून, तेथे बुद्धि हीच कशी स्थिर होते : तें सर्व जे कांहीं ह्या मनुष्यास पाहिजेच आहे तें त्यास दिलेंच पाहिजे : मन हें नुसतेंच जर पुढे घेतले, तर तें कारणातच उडी घेणारें असे-निष्कारण अशा अर्थाचें-तेथे पायच मुळीं त्यास उभे राहण्यास (करण्याचें-राहण्याचें) येत नसल्यानें, तें म्हणजे एक सर्व कारणच : येथें ध्यानच एक त्यास जरूर द्यावेच द्यावे असेंच तें येथे होतें : परंतु तें जर कां त्यास दिलें नाहीं, तर तें अनेक कारणांना पुढे घेऊन त्यांतच बुडून राहातें व

व्यर्थतेच्या अशाच एक बिनभावाचे असे-तेथे निभाव लागणेंच नाहीं-तेथें काय कसचें बरे स्वभावानें असणें ? हा स्वभाव हा जेव्हा जाणिवेस घेऊन चालतो, तेव्हा तो ह्या गृहस्थधर्मास लागणारे ज म्हणून गुण त्याचा काहीं प्रमाणात तरी होऊन असणारा होतो, नाहीं तर तेथे सत्वप्रधान असे जे बुद्धीचें अग तेंच नाहीं-तेथे ह्या मनास अकुरच येत नाहीं-तं बिन अंकुराचे नच ऐकणारे झाल्याने, त्याचा कांहींच उपयोग होत नसणारा व तं म्हणजे एक बिन कणाचीं कणसे हीं नुसतीं सोपटावर उभीं असलेलीं-तेथे दाणाच मुळीं नाहीं, दाण्याचें नाव नाहीं : तेथे काय काहीं बाधाच एक-वस्तीच नाहीं-वस्तीकर नाहीं-आसरा नाहीं-गृह नाहीं-व शरण असे तर नाहींच : केव्हाहि तसे म्हणणारे तरी होईल असे नसणारेंच नसणारे : तेव्हा तेथे वस्ती कशाची झाली म्हणावी तों ती नुसत बोलणे पाल्हाळ घेऊन असलेलें, तेथे काहीं घर नाहीं, घराणे असलेले अथवा घर घेतलेलें अथवा दिलेले असे नाहीं : तेथे व्यर्थच एक खडवडणे हें एखाद्या गोष्टीस पाल्हाळाचे केले व आता मात्र अतिशय कटाळा आला-मन किटून गेले : त म्हणते कीं जराशी मोकळी हवा ही हवी आहे, परतु तं तसे होतं कुठे ? तं तसे होतच नाहीं व असे न होण्याने तेथे ओसपण-देहामधील सर्व बाजू पडल्या-मोडल्या-आडल्या-तेथे ठेचाळणेच एक परिणाम करीत असलेले : तं काय गृहाची किंमत जाणणारे नव्हेच असे : म्हणून ह्या मनास काहीं ध्यान देण्याने तं भाव म्हणजे हं काय समजूं लागेल : मन हे कशावर वसत त पाहिले म्हणजे त्यास जे काहीं अतिप्रिय असणारे तेच लक्षात आले, म्हणजे तेथे हलकें हलके वस्तीकर होणारे असे बुद्धीचे क्षेत्र पुढे होईल व नंतरच मुळीं ह्या मनाच्या भावास अकुर येणारे : तं प्रेमाचे असेच आता झाले, व मग का तो एक नागरिक जन असा काहीं एक दागिनाच ह्या मनास केला-त्यास शृंगार हाच देऊं केल्याने ते प्रसन्नतेनें हंसू लागून मोठेपण कशावर अवलबिलें तं हे केव्हाहि नाहीं न म्हणणारे-'ना' न म्हणणारे -होऊन त्यातील अडीअडचणी ह्या लोकसंग्रहाच्या उपयोगीं कशा तं ते समजूं लागते-तेथे ह्या देहास काय सूक्ष्म, काय स्थूल, काय अगाधतेचा भर अथवा लघुत्वाचा हिनकट असे अनेक रंग येणारे असतात

एक गोष्ट येथे नमूद करावीशी वाटते, ती ही कीं, -परतु येथे तुजला हसूंच लोटेल, कारण ती एक जशी वळसा घेणारी अथवा वळण पाहाणारी बाजू असल्यान, येथे हे मन म्हणजे जसे का सवाण्यामधून पडलेला-झरोक्यातून पडलेला-एक प्रकाशाचा ठिपका तोच जसा श्रवणच मी आहे म्हणणारा-येथेच ह्या मनाचे उपमेने घेतलेले चातुर्य हे म्हणजे भावन होय : काय येथे असे म्हणूं कीं, जसे काय मोहनच जसे स्वयपाकामध्यें उपयोगाचे, तसे काय तेथे तो सवाण्यामधील पडलेला प्रकाश अथवा एखाद्या छिद्रामधून पडलेला उन्हाचा-सूर्यप्रकाशाचा-ठिपका हा मोहनाचा कसा तें काहीं सागता येत नाहीं : परतु तेथे तोच जसा भावन भावणे असा भावाचा करून असावा-येथें भाव पाहावा तर तो भाव-भाऊ-उभा-बाहू- 'बा हूं' - 'हूं बा' (खुबा-खूब-खुबणे-खुद-ब-खुद-आलु-बा-खूब (शाबूत) - भोजन भाऊ ) असे वैचित्र्य लोट घेऊन आल्यामुळे, तेथे तें भावणं हें काहींच पदरात पडूं देत नाहीं : म्हणून तो जो ठिपका तोच जसा काहीं आपल्या योजनेस घेतलेला होऊन असतो : व तेथेच ते भावाचें नटणे हें जसे मेघाने आपल्या आगचें करावे असे तं भावन हें मोहनाच्या उपमेचें एक असे असल्याने, तेथे जसे मोहन हे आत उत्तमतेचा असा स्वाद अथवा रुचि ही मूकेसच येणारी असून, तेथे आता ह्या मनाचें तें भावन कसे करावे ते काहींच समजत नाहीं : म्हणून हा जो भाव हा कदाचित् कारणावर वाजणारा असून, तेथे एक मुख्य गोष्ट की ती ह्या विषयाची होय : ह्या युगधर्मानें ह्या मनास पार चीत केले : तेथे जे काहीं खाद्यपेय हेंच व्रत वगैरे आहे असे जणू त्या विषयाच्या अंगांतच तें व्रताचें वारें भरलेले असे दाखवीतच जणं असलेलें व एकाच कारणानें ह्या अनेक अशा प्रकृतींना पार चीत करून झोडच त्यावर उठविली

असें एक त्या प्रकृतीचें अंगच लुटणें होणारें होतें : म्हणून येथे हा भाव हाच मुळीं पदरातच पडत नाहीं : तेथें भाव-भजन-ध्यान-मुद्रा इत्यादिचें जे काहीं ह्या प्रकटतेवर बोजा ठेवून असणे, तेथें गृहच मुळीं न सापल्यामुळे एक व्यर्थतेचा असाच हा देह नुसता बाजीगिरीवर टेकलेला असाच दिसत असल्यानें, तेथें ह्या मुक्ताची जी आराधना ही स्वप्नींहि नच येणारी झाल्याने, तेथे आता भावावे ते काय हेच समजत नाहीं : येथें पुरुषप्रकृतीवर मुळीं ताणच ह्या प्रकृतीनें केली व तीच मुळीं हा सर्व पुरुषभार अथवा अर्थभार हा मजलाच सजविण्याकरिता किंवा माझेकरिताच जणुं आहे असा कल घेऊन असणें तेंच मुळीं ह्या मनुष्यास आपला स्वत:चा भार अथवा भाव हा सापडूंच देत नाहीं : तेथे एकच ती स्त्रीदेहधारणा ही लावसडक-आडवीतिडवी-वर्तुळगोल अशीच फुगविली गेल्याने, तेथे ह्या पुरुषाचा प्रकार जर पाहणे असेल, तर तो तेथेच पाहवा असे ह्या भावाचे म्हणणे होऊन, तेथे काय काहींच ह्या मनुष्यास सापडणारे होणार नव्हेच (४३४)

नाहीं तर सरोवर आटले म्हणजे पक्षीच तेथे नाहींत, तेथे कोणी कोणास भेटायचें ते ! किंवा राना-मध्ये एका दुःखी जनाने दुसरा एक दुःखी जन पाहाणे ते काय दुगणत्व जसे त्या दुःखपणास येणारें : दु:खाने दु:खच पाहाणे, ते ओसपणच आणखी ओस दिसणारे, होणारे-कल्पनेचें नसतें असेच ते तेथे काय दु:खच एक : तेथे बुद्धीचे येणेंच जर नाहीं, तर ते काहींच कामाचे नव्हे . तेथे शहर किंवा नगर किंवा वेगळी जी एक स्तवनाची मिस पुढे करून असणारीं अशीं जीं स्तुतिपाठके तींच जर झालीं-सर्व काहीं झालीं, तर तेथे आता असा प्रश्न येतो कीं, हे बोलणे म्हणजे संताचे स्तवनच केले असे : अहो, संत होऊन असणे तें राहिले बाजूसच, परंतु त्याचे स्तवन हेच परमप्रिय होऊन गेल्यान, तेथे दृष्टच जशी पुढे झाली व तिने त्या स्तुतिपाठकासच पाहाणे केले त्यास पाहून ती जी किमत ती कशी तेथे आली ते पाहूं करून, आता ते ' सतपणाचे कोणीं व्हावे बरे ' असा प्रश्न विचारीतच, ती एकादा कोणी ह्या प्रश्नाचा निवाडा देऊन तेथे यथातथ्यतेचे अग हें उभे व्हावे असेंच एक गृहस्थरमणीयतेचे जे लक्षण ते हिंडूं फिरू लागून एवढाच एक प्रश्न त्याने सोडविण्यास घेतला

तेथे झाड पाहावे तो ते फुलानीं लकडलेले आहे, परंतु तीं फुले पाहावींत तो तेथे सुवास नाहीं-फुलपाखरेच जशीं अशीं दिसणारीं-तेथे काहीं भावनाच येईना-काहीं रम्यता ही उगवेना-नुसतींच फुलाचीं झाडें : तेथे सर्व फुल्याच फुलल्या तेथें उत्पन्नच काहीं होईना-निष्पन्नतेसच कशाचेहि येणे नाहीं -जेथे तेथे एक तऱ्हेचे वायफळपण-व्यर्थपणच नव्हे का ? तीं फुले कसलीं म्हणावींत, तर जे काहीं जवळ असेल, तेंहि पण पार होणारे-नाहीसे होणारे : असे करून आता वाझपण, वायपण, ते काय नवीन एकादें का जगात धुडून कदाचित् कोठे तरी सापडेल असे असणारे:अहा ते येथेच जसे भेटणारे-त्यास पाहण्याकरिता काहीं फार दूर जाण्याचे कारणच नाहीं असे तें सदाफुलीचे एक फुललेले असे सदापणच वाझ होऊन असणारे असेच ! (४३५)

हा जीवभाव नाहीं-ह्या जीवास काय पाहिजे ते तो जीव मागणे करीत नाहीं : तो काहीं कुणास प्रार्थं आदरीत नाहीं-कुणाचें आर्जव करीना-' अरे, तुला कशाची गरज आहे ' हें स्वत:सहि पण नच येऊं देऊन उगीच जीवभावच नाहीं असा जर हा जीव झाला, तर तो काय जीव तरी कसा म्हणावा ? ह्या देहासच मुळीं गौरविलें नाहीं-त्यास त्याचें खाद्य पुरविलें नाहीं-डोळयास प्रिय असें भोग दिले नाहींत-कानास मधुर लागणारे असे काहींच ऐकण्यास मिळत नाहीं-विद्या हीच जर तेथें प्रस्थापित झाली नाहीं, तर हा जीव,-जीव तरी कां म्हणावा ? तो म्हणजे एक अभावाचें ओस असेंच बिनवस्तीचें, बिनजीविताचें, बिनदिक्कतीचें-प्रेमाचें माणूस नाहीं-प्रेमास बोलण्याची किंमत कशी येते तें माहीत नाहीं-प्रेम हें केव्हा कसे बोलवावें हें समजत नाहीं : अहो, तेथें पाल्हाळच हाच

एक पुढे झाला, त्यानें तें सर्व प्रेमाचें गबाळ लांबविलें : व जर तसे तें प्रियपणाचें वारे ह्या जीवितास जर येईना, तर ह्या मनुष्यानें मनुष्यास देणें तो कसचा करें तेथे क्षेम आशीर्वाद !! तेथें कसला पोशाख करावा ? तो म्हणजे ह्यासच-जीवितासच-जसे एक जीवभावास येणें, आणणें हेंच होय : म्हणून ह्या मनास रजीव-त्यास दुसऱ्याशीं प्रेमाची एक गोष्ट बोलण्यास शिकीव-तें मन आपल्या पायावर उभें कर म्हणजे ह्या देहास काहीं थोडीशीं तरी किंमत येईल. नाहीं तर काय हें जीवित नसणारें असे त्यास काहींच आवडत नाहीं तेथे प्रेम कोणतें, जीव कसा, केव्हा कशाकरिता ह्पापलेला होतो-तेथे त्यास काय करावे लागतें-त्यास कसला रस द्यावा लागतो-ते जर करीत नाहींस, तर तुझें नुसतें झाडादगडासारखें हें मनच एक थंडगार हवा घेणारे असे तें काहींच कामाचें होत नाहीं : तेथें जर ते प्रेमाचें अंग-जीवाभावाची गोष्ट व तेथील अंग-जर नाहीं, तर वैभव हें काय नसतेंच बिनलिगाचें अशा प्रकारावर उभें राहाणारे ! तेथे काय कुळ तें कसचें-काय ज्ञाती ही तेथे उगवतच नाहीं-जाति ही अथवा उपजाति ही तेथें कशाचीहि होत नसून तेथें किंमतच मुळीं नाहीं : अहो, मग तेथे गौरव तो कसचा-तेथें जीवित हेंच जर बोलेना-त्यास कांहीं एका दगडाझाडासारखेंच होऊं देणे हें एक भूतजातीचेहि पण नव्हेच असे लक्षण हें जीवितदशाच मुळीं तेथील नामशेष झाली असे म्हणू लागतें. (४३६)

त्याप्रमाणे माझ्या भक्तीशिवाय असणें असे जें जगणे तें जगणे जळो-तेथें जियालेपण हेच नाहीं : तेथें भक्ति ही युक्ति पाहीना-जीवित हे उगवेना-प्रेम हे सचरेना-व्रत हे उभे राहीना तप हें वर येईना. असे जर, मग तें काय दगडासारखेंच एक-पाषाणहृदयी असाच एक तो पाषाणच मुळीं-म्हणून असलें हें पाषाणासारखें वर्तन करू नको : काहीं तरी भक्तिबीजाची सोय पाहा : ह्या जीवितास आनंदित करणें हें ज्यायोगे होईल ते कर : म्हणून भावास भाव-हा संसार जो आहे त्यास काहीं फुलविणें कर-ह्या देहाचा संसार हा भक्तीचा असाच कर, ज्यायोगे तेथे भ व हा सहजतेचा होऊन, तेथे मग हें जीवित केव्हाहि आदरणीय असेच होऊन असेल. (४३७)

सदा हिंवणेंच ! तेथे हिय्याच नाहीं ! अशी ही काय साउली म्हणावी ? हींवच जसे थडथडा आले-काहीं एकादे कामकाज करणें म्हणजे हिंवच वाजवून घेणे-असले हे करणे जे सज्जन सज्जन आहेत त्यांना आवडत नाहीं-ते त्याचा त्याग करून असतात-ज्याप्रमाणे अनेक पुण्ये अगाधे तीं अभक्त जे आहेत त्याना सोडून गेलीं. ( हिवराची म्हणजे काटेरी निवडुंगाची ) (४३८)

निंबानें काय केलें तर आपल्यामधील जे अमृत तें सर्व त्याने खर्च केलें व निंबोळयाच्या बहारासच तो आला; तो काय तेथे कावळयाची चैन झाली-त्याची काय मजाच झाली: त्याप्रमाणे येथें दोषच एक पदगत घेऊन असणें असेच ह्या किंवा त्या अभक्ताचें जगणें जगत असणे-आयुष्याचें होणे, तें दोषच मुळीं वाढीला लागले असे होय : दोषाकरितांच होय असे : ( भक्तिहीन पुरुष भरभराटीस आला चढला, तर तो दोषाचाच फैलाव करतो. )

निंब हा बाळंतपणच आपलें निंबोळयानीं प्रसवला-अहो, तेथे तें काय बाळंतपण ! नव्हे, ते तर अमृतच एक : त्याचे आयुष्य हेंच दीर्घतेचें जें ते सर्व त्यानें पाहून, एक निंबोळयाचें पीक तेथे उफाळयाच्या वाढीस लागलें व त्याने निंबोळयाचें अपारपण हेंच देऊ केलें-निंबोळयास येऊं केलें : तेथे आता त्या कावळयांना मात्र ते मिळालें-तें त्यांना सुकाळाचें असेंच खाद्य झाले : तसे भक्तिहीन जो तो जर भरभराटीस चढला, तर तेथें दोषच जसे सर्वत्र फैलाव घेणारे होतात (४३९)

तें म्हणजे (अथवा) जसे कांहीं षड्रस खापरामध्यें ( अकारणामध्ये ) वाढून चार रस्त्यांवर नेऊन ठेविले, तों काय त्या ( चांडाळचौकडीस अथवा ) कुत्र्यांना तें एक सुकाळाचें ( चाईच्या रोगा-

सारखे ) असेच खाद्य झाले : ते त्यांच्याच उपयोगास आलें जसे चार रस्त्यावर नेऊन ठेविलेलें, खापरांत वाढलेले षड्रस अन्न, हे कुत्र्यांना 'चा' असे झालें–चाईच्या रोगासारखें असे झालें : त्याना ओढून नेणारें, ओढ लावणारें जसे जीवनच भेटणारे, तेथे–जीवन जसे ओढलें जाते ह्या तहानेनें तसें–त्याना ओढच देणारें होत- ओढून घेणारें होत. हरिणाना जसे 'मृगजळ' हें ओढतेंच, तसे कुत्र्याना हे 'चा' हे एक जीवनास ओढून घेणारे होते

का षड्रस खापरीं वाढिले । वाढूनि चोहटा ठेविले ।
ते सुणिया 'चा' ऐसे जाले । जियापरी ॥५४०॥

येथील उपमा ही अतिविस्तीर्णतेची असून ती ह्या जीवनकलेस कसल्या प्रकारें बरे करणारी होते त काहीं थोडया बहुत प्रमाणाने आपल्या सरस्वतीच्या अंगाचे जे काहीं सौष्ठव ते जसे शद्बच पुष्टी घेणारे ! तेथे कलहाचे अंग कसे विचित्र ते पाहून असणारें–महत्‌चा भारच एक जसा भारच्या भार होऊन त्याने कालाचें दीर्घत्व कुणाच्या आटोपण्यास सहजसिद्धतेच्या भरास आणले ते कसे पाहाणें बरे ! जसे का नभच एक ह्या शास्त्राचे जे गगनाचे होणें तेंच ह्या नभानें आपले असे जे त्यासच तें आणिले व तेथे जे काहीं अमृत अमृताचे आहेच आहे असेच स्पष्टपणास आणून दाखवून दिलेलें–अनुभवातच तें येऊ लागले

तसे, येथे ह्या खापराचे ज काहीं असणे ते जसे का नभच एक, का सुवर्णच एक ह्या नभावर वाजणारे, का नाळेवर त्या वंशाच्या वाजणारें–तेथे तो वंश हाच ह्या नभावर उगवणारा एक का कोंभ, का दंड, का बाल, का टालक, का गाभा, का स्थाणु, का खांबच एक ह्या नभास टेकवून तें सर्व नभच त्याजवर उभे केले असे ते उगवणे असल्यानें, तेथे ह्या देहाच्या आजूबाजूवर टेकणारें आकाश, का नभ, का व्योम हेच आक्रमिले गेल्याने, एक दाबच ह्या 'शेवटीं जो जन्मला' त्याजवर पडल्यामुळे तेथेंच ते सर्व रस हे जाऊन पोहोचले व आता काय षड्रस भोजनच एक त्यास मिळालें : षड्रस अन्न, नवरस गायन, पंचरस धातु, नवविधा भक्ति, सर्व रसजीवन–व सर्व जो ह्या शरीरावर असणारा दाब–जेथे अमृताने किंवा तांदुळाने अलंकारणे तेच ह्या सर्व भोजनास पोहोचतें होऊं लागल्याने, तेथ जीवनकलहच ह्या जीवितास देऊ करणारे होऊन तेथे आता त्या सुणियाना तर एक तुटून पडणेच करू लागलें–ओढच देऊ लागले–ओढून घेऊ लागले : कोसळणेच एक देहाचे किंवा जीविताचें होऊ लागल्याने, तेथे आता ते काय 'वाजणेच', 'ओढणेच' एक खल्वाटाचे झाले–जसे का भुलणेंच त्या मृगजळानें हरिणाना जीवनासाठीं ओढून घेणारे–तेथे आश्रयच एक होत आहे असे त्रासणारें झाल्यामुळे, हे जीवित आपले जीवितासच विसर्जन एक जसे सर्व जीवित हेच दिसूं लागल्याने, तेथे कसला तो आनंद कोण जाणे : परंतु त्याने मात्र त्या जीवनकलहाचे अंगानें असणारे ते जीवित हेच मुळीं आपल्या त्या दोषाचे असे–अन्नाअन्नाचे जे काहीं ह्या देहामध्ये भिनून असणे–तेथील जो परिणाम तो कशानें तरी शद्बानें म्हणा–का भावाने म्हणा झेपलेला हा पाहिजेच, तरच तेथे शांत लक्षण ! नाहीं तर तें जसे का ह्या देहावरील दाबास, आकाशास विदीर्ण करून, जेथे तें त्या शद्बाचे का भावाचें झालें असेल, तेथेच आपले जीवित हे ओतणारें होते–प्रेम सर्व तेच देऊन टाकलें असे होते : तेथे जीवनकळा, जीवन-प्रेमा, जीवनसाररहस्य, जीवनभातें, जीवनजगत् हें जसे त्या पंचभूताना एक चेव देऊन असणारें झाल्यानें, तेथे तें पंचप्राणाचे झालेलें ते जीवित हेंच एक त्या जीवज्योतीचें तेज (आपलें) तेथें ओतू लागतें : मग काय चैनच जशी–बहर पुढें झाला–चहातीच एक झाली–चहाच झाली–वाहवाच वाजू लागली : 'चा–सा' अशी झाल्यानें तेथे देहावरील जें दडपण–दाब–तोच ह्या नखचंद्रानें–नखें काय चंद्रासारखीं अशी जी उपमा तिनें–त्या दाबावर आपलें सर्वच्या सर्व आयुष्य त्या चंद्रासारख्या नखांचें

जे ते त्यानीं चंद्र देऊन नखाचे केले व आतां तो जीवनभार-प्रकाश-परिवर्तनभार-हाच स्वत.च्या देहावरील हरवल्यामुळे तेथें दंशच हरवला : सर्वच्या सर्व सुदश हाच हरवल्यामुळे आता पुरुषत्वाचे अंग, पौरुषाचे अंग, हे काहीं तेथे लव उत्पन्न करीचना : तेथे मश्रू म्हणा (का स्मश्रू ?) का बाळशाचे जे लव फुटणें ह्या ओठावर तेच आपला भार हरवल्यामुळे तेथे दंशच होईना : शद्बच हरवला, प्रेमच ओतून घेतले व आतां काय तेथे जीवनकलहाची सर्वच एक बाजू त्यावरच कलती झाल्याने, तेथें जसे का ह्या कुत्र्याना खेचणारे असेच त अन्न झाले : तें काय कसे ह्यापेक्षा आणखी बोलण्याचे करावें तें काहीं जे ते ज्याचे त्यानेंच आपल्या समजुतीस घ्यावे : तेथे सर्व खेच, तुटून पडणे-ओढ हीच मुळीं आपले जीवनच एक आहे असे घेतल्याने, तें काय भक्तिहीनाचे असे एक . ' सुणिया ' ना उपयोगाचे झाले-सुणियाना तें आपली ' चहा 'च तेथे होत आहे, व तोच आनंद असे सरण रजाचे कां नव्हे असे झाल्याने, तेथें प्रकाशाचे परिवर्तन का ह्या जीवनकलेचे एक शुभ्र का श्वेत का पाढरे असेच त असणारे ते जीवित नव्हेच असे-तेथे फक्त ह्या दतिन् नावाखालीं येणारे जे गजचर्म तेच जसे का कोण जाणे !

म्हणून येथे ' आजा का पणजा का खापरपणजा ' हेच जसे एक देहधारण तेथे ऐकणेच नाहीं अरे, ह्या प्रेमास पाहा-प्रेमाची गोष्ट ऐक-असे कितीहि जरी सागितलें, तरी ऐकणारे नाहीं : म्हणून त्यास असेच सबोधिलें कीं, खापरा, अरे तो शब्द हा साध, प्रेम हे पाहा, लक्ष येथे दे, हेच तुझे जीवन, हेच प्रेमलक्षण, हे न घेता उगीच का आपले काळीज फुटून घेत आहेस असे सागणारे ते ह्या सहा रसाचे झालेले जे हे का देहधारणच एक त्यास आपले प्राणकळेचे अग पाहा म्हणणारे होऊन त्या प्रेमाविषयींची गोष्टच बोलत आहे

तेथे जिव्हाळा हा पवित्रतेचा असून त्याने ह्या देहधारणेसच एक क्षण देऊ व्हावें असे सर्व प्रेमच एक त्या सर्वेश्वराचे नव्हे कसे ? तें ह्या बुद्धियोगासच आळविणारे असे प्रेमलक्षणच एक ! (४४०)

त्याप्रमाणे भक्तिहीनाचे जिणे-जगणे-जीवित जगणे-आयुष्य कसेबसे काढणे-ह असून, तें का म्हणशील तर तेथे सुकृत हे कशाप्रकारे करूनहि-स्वप्नामध्येहि पण-त्याचे होतच नाहीं-सुकृत हेंच म्हणूं करितें कीं, भक्तिहीनाचें मीं केव्हाहि व्हावेंच न : व सुकृत जर नाहीं, तर तेथें ह्या संसारामधील अनेक दु.खानाच जसे वाढून यावें असे म्हणूं करणे होय : आवतणेच एक त्या समारदुःखाना देणें हे जर तेथे सुकृत नाहीं तर होणारे होतच. (४४१)

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥ ३२ ॥**

व्यपाश्रित्य = सगुणाचे आश्रयभूत होऊन स्युः = आहेत पापयोनयः = पापयोनी – अभावात्मक, ओस, जेथे अक्षराचे, भावाचे जन्मलेले नाहीं तें वैश्याः = कृषी, गोरक्षण व वाणिज्य करणारे जे शूद्राः = परिचर्या करणारे ते पराम् = श्रेष्ठ गतिम् = पावनात्मक होणें जे तें

पार्थ, माम् हि व्यपाश्रित्य ये पापयोनयः स्त्रियः वैश्याः तथा शूद्राः अपि स्युः, ते अपि पराम् गतिम् यान्ति ।

मला सगुणाचे करून–सगुणाच्या अर्थाचे करून–जरी ज्या पापयोनी होत तरी–त्या योग्य दाबात ठेवून वागविल्या जाणाऱ्या स्त्रिया म्हण, किंवा कृषी, कर्म, गोरक्ष्य, वाणिज्य करणारे असेहि म्हण, किंवा परिचर्या हेंच महिमा होऊन आले ते शूद्र म्हण–अशा जरी असल्या, तरी त्या श्रेष्ठ गतीस पाहाणाऱ्या होतात–उत्तम गतीस जातात. ॥ ३२ ॥

म्हणोनि कुळ उत्तम न व्हावें । जाति अंत्यजहि होआवें ।
वरी देहाचेनि नांवें । पशूचेंहि लाभे ॥ ४४२ ॥
पाहे पां सावजें हातिरूं धरिलें । तेणें काकुळतीं मातें स्मरिलें ।
कीं तयाचें पशुत्व वायो जालें । पातलेया मातें ॥ ४४३ ॥
अगा नांवें घेतां वोखटीं । जे अवघिया अधमाचिया शेवटीं ।
तिये पापयोनीहि किरीटी । जन्मले जे ॥ ४४४ ॥
ते पापयोनी मूढ । मूर्ख जैसे कां दगड ।
परी माझ्या ठायीं दृढ । सर्वभावें ॥ ४४५ ॥
जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टीं भोगिती माझेंचि रूप ।
का जयांचें मन संकल्प । माझेचि वाहे ॥ ४४६ ॥
माझिया कीर्तिविण । जयांचे रिते नाहीं श्रवण ।
जयां सर्वांग भूषण । माझी सेवा ॥ ४४७ ॥

(४४२) न व्हावे – नोहावे लाभे – लाभो (४४३) सावजे = नक्रानें हातिरू = हत्ती पातलेया – पावलिया (४४४) वोखटीं = अमंगळ अवघिया - आवघेया (४४५) मूढ – गूढ (४४६) आलाप = गुणानुवाद भोगिती – भोगी. (४४७) रिते = रिकामे सर्वांग - सर्वांगीं

पापयोनयः मा व्यपाश्रित्य परा गति यान्ति :- उपदेशाची जाती जी तेथे धर्म हाच आपल्या धर्माचा म्हणजे एक एक पृटच धर्मधारणेचे वसत गेलें असे तें जे काहीं उपदेशानें आता आंतच येणें पाहिले, व त्यानें ती जी ह्या स्वभावाची रचना ती कोठे मजेदार अशी मनास रंजन देणारी अशी ती पाहून, तेथे मग ह्या दुसऱ्या बाजूऱ्या चढ वृत्ती पाहून आपण तेथे नमन केले : त्याचप्रमाणें जे काहीं लक्षलक्षण ते भाराचे केव्हा व कसे तेंहि लक्षात घेऊन, आपण त्याच्या दुसऱ्या बाजूस टेकून, तेथे आपले लक्ष हे उदित आहे असे पाहिले-उदित असेच ते लक्ष करून घेतले : त्याप्रमाणें ज्या ह्या पाल्हाळाच्या बाजू त्याहि पण जसा उपदेश-एक प्रातच ह्या शरीरातील असल्यानें, तेथे तो तो प्रात हा प्रगाततेस कसा घ्यावा, शात असा केव्हा व कशाने होईल तें पाहून, तेथेंहि पण ते तें महत्त्व हे दिलें, स्वभावाचे केले, व्यवहारास घेतले-वृत्तिच तेथे भाराची केली : व आता तीं जीं दुर्लक्षतेचीं प्रमाणें खोटंच (नाटच) करणारे असे जे कामाचे त तेथे ती खोट (खोटी) म्हणजे नडविणे हेंच बाजूस करून, तेथें शात लक्षण हेच आपल्या धर्मास पाहूं देऊन-देहधारणधर्मास-धर्मधारणेस पाहूं दिल्यानें, तेथे तें सगुण हेच हीं वरील सर्व (विधि) विधानें पाहूं करून, तें सगुण झाले ते सगुणास मुळींच सोडीना : असे तें शरण असे म्हणणारे, मजला आसरा दे असे म्हणणारे, मजला आपण जे मोठे आहात त्यांचा आश्रय मला असावा असे म्हणणारे ते ह्या सगुणासच इतके लिगटून जात कीं, तेथे हें जे देहबुद्धीचें वारे तेंच मुळीं बद झाले व त्यानें सगुणासच चिकटून राहाण्याचें केल्याने, आता ते जे आपल्या जवळच असणारे ते ह्या देहाचे प्रात-अथवा देश-ते सर्वच त्यानें आपलेसे करून त्या सगुणत्वासच आलें-ते सगुण रूपाचे झाले-असे तें पारच होणें ह्या उप-देशाचें जसे : तेथे ह्या देहाचे व्यापारमात्र हे त्या एका सगुणावरच चालणारे, टेकणारे असे झाले : तसे ते मजला केल्याने त्यांना परा म्हणजे श्रेष्ठ गति ही ठेविलेलीच होते-असतेच म्हणूनच माझा आश्रय स्वीकारून असतात ते, हे पार्था, चाडालादि पातकी असोत, स्त्रिया, वैश्य किंवा शूद्र असोत, तरी देखील ते सर्व श्रेष्ठ गतीला प्राप्त होतात.

म्हणून उत्तम असे जरी कुळ नसलें, तरी हरकत नाहीं-जाति ही अंत्यज अशीहि जरी असली, तरी होऊं देत, व याहिवर हा देह हा जो लाधला आहे, तो कदाचित् पशूचाहि हो-पशूच्या देहानेंहि जन्मणें हो-देहधारण हे पशूचेंहि हो ! (४४२)

पाहा बरे ! त्या सावजाने हत्तीसच धरिलें-तेथे तें हातिरू अगदीं जेरीस येऊन, काकुळतीपणान, मजला त्यानें स्मरण्याचे केले व एवढयावरच त्याचे ते पशुत्वानें असणे ह नाहींसे झाले-मजशीं येऊन मिळाल्यामुळें त्याचें पशुत्व, पशुपण ह वावच झाले-नाहीसे झाले-तसे ते नाहींस होऊन तें जसे का एकागतीस आले-फोल झाले !

ही कर्मभूमि असल्याकारणानें येथें-' न तदस्ति पृथिव्या वा दिवि देवेषु वा पुन. । सत्त्व प्रकृतिजै र्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ '-कोणीहि म्हणून ह्या गुणकर्मापासून सुटला आहे असे नाहीं येथ गुण, कर्म, भाग, विभाग, शीण इ नीं ही कर्मभूमि आहे हेच निश्चित करून, ही जी देहधारणा, हा जो मनुष्यजन्म, हें जे जन्मणे ते, शरीरधारण हेच मुळीं एक कर्मभूमिच एक असेच प्रतिपादनात घेतले असल्याने, येथे देह ह्यासच कर्मभूमि म्हटले गेले

आता कार्य, दैव, नशीब, विधि, भाग्य, प्रारब्ध इ नीं हा ' कर्म ' शब्द पाहिला गेलेला असल्याने, तेथे कर्म म्हणजे नशीब किंवा दैव असे म्हणत म्हणतच बाकीच्या अनेक शब्दांनीं ह्या भूमीवरच आपला शिरजोरपणा चालविल्याने, येथे कर्म हा शब्दच दुसऱ्या अनेक शब्दामधील अनेक सौरस्ये घेऊन असलेला, त्यानीं त्या सौरस्यानीं परिणाम केलेला होऊन, तो काय सहज आकळिला . तेथ त्याचा जो वेध हा काय सहज आकळिला जाणारा नव्हेच म्हणून येथें कर्म कर्म करीत बसूं नको-माझ्या कर्मातच नाहीं असे म्हणून उगीचच उसने तूप लावीत बसूं नको . ह्या कर्मापासून कोणाचीहि सुटका झाली नाहीं : काय देव, काय राजा, काय मनुष्य, काय गधर्व, काय दानव, काय रक, इत्यादि सर्वांना हें कर्म लागू असल्यान, तेथे कर्म म्हणजे गुणकर्म होय गुण म्हणजे लागलेला जो वेध, सहित (सह) गुणानें असलेला तो, ह्या सगुणासच पुढे करून, तेथे कर्म हे दैव झाले-दैव होणारे होत-मग तेथे त देवाचें, का सिद्धाचें, का किन्नराचें, असे ज्याच्या त्याच्या ज्या त्या जाति म्हणजे प्रकारानीं काम करण्याच्या तऱ्हानीं-सुकृत पाहाण्याच्या तऱ्हानीं-ते प्रस्थापिततेचे होऊन, तेथे मग जसा काय एक बोजाच ह्या सगुणश्रीवर बसला गेल्यामुळे, तेथें हीच मुळीं अगोदर पुढे घेऊन, तेथेंच सर्व आपला अंदाज, अथवा प्रकार, अथवा व्यवहार, अथवा व्यापार, अथवा पोषाख हा जर अलंकार असा करून चढविला गेला, तर तेंच येथे कर्मभूमीचें रहस्य हें असून तेच एक ह्या कर्मासच मुळीं पुढे येऊं देत नाहीं

ह्या मनानें जसा का एक ध्यासच घेतला-त जेव्हा तेव्हां ह ध्यासाचे प्रारब्ध करून, तेथे प्रारंभच मुळीं अडविला गेल्याने, तें ' कर्म कर ' असेच ह्या कर्माचे जें निकृष्ट स्वरूप त्यातच वसविलें जातें : येणेंकरून तो त्या प्रारंभातच बसला गेला. म्हणून येथें जसा एक देवच आपली दानत पाहविला गेल्यानें, तेथे कर्म हें दिव्य असे होण्यानें, तेथे प्रकाशमान होणारे तें आकाशच सर्व प्रकाशूं लागलें व आतां कर्म हेंच मुळीं ' प्रारंभाचे झाल्यानें ', तेथें सर्व प्रकाश आल्यानें, तो देवच मुळीं ह्या भूमंडळावर उतरला व ह्या मनुष्यदेहानें वावरूं लागला असे होऊन जातें.

म्हणून कर्म हें जे तें ह्या जन्मास पाहातें, कर्मास पुढे घेऊन असतें, दिव्य असेच तेव्हाचें असे म्हणतें. तत्त्वानेंच तत्त्वास पाहिले, तत्त्व तत्त्वांत बसले, तेथें मग ह्या तत्त्वानीं, भूतानीं, आपले भाव्य आपणांसच करून घेऊन, तीं भूतें ही स्वाभाविकपणेच प्रसन्न होऊं लागलीं-व भूताची प्रसन्नता हीच मुळीं ती भाव्य अशी जी एक त्यांना दिली जाणारी अलंकारवजा घटना, तीच तेथें प्रस्थापिततेची

झाल्यानें, आतां तीं तत्त्वें अथवा भूतें हीं आपणें गिन्वासूत्र ह्याच दिव्यतेपासून उचलूं लागलीं : ह्या दिव्य अशा कर्मानें त्याना सहजपणेंच एक अनुकारणा-करुणा-दिल्यानें, तेथे तीं भूतें हीं प्रसन्न होऊन आलीं : परतु येथे जें एक त्यानीं करण्याचें तंच मुळीं उपकाराचें-उपचाराचे असेच का नव्हे बरें ? परंतु ती भावना ही भूताना आली व ती अगोदर भाव्य झाल्यामुळेंच तितकी दूर पोहोंचली असे त्यानीं म्हणं आदरण्याचें केलेच नाहीं : जे भाव्य झालें तें भावनेप्रत आले-तेथे आता भाव वर येऊं लागला, तो एक तर भोजनभाऊ असा झाला, व दुसरा भाव्य असा झाला व ह्या भाव्यानें तेथे भाव वर येऊ दिला गेल्यानें, तेथे तंच एक सहज देवतेचें लक्षण हे ह्या मनुष्यास अलंकार घालून असल्याने, तेथे देव हेच देवदिव्य असे आता वर येऊं लागून, त्याने आपली साखळी आता देव-भाव -भावना-भाव्य-भूत-तत्त्व अशी करून ठेविली : म्हणून येथे कर्म हेंच ह्या मनास एक डाव देणारें होत-तें चितासच मुळीं पाहात नाहीं-चितासच त्याजकडून पाहविले जात नाहीं : व तसे झाल्यानें जें गुणत्व ह्या कर्मावर उभे राहाणारे तच मुळीं आता आपले सगुणत्व हरवल्यामुळे कर्मासच पाहूं लागून, तेथे कर्मदिव्याने आकाशच सर्व आक्रमण केले-व तंच त कर्माचे असे सकल्पाचे-कल्पनेचें--कल्पब्रम्हाचें झाल्यानें तेथे कल्पच जसा त्या ब्रम्हाचा-तो फिरूंच लागला

म्हणून येथे जे सगुण ब्रम्ह-मनुष्य देहाने असणारे जे सगुण-नामरूपादिश्रींनीं घेतलेलें जे अक्षर-तें गुण घेऊन, गुण लागून, उच्चाराचा गुण लागल्याने-तेंच देव असे म्हटले गेले

म्हणून येथे ते कर्म हच मुळीं सुकृतशतावर उभे राहाणारे असे असतें : जर सुकृत नाहीं, तर इतर ज्या काहीं समारंभणा त्याच मुळीं उत्सवान्या अशा बुद्धीसच अधतेचा एक समारंभाचा आनंद देऊन असल्यानें, तेथें मग काय कर्म, काय सुकृत, हेच मुळीं लपविले जातें तेथे ही चित्ताची जी रंजना हीच तो विश्वाकार घेऊन-पाहून-दिलेला होऊन-ह्या ग्रहमंडळानेच जसा एक वाहनाचा प्रकार होऊन, तेथे तेच ह्या कर्मासच वळण, अथवा श्वासासच एक वळसा दिला असे होऊन, तें ह्या दैवासच मुळीं, कर्मासच मुळीं, नैष्कर्म्य नच करता, तेथे कर्म कर्म असेंच एक घोकणेंच पाठीं लागणारे होतें येथें संकल्पाचा बाजारच मुळीं त्या सगुणास हार (हारी) देणारा होतो : व दैव आता जे तें दुसऱ्याचें असेच झाले : म्हणून ह्या कर्माप्रमाणेच तेथे घटना अथवा व्यवहार असावा लागत असून, ह्या भूमि-भेदानें अथवा पातळी बदलल्याने ते कर्म हें आपले नैष्कर्म्य पाहू लागते : हे दैवाचे म्हणा अगर कर्माचे म्हणा तडाखे कमी अधिक प्रमाणाचे होऊन, ह्या मनुष्यास त्याचा तो दैवीशक्तीचा एक लागाबांधा, एक सुरेखसा डौल किंवा तारतम्यवजा झालेला सहज-भाव-सुंदर किंवा व्यवहार्य असाच एक प्रकार पुढे होऊन, तो ह्या प्रकृतीस रंजन देऊ लागतो : तेथेंच ते शात तत्त्व हें प्रस्थापित झाल्यानें, तेथे चित्त हे स्वाभाविकपणेंच प्रसन्न होणारे व आता ते प्रसन्नपण हेंच मुळीं ह्या-काय पुरुष काय स्त्री अशा ह्या-जन्माचा एक स्वाभाविक असा अलंकार असल्यानें, तोच 'देव असे असणारे तें', तेथें सहजपणेंच पूजन झाले : व पूज्यतेचा जो एक महिमा तोच येथे प्रभावाने वागूं लागल्याने, तेथे महत्त्व वडील-धाकुटा-लहान-पोरपण-बाल्य इत्यादिनीं ते चित्तच मुळीं-ते शातस्नेहच मुळीं-आपल्या सर्व स्नेहाचें महिमान घेऊन आल्यानें, तेथें अनेक व्यवहार हे व्यवहार्य-योग्य असे काम करणारे-आपापल्या कामात रंगणारे -जें जे ज्यानें अंगीकारले त्यातच त्याने बसणे करून-हे जे शातस्नेह हेंच मुळीं तेथील सूत्र असल्यानें तें सूत्र ह्या सर्वांना पुरून असतें-पुरवून चालणारे होते-पुरवितें होते : हा स्नेह हाच मग एक दिवाच लागला, तेथें देवच प्रकाशविला गेला-तो देवच महादिव्य पुढे घेऊन चालत असणारा असे तें सहज, स्वाभाविक, परमदिव्य कर्मच आतां देवपण झाले : तेथे कल्पच मुळीं ब्रम्ह झालें व त्यानें शांत प्रशात असेच लक्षण घेऊन तें सगुणश्रीसच लिगटून राहिलें.

आपल्या सत्त्वाला जागले पाहिजे असाच एक ' ओनामा ' ह्या प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्यांना दिलेला असून, तेथे ह्या सुरासुराना हाच महत् भाराचा असा दिव्य सदेश हाच पुढे होऊन चालत असलेला असतो

सत्त्व हेंच मुळीं सुख असल्यानें तेथे सुख–असुख, अवैधव्य, अहेवपण हेच मुळीं प्रत्येक योनीचे सौभाग्यलक्षण : तेथे ती प्रकृति हीच मुळीं महत देववर ह्या भूमडळावर डोळे उघडून चालत असणारी झाल्याने, तेथे तीच जशी आपल्या सत्त्वास जागली–तीच जशी एक खरोखरीच अशीच, आपले स्नेह-मार्दव घेऊन चालत असलेली अशी–माताच नव्हे काय ? येथे काय कोणी वगळिले जातात असे नाहीं तेथे सर्वच्या सर्वच मुळीं हिनें आपलेच देवतातत्त्व आपल्यास पाघुरविले असे पाहून, ती अति प्रसन्न होऊन ज्यास त्यास त्याचें तें सुख हे पुरवित

सुखाचे असे जे ते बाहेर दिसणारे कसे म्हणशील तर–जसे काय जडत्वच आभाराचे -किंवा जड-भार एक–अवजड किंवा अवघडलेला भारच तेथे–असे दिसणारें, परंतु ते तर सत्त्वाचें असेच सत्त्वास पाहाणारे असेच त्या सुभगेचें एक रम्य ठिकाण होऊन असावे असेच तेथे म्हणणे हे पुढारून आलेलें

काय ह्या योनी–पापयोनीच म्हटल्या गेल्या -तेथे पापपुण्य समान झाले म्हणजे हा मनुष्य-जन्म येतो असे म्हटले. तेव्हा हे कसे बरे महद्‌भाराचे असेच एक योग्य तेच ह्या बुद्धि धीस पाहा म्हणणारे होऊन, तेथें आता त्या मनाचे 'म्हण' (महत) अशा स्वभावाचे रम्य असे जे स्थान तें कसे पाहूं लागणारे होतें तें पाहूं

व्याप हा मोठा–त्याचे व्यापकपण हेंच कसे पाहावें–तो व्यापकत्वाचा आहे–माझे व्यापकत्व जो जाणतो तो सहजच मला पाहातो–असे माझे जे व्याप्यव्यापकत्व भावाचें जे परम दिव्य लक्षण तेंच पाहा, म्हणजे तेथे हें जे काहीं एक म्हटले जाणारे ते व्याप्यव्यापक भाव हे सहजपणेच तुजमध्ये वस्तीकर होतील : तेथे अतर हें पाहा व बाहेर हेंहि पण पाहून तेथे अनर्बाहि. हें कसे व्यापून असणारे तेंच जसे का एकाद्या शद्बाचे उच्चारणे ह काय त्या नभानेच उच्चारिले तेथे सर्व व्यापकता ह्या देहाची घेऊनच तें उच्चारणे झाले : व आता ह्यान्याचवर उभे राहणारे जे दुसरे त म्हणजे जागृति-स्वप्नादि अवस्थानीं निरनिराळे होऊन तेथे मूळचे नामवर असे व्यापक तें मूळच्या त्या व्यापक अशा नामावर किंवा उच्चारणावरच टेकत असलेले होय.

' प्रकृतिं स्वामवष्टभ्य '–असे असल्याकारणानें तेथे स्वामी म्हणजे साक्षीच एक ह्या प्रकृतीवर लक्ष ठेवणारा असल्यानें, तेथे स्वामी स्वामी असे जे एक रूप ते काहीं ह्या मनास शह लावणारे असे करून नसल्याने, तेथे एक प्रकृतीच एक देवतास्वरूपी झाल्याने–तेथे आपणच आपलेपण पाहूं आल्यानें–मीच तो जो प्रकृतिभाराची मत्ता–तीच मुळीं 'स्वाम' आपली अशी तीच मुळीं ह्या स्वामीसच म्हणा वाटेल तर, किंवा स्वतःस, किंवा देवास म्हणा–म्हणजे देवच तेथे एक जन्मला असे ते प्रकृतीचें स्वाम प्रचुरतेनें असलेले जे तेंच देवत्व होय !

येथें प्रकृति हीच सत्त्वप्रधानतेच्या अगानें असणारी किंवा सत्त्व जसे हे किंवा सत्त्व टाळायास लावणारीं अशीं जीं अनेक श्रमभाडारे तींच मुळीं ह्या स्वामीसेवेसच एक पुढे करून असल्यानें, तेथे अहो ! कां बरें येथे ह्या स्वमानाचें जे सहज ते नडविलें जावे असे नकोच : तेथे सहजसेवा–प्रकृति जी आपली स्वतःची तीच मुळीं विलसूं लागल्याने, तिचा जो नैराश्यविलास अथवा संगसाहित्यतेनें केलें जाणारे जें एक प्रभवन तेंच मुळीं ह्या व्यापास-व्यापकत्वानें असलेल्या ईशतत्त्वास–ईशास–शरण

असाच उच्चार करणारी होऊन असते . तेथे ते व्यापक असे जे ' ईश अग ' तच आश्रयभूत झालेले-करून ठेवल्याने-येथे त जे शरण या शद्वाचे गृह-मार्दव सौख्य लक्षण हेच आश्रयीभूत अथवा आधार होऊन, त्यानेच ते शरण्य हे पाहू केले. तेथे घरच एक गृहच न-ह्या प्रकृतीसच आलेला जो स्वामीसेवा-संबंध तोच येथे स्वत.वरच टेकला . त्याने स्वत.चे जे एक ह्या ' सत्त्व ' सुखाचे अग ते मनमुक्त असेच एक ' आपलें सत्त्व हरवं नको ' म्हणणारे असल्याने, तेथे अनेक देवदेवताना आपापली जागा ही पाहावीच लागने-सापडती करून घेऊन तेथेच मग त निरभिमानतेचे लक्षण हें सहजसेवा-प्रेमच एक तें-सुखाचे असेच लेणे-त ह्या शरीरयष्टीसच मुळीं ' अहो या शरीरास थोडे फार कष्ट होणे ह जणं एक व्यापच पाहविणारे असल्याने, तेथे शरण हच एक गृह त्या देवताना प्रिय होऊन असणारे होत

आता ह्या ' पाहा बरं ' ' किंवा ' बरं पाहा ' असे जे, ह्या बरं ल्यावे, बरं नेसावे, बरं खावे, हे परस्पर परिणाम करणारे त्यात-किंवा त कसे काय जीवनयात्रेस पाहाणारे त म्हणजे एक व्यापच आपल्या व्यापास-व्यापकत्वास-अतर्बहि. असा परिघ पाहू लागून-परिघ देऊ करून-त्यातच रमणारा होतो : म्हणून जी काहीं एखाद्या भाड्यामधील जागा किंवा आकाश ह त्या व्यापकत्वास कसे बरं व्यापाचे करणारे किंवा व्याप तरी तेथे कसला हे काहीं समजण्यासारखे कदाचितच !

आतबाहेर व्यापून असलेलें गगन हे का त्या भाड्याचा आकार वाढविणारं किंवा कमी करणारें असे नसून, येथे ह्या देहासच मुळीं त अलकारणे ते आतील जागा किंवा माया ही मायाच नाहीं असे न करून, तेथें ताणच एक दिला गेल्यानें, ते मन-देह कारण-अत करण-हे ह्या जीवदशेस-प्रेमास देहास-आपला व्याप हा म्हणजे काय प्रेमाचा का व्यवहाराचा का विनेचा का सेवेचा असा लक्षणाचा करून असते · तेथे ते जे वर बोलणे तच बरोबरीने बरोबर अशाच रीतीचें होऊन, ते कामच मुळीं उचलून घेऊन डोक्यावरच जसे त घेतले, त्यास महत्त्व दिले, माझे आहे असे म्हटले-तेथे मग प्रेम एक ते व्यापच घेऊन त्यातच रमं लागले · तेव्हा आता ह्या पुण्याच्या किंवा ईश्वर गोष्टींना काहीं काय रग यावा असे नाहींच-येथे सहज रग रगाचा झाला, उठावदार झाल्याने एक प्रेमाचे सहजत्वच तेथे उगवणारें होय

पापपुण्याची गोष्ट ती कशी बोलावी बरे ! कशी ती बोलास तरी येते काय ? निराळेपणाने असणारे जे अंग त्यास बरेपणाचें असे पाहा म्हणणारे त जे ह्या वणिकचे अग त ह्या भूमीस एक आपले आश्रयाचें करून तेथे बरं पाहाणे-आश्रयाचे करणे तुझे बरं होवो असे म्हणणे काय ती जी भूमिसेवाच एक ती आता आशिर्वाद देणारी अशी होणारी नव्हे असे कोण बरे म्हणेल ! ! येथे काय तें पाप म्हणावे-कां ते पुण्य म्हणावे-तेथे पाप म्हणजे पाहा, पाहा, आतमध्ये पाहा,-ते पाहाणें कसे असतें म्हणशील तर ते ' बरेपणाचे असे '-तुझे बरे होवो असेच एक मशागतेचे अग तेथें काय ते पाप कां पुण्य बरें !

एखाद्यास बरं पाहाणे जर केले, तर तेथे त्याचे हित कशात आहे तेच करावे लागणारे होय : येथे आता ही जी देहधारणा तीहि पण मूळ पाहावे तो अगदीं जसे पापपुण्याचें मिश्रित असे एक सचित प्रारब्धाने वेढिलेले असे तें, तें काय आपल्याच छंदानें जर होऊं केलें, तर कदाचित् बाहेरून येणारा एखादा अलंकार हा त्यास सुबुद्धीचा करून तेथे त्यास ' तुझें बरे होईल ' असेच एक म्हणणे होय : ते बरें होणें हें मात्र अगदीं लिगटूनच त्यास असल्याने, तेथे जशी ही जमिनीची मशागत, तशीच ह्या वृत्तीची मशागत एक करावी लागणारी असून, तेथे ह्या पापपुण्याच्या गोष्टीच मुळीं पार लोप पावणाऱ्या होतात. तेथील मागील सर्व विसरलें तेथे ह्या संतांच्या कृपेनें म्हणा-अथवा एका सेवेनें

म्हणा-तेथें हीं जीं पापें म्हटलीं गेलेलीं तीं तर जशीं पुण्येंच झालीं तेथे वृत्तिच मुळीं फिरवून घेतल्यानें जें पाप तेंच दडून बसले व त्यानें पुण्यच वर आणल्यानें-वर येऊ केल्यानें-तेथे ही वृत्ति हीच आता काय पुण्याची म्हणावी कां पापाची ! म्हणून येथें जो काहीं भेदभाव पाहाणारा डोळा तोच मुळीं आपली भुवई ही सरळली झाल्यानें, त्यास आता हे जे काहीं वृत्तीचे करणे ते सरळ असेच दिसूं लागलें : तेथे पुण्य वेळाच एक-त्या भेदास अभेद भक्तीचे महिमान पाहाण्यास लाविल्यानें, तेथें विभक्त हें नच होतां तेथें स्वभावच-भावच एक स्वभावात बसला : प्रकृति प्रवृत्तिप्रकृतीसच लिगटली : आकार आकारास आला, प्रमाणाचा झाला : उच्चार हा स्वर सुखाचा एक उच्चार असा झाला : व आता ती जी माता तीच मुळीं प्रकृति-भक्ति-असल्यानें, हंसाचे जसे एक मिळून जाणे तें भक्ताचें झालें-भक्तीस आलें-एक-जात एकजातात मिसळले-निराळे नच राहिले : तेथें प्रकृति ही आकार घेऊन संभावनेस आल्यानें, तेथें उच्चार हाच झाला व तेथें नाम हेच उगवले आता तीं पापें म्हटविलीं गेलेलीं-नावे ठेविलेलीं-तीं पुण्येच झालीं व आपल्या भक्तकोटीच्या सीमेसच लिगटून राहिलीं-‘ पुराण प्रसिद्ध सीमा ’ अशी झालीं ! ! (४४३)

आतां पशुत्व कसे बरे ह्या योग्यतेस येणार ! अहो ! पशुत्व हे काय देव होऊन येणारे असे कसे ! तर नावेच घेतलीं-नावेच टेविलीं-निंदाच केली . विश्व हें गवाप्रमाणेच वागविले : तेथें ज्ञानसपर्क हा पाहिलाच नाहीं-सज्ञान, जाणणे, जाणते होणे, जाणतेपणाच जे जाणतेंपण ते वागविले नाहीं . नुस तेंच जाणतेपण हें ‘पुस्तकीविद्या’ असेच त्यानीं नुसत्या पुस्तकावरच टेकून, टेकवून ठेविले : त्यानीं काय तें एक निंद्य असेच दुसऱ्यास पाहून म्हणूं केले . स्वतःसच मोठा शहाणा असेच म्हण करणारे अहभावन हें आत्मस्तुतीचे पोळणे पाठीशीं वाहून, त्याचा मोठा थोरला भाग आपलासा केला : त्याना दुसऱ्यास पाहाणे हे म्हणजे स्वतःचे मोठें ज्ञानाचें असेच एक आपलेच महत्त्व हे जेथें तेथें पुढे घेऊन असल्याने, तेथें निंदा हीच त्याची त्या जिव्हेची अथवा वाणीची अशी एक अधीरतेची झाल्याने, तेथें चित्तच पुढे येईना : त्याना मनाचा कलच आवडूं लागला व जेव्हा तेव्हा त निंदेचें सुखच एक मोठे आवडते झाल्याने, त्याचें तें भावाचे बळ अथवा मनुष्याचें जे कल्याण ते कसेहि केले तरी पुढे होणारेच होईना : व आता त्यानीं जसा काहीं त्या सर्वांचा उद्धार-त्याना ज्ञानाचें करणे -त्याना पुण्यव्रताचे एक लेणे करणें-ज्ञान दान हेच जसे त्यानीं आपल्याच हातात आहे असे समजून न समजून भला मोठा पापाचा डोंगरच शिरावर घेतल्यानें, त्याची छातीच पार दडपून गेली : व वोखटं, खोटे, असे हें एरव्हीचें बोलणे-तें श्रद्धेचें न झाल्याने किंवा निंदेचें केल्याने, तेथें अवघा भारच ह्या ‘ अ घ म ’ पदाचा केला : तेथें अघ हेच जे त्या ‘ म ’ काराच्या किंवा ‘म’ च्या पोटीं असलेले-तेथे महत् भार, महत् अवघेपण, महत् सकलैक, महत् सर्व, महत् अवघा असे तं अक्षराचें ‘महतो महीयान्’ पद तेंच उलटे चालविल्यानें, तेथें आतां ते कसे बरे जन्माशिवाय, ज्ञानाशिवाय, अभ्यासाशिवाय, प्रेमाशिवाय, त्यागाशिवाय, आस्थेशिवाय, नामाशिवाय, ब्रम्ह ब्रम्ह जे त्याशिवाय, रूपाशिवाय, प्रकाशाशिवाय, बुद्धीशिवाय, आस्तिक्याशिवाय, प्रमेशिवाय, काय सहज त्याच्या अगवळणी होणारे असे नव्हेच-असे नाहींच !

असे ते आता महत् भाराचें जे ‘ निंदणें ’ अथवा ‘ अश्रद्ध ’तेचे जे वर्तन तेंच त्याना हार देऊं लागल्यानें, तेथे काय ‘ पशुच ’, ‘ भेदच ’, भेदभावना हीच त्याना सर्व अकल्याण म्हणन जे आहे, त्यास कल्याणाचे केव्हा बरे करणार-केव्हा बरे करशील-असे म्हणूं लागून, तेथें दीनवाणे असेच एक देहाचें जें वर्तन तेंच त्याना प्राप्त झाले-व आता काय ती पापयोनी नव्हे ? अहो, तेथें मुळीं हा जन्मच तो काय दगडापासून झालेला आहे ! परंतु त्यानीं तो दगडापासूनच झालेला आहे नाहीं असे करून, तेथें जें हाय हायचें जे निंदणें तेंच पुढे घेतलें-व आता तें सर्व सुलट करून सेवा हीच सर्वतोपरी आपली एक

जीविताची अशी मैत्रीची जेव्हां करावी, तेव्हाच कुठें त्या परम प्रेमास पान्हा फुटणारा : व असे ते झाले म्हणजे हा जो जन्म जेथून झालेला तेंच स्वतःचे पुढे घेऊन, परम प्रेमाचें एक सर्व हृदय हालविणारें असे कळवळणे करून, तेथें आतां देवत्वच हा जन्म देणारे होय असे दर्शनच एक मातापितरांचे तें देवत्वाचें देणेच आपलें स्वतःचे असे होऊन, तेथें आता ' उद्धरिजे उद्धरिजे ' असेच आकाशवाणीचें दैदीप्यमान असे अक्षर आकाशास कोंभच उगवला असे दिसणारे होऊन, त्यानें आतां आतमध्येच येणे केले व सर्व देह हा ( जसा दिव्य असाच एक ) देवच तो झाला (४४४)

ह्या पापयोनी जशा मूढ अशाच–का दगडच जसे–परन्तु येथें कसे ते बोलणे कीं, असे जरी मढ, तसेच दगडाप्रमाणेच एक असे, तेहि पण माझ्या ठायीं दृढ असणारे–त्याचा सर्व भाव पाहावा तो तो माझ्या ठायीं दृढ होऊन असलेला . अशा मूढाचें किंवा दगडाचें त प्रेम हे भावासच सर्वथैव पाहाणारे झाल्यानें, तेथें दाढर्य हेच माझे ठायीं झालेले : कारण त्यानीं भावच एक, भाऊच एक, विश्वबाहूच जसा सर्व इच्छा पुरविणारा किंवा सर्व कामे करणारा असा झाल्याने, माझ्या व्यापकतेसच त्यानीं हात घातला व मजला आपलेसे करून घेतलेले : ह्या व्यापकत्वामुळे त्याचा हात हाच मुळी नच पुढे येणारा म्हणजे सहज समजणारा असा नसल्यान, त्याना इतर जनानीं मूढ असेच म्हणू केले–किंवा दगडच असे म्हटले परंतु दगड ह्या उपमेने घेतलेले जे काहीं एक सौरस्य तच मुळीं–अथवा मूढपणाने पाहविलेले जे काही नच भावाचें होणे तच मुळीं–दुसऱ्याच व्यक्तीचें मूढपण हे असून, तेथें लक्ष्य नच असल्यानें, त्या भावास किंवा स्वरुपास नच पाहाणारे असल्यानें, तेथें ह्या तल्लक्षणेनें जसे दुसरे एक असे दर्शविले जाऊन, तेथें देवपण हे स्वत.वरच उभे राहिलेले पाहाणारे असेच ते माझे भावाचे–तेथेंच त्यानी आपले स्थान केले

काय ह्या पापयोनीला मूढ किंवा दगडच म्हटले गेले : याचें कारण म्हणजे एक जे ह्या देहधारणेस तो ती योग्यता, व्यापकता, प्रेमभावन, सलग्नतेचें संबधित असे जे करणे तेच मुळीं काय तेथें श्रम किंवा दुःख हे जाणवल्याशिवाय होणेच नाहीं . आणि म्हणूनच तर ते जे योग्यतेचे करणे हे पाप होय असेच पुढे करणे का बरे व्हावें ? अहो, ते सहज होणारे–ह्या देहास कष्टविणे, श्रमभार उचलणे, आर्जवाचें होणे–हे जर नच केले, तेथें नुसतेच जर आळसाचें दर्शन ह लोळणेच एक घेऊन असले, तर तेथें ह्या देहाचें जे सबधी हेच शिथिल असे होऊन, आपला श्वासभार हा व्यापाचा नच करता तो जसा अस्थिर असा चंचलच : तेथें मनच मुळीं गारठा पाहाणारे झाल्यानें, ह्या गृहाची जी काहीं उभारणी–हीच मुळीं जीवितच एक तेथें ती फिरफिरून नवीनतेचें जेव्हा एक पाघरूण घालावे, तेव्हाच ती नीटसा श्वास घेणारी होते : व मग ते त्याचे जे भावाचें, सुबधाचें, जे महत्त्व हे–मजलेच जसे उभविले–असे असणारे तच नाविन्य पाहूं लागून आपल्या प्रतिष्ठेस येण्याचे करते

[ कामक्रोधादि रिपूनीं केलेला महाभयकर वाटवध हाच श्रीगुरूची सेवा उजवून घेऊन दुरुस्त करावा लागत असणारा . व वैराग्य हेच आपले जे तेंच साभाळावे लागते, नाहीं तर घरदार ससार इ हीच मुळीं लावविली जाणारीं होऊन ह्या मनुष्याने अगदीं अभावामध्येच फसण्याचे होणारे होते. परमार्थमहाधन हेच नाहींसे झाले व ते ह्या व्यवहारादिनींच मुळीं ह्या भूमडळामधील एक धन हें मनुष्यजन्म, नरजन्मच, तेंच फसविले गेले ] (४४५)

अशा ह्याना काय दगड म्हणावे ? काय मूढ म्हणावे बरे ? अहो ! त्यांची वाचा रंगलेली अशी, प्रेमआलापाची अशी, त्याची दृष्टि ही माझे स्वरुपींच रतलेली अशी, त्यांचे संकल्प हे मजला वाहाण्याचे करणारे असे ते काय मीच होऊन असलेलो ! असा मीच तो ! (४४६)

त्यानीं माझेंच श्रवण केल्यानें-माझी कीर्ति हीच त्यानीं आपल्या श्रवणास अलंकार केले-नेहमी ऐकणें काय तर त भागानें रूप घेतलेले तेंच त्यांनों ऐकणे हे होत राहिल्याने त्यानीं माझी कीर्ति हीच आतां जीवित्वास आणिली, जिवंत केली · नाविन्यतेचें एक भूषणच तं होऊन-हीच माझी सेवा सर्वांशीं लेणे करून असलेली-सर्व जे त्यांचे अंग तेंच त्यांनीं ह्या कीर्तिरूपाच्या श्रवणानें आपण कानच भरून टाकले, कान भरून ते ऐकलें व ही सेवाच एक लेइली, तीच त्याच्या सर्वांगास भूषणास्पद झाली-ती भूषणच त्याना झाली-सेवा हीच त्यानीं आपलीशी केली-सेवासुखातच ते राहू लागले-रगले !

' विषम '-हलाखी-हलके-रोगणे-हौजणे-सहज-सहाय्य-ह्यात-ह्याती-सहज योगाचें जम उलटणेचें चालणे ते हयाती जशी साहाय्यच-तेथे जातच मुळीं ह' म्हणजे ' ध्न ' होऊन जावी, हीच शून्याची झाली गेली किंवा केली गेली आता येथे देव का दैव का भाव का कोण ह्यास साभाळणार-तारणारे बरे ! येथे जसा एक वचनच, तहनामाच-तेथे वुच्य, वुच्य, का वुचच एक बसले किंवा पायच बच्चदिशी गेला असे काय · येथे तहाहयात हयाती-जसे तागाईत-एक गोष्ट येथे पुढे झाली, ती म्हणजे ह्या निन्या करणे किंवा चुन्या घालणे तें काय म्हणत कोण जाणे

' उजरी '-जागराचें वसूल करणेच एक, जागणे, जागविण, उत रिझणे-वृद्धि उपजत ही जागविली जाणारी. (४४७)

**जयांचें ज्ञान विषयो नेणे । जाणिव मज येकातेंचि जाणे ।**
**जयां ऐसें लाभे तरी जिणें । येऱ्हवीं मरण ॥ ४४८ ॥**
**ऐसा आघवाची परी पांडवा । जिहीं आपुलिया सर्व भावा ।**
**जियावयालागीं वोल्हावा । मीचि केला ॥ ४४९ ॥**
**ते पापयोनी होतु कां । ते श्रुताधीतु न होतु कां ।**
**परी मजसी तुकिता तुका । तुटी नाहीं ॥ ४५० ॥**
**पाहे पां भक्तीचेनि आथिलेपणे । दैत्यें देवांसि आणिलें उणे ।**
**माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिये महिमे ॥ ४५१ ॥**
**तो प्रल्हादु गा मजसाठीं । घेता बहुतें सदा किरीटी ।**
**कां जे मियां द्यावें ते गोठी । तयाचिया जोडे ॥ ४५२ ॥**
**येऱ्हवीं दैत्यकुळ सांचोकारें । परी इंद्रहि सरी न लाहे उपरे ।**
**म्हणोनि गा भक्ति एथ सरे । जाति अप्रमाण ॥ ४५३ ॥**
**राजाज्ञेचीं अक्षरें आहेती । ते चामा एका जया पडती ।**
**तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥ ४५४ ॥**

(४४८) विषयो - विषो = माझ्यावाचून दुसरा विषय मरण - मरण भल (४४९) आघवाची - अवघाची (४५०) होतु का = असोत श्रुताधीतु - श्रुताधीतहि = वेद पढलेले तुकिता = तुळिता तुका तुटी नाहीं = वजनाला कमी भरत नाहींत. (४५१) दैत्यें देवासी - दैत्यादेवा दैत्यां देवा जयाचिये = दैत्यपुत्र प्रल्हादाचे (४५२) बहुतें सदा किरीटी - द्वंद्वे बहुता काटी गोठी - गोष्टी (४५३) उपरे = श्रेष्ठपणानें सरे = पुरते, श्रेष्ठ ठरते (४५४) आहेती - आहाती चामा = कातड्याच्या तुकड्यावर

त्याच्या ज्ञानास विषयांनीं बाधा केली नाहीं-त्यांच्या ज्ञानाने विषय हा तेथील विषयाचे जे जागणे ते नकोच म्हणून तो जाणलाच नाहीं-ते विषयाचे झाले नाहींत : जाणिवेनें एका मजलाच ते जाणणारे झाले : असे ते जाणणे व ज्ञानसम्यक्तेनें असणे हेच त्यांना अमृताचें असे अमरपणच देत राहिल्याने,

त्याना आता तेंच परमप्रिय झालें : जर का हें अमरपणाचें लेणे त्यांना मिळेनासे झाले, तर मात्र तेथें मरण हेंच त्यांना आलें असे होणारे . म्हणून लाभच एक, प्राप्तिच एक अशी ती त्याची राहाणी ही जाणणे जाणत्याची झाली : जाणताच एक जसा ज्ञानामध्येच वावरणारा, तसे त्यांचे राहाणें, वागणे, वावरणे झाले : असे तें 'ज्ञान' किंवा जाणणे हेच ते साक्षात् होणारें किंवा होऊन असणारे (४४८)

असा अवघा मी, प्रेमच सर्व भावाचे झालें . तेथें भावन हें स्नेहधाराच एक, उभाच तो जसा सहज सगुण, तो सर्व भावाना-सर्व पदार्थांना भाव आला-सर्व पदार्थ किंमतीचे झाले-त्याना किंमत आहे बरं का असे मनावर परिणाम करणारे झाले : संपन्नता ही पदार्थमात्रास आहे-ती त्याची संपन्नता ही पदार्थापदार्थाच्या ठायीं असणारी ही त्या रूपसपदेने आटोपशीर करून त्या भावासच येऊं केली : तेथें दिव्यच जसे प्रकाशणारे असे रूपच तेथे आल्याने, तेथे भाव हा प्रेमच एक आपले असे तें ब्रम्हाचें ह्या सम्यक् ज्ञानान जाणणे घेऊन-स्वरूपच घेतले असे-तेथें त्यास सगुण केले, रूप दिलें व आता परस्पर प्रेमभावाचें ज ह्या मनुष्यजन्माचें वैभव तेच तेथे स्थापित असे होऊ लागल्याने, तेथे जाणणे हें ज्ञानच एक असे होऊन गेले . व आता हा प्रेमभार-किंमतीचा भाव-जणु काय तारुण्यास आला : उल्हास हा तेथे एकदम उडी घेऊन आला : मन उल्हसित झाले . ह्या जीवितास जणूं काहीं एक त्यास किमत आहे असे वाटू लागले व जे जे काहीं दिसेल ते त किंवा जे काहीं स्वत.जवळ आहे तेंच जसे एक आनद हा वर्षणारा होईल असा जो भाव तो तेथे महत्त्व घेऊन आला-महत्त्वाचा भार आहे असा होऊन आला : भार हाच किंमतीचा असा भावच एक 'प्रेम दे' म्हणणारा होऊन, तेथें प्रेम हेच आर्जविले गेले तच विनविले गेलें-तच खऱ्या योग्यतेचें झालें, किमतच त्यास आली : व हाच ह्या जीवदशेस ओलावा झाल्यानें, तेथें महत्तत्त्व हेच जसे बुद्धिस्वारस्याचे एक कौशल्यच ते तेथे जीवित्व हें देवत्वासारखेच सहज पाहाणारे, दिसणारे, प्रकाशणारे असे झाल्याने, तेथे आता मीच ब्रम्हरूप होऊन असतो तेथे ब्रम्हच एक प्रस्थापित झाले-प्रतिष्ठेस आलें : तेथे सर्व भाव हाच संपन्न असा श्रीमंततेचा एक भाग्च वाहविला जाणारा असा-झेपलेला असा

**सगुण**—' योगसूत्र ' असे म्हणते कीं, भूत, वर्तमान अथवा भविष्य याचा परिणाम ज्यावर होतो, त्यास 'सगुण' असे म्हणतात : ज्या पदार्थावर काळाचा आणि सस्काराचा परिणाम होतो आणि ज्यात वारंवार बदल होऊन ज्याचें रूप नेहमीं दृश्यास येत त्यास सगुण म्हणजे गुण आणि धर्म यानीं युक्त असे म्हणतात

योग असे म्हणतो कीं, 'समाधि विधीयते'-न म्हणजे सर्व विषयाच्या ग्रहण करण्याच्या शक्तीचा क्षय आणि एकाग्रतेच्या शक्तीचा उदय झाला म्हणजे चित्ताला समाधीची अवस्था प्राप्त होते : तेथे 'विधीयते' ते जसे एक दैवास-देवास-येणारे असे स्थिरत्व चित्ताचें. (४४९)

ते आता 'पापयोनी' दगडासारखेच असे जसे मूळचे-बहुश्रुत असे जरी होणें नाहीं-त्यानीं श्रुति स्मृति इ ग्रंथाचे अध्ययन हे जरी नच केलेलें असले, तरी आता तेच जसे मीच झाल्याने-मजशीं ते जर तोलले गेले, तर तेथे फरकच मजमध्ये व त्याच्यामध्ये नाहीं असे ते असणारे, होणारे : मजशीं जर ते तोलले-मजसम असे ते आहेत ते कसे हेच पुरून उरलें-तेथे तुटीच मुळीं आली नाहीं-तूटच ह्या ब्रम्हाच्या योग्यतेशीं ती त्याना एखाद्या वृत्तीने किंवा ज्ञानानें आली असे नच होतां, ते समूळ ब्रम्हच असे-ब्रम्हसमच ते झाले : इतुका, एवढा असा तो भार, ब्रम्हभार, ज्ञानभार नच होता-भारानें डोलणें एक नच करून तेथे तितका तो ब्रम्हभाव हा बरोबरीच्या तोलाचा होऊन-बरोबरीचा गडीच असा होऊन असलेला-जितुकें जेवढे ब्रम्ह ते भावच होऊन आलें : व त्यानें ब्रम्हभावासच अंगचें असें करून ठेविलें-ते ब्रम्हच झाले. (४५०)

सेवा हीच परम पद देणारी–तेथे ते दक्षिणेचे जे एक देणे तेच जसे ‘ गुरुदक्षिणाच एक दिली ’ असे तें सेवाऋणाने मी बद्ध झालो आहे असे म्हणताना–‘ मी न लजे ’ असे म्हणणारा तो देवीवर असल्यानें–तेथे महिमा हाच जर जाणीवेने चालला, तर तेथे सर्व देवाना लाजविले असे भूषणच एक त्या दैत्यकुळास पाहाणारे होत : तेथे अनेक महिमे, अनेक भक्तिबीजे, अनेक अस्तित्वे (आस्तिके) हीं पुरतीं होणारीं असल्याने, तेथे आता तो देव श्रीनृसिह हाच ते सर्व देणारा असल्याने, तेथे त्याना आता आलेला तो स्वतःचा असाच म्हटला गेलेला, मोठेपणाने असलेला आपला महिमा हा त्यानीं विसरण्याचे करूंच नये : तो महिमा त्यानीं आपलासा केला–तेथील लेणे लेवविणाऱ्या प्रभूस जाणले–ह्या ऋणाचे उतराई होणे हेच आता करुन असावे असेच ते भक्तीचे अग हे परम दिव्य देणारे होऊन, तेथे ह्या भक्तिबीजास अकुरच आले असे प्रेमच एक सख्य झाले, आवडत झाले व आता ती गुरुदक्षिणाच जशी त्यानीं त्या स्वरुपास पोहोचती केली असे होय ‘ ऋणी म्हणणारे तत्त्व त्यानीं जाणले व ते हास्यच करू लागले . म्हणून मोठेपणाचे महिमान हे देवानें दिलेले ते त्याचे देणे हे दक्षिणा देऊनच–प्राण हीच एक दक्षिणा–तोच सर्व काहीं पुरविणारा करून घेऊ लागला तेथे भक्तीची मोहरच दिली, हे परम आभार उतराई करणेचे, होणेचे व्हावेत असे करणे होय (४०,१)

तो प्रल्हाद मजसाठी बहुतप्रकारे बहुतप्रकारची अशी जी छळणूक ती घेत राहिल्याने, तथे जसे काहीं त्यास झेपले, साभाळले, ते त्याजला मजमध्ये जोडून घेतलेले असेच करण्याचे होय . त्या प्रल्हादाचे कुळ ते धडधडीत दैत्याचे होत, परतु इद्रालाहि त्यावर कडी करता आला नाहीं

‘ तयाचिया जोडे ’–त्याची योग्यता ही पुरती केली–त्याचे कल्याणच उभे केले- त्यास तृप्तीची अशी ह्या जीवित्वास एक जोडच देऊन पुस्तीच लावून, अगच देऊन, उत्तम अर्थ ते देऊन तृप्ति ही व्हावी तेथे समाधान हे उगविले गेल्याने- उगविणारे होत राहिल्याने, होत असल्याने, तेथे काय मी त्यास मजमध्ये जोडून घेतलेला असाच तो खाणे, पिणे, व्यवहारणे, इ सर्वच्या सर्व ह्या देहाचे व्यापार ते मी आत बसून त्याचे ते असे केले–त्याच्याच शब्दाचे केले

येथे काय उपकार झाले म्हणून नुसते हसण्याचेच कौतुक का ! ते हसण्यावरच घालविलेले ते का बरे ? काय ह्या उपकारास आता कसे अपकाराचे करशील, का ते ऋणच झाले म्हणून त्याची फेड करण्याचें पाहाशील, व ते कसे बरे ? येथे देव तर तुझा ऋणिया मी आहे असे म्हणत आहे–व आता देवानें ऋणिया आहे म्हणणे हे काय कसे बरे जोडून घ्यावे ? तेथे एक सहोदरपणाचे बीजच एक–काय ‘ गुरुत्व ’च एक व ते आता त्याच्या मुद्रेचे करून जोडून घ्यावे, किंवा त्याचे त्यासच जोडून द्यावे असे नव्हेच का ? तसेच आहे हो ! ! !

तें तूं गुरुलिंग माझे । जे येकलेपणाचे विरजे ।
जयालागीं बोलाडिजे । अद्वैतबोधु ॥ १५७१ ॥
आपणचि होऊनि ब्रम्ह । सारिजे कृत्याकृत्याचें काम ।
मग कीजे कां निःसीम । सेवा जयाची ॥ ७२ ॥
गगा सिधु शिवूं गेली । पावताच समुद्र झाली ।
तेवीं भक्ता शेल दिधली । निजपदाची ॥ ७३ ॥
तो तूं माझा निरोपचारु । श्रीकृष्ण स्तव्य सद्गुरु ।
मा ब्रम्हतेचा उपकारु । हाचि का मानी ॥ ७४ ॥
जी मज तुम्हा आड । होते भेदाचे कवाड ।
तें फेडून केले गोड । सेवासुख ॥ ७५ ॥

तरी तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेव राज्ञा ।
करीन देई अनुज्ञा । भलतियेविषीं ॥ ७६ ॥
यया अर्जुनाचिया बोला । देवो नाचे सुखे भुलला ।
म्हणे विश्वफळा झाला । फळ हा मज ॥ ७७ ॥
उणेनि उमचला सुधाकरु । देखुनि आपुला कुमरु ।
मर्यादा क्षीरसागरु । विसरेचिना ॥ ७८ ॥
ऐसे संवादाचा केला । लग्न दोघांचिया आतुला ।
लागले देखोनि जाहला । निर्भरु सजयो ॥ ७९ ॥ (४९२)

त्याचे पदरात सर्व कल्याणच टाकीत असणारा असा मी जो तो ते माझे करणे हे जोडीनेच चाललेले असल्याने, तेथे खाणे पिणे, चालणे रमणे, विराजमान होणे, सामान्यतेचे होणे अशीं अनेकच्या अनेक कामे उपकामे हीं जशीं मींच केलीं त्यास जोडूनच घेऊन, किंवा मीच तेथे जोट देऊन त्यास जोडून घेतलेले असे त असल्यानें, तेथे त्याची हरएक गोष्ट ही काय इंद्रपद हे काय हो अति तुच्छ असे म्हणणारी होऊन असते . ह्या सर्व प्रकारानीं तेथीलचे पद असे रंगविले गेलेले कीं, इंद्रपद, इंद्रपद, अहो, ह्यापेक्षा आणखी अधिक असे ते काय तेथें असणार ! म्हणून भक्तिच एक श्रेष्ठ अशी आहे-जाति ही कसलेच प्रमाण पुढे घेतच नाहीं-तेथे प्रमाणच मुळीं सापडणारे होत नाहीं (४९३)

राजाज्ञेचीं जीं अक्षरे तीं एका चामासाठीं जया पडतीं त्या चामाने सर्व वस्तु मिळणाऱ्या होतात . आज्ञा ही राजमान्य अशी झाल्यान, तेथे त्या एका टोळाघालीप्रमाण एक चामाच्या तुकड्यावर जर तीं अक्षरे पडली, तर सर्व काहीं वस्तुमात्राचे मिळणेच होत . चमचमाट चमकत है चपला, ब्रिजजन थरथर कांपे-येथे नदाचा कान्हा हा डोळाच घालणारा झाल्यान, तेथे ह बहिर्मुखाचे अग अथवा देहच नुसता पाहाणारे त-तेथेच तो डोळा विश्वत चक्षु हा बसविला . त्या डोळा घालण्यातच-चामातच-त्वचेचे रानच सर्व ह्या मनाने व्यापले व आता तथे आज्ञाच राजमान्यतेची अशी 'अक्षर' भाव पाहू लागून, तेथे किंमतच मुळीं ह्या सर्व वस्तुना एका त्या डोळयाने दिली . येथ भक्तिच एक सरती झाली व जाति म्हणजे प्रमाणच तेथे न येणारे असे ह्या जीवदशेस तोलणारे तोलन ह विभक्तता नच होऊन एकजीव, एकाग्र, एकनिष्ठ, एकायत्त, तेथे श्राद्धच जसे करू आदरिलेले . असे त्याचे त करणे हे सर्व प्रमाणे सम होऊन आलीं- साम्य योगच तेथे-जीवदशाच-जगणे ह प्रेमाचे-तेथे मुळीं अक्षर हींच त प्रेम आहे असे म्हण लागून, सर्व ग्रहच त्यानीं भक्तिबीजास दिला : तेथे विभक्त नव्हे असे-पर नव्हे असे-दुजे नव्हे असे-दुजाभावाचे नव्हे असेच त्या अक्षराने पाहाणे झाल्याने, तेथे काय जाति जी ती तीस महत्त्व देणारे कोण होईल कोण जाणे

दुर्बुद्धि । देवा भजले ॥ तेथे धृतराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षव । असे स्वाभाविकतेस सोडून ईर्षेस चढले, व 'मी-तू' करीत बसण्यापलीकडे काहींच केले नाहीं-बसं लागले-ते 'कर्म दिव्य देव' ह्यातील वर्म समजलेच नाहींत-व मग निवृत्तितत्त्व कसचे जाणणारे ? म्हणून निवृत्त लक्षण हेच पुढे घेऊन असावे

ते म्हणतात येथे सोन्यास प्रमाण नाहीं, रुप्यासहि नाहीं : आज्ञाच राजराज अशी झाली ती 'राजाज्ञा' अशी समर्थ झाली व तीच जर एका चर्मावर असली, तीच चामानें आपलीशी केली, एखाद्या चर्मास जर ती मिळाली, तर त्याच चर्मानें अवघीच सर्व काहीं चर्मदृष्टि तीच विकली गेली : एका चर्मासच त्या राजाज्ञेने जर वरिले, तर बाकीचीं सर्वच्या सर्व त्याच्याच अनुरोधाने पाहणारीं होतात-विकलींच जातात-त्याच कलाचीं होतात : एका विशेष चर्मावर जर ती राजाज्ञेची दृष्टी ही बसली, तर

त्याच चर्मानें–चर्म शेवटीं जन्मला त्यानें–त्याच चरमास ती आज्ञा वरूं लागून, बाकीचीं जीं सर्व कोणी कांहींहि जरी असलीं, तरी त्याच चरमाच्या लोहपणानें-लाहोपणानें–बाकीचीं सर्व विकलीं जाणारीं होतात चरम गुरु असेच ते चाम झाले व त्या एकासच उचलून झेंपण्याकडे-त्या एकासच झेलण्यात–त्या एकासच रंगविण्यास, अलंकारण्यास बाकीच्या सर्वांनीं आपणांस विकलें, विकवून घेतलें : येथें वस्तुमात्र, पदार्थमात्र हीं जशीं ' आघवीं विकती ' : विकलें जाणे हें तेथीलच्या चामासच थटविणें, रंजविणे, राजविणें, नटविणे, शोभविणे, योग्यतेस आणणें, समर्थ करणे असेच आवघीं जीं त्यांच्या-कडून केले जातें–थटविलें जाणारे होतें म्हणून येथें राजाज्ञा ही समर्थ आहे, ती एक सम अशी आहे : व ती काय नुसत्या सोन्यारुप्यावरच बसली व स्वतःस नडवून घेईल अशी नच होऊन, तिनें त्या चामासच एक आपलें समर्थतेचे अक्षर दिले, व आता बाकीचीं सर्व कोणी ती आज्ञा शिरसावंद्य आहे, असेच करून असणारे ' म्हणून येथे भक्तिच एक सरती झाली . ती एकत्वच ! तेथें जातीचे प्रमाण हें भक्तिबीजाने दूरच केलें व एकनिष्ठ असेच तें भक्तीचे झाले येथें भक्ति ही ' आथी आथी ' अशी असल्याने देवांना उणें पडले–त्याना लाजविले–खालीं पाहाण्यास लाविलें : तेथें आता त्या भक्तीचे तें सर्व झाल्यानें, तेथे ' बहुवे घेता ते मिया द्यावे ते गोठी तयाचिया जोडे ' असेच सर्व होऊन गेले : फार होणे बहुत होणे : हे त्यानीं घेतले–ते मी त्याना देऊ केलेले, दिलेले व तेथे पाहावे तो सर्व कल्या-णाचा एक पाऊसच त्यावर पडला–त्यास मी आपली जोड ही देऊन आपल्यात जोडून घेतलें . तेथें भोजनच झाले–कल्याणच पदरात पडलें–खुशालीचें अंगच त्यास मिळाले–मजबूत असेच त्याचे जिणे झालें–तेथें बहु राजी आहोत, बहुत खुशी आहोत असेच त्याना स्वभावाचें मोठेपणच आले

[ रम्य बालाच ती ! मनोवेधक अशी बालिकाच ! एक अंबिकाच, एक अंबा अशी असणारी काय माता येथें ती, जशी नेहमीं मी माताच होऊन असावे असा रम्य जो मनोवेधक असा भार त्या मजला मिळावा, तोच तेथें दिला जात असल्यानें–जो भार तो दिव्य असेच तें आहे असे दर्शविणारा ] (४५४)

**वांचूनि सोनें रुपें प्रणाम नोहे । येथ राजाज्ञा समर्थ आहे ।**
**तेचि चर्मा एका लाहे । तें विकती आघवीं ॥ ४५५ ॥**
**तैसें उत्तमत्व तेंचि तरे । तेंचि सर्वज्ञता सरे ।**
**जें मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ४५६ ॥**
**म्हणोनि कुळ जाति वर्ण । अवघेंचि गा अकारण ।**
**येथें अर्जुना माझेंपण । सार्थक येक ॥ ४५७ ॥**
**तेंचि भलतेणें भावें । मन मज आंतु येतें व्हावें ।**
**आलें तरी आघवें । मागील वावो ॥ ४५८ ॥**
**जैसें तंवच वाहाळ ओहळ । जंव न पवती गंगाजळ ।**
**मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ४५९ ॥**
**कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंववरीचि घटे ।**
**जंव न घेपती एकवाटें । अग्निमाजीं ॥ ४६० ॥**
**तैसें क्षेत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यज्यादि इया ।**
**तवचि जाति वेगळालिया । जंव न भजती मातें ॥ ४६१ ॥**

(४५५) चर्मा – चामे एक जें विकती = विकत मिळतात. (४५६) भरे – मोहरे. (४५८) मन मज आंतु येतें व्हावे – होआवे = मन मत्स्वरूपीं लावावे. (४५९) वाहाळ वोहळ = लहान ओढे.

(४६०) विवंचना = विचार तंववरीचि – तवचि. घटे = तोवरच असतो न घेपती - घापती = घातली जात नाहींत (४६१) क्षेत्री - क्षत्री भजती – पवती

भक्तीची परम सीमा-प्रेमाचा हार, गळ्यातील ताईत, प्राणच जसा-जसे का आपल्या प्रियानें आपलें अंगच सर्व हें जोडयाचे करून-अगाचे जाडे केले-जाडेच सर्व अगाचे करून प्रियतमेस लेवविले · येथें भक्ति ही परम दिव्य अशी तीच झाली-देव झाली-शोर्य नसली-व प्राणकर्षक रम्य, चित्त हरण करणारी अशीच ती आता स्वर्गास शोभवू लागली (४५५)

मनोबुद्धि ही माझ्या प्रेमानें भरून आली असता, तीच मग सर्वज्ञतवर मात केली असे होते तेथे उत्तम असे म्हणजे जें ते हे आपला तर भावाचे होण्याने, तेथे तो पुरुषच आता ही मायानदी तरून गेला असे ! (४५६)

म्हणून काय येथे कुळ अथवा जाति अथवा वर्ण हे अवघे काहीं कारण होणारे- माया तरण्यास, सेवेस, भक्तीस, पुरुषार्थास कारण होणारे असे नव्हतच . येथे एक माझेपण हेच सार्थकता देणारे–ह्या जन्मास आल्याचे सार्थक झाले त कशानें तर ' माझेपण ' ह जे तेथे ' सार्थकत्व ' झाले ' जन्मा आलियाचे फळ । आजी जाहाले सफळ ॥ ' असे ते माझेपणान ती इच्छा हीच सफळ झाली : आता परम निर्वासन पाहून मी अति आनदात आहे, जीव हा आभाळाएवढा मोठा झाला आहे : मी अति आनंदात आहे, तो आनंद गगनातहि मावेना येथे, अर्जुना, माझेपणाने ती सार्थकता पाहिली . येथे काय अकारण अशीच तीं कुळे का जाति का वर्ण हे होत (४५७)

ते सार्थकत्व ह भलत्याहि–अहो, भलत्या का होईना–अहो भलत्यासलत्याहि- भावान जरी मन ह माझे आत आलें, मन ह माझे आत व्हावें, व जर का एकदा त आत आले कीं, मागील सर्व काहीं नाहींसेच झाले . मागील सर्व काही आठवतच नाहीं-त सर्व विसरले-नाहींसे झाले-माझे नव्हतच असे होऊन गेले : तेथे तो भलताहि भाव हा त्या मनास माझे आतच करून-मागे मुरडणे देऊन-मीच झाला व आता मीच तें झाल्यानें, तेथे सर्व मागचे ज काहीं, का जाति, का वर्ण, का कुल हे सपलेच . काय जाति, काय वर्ण, काय कुल ते कसचे बरे ! व त तसे म्हणणें जर झाले, तर त कुणाचे म्हणणे बरे, कोणीं म्हटलेले त ! (४५८)

अहो, तोपर्यंतच ती वहाळ किंवा तो ओघळ, जोपर्यंत ते गगेस मिळाले नाहींत : एकदा का तो वाहाळ (ओढा) किंवा ओघळ हा गंगेस मिळाला, तर मग आता तेथे गगाच ती-तेथे एक ' रूपच ' मुळीं तो ओहोळ झाल्याने, तथे गंगेशिवाय दुसरे काहींच नाहीं ती सर्व गगाच एक-तेथे रूप हे एक झाले, ते तीर्थच जसे आता व काय तुम्ही त्यास मग एक (गगा) स्वरूपतीर्थ असेच न म्हणणें कराल ? (४५९)

जोपर्यंत-अग्नींत पडल्यानें-तीं त्या अग्नीच्या वाटेस लागलीं नाहींत, अग्निरूप झालीं नाहींत, तोंपर्यंतच तेथे हा खैर, तो चंदन असे वचनच एक त्या त्या घटनेस एक घटाचे म्हणजे प्राणाचा (वायुच) एक थेंब किंवा घटक असे त ते एक विवंचनच जसे त्या खैराचें किंवा चंदनाचे झालेले . अग्नीच्या वाटेस लागले व आता तेथे अग्निच एक : का तुम्ही त्यास काहीं आणखी एखादे नाव घाल असे नाहींच (४६०)

तसे येथे तोपर्यंतच हें वेगवेगळेपण, जोपर्यंत मजला ते जे निरनिराळेपणानें म्हणणे केलेलें ते मजप्रत पावले नाहींत : तेथे हा क्षत्रिय अथवा तो वैश्य अथवा ही स्त्री, तसेच तो दुसरा शूद्र असे :

तेथे घृष्टि हीच मुळीं तो तो तसतसा त्याचमध्यें एकसारखे असणे हेच त्या त्या मातीचें पुट चढविणारे झाल्यानें, आता तें सर्व बाजूस झाले व मीच एक भजनीं लागलो गेलो-मजला पाहाणे झाले-पावनत्व तेथे आले-मजला पोहोचल्यामुळे-मजप्रत आल्यामुळें-मीच त्या भजनास पावलों, व आता तेथे काहीं एखादी वेगळी जात होती किंवा आहे असे नाहीं-मीच ते होऊन गेले-तेथे भक्तिच एक ती (४६१)

**मग जाति व्यक्ति पडे बिंदुलें । जेव्हां भाव होती मज मीनले ।**
**जैसें लवणकण घातले । सागरामाजीं ॥ ४६२ ॥**
**तंवचि नदानदींचीं नांवें । तंवचि पूर्व पश्चिमेचे यावे ।**
**जंव न येती आघवे । समुद्रामाजीं ॥ ४६३ ॥**
**हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझिया ठायीं प्रवेशे ।**
**इतुलेनि आपैसें । मीचि होणें आहे ॥ ४६४ ॥**
**अगा वरी फोडावयालागीं । लोहो मिळो कां परिसा आंगीं ।**
**कां जे मिळतिये प्रसंगी । सोनेंचि होईल ॥ ४६५ ॥**
**पाहे पां वालभाचेनि व्याजें । तया व्रजांगनांचीं निजें ।**
**मज मीनलिया काय माझें । स्वरूप नव्हतींचि ॥ ४६६ ॥**
**ना तरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें ।**
**की अखंड वैरावेशें । चैद्यादिकीं ॥ ४६७ ॥**
**अगा सोइरेपणें पांडवा । माझें सायुज्य या यादवां ।**
**कीं ममत्व वसुदेवा-। दिकां सकळां ॥ ४६८ ॥**

(४६२) बिंदुले = शून्य. भाव - भावे (४६३) नदानदींचीं - नदनदींचीं यावे = प्रवाह. (४६४) आहे - असे (४६५) परिसा-परिसाचे मिळतिये प्रसगीं = स्पर्शाबरोबर (४६६) वालभाचेनि - वल्लभाचेनि व्याजें = प्रियकर या भावाने तया-तिया. ४६७ वैरावेशें - वैरवशें चैद्यादिकीं = शिशुपालादिकानीं

तेथे आता जाति व व्यक्ति ह्यावर शून्यपणच आले-तेथील भाव हे मजला मिळाले व मीच झाले-जसे मीठ हे सागरामध्ये पडले असता ते सागराएवढे झाले-तेथ निराळे निवडणे होणारे नव्हेच ! (४६२)

तोपर्यंत नदीनद हीं नांवें (दिलेली)-तोपर्यंतच तेथे हे पूर्वेकडील व ते पश्चिमेकडील, जोपर्यंत ते समुद्रात येऊन पडले नाहींत : जसे मीठ हे निराळे थोडेसे जरी, तरी पण सागरात मिळाल्यावर सागरच झाले.

नद हो अथवा नदी हो, समुद्रीं रिघाल्यावर-'समुद्र' झाल्यावर काय पूर्वेचे आलेले अथवा पश्चिमेकडून मिळालेले असे ते म्हणणे काहींच गोमत नाहीं-अहो, तेथे 'समुद्र' असेच ते झाले; तेव्हा आता काय तें विचारणे कीं हे पूर्वेचे का पश्चिमेचे-हा तिढा का हे वळण अथवा वळसा (कुठचा !) पश्चिमेचा म्हणजे 'विश्वपत्नीचा' का 'प्राचीन कर्माचा' हे राहातच मुळीं नसल्यानें, तेथे एक समुद्रामध्येच ते आले-समुद्राच्या आगचे झाले. (४६३)

हें जें समुद्रतेच्या अगचे होणें, कसल्याहि का निमित्तानें का मिषानें जरी त्या समुद्रतेस आले, तर चित्तच त माझे ठिकाणीं रत झालें असे : तें चित्तच मी झालें-मीच तें चित्त होऊन आहे-तेथे मग

सहज योगच-त्या चित्तास मजमध्य प्रविष्ट करून-योगास आला, मीच झाला-सुलभ, सहज, आपैस असे व्यापकत्वाने त चित्त मजमध्ये प्रवश करून असल्याने, तेथ 'समुद्र' भारच-व मग मीच तेथे होणें हाणारे-असणारे-झाले (४६४)

असे, परिसाला फोडण्याच्या उद्देशाने का होईना, परन्तु एकदा लोखंडाने परिसाला लागावे ह बरे, कारण त्या परिसाच्या सगाने ते साक्षात सोने होईल ' चित्त हेच अंगभर फोडणे करुन ('मीच' ते चित्त) त्याने तर परिसाचे सर्वच अंग हे आपलेच असे केले व आता त परिसणे झालेले जे त्यानें तर सर्व अग हच ( आता चित्ताचे करून ) सुवर्णासारखे झाले-त सुवर्णासारखे तेजस्वी झाले-तेथे मीच त्या लोहास येऊन तेथे चित्ताची जी तप्तता, हीनेच चित्तास पाहिल्याने, तिने तर तें परिसणे हेच सर्व अगभर केले : सर्व अग हच तेथे फोडफोडून तेथे त चित्त व तो (परिसणारे परिसाचे) परिस हेच आता निखळ सुवर्णतेजाचे, कातिमय असे झाले : त्यान लोह ह लवणेच एक तप्ततेचे, चित्ताचें, तेथे ह्या मायापुरामध्ये लव्हाळयानें स्वत स वाचविणे केले, असे त चित्ताचे तापणे ते सर्व काठिण्य हे कानभर व्यापून गेले व तेथ आता नमन झाल्यान प्रेमच त झाले त्या प्रेमाचे, प्रेममुद्रेचे, रूप कसे म्हणशील तर त सुवर्णासारखे तेज पुज अस

हे श्रीकृष्णा नारायणा, प्रथम आपल्याहून तुला आनाते म्हणजे भिन्न समजून पाहाण्याला गेलो, ना शरीरात, मनात व सर्व त्रिभुवनात तूच व्यापिला आहेस असे दिसले काय चमत्कार झाला, सगळे जग हरिरूप होऊन गेल्यामुळ, जिकडे पाहावे तिकडे हरिच आहे असे झाले आता तुझा आठव करण्याचे व विसरण्याचे राहिलेच नाही . लोखडास परिस लागल्याबरोबर जसे त सोनेंच होत, त्याप्रमाणे विठ्ठलान माझे खरे स्वरूप मला प्राप्त करून दिले असे श्री ज्ञानेश्वरमहाराजम्हणतात (४६५)

मुद्दल जे ह्या नवलावर टेकलेले-नवलाचे असे-तथ ह्या नरजन्मावर उभे असलेले जे व्याज म्हणजे सर्वोत्तम असे निरकाळजीचे-आपला तोल संभाळून चालणारे-आपला भार, वृत्तिभार, झेपूनच ज चालत असणारे-अस ज वल्लभाचे जे तेथे वालभ म्हणजे प्रेमच जे-तेथे हृदयनिवासी जो तोच जसा आपल्या उत्तमत्वास आला व त्याने तर प्रव्रजा हीच त्वरिततेने परिणाम करणारी झाल्यानें, तेथे ते जे निजसुदर असे हृदयातील प्रेम सर्वांगच त-तेथे त्यासच जसा जीवदशेने घेतलेला-असे ते प्रेमबीज हच तेथे त्या वालभास देऊ केले, दिले : सत्वर त्वरिततेचे त देणे हे निजसुदर असेच झाले : तेथे मजला तीं हृदये मिळून गेल्यान, काय माझे स्वरूपाचीं अशीं तीं नव्हत काय? मीच तेथे तो वृत्तिभार झेपून असल्यान, तेथे त्याची जी जी म्हणून लज्जावृत्ति-भार हाच मी साभाळून, तेथें रूपदर्शन-माझे रूपाचीं तीं होऊन तेथ आता तीं काय माझ्या स्वरूपाचीं नव्हत असे कोण म्हणेल बरे-माझे स्वरूपच तेथे (पाहाण्यास मिळणारे) सरूपतेचे नव्हे कसे? (४६६)

रात्रदिवस एकच व्यास लागल्यान तेथे जीवदशाच मुळीं पार पिळून काढली गेली व आता येथे तर भयानेहि पण का होईना ते हृदयातील काठिण्य पिळून टाकिले व मजलाच ते मिळून गेले काय येथे त कंसाचे म्हणावे का नेहमींच वेरवश झाल्यानें त्या चैद्याचे त : (४६७)

सोयराच एक तन्मयता पावविला गेला-बाल्य हे काय कसे वागविले जाणारे-तेथे मी जो आहे त्याने तर त्या पाडवाना सोइरे-धाइरे समजून, करून-तेथे पुरुषलक्षणच एक वागविलें-तेथे सदन म्हणजे हे जे गृह तेथे माझ्या आश्रयानें ते असल्यानें, तेथे सायुज्यसदनाचे ते झाले-तेथे मी आपला प्राणच वागविला व बाल्य हे तेथे अनेकशः अवस्थामध्ये वागविले तेथे तारुण्य हेच अनेक अवस्थामध्ये दर्शनास आल्यानें, तेथे सोइरा तो कसा हे पंचभूतांना पंचप्राणानीं जीवदशेची वातच लाविली : व मीच तेथे सायुज्यता मार घेऊन असल्याने, तेथे ते पाडव हे आता सोइरेच जसे झाले : सोइरेपणानेंच त्याना

सायुज्यता झाली व मी त्यांचा झालो-जे यादव त्यांना माझ्या सायुज्यतेचें होणे झाले-'ममत्व' एका बालकावर जसे थोर तसे वसुदेवाला माझे सायुज्यपद प्राप्त झालें (४६८)

**नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा ।**
**इया भक्ती मी धनुर्धरा । प्राप्यु जैसा ॥ ४६९ ॥**
**तैसाचि गोपिकांसी कामें । तया कंसा भयसंभ्रमें ।**
**येरां घातकां मनोधर्में । शिशुपाळादिकां ॥ ४७० ॥**
**अगा मी येकुलाणीचें खागें । मज येवो ये भलतेणें मार्गें ।**
**भक्ति कां विषयविरागें । अथवा वैरें ॥ ४७१ ॥**
**म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठाईं ।**
**उपायांची नाहीं । कोणी येथ ॥ ४७२ ॥**
**आणि भलतिये जाती जन्मावें । मग भजिजे अथवा विरोधावें ।**
**परी भक्त कां वैरी व्हावें । माझियाची ॥ ४७३ ॥**
**अगा कवणिये येकें बोलें । माझेंपण जरी जालें ।**
**तरी मी होणें आलें । हाता निरुतें ॥ ४७४ ॥**
**यालागीं पापयोनी अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।**
**इये मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ४७५ ॥**

(४६९) भक्ती = भक्तीस्तव. (४७०) घातका = वैर बुद्धीनें (४७१) एकुलाणीचें खागें = निर्वाणीचे स्थान विरागें - वैराग्यें. (४७२) कोणी - वाणी (४७३) भलतिये - भलतिया मग-मज अथवा - का भक्त - भक्ता वैरी - वैरिया

ओहळ गंगेस मिळाला, गंगा झाला . काष्ठ अग्नीच्या वाटेस लागलें, अग्नी झालें जाति व्यक्ति ह्या भावाने, भावामुळें, मजमध्ये मिळाल्या : नदनदी ह्या नावाच्या न राहताना-विश्वपत्नीचें का प्राचीन कर्माचें ते-समुद्रच झाल्या : लोह परिसाला मिळाले, सुवर्ण झालें बालभाव मिषानें ( प्रेमाचें झाल्याने ) ह्या व्रजांगना माझ्या स्वरुपीं मिळाल्या-स्वरुपाच्या झाल्या : भयामुळ कंस, अखंड वैरच त्यानें चैद्य मजला मिळाले : सोयरेपणाने पांडवाचा (धर्मधारण), योगयुक्ततेनें यादवाचा (युक्तता) व ममत्वाने मी वसुदेवाचा (थोर असा) झालो : त्याप्रमाणे येथे आतां, हे धनुर्धरा, मी ध्रुवास अक्रूरास शुकाचार्यांना व सनकुमारादि सकळाना ह्या भक्तीनेच प्राप्त झालेला असा (४६९)

गोपिकाना कामामुळे, कंसास भयसंभ्रमेकरुन व घातक अशाच देहबुद्धीचे झाल्यानें त्या शिशुपाळादिकाना (४७०)

अहो, मी एक ह्या लज्जेचें स्थान असल्याने-मजला भलत्या मार्गांनींहि जरी येणे केले, तरी मी पावणारा होतोच : तेथें मग ती भक्ति पुढे घेतलेली असो, अथवा विषयवैराग्य हे उपजलेले असो, अथवा वैर हे अखंड असे व तेथेच वश झाल्यामुळे असो

ह्या देहधारणेस लाजावे-हा मनुष्यजन्म लाजाळू असाच जर केला, तर काय तेथें ही जी लाज हीच मुळीं मोठ्या शरमेची गोष्ट आहे : ही लाजेची गोष्ट हीच मोठ्या एका समारंभाची अशी एक वाहवाच पाठीशीं वाहवून असणे हेच एक नवल सध्यां पाहाण्यास मिळते सर्व शरम म्हणून जी आहे, तीच आपला सर्व भार घेऊन आली व तिनें तर पार लाजविलेच हें जीवित-हे अखेरचें स्थानच झालें, जीवित हें मेलें-जिवंत असतां मेलेलें कसे असतें तें दिसूं लागलें : असे ते एक लाणीचें ठिकाण-

आतां मात्र निर्वाणच केलें पाहिजे, मेलेंच पाहिजे, असे तें जे चिथविणारें तें ह्या मनुष्यास 'मोठ्या शरमेची गोष्ट' असे म्हणणें करून, त्यानें भलत्यासच त्या कसल्याहि प्रकारच्या मार्गानें मजप्रत यावेच यानें असे तें आहे, मग तेथें काय भक्ति, काय वैराग्य, का काहीं वैर हें एक निमित्तच होणारें "मी तेथे उगवून असलाच पाहिजे" (४७१)

म्हणून, हे पार्था, मजमध्यें (वशेकरून आवेशास येणें व तेथें प्रवेश होणे) प्रवेश व्हावा असे जर मनात असेल, तर तेथें उपायाची वाण म्हणजे उणीव आहे असे नाहीं, अमुक एक विशेष उपाय महत्त्वाचा आहे असे नाहीं, तर तेथें कोणताहि उपाय केला, तरी मजमध्ये प्रवेश होतो. मजमध्ये यावयास-मी होण्यास 'प्रवेश झाला' असे जे बोलणे-' तेथे अमका एक विशिष्ट उपायच महत्त्वाचा आहे' अशी जी बोली-तेंच येथें नाहीं (४७२)

भलताहि सोस करून असावें-भलत्याच जातीच्या प्रेमाचे अगानें असावें-परंतु तेथे जर जाति ही आपला समूळ भर तारुण्याची निर्भर इच्छा ही तरुण होऊन, जर तिनें आपली जाति ही प्रेमाची केली, तर तेथें चढणेंच जसे एक त्या रामनामावर-मग काय तेथे ती जाति ही अस्सल अशीच !

आता येथें जन्मणे तें भलत्याहि जातीमध्ये झाले व मग भजनाचे व्हावे का निरोधणें करावे हेंच येथें त निवडणें-हे भक्त का वैरी असे जें-तेहि पण माझेंच !

येथे ह्या भावना ज्या 'प्रेम व वैर' यानीं दर्शविल्या गेल्या, त्या तर परस्पर विरोधी असल्याने, तेथे द्वंद्वच एक लागलेले तें म्हणजे हा जो देहधारणेचा संसार तो एक तर देवप्रेमाचा केलेला, व दुसरा तो अनेक व्यवसाय-व्यवहारांमध्ये रत असणे ते : परंतु येथे संसारदृष्ट्या पाहिलें, तर काय तेथे फरक तो कसला ? म्हणून येथें 'जाति' हा शब्दच मुळीं तेथीलचा आदर्श असून, तें म्हणजे एक ह्या प्रकाराप्रकाराचे व्यवहारास पाहविले जाणें तेंच होय : 'जातीचे' म्हणजे ती विशेष जाति-प्रकार-उपजाति-ह्यानीं तेथीलचे जे एक गुणदिग्दर्शन करणे ते कसे ते तेच मुळीं ती तेथीलची 'जाति' ठरविणारी होते विवरण करतानाहि पण तेथीलची जाति-जात-ही साभाळावी लागतेच म्हणून 'भलतिये जाति जन्मावें' हे त्या जातीचें वैशिष्ट्यच एक कसे तें प्रेमाचे, का वैराचे, कां प्रकाराचे, कां द्वंद्वाचें, का उपरोधाचे, का उपहासाचे करणारें, का प्रेमच एक पोसणारें, का प्रेमाचा साज हाच सर्व तेथें दिला व एक प्रेमाचे असे तें जातीचें भलतेपण हें निवडिले गेलें असे करणे होतें (४७३)

येथे एक बोल हाच-एकादी गोष्ट हीच मनास रुचली, तिनें ते बोल हे अनुमोदनात घेऊन त्या तेथीलच्या देवतेसच आणिले व ते आतां माझेपणास आले-असे तेथे माझेपणच उगवलें-माझे असे ते झाले : तर तेथें आता 'मी' असे जें एक बोलणें आवडलेलें, तेथे तो जो मी हाच आता होऊन आला, घडला गेला, बोलास आला, मीच झाला : व आतां तें मी जे तेच अगदीं आपल्या हातावरच चढलें-हातास आले तें आतां दूर म्हणून केव्हाहि होणेच नाहीं, तेथें 'मी' असे जे-हातच एक माझा असा, बोलाचा, प्रेमाच्या गोष्टीचा ! (४७४)

आणि म्हणून पापयोनी हो, अर्जुना, जरी का वैश्य हो, हो का शूद्रहि किंवा अंगनेचे अंगानें त जातिपण जरी असले, तरी ह्या मला भजनाचे केले-मजनीं लागले असे केलें-तर मग माझें सहजच तें होय : तेथे ह्या बोलास जर सजणारे नव्हे असे तें जर केलें, तर तेथे सदन हें सांपडत नाहीं : म्हणून तेथे 'सजन' असाहि ताव कदाचित् बसणारा हा व्यवहाराचे अंगच दुसऱ्याकडून काढून आपलेकडे वळविण्यास लागणारें असे वाजणारें होतें : परंतु ही एक जातिच जशी अशी असल्यानें तेथे 'सदन' हेंच माझे जे त्यास येण्याचें करावेच करावे : तसे तें भजनाचें केल्यानें-बोलाचें केल्यानें-माझ्या सदनास येतातच-माझे गृहाचे, माझे सदनाचे, स्थानाचे, असे ते होतातच

एक-ह्या लोकांमध्ये ऐहिक भोग भोगणे असे भाग्य साधणारी अशी-बुद्धि आहे : तीसच व्यवसायाची, उद्योगाची, असे म्हणतात : तिजपासूनच कल्याण हे प्रवृत्तीस आले-असे त्या प्रवृत्तिमार्गाने जणू स्वतःसच तें उद्योगाचे असे म्हणू केले

लोक(ध्वनि)कल कलयति, परंतु ज्याना व्यवसाय नाहीं, उद्योग नाही, रिकामपणच, नुसतेच मोकळेपण हे जसे बहुशाखाना अनन्त असे म्हटलेले-अशा बुद्धि ह्या अनत असतात बहुशाखा ह्या अनत बुद्धीच्या झाल्या : म्हणून अव्यवसायिनाम् म्हणजे जेथे ' निश्चय च नाहीं, जेथे बळ हेच मुळीं एका निश्चयास आणले जावेच जावे असे असून, तेथे त जर तसे निश्चयाचे केले नाहीं, निश्चयान आपले विशेष असे जे व्यवसाय ते युक्त असे, योग्य असे जर केले नाहींत, तर तेथ ही अनेक शाखानी असलेली जी बुद्धि तीसच मग ते ' अन+अन्त ' नान्त ' असे अनतत्वच घेऊन, तेथे मग काय बुद्धि ही ' एक ' जी ती आता अनेक बुद्धयाची अशी झाली व मग तेथे नुसत चित्ताचे चचलपण-मनाचे नुसत मोकळवादाचे असे त होणे व तेथे अनंत असे म्हटलेले जे आकाश किंवा अनेकत्व, किंवा ज्याचा अतपार लागत नाहीं असे आकाशच आता ह्या बुद्धयाचे झाले . तेथे फाटे अनेक प्रकारे, अनेक काम्य असे, व चचलपणहि अनेक असेच झाल्यान, तेथ नुसत मनाचें आकाशावरच धावणे त अनिश्चयाचे असे अव्यवसायाचे . अविपश्चित म्हणजे मूढ लोक (अनेक जन्माचे प्रायश्चित्त हरी) हे ज्यांनी प्रायश्चित्ताने कधीं शुद्धि हीच पाहिलेली नाही असे ते व्यवसाय करणारे-निश्चयात्मक बुद्धि नसणारे ते अनिश्चयी-वेदान्या रमणीय अर्थवादात जाणणे जे ते वादात घेऊन जो ती आपल्याच जाणतेपणाची जी तीच एक मोठिवेची अशीच आहे असे म्हणून, तेथे ह्याशिवाय दुसरे काहीच नाही असे ' न अन्यत अस्ति ' असेच स्वत.चे एक वादरत असे मोठेपण-त मजसारखे दुसरे कोणीच नाहीं असे म्हणणारे न अहंचे एक स्वतःचे श्लाघ्य लक्षण-त्यानेच असतात . अशाची वाणी जी ती फुललेल्या वृक्षाप्रमाणे शोभणारी अशी मनोहर असून तीच ते (बोलणारे) बोलतात . कामुक स्वभाव, स्वर्गसुख, भोग, ऐश्वर्याकरिता अनेक क्रियाचा उपदेश-जसे एक मोहून जाणेच तेथे होत . व आता भोग व ऐश्वर्य ह्यामधील आसक्तीमुळे (अपहृतचेतसाम्) त्याना विधु म्हणजे चद्र जो आहे तोच मुळीं विधी म्हणजे दैवाने किंवा ब्रम्हदेवाने विधियोग्य असा होत नाहीं : आसक्तियुक्ततेने ती निश्चयात्मक बुद्धि हीहि पण स्थिरतेची अशी समा-म्हणजे अनेक बुद्धयाची झालेली ती बुद्धि ही आपले समधात-होत नाहीं असे ते लक्षण-ज्याप्रमाणे पचतत्त्वानी पचतत्त्वाना सामावून घेऊन जीवनज्योतच लाविली असे-तथे अनेक बुद्धयानीं आपआपले त बुद्धितत्त्वातत्त्वाचे जे झालेले, उद्योगाचे निश्चयाचे असे, असे त कदाचित्‌च ह्या समब्रम्हासच आले-तेथे ब्रम्हज्योतच जशी लाविली असत होतच नाहीं . तेथे दैव ह समब्रम्ह पाहात नाहीं : म्हणून (वेद म्हणजे जाणणे जे आहे, ज्ञान जे आहे त ) वेद जे आहेत ते ह्या तीन गुणानीं-सत्व, रज, तम ह्यानीं-भरलेले आहेत, म्हणून, हे अर्जुना, त निस्त्रैगुण्य हो-नित्यसत्त्व थ असा हो-योगक्षेमाची, निर्वाहाची नित्य चिता करणारा असा न होता, योगक्षेमाची चिता न करणारा हो व आत्मवान् म्हणजे आत्मनिष्ठ असाच हो, निर्गुण निष्काम हो, निर्द्वंद्व म्हणजे सुखदुःखादि द्वद्वापासून अलिप्त हो

येथे (का पुरुषा' व) पुरुषाः का . अहो, पुरुष काय यःकश्चित असे तेथे जर नारीचा भाव नाहीं, तर सा नारी अर्थतः पुमान् तरी कशी, किंवा अर्थतः पुरुषो नारी हेहि पण कसे बरे शोभेल !

एकंदरींत ह्या मनाने घेतलेले असंतुष्टपण व त्यामुळे भेव किंवा भय व त्यामुळे जे असंतुष्टपण हच मुळीं त्या तपास पाहू देत नाहीं, व बुद्धि ही जशी भयभीत अशीच होऊन तिला काहींच समजत

नाहीं : म्हणून येथें याच धर्तीवर उभारलेलें बोलणें तें म्हणजे, हे पार्था, माझा आश्रय करण्यास भीतीच वाटत आहे असें ज्यानीं-शूद्र किंवा आश्रय माझा घ्यावा असें ज्यानीं-करण्याचें भीतीमुळें सोडून दिलें, तें त्यानीं तसें न करितां ह्या ज्या ब्राम्हणान्या संस्कारानीं जशा आपल्या योग्यतेस येऊं दिलेल्या अथवा सहज आलेल्या ज्या ' खोटी ' करणाऱ्या अशा बाजू अथवा योनी त्यानीं जशा त्या बाजू आपणच वापरूं लागून, तेथें जसें काहीं एक ह्या मातीचें वजनच केलें-ह्या वाचेसच, ह्या बुद्धीसच, ह्या वासनेसच, ह्या स्त्रीसच पुढें घेऊन . म्हणून येथें घाबरू नको, मनास बिडवर् नको, तेथील गति जी आहे तिची जी व्याप्ति ती केवढी आहे तें जाणून घे व मगच तें तुला समजेल कीं, ह्या बाजू परम्परावलंबी असून त्या आश्रय करण्यास योग्य अशाच आहेत

' गतिर्भर्ता प्रभु साक्षी '-अशी ह्या ' गति ' शब्दाची व्याख्या ब्रम्हादासहि पुरून उरणारी अशी महान विभवाची आहे, प्रेमाची आहे, आपलेपणाची आहे, ती नीट समजून घे, म्हणजे तुला त्यातील गुह्य हें समजून भीति वाटणार नाहीं-म्हणून भिऊं नको-माघार घेऊं नको

**किं पुनर्ब्राम्हणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥**

पुण्य. = पुण्यवान् भक्ताः = भक्त इमं लोकं प्राप्य = ह्या लोकास येऊन, आल्यामुळे भजस्व = भजावें

किम् पुन. पुण्या. भक्ता ब्राम्हणा तथा राजर्षय., पार्थ, इमम् अनित्यम् असुखम् लोकम् प्राप्य माम् भजस्व ।

अहो, अशा ह्या ' स्त्रिया, वैश्य, शूद्र ' योनींना जर सगुणत्वानें-म्हणजे माझ्या आश्रयानें जाण्यानें-त्यांना श्रेष्ट गति ही मिळते, तर मग जे पुण्यवान असे ब्राम्हण, भक्त, राजर्षि, वगैरे त्यांना हा लोक अनित्य व असुखाचा आहे व तेथेंच आता आलो आहोत असें पाहून मजला भजन असावें हें काहीं नवलाचें नव्हेच. ( ३३ )

माझी भक्ति केल्यानें जर चांडाळादिकांना उत्तम गति मिळते, तर मग पवित्र व उच्च संस्कारयुक्त जातीमध्ये जन्म पावलेले व भक्ति करणारे ब्राम्हण आणि पुण्यश्लोक ऋषितुल्य क्षत्रिय या मार्गानें उत्तम गतीला जातील हें निराळें कशास सांगण्यास पाहिजे ? याकरिता अनित्य, क्षणभंगुर व सुखशून्य लोकीं तू जन्म पावला आहेस, म्हणून माझेंच भजन कर

**मग वर्णामाजीं छत्रचामर । स्वर्ग जयांचें अग्रहार ।**
**मंत्रविद्येसी माहेर । ब्राम्हण जे ॥ ४७६ ॥**

**जेथें अखंड वसिजे यागीं । देवांचीं जेथ वज्रांगीं ।**
**जयांचिये दिठीचिया उत्संगीं । मंगळ वाढे ॥ ४७७ ॥**

**जे पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार सावेव ।**
**सकळ तीर्थांसी दैव । उदैलें जें ॥ ४७८ ॥**

**जयांचिये आस्थेचिये बोलें । सत्कर्म पाल्हाळीं गेलें ।**
**संकल्पें सत्य जियालें । जयांचेनि ॥ ४७९ ॥**

जयांचेनि गा बोलें । अग्नीसि आयुष्य जालें ।
म्हणौनि समद्रें पाणी आपुलें । दिधलें यांचिया प्रीती ॥ ४८० ॥
मियां लक्ष्मी डावलौनि केली परौती । फेडुनी कौस्तुभ घेतला हातीं ।
मग वोडवली वक्षस्थळींची वाखती । चरणरजा उयांचिया ॥ ४८१ ॥
अजुनी पाऊलाची मुद्रा । मी उरीं वाहे गा नरेंद्रा ।
आपुलिया दैवसमुद्रा । जतनेलागी ॥ ४८२ ॥

(४७६) छत्रचामर = श्रेष्ठ पदवीचे अग्रहार – अग्रार = इनामगांव (४७७) देवांची जेथ - जे वेदांची. दिठीचिया उत्संगीं = कृपादृष्टीच्या माडीवर (४७८) पृथ्वीतळींचे देव = भूदेव तपोवतार = तपाच्या मूर्ति. सावेव – सावयव उदैलें – उदयलें (४७९) आस्थेचिये – आस्थेचेनि पाल्हाळीं – पाहालीं. वोले = वोलाव्याने पाल्हाळीं गेले = प्रसाद पावते जियाले = जगते (४८०) बोले = आशीर्वादानें डावलौनि - जवळोनि = दूर करून, अव्हेरून, उपेक्षून (४८१) बोडवली = पुढे केली वाखती = खळगी. वक्षस्थळींची = छातीची. (४८२) मुद्रा = चिन्ह उरीं = हृदयीं नरेंद्रा – मुभद्रा दैवसमुद्रा = गातीचे ऐश्वर्य.

जे चारी वर्णांचे गजे (ज्याच्यामुळे चारी वर्णांना वर्णविशेषत्वाचे महत्त्वानें विभषित केलेले होतें), ज्यांना स्वर्ग हे आंदणच मिळालेलें असे व जे मंत्रविद्येचे केवळ माहेरघरच आहेत, असे जे ब्राम्हण- (४७६)

अशा ब्राम्हणांच्या ठिकाणीं याग म्हणजे एकले वैराग्य हेच वास्तव्य करून असल्याने ती अखंड अशी वैराग्यशीलता हीच मुळीं परम भाग्य देणारी अशी देवाची दैविकी शक्ति ही परम अभेद्य असे एक कवच धारण करून असणारी अशी ' वज्रकवचच एक असे ' : तथे वेद हेच जे आपले दास्यच करणारे सर्व कोणी झाल्याने, त्याचा भलताच हुरूप हा सर्व गगनहि पण आक्रमण करणारा झाल्याने, आतां देवत्व काय कुठे हया पृथ्वीवर तर मुळींच नाहीं असे भासमान झाल्यानें, तेथें जे काहीं कर्म दिव्य दैदिप्यतेस आल्यामुळे आता ते दिव्य कुठे राहावे, तो एक देवच त्या दिव्यास उचलूं पाहू लागन तोच पुढें झाला : व आतां ते वेदाचे जे वेदच होऊन असणें तच हया देवानें करून तेथेच मुळीं ते वेद सर्वच्या सर्व पोहोंचले व त्यानीं आता असे म्हणूं केलें कीं, आम्हीच मुळीं हे आहोत, ते वेद जे तेच मुळीं आता हयाचमध्ये येऊन आहोत : कारण तेथे जी एक परम उणीव हीच मुळीं भरून निघाली व तीच येथे हया वैराग्यकवचानें भरून काढल्यामुळे, आता ती वज्रागी हीच पुढे होऊन ती हया वेदरूपी देवाच्या माडीवर बसली-माडीवरच जगी ती घेतली गेली : एक बाळच जसे माडीवर असावें व त्याने आपल्या आईच्या तोंडाकडे पाहात असावे : तेथें ती माता ही मंगळाचा वर्षाव त्याजवर करीत असलेली, कीं कल्याण हेंच तेथें ओतप्रोत भरून येते-तेथें दिसेन्‌दिस, दिवसानुवस, कल्याण एक मंगल शुभ असेच आपला प्रभाव घेऊन असलेलें असे तें देवाचे जे असणें, तेच हया (' ब्रम्ह जानाति असौ ब्राम्हण: ') ब्राम्हणांच्या ठिकाणीं वसून असलेले. (४७७)

अहो, हे आणखी कसे आहेत म्हणाल-तर ते म्हणजे हया भूतलावरील देवच जसे-जेथे कर्म हेंच दिव्यतेस आलेलें-असे ते देवच हया भूमंडळावरील-पृथ्वीतळावरील : तेथे ' तपश्चर्या ' जी तिने आपले सर्व महत्त्व हें भाराचे असे ते तप आचरणें हेंच आता अव्यय असे झालें : अवयवांनींच जसा हा देह पूर्ण असा दिसणारा होतो-तेथे एकादा अवयव कमी असे नाहीं : तसे येथील अनेक अंगांनीं अवयवांनीं ते तेथीलच्या बुद्धिकलेचें जे अवतरण तेच हया तपोवतारांनीं-ब्राम्हणानीं-बुद्धि ही तपच एक करून असणारी अशी सर्व बुद्धिकला ही ' जातीची ' केली : तेथें जाति जी हया तपाची तीच ओढून

आली, महत्त्वाची झाली, भारास आली, प्रभावास पाहूं लागली : तेथें आता सर्व तीर्थें हीं आपणास दैव आलें असे पाहूं लागणारीं झालीं : जशीं का सर्व तीर्थें हींच तेथीलचे अवयव असून, त्या अवयवाचे जे काहीं देवता होणे ते जसे-सर्व अवयवानीं शोभविलेला तो देवच एक ह्या तीर्थांना दैवच देणारा असा-तें म्हणजे दैवच एक उदय घेऊन आले असे : तेथें उदय असल्यामुळें दैव हे काहीं मी दैवाचें केव्हा होईन असे नसून, तें विदिततेच्या अशाच एक उत्सवास अथवा उदयास पाहून असणारे होय (४७८)

ज्याच्या आस्थारूपी ओलाव्यानें सत्कर्म हे विस्तार पावलेले, ज्याच्या संकल्पामुळे सत्य हें जन्मास आले-त्यानीं पाणीच जसे सोडलेलें कीं, सत्य सत्य म्हणून जे आहे, ते जीवित लाभो-सत्य हे जन्मो-ज्या सत्यामुळे सूर्य हा अंतरिक्षात प्रकाशमान होऊन आहे-ज्या सत्यामुळे पृथ्वी ही आपला गर्भ यथा असा धारण करून आहे. (४७९)

ज्याच्या 'बोला'मुळे अग्नि हा आपल्या सामर्थ्यानें आहे-समुद्र हा अग्नि विझविणाग आहे, कारण पाणी आणि अग्नि हे दोन्ही परस्पर द्वंद्वाचे असे असल्यानें, तेथें ह्या ब्राह्मणाचे जे बोल त्यानीं आपले वचन देऊन, प्रतिज्ञा करून बोल आदरिलेले जे काहीं सत्यच सर्व एक, म्हणून समुद्रानें आपले पाणी ह्याच्या वन्हिवत् दीप्तीस्तव-प्रीतीस्तव-दिलेले आहे : ह्या ब्राह्मणाचे जे काहीं बोल-अहो, ते बोलच नुसते नव्हत, तर ते म्हणजे ब्रह्मरूप होऊन, अग्निरूप होऊन ह्या अग्निनारायणासच एक प्रार्थिलेले असे, त्यानीं त्यास महत्त्वास घेऊन असणे जे ते म्हणजे जसे का फक्त एक हे ब्राह्मणच होत ह्या ब्राह्मणाचे रक्षण का कसे म्हणावें, ते काय अग्नीचे त्या समुद्रानें आपले पाणी देऊन पोषण केले-समुद्रानें ब्राह्मणाचे पोषण आपले पाणी देऊन केले-प्रीतिच एक ह्या ब्राह्मणावर ' ब्रह्म जानाति असौ ' त्यावर) ह्या समुद्राची आणि म्हणूनच तर त्या ब्राह्मणरूपी अग्नीचे, आपले स्वत:चे पाणी देऊन, पोषण केले-त्यास पाळिले तेथे अग्नीसच मुळीं ह्याच्यामुळेच आयुष्य आलेले असल्यानें, तेथे केवढी प्रीति बरे या कारणास्तव, आणि म्हणूनच तर ह्या अग्नीच समुद्रानें पोषण केले तेथे परस्पर काय, प्रीति कशी, बोल म्हणजे वचन किंवा प्रतिज्ञा ती काय, आयुष्य ते कसे ह्या अग्नीचे जे साक्षात् देवच एक असे-म्हणून देवत्वच ते आयुष्यास आलेले असे-तो देव अग्नि हाच आयुष्याचा झाला, आशिर्वादच एक त्यास ' आयुष्मान् भव ' म्हणून दिलेला ह्या ब्राह्मणानीं तेथे, तो काय आयुष्याचा असाच वेभवगातीनच !!

दैत्य राजे हे और्व ऋषीच्या बापाला त्रास देऊ लागल्यानें, त्या और्व ऋषीनें 'नाशक' अग्नि उत्पन्न केला . परंतु त्यास आपल्या बापाची आज्ञाच झाली कीं, दैत्यनृपाचा नाश हा नच व्हावा परंतु आता तो अग्नि कुठे काय उगीच अग्नि असा असणारा काहीं नाश केल्याशिवाय राहील असे नसल्यामुळे, त्या और्व ऋषीनें तो 'नाशक' अग्नि समुद्रामध्ये टाकून दिला तेथे त्या अग्नीचें अग्निपण, अग्नित्व, साग्निकत्व, हे समुद्रानें आपले पाणीच त्यास राहण्यास दिल्यानें रक्षणच झाले · असा तो समुद्रामध्ये राहणारा जो-समुद्रात असणारा जो--अग्नि त्यास आता और्वानल हे नांव प्राप्त झाले-व ' वडवाग्नि ' असेहि त्यास नाव आहे. अशी ही एक आख्यायिकाच जशी ह्या वडवानलाची का और्वानलाची का वडवाग्नीची आहे (४८०)

त्या ब्राम्हणाच्या चरणाच्या-रज: एका कणासाठीं-एका रज:कणासाठीं-कण: एका रजासाठीं-मी आपली वक्षस्थळाची जी तोलून धरणारी, उचलून असणारी, अशी जी एक मातृकाप्रेमाची झपणी करून त्यास ती पाळण देणारी होते : तथे लक्ष्मी जी सर्व सामुद्रिक लक्षणांनीं भरलेली अशी जरी असली, तरी तीहि पण येथे पुरती न झाल्यानें, तेथें गणीव म्हणजे जाणणें हें बुद्धीने जाणलेले, परंतु ते

भावानें स्वभावाचें सुंदर असें गृहस्थपणानें वागवं न शकल्यामुळे, तेथें नुसती राणीवच एक, राहाणीव-एक स्थळच-राहाण्यास दिलेली असे गृहच केलेलें : परंतु ती जाणीव, जाणणें, जाणतेपण हे वागवावें, वापरावें, वापरून ते यथा उत्तम असें आहे असें ते करणें-ते भावाचें स्व असें उत्तम वागविलें जाणारें व्यापकत्व जें ह्या ईशत्वाचें-तेथें त पूर्णपणें रत आहे, त्यास अवकाशन आहे, आवरून आहे, पाहून आहे, अवलंबन आहे असें तेथें नच करूं आल्यामुळे, तीं लक्षणें हीं काय नुसतीं लक्षणें घरात असणारी-तीं आता ह्या लक्ष्मीसच बाजूस करून-परती करून-परोती करून-डावलिली व आता कौस्तुभच एक हातीं घेतला . तीं सामुद्रिक लक्षणें तेथें मुळीं काहींहि उणें नाहींच-तीं सर्व लक्षणाना उकलणें करून-तीं त्या रत्नानें दर्शित झालेली अशीं कौस्तुभाचीं-आता आपला हातच मुळीं त्या रत्नाचा केला-रत्नच हातीं घेतलें : तेथें सर्व सामुद्रिक लक्षणें परिपूर्णपणें असलेलीं-काय ती सामुद्रिक लक्षणाची संपदाच एक, लक्ष्मीच एक ब्रम्हपदाची, तेथें ब्रम्हपद हें भाग्य झालें-परम भाग्याचें असें, भाग्यशालीन असें स्पष्ट ब्रम्हच-ब्रम्ह स्पष्टतेनें ब्रम्हपदाचें असें, संपदेच असें : (४८१)

ज्याच्या चरणरजाकरिता दूध फेडून दहीं, दही फेडून जसें ताक, तशी ती सर्व सामुद्रिक लक्षणें, जेथें लक्ष्मी सर्व लक्षण-लक्षण्य-लक्ष्मीवान् असलीच पाहिजे, सर्व लक्ष्मीच जशी जेथें, तो कंठ मी आपल्या हातीच घेतला कंठ उपकंठ, जेथें सर्व तेज येणारें-जशी का तो एक अस्तुगिरीच असा प्रकाशमय, दिव्य, सर्व लावण्य, परम दैदीप्य, अतिसुंदर, हृदयाकर्षक-ह्या देहामधील जो काहीं भार-अंतर्बहि-तो जसा त्यानें प्रकाशनय करून, ह्या आत्म्याची फेरीच जशी-सर्व सुंदरतेचें अंग हे सर्व प्रकाश लागेल असें ते-तेथें माझ्या हृदयींचें जें काही एक प्रेम, गर्भ असें-हृदयींच माझ्या जें तें प्रेम-एक गर्भच करणारें, स्थिर होणारें असें लक्षण-तें त्याच्या चरणरजाचें वंदनच एक : त्याच्याकरिता मी आपलें वक्षस्थळ हेंच दिलें व तेथेंच त्याचें चरणरज कण हे जेव्हा म्हणून येणार, तेव्हा ते म्हणजे गर्भ घेऊनच आले असें स्थिर : अजुनीहि मी त्याच्या पाउलाची मुद्रा 'श्रीवत्सलांछन' मी आपल्या उराच्या ठिकाणीं वागवीत आहे : ती मुद्रा म्हणजे आम्हाला दैवच देणारी होणार-देव हे देवाचें जसें एक प्राणापेक्षाहि जास्त काळजीनें रक्षण करून मी ती मुद्रा वाहात आहे-का समुद्रभारानें जतन ह प्राणप्रिय असें केलेलें तें दैवच एक त्या मुद्रभारानें देऊ केलेलें-येत असलेलें-आणलें जाणारें (४८२)

**जयांचा कोप सुभटा । काळाग्नि रुद्राचा वसौटा ।**
**जयांचिया प्रसादीं फुकटा । जोडती ऋद्धी ॥ ४८३ ॥**
**ऐसें पुण्यपूज्य ब्राम्हण । आणि माझिया ठायीं अति निपुण ।**
**आतां मातें पावती हें कवण । समर्थपणें ॥ ४८४ ॥**
**पाहें पां चंदनाचे अंगानिळें । सिवंतले । तेथें निंब होते जे जवळे ।**
**तिहीं निर्जिवीं देवांचीं निडळे । बैसणी केलीं ॥ ४८५ ॥**
**मग तो चंदन तेथें न पवे । ऐसें मनींचि कैसें धरावें ।**
**अथवा पातला हें समर्थावें । तेव्हां काय साच ॥ ४८६ ॥**
**जेथें निववील ऐसिया आशा । हरें चंद्रमा आधा ऐसा ।**
**वाहिजतसे शिरसा । निरंतर ॥ ४८७ ॥**
**तेथ निववित आणि सगळा । परिमळें चंद्राहूनि आगळा ।**
**तो चंदन केवीं अवलीळा । सर्वांगीं न बसे ॥ ४८८ ॥**
**कां रथ्योदकें जियेचिये कासें । लागलिया समुद्र जालीं अनायासें ।**
**तिये गंगेसी अनारिसें । गत्यंतर असे ॥ ४८९ ॥**

(४८३) वसौटा = स्थान, वस्तिस्थान (४८४) पुण्यपूज्य – पुण्यपुंज समर्थपणें – समर्थणें – सगर्थावे = प्रतिपादावे, समर्थन करावे (४८५) अगानिळे = अंगवायूच्यायोगानें सिवंतले – शीतळें निर्जिवीं – निजिवीं निडळे = मस्तके, कपाळे बैसणीं = वस्तिस्थानें (४८७) आधा = आर्धा. वाहजतसे – वाहिजत असे हरे = महादेवानें (४८८) सगळा – सबळा. अवलीळा = सहज (४८९) रथ्योदके = रस्त्यावरील उदके अनारिसे = वेगळे

असे जे-स्वर्गच ज्याना आदण मिळालेला आहे असे-ब्राम्हण, ते म्हणजे राजर्णेच एक ह्या वर्णांना-ह्या वर्णांमध्ये ते कसे आहेत म्हणशील तर राजेच जसे राजेपणाचे जे अधिकार ते एक छत्र हे पण जसा काय अधिकारच तेथे स्थिर झालेला–त्याचप्रमाणे ते जे चामराचे असे, चवरीचे असे– का पचचामराचे असे जे एक अधिकारणेच-अधिकारच तो आहेच आहे जेथे–असे ते ब्राह्मण हे चारी वर्णांमध्ये अधिकारपदानें असणारे-त्याचीं तीं भूषणेच, अलकारच, अधिकारच, वस्त्रेच जशीं त्या अधिकाराचीं-असे ते आपला अधिकार वागवून असल्याने मीहि पण ते जतन करून आहे, कारण केव्हा तरी दैव हच समुद्रासारखे खोल गभीर असे ते रक्षण करून आहे- जिवापलीकडे जतन करीत आहे–त्याच्या अधिकारावरच ते जसे जतन असे होऊन आहे, तेथे समुद्रासारखे खोल, अर्थभरित, विस्तीर्ण असे देवच एक जतन झाले असे : त्याचा कोप पाहावा तर काळाग्नि रुद्रच जसा एक वसौटाच पाठीस लागणारा–तो काय रुद्रच एक कोप झालेला असा काळाच–तेथे मग ह्या देहधारणेचें काय काहींच होणारे नव्हे . तेथं सर्व भोग, भाग, दिव्य, योग्य असे जे तेच ह्या काळाग्नीप्रमाणे वागविणारे झाल्यानें, एक कोपच झाला व सर्व दु.खेच जणं क्षत होऊन आलीं . बरे, त्याचे प्रसन्नपण कसे म्हणशील तर सहज प्रसन्न हे प्रसादच एक दान झालें व तेथे काय अनेक सिद्धि ह्या फुकटफाकटच मिळाल्या– सिद्धिच जोडल्या गेल्या-मिळाल्या : लहानसहान, बारीकसारीक असे जे उत्तम प्रसंग–सहज योग, वेळा– हे सर्व एकत्रित होऊन, त्यानीं सिद्धीच एक सर्व लक्षणाची अशी आता जोडली–त्याच्या बोलण्यानें बोलणे हे जोडले होऊन सिद्ध असेच झाले

[ ज्या परमात्मस्वरूपाविषयी विचार केला तर मन अन्यत्र कोठेहि जात नाहीं, अशा परब्रम्हाच्या पेठेत मला नेऊन उभे केले त्या पेठेत जाण्याला ससारसमुद्र फार मोठा आहे खरा, तथापि भगवान जो श्रीरग हा नावाडी होऊन त्यानं मला हलकेच, म्हणजे यत्किचित्‌हि धक्का लागू न देता, ब्रह्म विद्येचा पार प्राप्त करून दिला हे सर्व उपकार श्रीगुरुचे असल्यामुळे त्या श्रीगुरूवाचून मी सर्व शून्य समजतो कारण तेथील खूण प्राप्त करून देणारे श्रीगुरु निवृत्तिराज आहेत रखुमादेवीवर जो बाप विठ्ठल त्याचे ठिकाणीं अनुसधान ठेवून रात्रंदिवस ब्रम्हस्थितीमध्ये लीन करून ठेवणाऱ्या श्रीगुरूचे काय उपकार सागावे असे ज्ञानेश्वरीकार श्रीज्ञानेश्वरमहाराज गातात, म्हणतात ] (४८४)

हे पाहा, चदनाचे अग हे अनिलाने म्हणजे वायूनं शिवले, स्पर्शले, तेव्हा तेथे जवळपास जे निब होते, त्या निर्जीव अशानींहि पण आसनस्थच त्या देवाना केले : पुण्यपूज्य असे ब्राह्मण मजप्रत पावतातच–जसे का चदनाच्या वृक्षाना वायूनें स्पर्श केला–तेथे सर्व रान हेच परिमळानें दरवळून गेले–तेथें जवळच जे निब होते ते सहजच त्या जवळपणाने जसे काय चदनाच्या योग्यतेस आले व देवाच्या बैसण्यास त्यानीं जागाच केली : चदनाच्या अगानिळानें शिवलेले निंबहि चदनच झाले–व आता त्यानीं देवाचीं जीं निडळे तेथे त्यानीं वास्तव्य केले : नेहमीं प्रेमाचें एक व्हावे हे तर खरेच, ती वाटच जशी का पाहात असावे असे झाले, तर मग काय तेथे तें प्रेम हे प्रीतीस केव्हां येणार कोण जाणें : नेहमीं वाटच पाहात उभे असणें–वाटच पाहात असणे–कीं तो प्रिय किवा ती प्रिया ही केव्हा बरे येणारी अशी जी दृष्टि, मुद्रा, लक्षण, मनच निस्सीमतेने रममाण होऊन जाणारे असे ते प्रीतीचे लक्षण–मदनच जसा जन्मला :

काय प्रेमाशिवाय-प्रीतीच्या माणसाशिवाय काय मदन असा मुळींच म्हटला जाणारा नव्हे-तो येथेच फक्त मदन असा, एरव्हीं अथवा दुसरीकडे तो काहीं दुसऱ्याच नावाने जसे 'काम' असाच म्हटला जाणारा : किंवा परिणामात्मकहि पण बोलणे तेथें एक उपजीवनाचे-उपस्थितिच पाहिली असे- म्हणून त्या निर्जीव निंब वृक्षानीं हीं तीं 'अंगानिळे सिवंतले' अशीं बैसणीं-आसनेच देवाना दिलीं- तेथे दिव्यतेची ही दृष्टी होणारी-ह्या दृष्टींतच त्यानीं आपले वास्तव्य करून देवसान्निध्यच साधले (४८५)

अशी ती देवाना बसण्यास जागा झाल्याने, तेथे आता तो चंदन पोहोचणारा नच होईल ? असे नव्हेच ! तेथे तो असणारच-किंवा आता तो तेथे आला असे म्हणणे काय महत्त्वाचे ? स्वरूपणाचे ? तेथे तो आहेच आहे व त्यास आता तो तेथे आला असे म्हणणे काहीं महत्त्व घेत काय ते पाहा ! म्हणून तेथे तो चंदन आहेच आहे असेच (४८६)

ह्या जीवदशेस निवविले-माझे डोळेच ते रूप पाहाण्याने निवले-जीव शांत झाला-रूप पाहावेच पाहावे-रूप पाहाण्याचा कंटाळाच येईना . असे वाटले कीं पुन्हाच जसा जन्मलो-अमृतातच जाऊन पडलो-सहजच ह्या जीवदशेस प्रसन्नता आली : असे ते जे माझ्या जीवप्रेमाचे, जीवदशेचे, मनाचे निवणे हे होईल हे व्हावे-असे समजून श्रीहराने चंद्रमा आधीच मुळीं आपल्या शिरोभागीं स्थिर केला-आधी चंद्र शिरसा वाहिला आहे ज्या श्रीहरानं तथे निरतरचे असेच ते त्याचे करणे ते तथ काय निवविणे हें सगळेपणाने-निवणे हें सगळेच तेथे आले . तेथे परिमळ-स्वाद पाहावा तो चंद्रापेक्षाहि विशेष आगळा असा महत्त्वाचा असा तो चंदन सहजतेच्या अवलीलेनेच सर्वांग निववणारा होत नाही ? अहो ! सर्वांगामध्येच तो बसून गेला व आता सर्वांग हे निवलेच-निववलेच त्याने-आता चंदन सहजच सर्वांगीं बसून आहे : असे ते त्याचे चंद्रापेक्षाहि विशेषत्वाने केलेले-विलेले-निवविणे हे सगळाच चंदन हा सर्वांगी बसला व तो निववणारा असाच होणारा

ही चंदनाची करणी श्रीज्ञानेश्वर माउलींनी कशी गाईली आहे पाहा.-व्यवहारात अति उत्तम चंदनास मैलागिरी चंदन अथवा बावन्नी चंदन असे म्हणतात त्या बावन्नी चंदनाच्या संगतीने दुसरे सामान्य वृक्षहि चंदनरूप होतात अशी प्रसिद्धी आहे हा अभिप्राय मनात घेऊन गौळण म्हणते, "बावन्नी चंदनाप्रमाणे असणारा हा श्रीकृष्ण परमात्मा त्याजजवळ मी एक सामान्य वृक्ष या भावाने रममाण झाले त्याचा परिणाम असा झाला कीं, मी आपल्या जातीकुलाला मुकून म्हणजे अतररूप परमात्मरूपच झाले लोखंडाचे हीनत्वाचे सायास म्हणजे कमीपणा जसा परीस नाहींसा करतो, त्याप्रमाणे मला श्रीकृष्ण परमात्म्याने जीवभावापासून काढून परमात्मरूप केले हे माझे परमात्म्याशीं ऐक्य होणे मेघजळामध्ये आणि सिंधुजळामध्ये जसा सावयवत्वाने भेद असतो, तसा माझ्यामध्ये आणि परमात्म्यामध्ये स्वगत म्हणजे अवयवभेद नसून, आम्ही मुळचेच एकरूप आहोत परमात्मा श्रीविठ्ठलाचे ठिकाणीं कोणत्याच तऱ्हेचा भेद नसून, उपाधिदृष्ट्या मात्र उत्तम-मध्यम भावाच्या ठिकाणीं तो व्यापून आहे असे म्हणावे लागते असे ज्ञानेश्वरीकार श्रीज्ञानेश्वरमहाराज गातात-म्हणतात (ज्ञा गा ७५९)

तेंच कसे ते म्हणजे जसा का जनवनाचा निकट संबंध असलेला-तेथ ही जी धारणा-प्राणधारणेने श्वासोच्छ्वासाचे ठायीं ह्या जीवदशेने परिणमून असणे- श्वसणे-तेथे जणूं ही जीवदशा आपला तळच घेत राहून ह्या जीवदशेचे जे काहीं रंजन ते पोषणादि व्यवहारादिनीं केलेले, तेथे आता हा जीव जसा काहीं एका अक्षरास आला, व त्याने ते जगणे, जीवदशेने असलेले श्वसन, हे भावबळाचे असे केले : तेथ उत्तम-मध्यम-कनिष्ठ असे जे कांहीं भावाभावाने असणे, तेथे स्वगत म्हणजे अवयवभेद नसून, एक ते प्रकाराचे असेच ते भावणे हे ज्या एका मूळ स्वरूपावरच उभे असलेले-त्या मूळ स्वरूपात राहूनच जसे का ते उत्तम-मध्यमतेचे पाहाणें केलेले-तेथे ह्याबाबत अक्षरांनीं जसा का तो सर्व श्वसनभार हा

भाजन म्हणजे भिन्नच एक ह्या बावन्न मात्राचा ! तेथें मैत्रीच जशी एक परिणमून असल्यानें, तेथें ते भाव हे मिश्रच असेच जरी दिसले, तरी पण ते तसे नसून, एकच भाव एका वेळीं येत असल्याने (ह्या वृत्तीस समजणारा असल्याने), तेथें आता स्थूल दृष्टीच जशी आपल्या उत्तमत्वास आली आता ह्या उत्तमत्वान जर आपल्या मूळ स्वरूपातच गहाणे केले, तर ते जे सूक्ष्म-अतिसूक्ष्म-असे भाव हे जसे का ह्या पदार्थमात्रानीं भरलेली सृष्टीच एक आपआपले गुणानुवाद अथवा आपापलें रहस्य सागत असलेली -तेथ त्या त्या उत्तमत्वाचे अथवा मध्यमतेचे असे ते झाल्यानें, तेथें बुद्धि ही आपले एक मुख्य पाहाणारी होऊन, आपल्या मूळ स्वरूपासच चिकटून राहाण्याचा प्रयत्न करिते . असे करिता करिता तिला अनेक अनुभव येऊ लागून ती एका महत्त्वास आली असे होते आता याहिवर जे काहीं तिने आपलेपणासच त्या मूळ स्वरूपात स्थिर करण्याचे केले, तर तेथें त्यावर म्हणजे मूळ स्वरूपावर जो भाव आपला स्वरूपस्थितीचा असा तो दृढच होऊन असल्याने, तेथें जसे का एका त्या मूळ ब्रम्हस्वरूपावरच ते जाणे येणे अथवा दृढीकरण अथवा उत्तम मध्यमतेचे होणे हे होत राहिलेलें, हे तिच्या त्या मूळ स्वरूपाच्या होण्याने त्या त्या भावानाहि पण एक रगव जसा चढला असे होत . त रगणे हे ह्या मूळस्वरूपावरच होत असल्याने, तेथ ती बुद्धि ही आपली अत्यंत शुद्धि घेऊन असल्याने, ती कोठेहि काहींहि त्या विविधतेने असलेल्या भावाने मुळी बोलणेच करीत नाहीं . तेथ ती स्वतःच तें मूळ झाल्याने, जसे का एक स्वरूपस्थर्याचे महत्त्व-सगुण-हेच तीस आल्याने, तेथ ती ब्रम्हभावासच चिकटून जाते म्हणून येथें जर का एकादा प्राणी त्या ब्रम्हभावास पाहून आपली बैठक स्थिर करून असेल, तर तोहि पण त्या ब्रम्हभावाच्या शेजारींच जसा बसला असे महत्त्व तेथें येणारे होतेच होतें : म्हणून आता जसे काहीं ह्या वनाने त्या सर्व चदनाचे चादणेच जसे एकत्र करून, त्या स्वरूपदर्शनास एक 'बा' किंवा 'बापच' म्हण करू लागून, तेथें त ब्रह्मरूपच जसे ह्याचे म्हणजे चदनाचें

म्हणून तथें एक चंद्राचे जसे का रूप येऊं लागून, तेथें ह्या भावाप्रमाणे प्रामाण्य क्रमाचें जर, तर तेथें जशी का एक तीर्थावळीच-ह्या तीर्थावळीमधील जो काहीं ह्या चंद्राचा अर्धा भाग-आधेपण जे चंद्राचे-एक अष्टमीचा असा आता चद्रच शिरोभागीं दिसणारा, असणारा होऊन-तेथें शिरोभाग हाच त्या चदनाने (किंवा चादण्याने) आपल्या स्थिरतेचा-सुघटिततेचा-केलेला असतो : तेथें सर्व वन हेंच जसे सुगधाने दरवळून जाऊन, तथे तो तो भाव हा स्थिरच जसा झाला : तेथें वनाचा 'बा'च एक असा तो दुसऱ्या अनेक वृक्षाना 'आपलेपणाचा' करून असतो तेथें ज्या वृक्षाना म्हणून एक बैसक सापडलेली किंवा दिलेली होते, ते ते वृक्षहि पण त्याच्याजवळचे असेच होऊन जाणारे : सर्व शीतलता हीच जशी ह्या जीवदशेचा एक मनस्थैर्याचा भाव होऊन, तेथें ब्रह्मभाव हाच ब्रह्मपणाचा झाला व आता काय तो देवानेंच आपला असा किंवा श्रीहरानेंहि पण आपला असा नच म्हणावा ? तेथें देव जो तो श्रीहरच एक

हच एक व्यवहारास घेऊन कसे बोलणे केले, ते म्हणजे एक गौळण ही त्या श्रीकृष्ण परमात्म्याचे स्वरूपदर्शनाने अति प्रसन्नतेस आली, व ती त्याचे महत्त्व हें कसे आहे ते सागूं लागली : तेथें तिनें त्यास एका चंदनवृक्षाची उपमा दिली व त्याचा तो गुण सहजतेचा असा एक स्वगत प्रेमाचा असा झाल्यानें, तिजला त्यानें आपल्यातच मिळवून घेतलें व ती आता पाहावे तों एक त्या श्रीकृष्णाप्रमाणेंच ब्रम्हभावाची अशी झाली . तिचें मूळचें एक जातीचें हीनतेचे असे तेच तेथे सर्वच्या सर्व जाति मुळीं एकवटून आली, व तिने ते सर्वच्या सर्व जातीचें प्रेम हे उचंबळून ती त्या प्रेमातच मिळाली, प्रेमाची झाली, सर्व प्रेमच तें : तेव्हां आतां काय तेथे जातीची गोष्ट कसलीच नाहीं-जसे का लोखंड हें परिसानें शिवलें म्हणजे तें सर्व सोनेंच झाले, तेथें लोखंडहि नाहीं व परिसहि पण नाहीं : तेथें सर्व सुवर्णच एक-मेघजळाचें व सिंधुजळाचें जे उपमेचे तें सुवर्ण विशेष असे होय तसे तेथें तें सागितलेलें जे

एक-गौळणींचे व त्या श्रीकृष्णाचे त एक होणे-हे ब्रम्हरूपच पुढे करते . तेथे ब्रम्हभाव हाच दृढ होऊन आला : ब्रम्हच एक तेथे ! तिचे ते जीवभावाचे होणे हे काढून टाकले गेले-निघून गेले-तो त परमात्म्यागीं एकरूपच होऊन आले, झाले : तेथे श्रीपरमात्मा जो, त्याचे ठिकाणीं कोणताच भेद हा नाहीं

येथें बावनी चदनाची उपमा श्रीकृष्णास दिली व ती गौळण म्हणजे एक सामान्य वृक्ष जशी : येथे 'वृक्ष' किंवा 'झाड' ह्या देहास म्हटले आहे . ह्या वृक्षाचे अथवा झाडाचे काहीं तर देणे असणारे ह्या उपमेने जसे पुढे केले-तेथे म्हणजे एक प्राणच जसा त्या झाडानीं दिला, व तुमचे त हीनत्व स्वतःच प-करिले : तेव्हा तेथे उतराई हे कसे दक्षिणेचे साग पाहूं ?

रूप सामावले, दर्शन ठाकले । अंग हारपले तेचि भावी ॥ १ ॥
पाहो जाय तव पाहण्या वेगळे । ते सुखसोहळे कोण बोले ॥ २ ॥
जेथे जाय तेथे मौनचि पडले । बोलवेना पुढे काय करू ? ॥ ३ ॥
सरिता ना संगम, ओघ ना भ्रम । नाहीं क्रियाकर्म, तैसे झाले ॥ ४ ॥
जाणो जाय तंव जाणणियासारिखे । नवल विस्मये कवणा सागो ॥ ५ ॥
बापरखुमादेवीवरु विठ्ठलुचि अगीं । निवृत्तिरायें वेगीं दाखविला ॥ ६ ॥
तोचि सरबराभरितु रूपनामरहितु । अपरपार मी त नीच नवा ॥ ७ ॥

(ज्ञा गा ७५२) (४८७, ४८८)

किंवा रस्त्यावरील जीं काहीं लहान लहान अगीं असणारी टबकी-उदके-तीं त्या गंगेच्या कासी लागल्यामुळे समुद्रच झालीं, त्या गंगेस काय आता समुद्रच होऊन असणे होय-तेथे काय दुसरे तिसरे ह होणे नाहींच-तेथे समुद्रच होऊन असणे हेच एक ! त्याशिवाय तिजला गत्यतरच नाहीं-ती समुद्रच अहो, रथ्योदकेच समुद्र झालीं, काय आता गंगेस गत्यतर त नाहींच, तिनेहि पण समुद्र होणेच होणे आहे (४८९)

**म्हणोनि राजर्षि ब्राह्मण । जया गति मति मजचि शरण्य ।**
**तया त्रिशुद्धि मीचि निर्वाण । स्थितिहि मीचि ॥ ४९० ॥**
**यालागीं शतजर्जर नावें । रिघोनि निश्चित केवीं व्हावे ।**
**कैसें उघडे असावें । शस्त्रवर्षावीं ॥ ४९१ ॥**
**अंगावरी पडतां पाषाण । न सुबालें केवीं वोढण ।**
**रोगें दाटलिया आणि उदासपण । ओपधेंसि ॥ ४९२ ॥**
**जेथ चहुंकडे जळत असे वणवा । तेथूनि न निघिजैल कैसेनि पांडवा ।**
**तेवीं लोका येऊनि सांपद्रवा । केवीं न भजिजे मातें ॥ ४९३ ॥**
**अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पां आपुलिये अंगीं ।**
**कायी घरीं की भोगीं । निश्चिंती केली ॥ ४९४ ॥**
**ना तरी विद्या की वयसा । प्राणियासी हा ऐसा ।**
**मज न भजतां भरवंसा । सुखाचा कोणु ॥ ४९५ ॥**
**तरी गा भोग्यजात जेतुलें । तें येका देहाचिया निकिया लागलें ।**
**आणि येथ देह तंव पडिलें । काळाचिया तोंडीं ॥ ४९६ ॥**

(४९०) मजचि शरण्य – मीचि शरण (४९१) शतजर्जर = शेकडो भेगा पडलेल्या, शेकडो भोकाच्या फुटक्या नावेत. व्हावे – होआवे. कैसे – कैसेनि. शस्त्रवर्षावीं – शस्त्रवर्षी = शस्त्राचा

वर्षाव होत असता. (४९२) वोढण - वोडण = ढाल न सुवावें = का न घ्यावी. दाटलिया - दाटला = व्यापला ओषधेसि - वोखदेसि (४९३) कैसेनि - केवीं सोपद्रवा = दु:खरूप (४९५) प्राणियासी - यया प्राणियासी (४९६) भोग्यजात = उपभोग्य वस्तु. निकिया = सुखास्तव, बरेपणास पडिले - असे पडिले.

या कारणास्तव काय राज-ऋषि का काय ब्राम्हण ह्याना गति ही मीच व त्याची मतिहि पण मजमध्येच वसणारी अशी, व आता शरण्य जे तेहि मीच होय : त्याना केव्हाहि त्रिशुद्धि मीच शेवटचे स्थान-विसाव्याचे स्थान-गतीचे असे व स्थितीचे जे म्हणजे मतीचे जे तेहि पण मीच होय (४९०)

याकरिता शेकडो तऱ्हानीं जर्जर होऊन असलेली जी ह्या देहाची नाव-अशा ह्या देहनौकेत बसून कसे बरे अगदीं निवात होऊन असावे-निश्चिततेने असावे ? अहो, शस्त्राचा वर्षावच जेथे होत आहे, अशा ठिकाणीं उघडेच अगदीं असणे बरे नाही-कसे बरे, का बरे तेथे उघडे, अगदीं उघडे, असे असणें ह करावे ? (४९१)

अहो, अगावर जर दगड येऊ लागले, काय काहीं आडोसा घेणे हे नच करावे ? काय, अहो, रोगच दाटून आलेला आहे, तेथे औषध सेवन करणे हे बरे-ओषधीचा, औषध सेवन करण्याचा कटाळा किंवा उदासपण हे करूच नये-तेथे औषध ह घ्यावेच घ्यावें (४९२)

जेथे चोहोबाजूनीं वणवा लागलेला आहे, तेथून काय बाहेर न निघावे ? अहो, हे पाडवा, काय ह्या उपद्रवाने असलेला हा लोक-ह्या लोकास येऊन मजला भजण्याचे करू नये हे का बरे ? (४९३)

अगा, मजला न भजावे असे-मजला काय भजणे हे नच-मातें न भजावयालागीं काय कसले ते बळ आपल्या अगामध्ये आहे बरे, कीं मजला भजच नये ? काय कसली तेथे निश्चिती आहे ? ती काय घर (घरेदारे हीं) आहे म्हणून, का भोग हा यथास्थित आहे म्हणून बरे ? घरेदारे हींच ती निश्चिती देणारीं आहेत काय ? का तो भोग हा काय भोग असा खराखुराच आहे का तरी बरे त सागा पाहू (४९४)

येथे भावानेच स्वत:त वागवीत असावे असे जे म्हणणे तेच यथार्थ असेच जणू म्हणू करणारे, तेथे काय तो भाव सोडून काय विद्या ही असणारी, का विद्या हीच मुळीं भरवशाची अशी का आहे-अशी आहे का ? का वय हेच एक भरवसा देऊन आहे-कीं काहीं हरकत ही येथे येणारी नव्हेच मजला न भजता असा एक भरवसाच जणू दिला व आता काय भजणे हे काहींच काहीं नको असे कसें नव्हेच ! तेथे सुखच मुळीं नाहीं-काय घरीं, का भोगीं, का विद्यावयसेने भरवशाचे केले आहे असे ते भजणे नकोच म्हणू आदरणारे काय तेथे सुखाचे त कोण बरे-का भरवशाचे ते काय काहीं तरी आहे का ? म्हणून मजला भज-ते भजणे हेच एक सुख ह भरवशाचे देणे देऊन असेल-तेथे भरवसा हा येईलच (४९५)

तेथे जसे का ह्या देहाचे हित व्हावे असेच ते सर्व भोग्यजात असून, आता येथे हे देह पाहावे तो ते तर काळाच्या तोडींच पडलेले जसे (४९६)

**बाप दुःखाचें केणें सुटलें। जेथें मरणाचे भरे लोटले।**
**तिये मृत्युलोकींचिये सेवटिले। हाटवेळे जाले येणें ॥ ४९७ ॥**
**आतां सुखेसी जीविता। कैची ग्राहिकी कीजैल पांडुसुता।**
**कायी राखोंडीया फुंकितां। दीपु लागे ॥ ४९८ ॥**

अगा विषाचे कांदे वाटुनी । जो रसु घेइजे पिळुनी ।
तया नांव अमृत ठेवुनी । जैसें अमर होणें ॥ ४९९ ॥
तेवीं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख ।
परि काइ कीजे मूर्ख । सेविता न सरे ॥ ५०० ॥
कां सिस खांडुनि आपुलें । पायींच्या खतीं बांधिलें ।
तैसें मृत्युलोकींचें भले । असे आघवें ॥ ५०१ ॥
म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची काहाणी । आइकिजेल कवणाचिये श्रवणीं ।
कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांच्या ॥ ५०२ ॥
जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तावयालागीं ।
दुःख लेवोनि सुखाची आंगी । सळित जगातें ॥ ५०३ ॥

(४९७) मृत्युलोकींचा शेवटचा बाजार – मनुष्यरूपानें शेवटचा जन्म जो नरदेह – त्यात मोठया (बाप) दुःखाचा माल (केणें) सुटला असून मरणाचें माप ( भरा = १६० पायल्या ) चालले आहे आतां जीविताला सुख व्हावे म्हणून, सुखाचा सौदा कुठला ? भरे-भारे जाले येणे-येणे जाहले (५००) सेविता न सरे-न सेविता न सरे = सेवन केल्याशिवाय सुटतच नाहीं (५०१) खतीं = व्रणावर पायाच्या क्षतावर डोके तोडून बाधल्यासारखे (५०३) अस्तावयालागीं-अस्तालागीं दुःख लेवोनि = दुःख सुखाचें रूप घेऊन जगाला छळते आंगी = आंगरखा.

बाप ! बाप ! दु खाचे भारेच येथे सुटलेले आहेत-येथे मरणाच्या गठड्याच लोटन येत आहेत - असे ते ह्या मृत्युलोकाचें असे घडणारे-असणारे, तें एक जसा बाजाराच भरला आहे असे-बाजार भरल्यावेळीं जसे का मालाचे भारे अथवा कापडाचे गठेच हे लोटलोटन तेथे आणिले जातात

तेव्हा आता ह्या अशा बाजारवेळेस-जेथे दु खेच, मरणेच, हीं भारच्या भार हे ऊन आलेलीं आहेत-तेथे आता काय बरे विकत घ्यावे ? ह्या जीवीतास सुख पाहिजे अशीच गिऱ्हाइकी ती काय कशी होणारी बरे ? हे पंडुसुता, काय येथे राखोंडी फुकिली असता दिवा लागेल ? अधारात उजेड व्हावा म्हणून, प्रकाश व्हावा म्हणून, तो काय दिवा हा राखोंडी फुकून का लाविता येईल-लागल ?

ह्या मृत्युलोकींचा हा तगादाच एक असलेला-तेथे हीं दु.खे हीं मरणेच अगदीं शेवटून आहेत अशीं आलेलीं-तेथें ह्या जीवदशेस सुख पाहिजे अशीच एक गिऱ्हाइकी ती कशी काय येथे होणारी होईल बरे ! येथे तर आणखी दु.खे, तशींच जीं मरणे आहेत, तीं कोणास पाहिजेत काय म्हणन एक हाटवेळाच होऊन आलेली ! तेथे काय कोणीं ह्या जीवितास सुख हे द्यावे असे मागणे, तें काय राखोडी-जवळच मागणें जसे कां माझ्या घरामध्यें प्रकाश व्हावा व मला एक दिव्यच द्यावे, ज्यायोगे मला सुखाचा एकादा क्षण जाईल : अशीच मुळीं जी खरी ग्राहिकी–गिऱ्हाइकी-ती काय ह्या राखाडीच्या फुकण्यानें दिवा लागेल असेच होऊन असणारे-तेथे दिवा तर लावणे नाहींच, परंतु एवढे मात्र होईल कीं, आपले अधिकपण अथवा वेळेचें आधिक्यपण घेऊनच असेल-राखोडीवरच एका राखोंडीचे पुट बसावे, तसे तेथें ह्या जीविताच्या ज्या कांहीं दशा-उपदशा ह्यानाच एका जास्तपणाच्या अशाच अविद्येचे अथवा दुःखाचें केलेलें होणारे (४९७-४९८)

अगा हे पाडवा, विषाचे कांदे वाटून जो रस मग पिळून घेतला जातो त्यास जसे का अमृत आहे असे म्हणणें केले-व त्या तसल्या अमृतानें का कोणी अमर होणार आहे ?

त्याप्रमाणे विषयाचें सुख हे तर परम दुःखच एक ओढून येणारें असे-परंतु काय करणार, मूर्ख जो आहे तो ते विषय सेवन केल्याशिवाय राहातच मुळीं नाहीं

का आपलेच मस्तक खाडून आपल्याच व्रणावर बाधावे, तें व्रण बरे व्हावेत म्हणून, तों इकडे मस्तकच मुळीं विघडले झाले-असे ह्या मृत्युलोकींचे सर्व काहीं आहे बरे!

देहबुद्धीची जी एक गाठच बसलेली, ती काहीं केल्या ओसरतच नाहीं-दुःखाचे असेच जीवित : हे सुख म्हणजेहि पण दुःखच एक असे म्हणते : मरण हेच कर्माचे गठ्ठेच पुढे करून आहे-दुःखाचे भारेच अंगावर लोटले जात आहेत असे त ह्या मृत्युलोकींचे असणे . तेथें सुखाकरिता होणारी तळमळ-तेथे कोणाजवळ बरे ही गिन्हाइकी करावी? तेथ काय अज्ञानाजवळ जर तसे ते मागणे केले, तर अज्ञानच मुळीं घनतर म्हणजे आणिक जास्तपणानेच घडलेच असे होणार . म्हणून येथे अज्ञानाजवळ त मागून काहीं उपयोग नाहीं, कारण राखोंडी फुकून काहीं दिवा हा लागणेच नाहीं : अज्ञानास अज्ञानानं म्हणणे कीं, मजला सज्ञान करावे, तर त तसे मागणे हेहि पण अज्ञानाजवळ मागितल्याने तेथेहि पण काय मिळणार, तर अज्ञानच एक-तेथे ज्ञानदिवा हा मुळींच पालविला जाणारा नव्हेच! बरे, ह्या विषयाच्या मागे लागावे, तो काय तेथ तर प्रकृतिमतनचे एक विषयाचा रसच पिळून घेऊन तेथे तोच ग्रहण कर म्हणणारे ते म्हणजे अघोदरच मुळीं येथे आहे जे-काय ते थोडे असे नव्हेच-त्यात आणखी एक जास्तच मुळीं अशी भरच ह्या विषयानीं केली, तो काय जाहाले कीं, त विषयच एक खरोखरीचे असेच झाले . तेथे विषय विषय हेच विशेष प्रकृतींचे नवे नवरे खरेखुरे ह्यानींच मुळीं ह्या येथीलच्या ज्या काहीं साध्या गोष्टी त्याच मुळीं आता विशेष नखऱ्याच्या केल्यान, तेथे विषय ते ह्या स्वभावास दिले असे झाल्याने, तेथे जे जवळच होत ते आता लांब झाले-जे सहज होत त तर आता योगबळेचें झाले-जे सिद्धपणाचे असे त तर भिऊन जाऊन त्या सिद्धपणासच मुळीं एक लटिकतेचा असाच अंगरखा पेहेनण्यास दिला गेला : व हा आता मात्र देवच अगदीं जवळपास असाच चोहोंकडून मानविला गेलेला, तोच पुढे झाला, व त्याने तर त देवपणाच होणे हे लांब पल्ल्यावरच जसे ढकलिले-तेव्हा आता देव कुठे लपला त नसत्या विषयाचे असेच ह्या मनास एक खाद्य मिळाल्या-मुळे त मनच जे जवर होत, तच आता निरस होऊन भिऊच लागले-त त्या स्वतःस-प्रकृतीस-विषयाचे केल्याने, तेथें आता त सर्व विषयाचे असेच ह्या प्रकृतीचे स्वास्थ्यान ते आता त्या आपल्या स्वास्थ्यासच भिऊ लागले आहे, असे त एक विचित्रच माप पदरात टाकणारे झाल्याने, तेथे दिवा कसचा न् काय लागणे ह तर कोणच्या गावचे हे माहीतच नाहीं तेथे एकच एक गोष्ट म्हणजे तो काय उपकार-का शुद्धतेचे अगच मुळीं तो उपकारच एक मजबर झाला असे म्हणणारे-त तपाची कीं योगाची मुळी गोष्टच जाणणारे नसून, तेथे अज्ञान हेच मुळीं कसे गडदनेचे विषाचे असे तेवढेच घेऊन चालत असणारे होय येथे आता मुळीं आपलेच मन ह सर्व त्या दुःखाचे केले पायास दुःख झाले त्यावर ते आपले 'सिसच खाडले' व पायान्या दुःखावर बाधले-डोकेच आपले जसे खाडावे व ते पायाच्या खतावर-क्षतावर-व्रणावर-बाधावे, असे त ह्या जीवितचे एक आकुंचन करणारे तेथे मन ह आकुचले-हस्तपायादि अवयव हेहि आखडले-बुद्धीचे पैसपण हे आवरले गेले-चित्ताचे ज स्वच्छपण ह तर गहाळच झाले व त भलत्याच ठिकाणी बाधलेच गेले . असे ते विषयाचे सुख हे तर परम दुःखच एक! परन्तु त समजणेत येत नाहीं बरे का? तेथे बुद्धि ही स्तुतिपाठास प्रिय आहे, म्हणून ती त दुःखच बहु बहु गोड आहे असेच म्हणूं लागली व आता येथे लिहिलेले त खरेच आहे असे त्यावर एक निदर्शनें झाले : येथे भले भलेच ते आहे असेच घेतलेले ते काय आता सुख सुख म्हणून एक मोकळणेच ह्या स्वभावास आल्याने, तेथे दुःखच ह्या स्वभावास होत-तेथे त सुख अति दूर झाले, असे होण्याने ह्या मनास कोठेहि म्हणून चैन नाहीं-तेथे बेचैनपणच एक सर्व! (४९९,'५००,'५०')

अशी ह्या मृत्युलोकच्या सुखाची कहाणी ती काय कुणाच्या कानानीं ऐकावी बरे! कुणास ती ऐकूं येणारी अशी होईल बरें! म्हणून येथे मुळीच सुखाची अशी गोष्ट नाहीं तेथे सर्व दुःखेच मुळीं-तेथे

झोंपच ती मुळीं कसलीहि नाहीं, केव्हाहि नाहीं, तेथें तळमळच एक : काय अहो इंगळांच्या (विंचवाच्या) अथरुणावर निजणाऱ्यानें मजला अति अति गाढ झोप लागली होती-सुखनिद्राच आली होती-असे म्हणणे कधीं तरी शक्य काय ?

" पूर्व जन्मीं पाप केले ते हें बहुत निस्तारले."

संसार दुःखमूळ, पाठीं लागले इगळ, विश्राति नाहीं कोठे, रात्रंदिवस तळमळ ॥

काम-क्रोध-लोभ-शुनीं पाठीस लागले ओढाळ । कवणा शरण जाऊ आता हित देईल निर्मळ ॥

धर्म जागो सदैवाचा जे बा पर-उपकारी । आधळया होय दाते त्याचे नाव मी उच्चारी ॥ ध्रु० ॥

(५०२)

ह्या मृत्युलोकींचा चंद्र हा क्षयरोगीच जसा नेहमीं कलाच लागलेला-(कला नाहीं असा एक तो पूर्णिमेचा फक्त)-तेथें उदय झाला तरी तो अस्ताकरिताच जप झाला असा येथीलचा उदय असल्याने-तेथेंच दुःखच पाघरावे व म्हणावे कीं, सुखाचें आगच-आगडेंच-मुळीं हे आहे असें सलणेंच एक-असेंच तेथीलच्या प्राणकलेसच एक असे काहीं फिरवीत असणारे कीं, तेथे असल्याच पाकळया आत बाहेर फिरवून असणाऱ्या-तेथें जगच मुळीं सळले गेले व दु:ख तेच सुख असे ते लेणें-आगडें, सोंग-लेण्यास दिलेलें असे आहे (५०३)

जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पोहरी ।
मृत्यु उदराच्या परिवरीं । गर्भ गिंवसी ॥ ५०४ ॥
जयातें नाहीं तयातें चेतवी । तंव तेंचि नेईजे गंधर्वी ।
गेलियाची कवणे गांवीं । शुद्धि न लगे ॥ ५०५ ॥
अगा गिंवसितां अथवा वाटीं । परतलें पाऊलचि नाहीं किरीटी ।
सैंघ निमालियाचिया गोष्टी । तियें पुराणें जेथींचीं ॥ ५०६ ॥
जेथींचिये अनित्यतेची थोरी । करीतया ब्रम्हयाचे आयुष्य वेऱ्ही ।
कैसें नाहीं होणें अवधारी । निपटूनियां ॥ ५०७ ॥
ऐसी लोकींची जिये नांदणुक । तेथ जन्मले आथी जे लोक ।
तांयचिये निश्चिंतीचें कौतुक । दिसत असे ॥ ५०८ ॥
पै दृष्टादृष्टीचिये जोडी-।-लागीं भांडवल न सुटे कवडी ।
जेथ सर्वस्वें हानी । तेथ कोडी वेंचितील ॥ ५०९ ॥
जो बहु विषयविलासीं गुंपे । तो म्हणती उवावे पडिला सांपे ।
जो अभिलाषभरें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ॥ ५१० ॥

(५०४) पोहरी - पोरी - वोहरी - पारी = पोरकीड, धान्यावर पडणारी कीड, आच्छादन. परिवरीं - घरीं = उदरातील गर्भालाहि मृत्यु गिंवसीत येतो (५०५) शुद्धि = शोध, पत्ता. (५०६) गिंवसिता = शोधल्या तरी अथवा - आधवियां सैंघ = पुष्कळ (५०७) निपटूनिया = सर्वथा. (५१०) दृष्टादृष्टीचिये - दृष्टादृष्टाचिये जोडीसाठीं = ऐहिक व पारलौकिक लाभासाठीं कोटी = कोट्यवधि वेंचितील - वेचिती गा. गुपे - गुफे = गुततो उवावे - उवाई = सुखात. सापे = साप्रत अभिलाषभरें - अभिलाषें मारें.

दुःखाचे लेणें करून, देऊन-तें एक सुखाचें असेंच आगडें-आंगीच एक लेइली व ती सुखाची अंगीच असेंच समजुतीस देऊन, समजूतच एक तगी करून दिलेली, घेतलेली व असे सळणेंच ह्या

विश्वास, जगास, करून आहे, देऊन आहे : आता येथें काय असेहि म्हणूं नये काय कीं, अहो, मंगल मगल असे एक कल्याणप्रदच तें असे आहे अशा समजुतीचे अंकुर हेच पुढे होऊन असलेले-ते आता पाहावे तो गोपकिड्यानीं ( शेणाचे गोळेच करणारे जे किडे-इंद्रगोप किडे ) तेथें एक पोहरीच घातली-मगल दीपक अशा समजुतीस दिलेला तो त्याने आता एक पोहरी वाजविण्याचे जें केले, त्यामुळे तर एक अमंगळाचें असेच ते होऊन आहे असेच ! ह्या उदराकरिता जे काहीं कष्टसायास-त्या सायासाचा सर्वच्या सर्व परिवार घेऊन ह्या मृत्यने तर तेथील गर्भ म्हणजे सर्वच्या सर्व व्यापच तेथील खोलीसहित गवसून घेतला

जेथें मगल असे म्हटलेले, जेथें भर्तेपणाची एक सुखदायक अशी गोष्ट-जी गोष्ट सर्व कांहीं ज्या ह्या शरीरास लागणाऱ्या गरजा पुरवत असणारी-जणू एक घराचा मालक, भर्ता, नवरा, भलेरी अथवा वधेरीच एक जशी तेथें, मंगल असे (शकुनाचे) असणे, मगल मंगल अशी एक नवऱ्यासंबधीं-नवरेपणाची-गोष्टच बोलली जाणारी असते : तेथें ह्या मंगल अशा समयाबरोबरच एक अमंगळ अशीहि पण एक धुमसणी असतेच : तेथें ही जी धुमसणी तेथें जणूं ह्या उदरासच मृत्यु हा त्याच्या परिवारासहित उलथवून त्याचा एक अतिव्याप्त किंवा गर्भाची जी 'पितृपणाची' व्याप्ति तीच हुडकीत आहे . येथें पोहरीचा ( घालणे ) अर्थ अनेक तऱ्हानीं केलेला असून, तेथें एक धुमरी घालणे-धुमसणी-मारितल-बसरी-मुरली बासरी-अशी एक सूक्ष्मतेची जी ध्वनिमात्र ती जणूं काहीं का घासाची, का गवताची, का वेळूची अशी एक पोरीच-जणं पोरकिडाच-तेथें काय जी सूक्ष्मतेची ती पोहरी वाजणारी ती कसले बोलणे करीत असेल हे वर सागितले · परंतु तेथें जर सुव्यवस्थिततेचे ते जर करून असले, तर मात्र तेथीलची जी गोष्ट ती मुळीं मुद्धा मनास जर्जर करणारी होत नसून, तेथें एका शेतकऱ्या प्रमाणेच ह्या देहाचा ससार करून असणे-खिदमत, मशागत, मोलमजुरी, नोकरीचाकरी करूनच असणे तेच एक जसे नवऱ्याचे किंवा नवरेपणाचे कामच मुळीं ह्या देहाच्या गरजा पुरविणारे, किंवा ह्या देहास दुसऱ्या गोष्टीने बोलण्याचे म्हणजे-संभावना करून असणे होय (५०४)

असे ते उदराकरिता करावे लागलेले कष्टसायास त्यान आता जे काहीं नाहीं तेच पाहू दिले-भलतच चिंतन करण्याचे ते करू लागले, व असे झाल्यामुळे आता काय गधर्वांनींच ते नेले-यमदूतानीं त्यावर आपला मोर्चा चढवून ते नेलेच व ते कोणत्या गावास गेले ही शुद्धिच नाहीं · तेथें बुद्धीस मुळीं काहींच समजेना-बुद्धि ही काहीं मुद्धां तेथें समजण्याचें करीना-तिला समजेना तेथें हेतु काय, प्रीति कसली, बोलणे ते कसले झाले, जे न बोलावे तच बोलिलें, का जी पांटींच राहावी अशी एकादी गोष्ट तीच मुळीं त्या बोलण्यानें बोलूं केली . का जे ह्या भोगभागाचे जे बोलणे तेंच येथे योगच जसा बोलून दाखविला असे झाले : तेथें भोग हा बोलिलाच-सागूनच टाकला : बुद्धीला आपले गावच न समजल्यामुळे ती काय बोलत आहे ते तिला समजेचना : तेथें तिची शुद्धि ही म्हणजे त्या भोगमोक्षावर टेकवून घेतलेली असल्याने, तिने तें बोलणे स्वत.च्या शुद्धीशिवायच करू केलेले : असे त यमदूताचे एक भावविरहिताचे कसे वागविले जाणे होत तेच सागून, आता ह्या देहामधील काय हरविले जातें याची शुद्धिहि नच आल्याने, तेथें काय 'अज्ञान' हे सुखच एक-सहज बालकाचे एक आपले अवयवाचे हालचालणेच (५०५)

असे ते होणे हें बुद्धीच्या वांटयास जरी आले तरी-जरी तें गिवंसले-सापडले-समजूं लागले-तरीहि ह्या वर्तणुकीचें पाऊल हें मुळीं परत होईचना ह्या वागण्याने तर तेथे जसे का कांहींच समजत नाहीं असेच फिरफिरून ह्या बुद्धीवर दाट पडदाच एक केला, व गिवंसले तरी तेथें शुद्धि ही ही बुद्धि घेईचना, तेथें वाट सांपडली तरी सुद्धां ही बुद्धि परतच होईना तिचें तें आपलें आचरण हें एकसारखें

होतच आहे-तिनें हे आचरणादि व्यवहार हे फेरफाराचे करावेत-किंवा व्रताचे करावेत असे ती मुळींच करीना-तिचें पाऊलच परत होईना : वाट ही सापडली-तेथे हे जे देहाचे पोषणादि धर्म हे मगल म्हणजे कल्याणकारक व्हावेत-करून घ्यावेत-असे ती पाहीचना ती मुळीं शुद्धीवर येईचना-आचरणास बदलीचना मुळीं : वाटच सरली-वाटच मुळीं बद झाली-वाट ही सर्वच्या सर्व मुळीं तेथे नाहींशी झालेली तेथें ती वाट-म्हणजेच जो हा देहाचा संसार-तीच मुळीं अवघी हरवलेली : बुद्धि ही परतच मुळीं फिरेना-तिनें आपले पाऊल हे व्यवस्थित करण्याचें ते ती करीचना : तेथे पाऊलच तिला मुळीं सापडेना व आता काय ही वाट किंवा संसार किंवा धारणा किंवा धर्म किंवा क्रिया ह्याच मुळीं सर्व हरवल्या व आतां काय ह्या गोष्टीच एका त्या मनोरजनाच्या झाल्या : तेथे निमणे होणे-निपटले जाणे हें ज ते सर्व गोष्टींतच गोविले गेले, व आता काय नुसती तो पुराणाची अशीच एक कथा : पैशून्यतेचे अगच तेथे वाजूं लागलें-बुद्धीची सोडवणूक होईना-तेथे निमणें जे हेच झोपच एक कारणास आकळून असलेली ती काय काहीं केल्या सरतीच मुळीं होईना-संपेचना ! (५०६)

ह्या देहबुद्धीवरच टेकणारे-हा देह म्हणजे काय नेहमींच टिकणारा आहे असा-नेहमीं देहबुद्धिच वाजणारी-अहंममता-देहाहंता-देहाभिमान-देहबुद्धीचें असेच एक जे ते त्या अनित्यतेसच मोठे महिम्याचे आहे असे करून असल्यानें, तेथे देहभावना हीच एक त्या कुळासच किंवा विद्वत्तेसच नेहमी पुढे घेऊन चालणाऱ्या त्या अहतेसच बहुमान देऊन असल्याने, तेथे अनित्यता हीच नित्य आहे अशाच समजुतीचे बोलणे-चालणे करणे ते थोर-बहुथोर-असेच करून, त्यातच वावरणे हेंच जन्माचे एक सार्थकच असे पाहणारे !

जसे कांहीं एक गुण अभ्यासिलेले-व मगच ते उगवलेले, तेथे आतां ढिलाईच त्या वागणुकीस आल्यानें, तेथे जसा काहीं एक जन्माबरोबरच आला आहे तेथील लक्षणभार असेच घेणे केलेले ते-तेथे 'का आहे कि नाहीं ?' असेच एक गाजणे केल्याने, तेथे माजणेच एक झाले त्याचप्रमाणे ह्या वयोमानासहि पण तसलाच पूर आला-उतणेच झाले-एक माजवणच करून घेतले व आता पाहावे तो त्या ब्रम्हदेवासच एक धाक पडला कीं, आपले आयुष्यावरच ही गोष्ट बेतणारी असल्याने, तेथे आता त्याचे आयुष्यच मुळीं घटले गेले . व आता पाहावे तो काय ह्या असल्या आचरणाने तर तेथे एक नाहींसेच झालेले आयुष्य हे आपले नाहींपण हेच अगदीं सपशेल निपटलेले असे होऊन आले : अहो, अवधारून असा कीं, हे जे ब्रम्हाचें आयुष्य-ब्रम्हदेव जो त्याचे आयुष्यच जसे-आता काहींच तेथे नाहीं असे : इतके जरी तेथे पार निपटून जाणे, अगदीं रगडले जाणे, पुसून जाणे, नाहींसे होणे ह जरी होत असलेले, तरी सुद्धा तेथे ह्या बुद्धीने आपलें पाऊल हे परत घेतले नाहीं-आपले पाऊल परत घेण्याचे ते ती बुद्धि करीना-काय केवढी येथे निश्चितता ही येथे वाहविली गेलेली-वागविली गेलेली (५०७)

अशी ज्या लोकामधील नादणूक आहे-त्या ठिकाणीं जन्मले आहेत जे लोक-त्याचे निश्चित असणें हें काय कौतुक असेच दिसून आहे : निश्चितता ही केवढी वरे तेथे, व तिने कसले हे कौतुक आपले शिरावर घेऊन असणे ते पाहिले म्हणजे-तें दिसतच जसे आहे असे केले तर-काय तेथे हे देहाहंतेचे कोडच पुरविले जाणारे ते दिसून आहेतच (५०८)

अदृष्ट म्हणजे नशीबच नाहीं असे किंवा दृष्टच एक लागली असे जे-तसेच स्पष्ट दिसत असूनसुद्धा तेथें उपाय करावा कीं नाहीं, परंतु तेथे तें उपायानें जे जोडून घेणे, त्याकरितां लागलेला जो पैसा हा भाडवलच एक, ते तेथें मुळीं हातून सुटेचना : अहो, ज्या गोष्टीनें कल्याण होणारे त्या गोष्टीमध्ये आपण आपले मन घालून ती गोष्ट कल्याणाची करून घ्यावी कीं नाहीं ? परंतु तें तसे

कल्याणाचें जोडणें जोडून घेणें हे कांहीं एका भाडवलासच येईना : तेथे जोड-अक्षर-हेंच मुळीं हाताचे जोडावे मीं कसे तेंच समजेना (हात जोडणें हें मनुष्याचें मूळ स्वभावाचें असेच आहे)-व त्यामुळें हा देह जो एक भाडवलच आहे, त्यास मुळीं काहीं उपयोगाचे करून ह्या बुद्धीचें पाऊल परत आणावे, व्यवस्थित करावे, असे होईचना : हा देह हाच मुळीं वागवावा कसा किंवा का-तेथे गुणांचें जें कांहीं आपल्या महत्त्वानें असणे तेंच समजेना : तेथें श्लाघ्यता हीच परम पद घेऊन असलेली-व अशी असल्या-मुळे तेथे ह्या देहाचें असणे हेंच भाडवल व त्यासच तें कसे बरें व्यवस्थित करावे हें काहीं समजेचना तेथें देव, ऋषि, मुनी अथवा दुसरेहि साधक-सिद्धाचें जे तेहि अगदीं अंगवळणींच येईना : त्याकरिता हातून एक कवडीमुद्धा सुटेना : अहो, येथे कल्याणाचा मार्गच एक आहे असे जरी सांगितलेलें झालें, तरी मुद्दा हातून काहीं भाडवलच-एकाद्या कवडीचेंहि पण सुटेचना !

येथे जें काहीं महत्त्व तेंच मुळीं जेथे सर्वस्वे हानी आहे, तेथेंच वेचले जात आहे-गेले-तेथे कोटयवधि जरी द्रव्याची जरूरी, तरी तेथे ती जरूरी ही पुरतीच केली गेलेली-करितात-वेचतात.

'पैं हटाहट्टाचिये जोडी'-जेथे 'परितो दुरितः'-दुरिते बाधा करणार नाहींत असे ते पुनीत (आत्म्याचे) शिवस्वरूप हे 'पवनसुत हनुमानाचें' जसे : तेथे इतःपर म्हणजे परितः त्याचप्रमाणे परिघा. परितः असेहि अभिलसणे जसे ह्या भिंतीचे जे एक तऱ्हेतऱ्हेचें गिलाव्याचे म्हण अगर लाशाचें म्हण तच कसे ह्या (अभिलाशाचे) अभिलाषाचें !! (५०९)

जो पुष्कळशा अशा विषयविलासामध्यें गुंतून असतो, त्यास काय म्हणतात तर, साप्रतच्या अशा चलित असलेल्या प्राणामध्ये उकडूनच घेत आहे-गजबजलेला आहे-दडपून गेलेला आहे-साप्रतच्या पांघुरण्यानीं तोच हा येथे विषयविलास भोगून आहे-विषय विविध, अनेकविधतेने असलेले जे विलास, ते जसे काहीं हे गुदमरूनच जाणें होत आहे असा तो एक प्राणच-अनेकविधतेचीं पांघुरणेंच जशीं

जो अभिलाष करून आहे-इच्छेनें आहे-इच्छेच्या भाराखालीं रगडूनच गेला आहे-आकांक्षा ज्याची सुटेना व असाच जो अनेक इच्छानीं स्वतःस दडपून घेत आहे, त्यासच 'सज्ञान' असें म्हणतात (५१०)

जयाचें आयुष्य धाकुटें होये। बळ प्रज्ञा जिरोनि जाये।
तयाचे नमस्कारिती पाये। वडिल म्हणौनि ॥ ५११ ॥
जंव जंव बाळ बळिया वाढे। तंव तंव भोजें नाचती कोडे।
आयुष्य निमालें आंतुलीयेकडे। ते ग्लानि नाहीं ॥ ५१२ ॥
जन्मलिया देह दिवसें। हों लागे काळाचिया ऐसें।
कीं वाढिती करिती उल्हासें। उभविती गुढिया ॥ ५१३ ॥
अगा मर ऐसा बोल न साहाती। आणि मेलिया तरी रडती।
परी असते जातें न गणिती। गर्हिंसपणें ॥ ५१४ ॥
दर्दुर सर्पें गिळिजतसे उभा। कीं तो मासिया वेंटाळी जिभा।
तैसें प्राणिये कवणा लोभा। वाढविती तृष्णा ॥ ५१५ ॥
अहा कटा हें वोखटें। ये मृत्युलोकींचें उफराटें।
येथ अर्जुना जऱ्ही अवचटें। जन्मलासि तूं ॥ ५१६ ॥
तऱ्ही झडझडोनि वहिला निघ। ये भक्तीचिये वाटे लाग।
जे पावसी अव्यंग। निजधाम माझें ॥ ५१७ ॥

(५११) बळप्रज्ञा – बाळप्रज्ञा (५१२) कोडें = आवडीनें भोजे = आनदानें आतुलियेकडे निमाले = आतून कमी झाले ग्लानि = दुःख (५१३) देह दिवसे – देहादिवसे – दिवसदिवसे काळाचिया – काळाचेचि ऐसे = काळाच्या आधीन वाढती = वाढदिवस (५१४) मर ऐसा बोल – मर हा बोल गहिंसपणें = मूर्खपणानें (५१५) सपे – सापें. गिळिजतसे – गिळिजत आहे, असे कवणा – कवणे. लोभा – लाभा (५१६) कटा–कटकटा = हायहाय ये – इये अवचटें = दैवयोगानें (५१७) वहिला -वाहिला–वयिला = वेगळा ये–इये जे - जिये

ज्याला आयुष्यच नाहीं-ज्याचें आयुष्य असे म्हणावें तर तेथे ह्या इच्छानींच ते हरघडीं हर तऱ्हानीं अडविलेले असल्यानें, तेथे प्राण हा भाराचा असा नाहींच : त्यामुळे तेथीलच आयुष्य, मापना, गणना, धारणा ह्या लिंगसमर्थनाची-ह्या अर्थव्याप्तीची-ह्या पुरुषप्रकाराची–जी एक स्वयंतेने असलेली, ती धाकटी झालेली, आटून गेलेली, नाहींशी झालेली-तेथे बळ ते काय, मुळींच नाहीं असे . प्रज्ञा कारण हे तर मुळींच जिरून गेलेले-जिरूनच गेलें आहे ज्याचें ह्या पुरुषार्थास पाहाण्याचें अग-तेथ पुरुषार्थानें हारच दिलेली असे तें जिरणेच एक, आटणेच : जसे का ह्या पुरुषार्थास हात घालणे म्हणजे काहीं का हलक्या सलक्या गोष्टी आहेत-तेथे हे मनच मुळीं नच आदरले गेल्यामुळे, ह्या विषयानींच पार तो ह्याचा दमच हाणून पाडला, जिरवून टाकला व आता तेथे हात घालणे-वडील म्हणविणे-पुरुषार्थच केला आहे असे जे महत्त्व ते तेथे नसलेलेंच-असा जो त्याचे पायच नमस्कारिले जाणारे तो वडील आहे असेच म्हटले जाणारे ! (५११)

हीं कल्पनेचीं भोज्येच नाचूं लागलीं असे ते कोडकौतुकाचें अन जीवित होणे हेच बळ घेऊन वाढू लागेल असे वयाचे होणे हे जसे का बाळ आता मोठे झाले आहे असे म्हणणारे . अहो, यास का म्हणतात कीं ते बाळ मोठे झाले आहे म्हणून ? ह्या कोडानीं, लाडानीं, कौतुकानीं तर त्याचें आयुष्य हे आत आतच जाऊं लागून आहे : तेथे काहीं अग्नि असेल, तर तो ग्लानी पाहाणारा होईल, परंतु तेथे तर सर्व ' जिरणेच एक ' होऊन असल्याने, तेथे अग्नीचें तर नावच नाहीं . रस हाच जसा अनेक रसाना घेऊन उज्वलतेचा असा परिपाक पाहाणारा असल्याने, तेथेच मुळीं ते जे भरात, नितात, निश्चित, निश्चेष्ट असे जे ह्या कंठस्थानाचें तेंच मुळीं वरवरच जाऊ लागल्याने--तेथे ह्या मस्तकामध्येच ते रसपरिपाकाचें दिसणे हे काहीं एक मोगच योगभावाचा-येथे तर ते तसे काहीच नाहीं येथे तर ती ग्लानी ही ग्लानीच मुळीं नसल्यानें, तेथे वय हेच वयास आले नाहीं–तरुण झाले नाहीं : ते आयुष्यच मुळीं आत आतच निमाले झाल्यानें, तेथे देहधर्म हा धर्मधारणेचा व्हावा-झालाच पाहिजे असा जो त्याचा सहजधर्म तोच येथे नाहीं : तर मग तेथे ग्लानी ही कशाची होणारी–म्हणून तेथे ग्लानीच मुळीं नाहीं–तेथे देहधर्म किंवा धर्मधारणा हीं काय असतील कोण जाणे (५१२)

दिवसेंदिवस उल्हासच वाढवीत राहिले-गुढयातोरणे उभवितात-उभारून आनद करितात-जसा काळ, तसाच तो प्राणी दिवसेंदिवस अगदीं बरहुकुम त्या सद्यःकालाच्या घडीचा घडलेला असा होत राहिल्याने, काय तेथे हा काळधर्मच जसा एक वाढत आहे . काय तेथे त्याचे वाढणें हें कसचें न् काय–तेथे उल्हास हाच वाढवावा काय–कीं हे जे जन्मणे ते ह्या काळासारखेच जन्मलेलें जन्मणे व त्यांत जगणे होणारे ते–तेथे कसल्या त्या गुढया उभारण्याच्या ? परतु तसे नव्हे, तसे तें काळाप्रमाणे वाढणे होतच असते, उल्हास हा वाढविला जातच असतो व गुढियाहि पण उभारल्या जातातच-जात आहेतच (५१३)

जे आहेत-जे 'असते जात' आहेत–ते मुळीं मनावरच घेत नाहींत–'मर' असे म्हटलेले सहनच करीत नाहींत व मेल्यावर तर रडतातच–जे आहेत तेहि पण जात आहेत हे पाहून सुद्धा ज्यानीं मूढपण पत्करून असणे केलेलें असे ते (५१४)

वेडूक हा सापान अधा गिळिलेला उभा (दिसणारा), की तर त्याच्याहि तोंडीं पण एक माशीच येत आहे, आली आहे, असा तो आपली जीभच त्या माशीवर वेटाळून आहे : असे ते येथींचे हे प्राणी आपली तृष्णा ही कशास उगीच वाढवीत आहेत कोण जाणे. (५१५)

अहा ! हां ! ह ह्या मृत्युलोकींचे असे उफराटे असे ते हायहाय करणारे असें वोखटेंच-खोटेपणाचें असें-ज्यात खरेपणाचा लवलेश नाहीं असे पाहा बरें : येथे, हे अर्जुना, तूं महजगत्याच जन्मला आहेस (५१६)

करिता, हरप्रयत्नानें बाजूस हो-आनंदाचा हो-य ह्या भक्तीच्या वाटेस लाग कसा एकदम : ह्या भक्तीनेच फक्त एक त माझे अव्यय, महत्त्वाचें, गभीरतेचें-सर्व देहच जसा हा भक्तिच झाला असे जे माझे निजधाम-माझे, आपले स्वतःचें असे, निजाचें, नित्याचे जे धाम, 'गृह', तेच तूं होशील . तेथे तू पोहोचशील-पावशील-सर्व प्राणच तुझा माझाच झाला, मीच तूं झाला, तूच मी झाला असे होईल (५१७)

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

| | |
|---|---|
| मन्मना. भव | = मन्मय, मन्मन असा हो, ब्रम्हभाव (मत् + मन) |
| मद्भक्त. भव | = माझा भक्त हो. (मत् + भक्त) |
| मद्याजी भव | = माझे 'भजनपर' हो 'योगयाजी हो' मत + याजी हो चडबड थाबली असे स्थिरतेचे जे-शब्द उल्लविले |
| मत्परायण' भव | = तू आपला प्राण हा (मत + परायण) सर्वथा माझाच असा कर प्राणच स्वाधीन केला असे |
| मा नमस्कुरु | = मलाच नमस्कार कर |
| एवम् आत्मानं युक्त्वा | = आत्म्याचा झाल्याने-आत्म्यास जोडून घेऊनच असल्याचें |
| माम एव एष्यसि | = मलाच सर्वथा येशील |
| एव एष्यसि | = तुझ्यासहित आत्मा किंवा आत्म्यासहित तू मलाच येऊन मिळशील · तं आत्माच झाल्याने मलाच पोहोचशील |

मन्मना भव मद्भक्त भव मद्याजी भव मा नमस्कुरु, एवम् युक्त्वा मत्परायण. माम् आत्मानम् एव एष्यसि

'मन्मना' हो, 'मद्भक्त' हो, 'मद्याजी' हो, मलाच नमस्कार कर; असे करण्याने मलाच तू पावशील असा सर्वथा 'मत्परायण' झाल्याने आत्मानम् म्हणजे मलाच तू येशील—मीच होशील. (आत्म्यासच जसे का तुवा जोडून घेऊन मत्परायण झाल्याने तू मलाच सर्वथा येशील—मीच तू होशील.)

मला आश्रय करून, चित्त प्रशांत ठेवून, परम व अंतिम आश्रयस्थान जो मी त्या मला निश्चयपूर्वक जाणलेस म्हणजे जगदात्मा जो परब्रम्ह त्या मला येऊन मिळशील, ईश्वरस्वरूप होशील (३४)

तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं ।
सर्वत्र नमस्कारीं । मज येकातें ॥ ५१८ ॥
माझेनि अनुसंधानें देख । संकल्प जाळणें निःशेष ।
मद्याजी चोख । याचि नांवें ॥ ५१९ ॥
ऐसा मियां आथिला होसी । तेथ माझिया स्वरूपा येसी ।
हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलत असें ॥ ५२० ॥
अगा अवघिया चोरिया आपुलें । जें सर्वस्व होतें ठेविलें ।
तें पावोनि सुख संचलें । होऊनि ठासी ॥ ५२१ ॥
ऐसें सांवळेनि परब्रह्में । तेणें भक्तकामकल्पद्रुमें ।
बोलिलें आत्मारामें । संजयो म्हणे ॥ ५२२ ॥

(५२०) बोलत–बोलिजत (५२१) चोरिया = चोरून ठेवलेलें

" चित्तानें ( मनानें ) सर्व कर्में मला अर्पण करून मत्परायण हो आणि समस्त बुद्धिरूप योगाचा आश्रय करून निरंतर माझ्या ठिकाणींच चित्त ठेव. याप्रमाणे माझ्या ठायीं चित्त ठेवून राहाशील, तर माझ्या प्रसादानें सर्व संकटे तरून जाशील · पण अहंभावनेनें जर माझें न ऐकशील, तर मात्र परमार्था-पासून भ्रंश पावशील " ( गीता अ १८-५८ )

येथें हलके हलके तो बुद्धियोग हाच स्थिर होऊं लागल्यानें, तेथें प्रज्ञा ही दृढ होऊन स्थिरतेची झाल्यानें, प्रसादच एक तरून जाण्यास-सर्व संकटापासून तरून जाण्यास-समर्थ होतो, तो प्रसादच तारून नेतो-संकटामधून तारून नेलें असे त्या भावनेचें कुतूहल हेच दिसण्यास येऊं लागणारें होतें.

" हे अर्जुना, ह्या शरीररूपी यंत्रावर आरूढ झालेल्या सर्व प्राण्यांना अंतर्यामी परमेश्वर आपल्या मायेनें तत्तत्कर्मानुसार फिरवीत सर्व भूतांच्या हृदयांत स्थिर आहे : हे भारता, त्यालाच तं सर्व भावानें शरण जा : त्या परमेश्वराच्या प्रसादानेंच उत्तम शांति व शाश्वत पद तुला मिळेल . ह्याप्रमाणे गुह्या-तलें गुह्य ज्ञान तुला सांगितलें : आतां याचा पूर्ण विचार करून ( विमृश्य ) मग तुझ्या इच्छेस येईल तसें तूं कर " ( गीता अ १८-६३ )

परिचर्यात्मक, वाणिज्यात्मक जें कर्म तें ह्या बुद्धिस्त्रीसच वापरण्यास दिलेलें असल्यानें, तेथें तो भाव जो का एक शुद्रतेच्या क्षुद्रतेचा असा स्व-पुरताच असल्यानें, तो नेहमीं क्षुद्र असाच पाहविला जातो, व मग ह्या मनाच्या ज्या काहीं महत्त्वानें घेतलेल्या बाजू त्याना तें महत्त्व कसें व्हावें तेंच परिणाम करीत राहिल्यानें, तेथें ' संक्रम '–क्रम-मार्गाचें असे एक संगतेचें असें तें होऊं लागल्यानें, तेथें ही बुद्धि हीसच ती ती पैस ही आपलीशी करता येण्यासारखी व्हावी अशी जी एक आकांक्षा तीच नेहमीं ह्या संगास व क्रममार्गास पाहाणारी होते : संगतवारीचा जो एक हात तोच येथें त्या ईश्वरभावास तेथील यथोचिततेचें जें कांहीं दान देणें अथवा उदार भावाचें जे ह्या सत्तेचें अंग–जे विजनाप्रत पाहाणारें असतें–तेंच आपलें भूमिगततेचें जें तेंच दैव असें करणारें असून, तेथें ईश्वरत्व हें महान् महान् असे परमेश्वरी सत्तेचें जे नायकत्व तेंच एक ह्या ईश्वरत्वास आणिलें जातें : आदरसादरतेचें असे एक प्रेम-लक्षण हें धाकाचें सहजतेचें एक प्रेमभावनच तें ह्या ईश्वरीसत्तेचें कौतुक करणारें असून, तेथें विश्वास, श्रद्धा व निष्ठा हीच एक ह्या मनुष्यप्राण्यास लाधलेली संपदाच होय : ह्या संपदेवरच हा प्राणी उभा राहून आपलें जें हें देहधारण हेंच उपयोगास देऊन, तेथें ऐक्यच जसें साधलेलें ह्या अनादित्वाचें-भाव्याचें-व सत्तेचें असें ते एक अति उदात्ततेचें भावन, प्रेमभावन, भावनेचें स्थळ तें ह्या मनुष्यजन्मास एक

अतिदिव्य असेच, जणूं का देवच जन्मला-दैवच जन्मले-असे महत्त्व देणारे झाल्याने, तेथे आता सहजपणेंच एक देवतालक्षणाचें प्रमाणच जणूं आपल्या स्थिरतेस आले असे होय

" म्हणून माझ्या ठायीं मन ठेव-माझी भक्ति कर, माझे भजन कर व मला वंदन कर, म्हणजे तूं मलाच प्राप्त होशील, हें सत्य मी तुला प्रतिज्ञा करून सांगतो, कारण तू मला अत्यंत प्रिय आहेस. इतर सर्व धर्म-माझे प्राप्तीचीं अन्य साधनें-सोडून, तूं मलाच एकट्याला शरण ये-आश्रयाचा कर-मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन-शोक करू नको " (गीता अ १८-६६) (५१८)

'**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते**'-अनादिपणानें वासनाचे जे असणें ते जसे 'अनादिमत् पर ब्रम्ह ' असे तें, व ' ईश्वरः सर्वभूताना हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ' असे ईश्वरत्व जें तेथें तन्मयता हीच करून, ह्या वासनांचे जे ब्रम्हरूपानें असणे तच येथे स्वरूपीं दृढ राहून वागविण्याचे करणे जे त-येथे ईश्वरभाव व ब्रम्हभाव हेच परस्पर मिळाले असे सगुण अक्षराचे असे : शब्दसृष्टीच मुळीं लपली, तेथे देहभाव हाच न पाहाता जे काहीं ' जिज्ञासितव्य ' तच येथे उगवले असे माझेपणच एक आता स्वरुपास येऊ लागले आहे असे-तेथ स्थिर होऊनच असावें.

जेथे जीवदशा हीच जणं ' ब्रम्ह ' ती ब्रम्हभावाची केलेली व्हावी, ती कशी तर ह्या ' भाव्य ' भावाने . जेथे ही पचमहाभूताची केलेली ही देहरचना हीच जशी का देहदशेस आली . तेथे अतर जे तें ह्या पंचप्राणाचे असून, तेथे ती जीवज्योत हीच लाविलेली-ती जीवदशा हीच जशी ह्या भूताना एक मध्यवर्ती असणारी अशी ' भाव्यच ' : तेथे अनुसधान हेंच जे, शील ते जर व्यवस्थिततेने वागविले गेलें, तर तेथे जशी का ही जीवदशाच ह्या पंचमहाभूताना झेपून असणारी अशी-एक देहधारणा हीच जणूं ईश्वरभावाने हे जगत झेपून धरिलेले.

म्हणन ह्या अनादि ज्या वासना आहेत, त्याच येथे जशा का ह्या भताना झेपून असलेल्या-त्यानीं ह्या पचमहाभूताना आपले अनादिपण हच शोभव दिले-तेथे ह्या ब्रम्हाडाचे जे अनादिकाळा-पासून उभे असणे, तच यथार्थतेच्या म्हणजे प्रामाण्यक्रमास आलेले असे आहे : म्हणून हें जे मध्यवर्ति शील वृत्ति भावना-(भाव हा परिणामात्मक)-ह्याना अगदीं पोटीशीं धरूनच असणे हेच ह्या देह-धारणेचे आपल्या योग्यतेने असणे असून, तेथे शील हेच त्या बुद्धितत्त्वास आपले प्रमाणशुद्ध असे शुद्धतेचे अंग हे मिळवून देऊन, तेथे अक्षर हेंच आपलेपणास आले : म्हणन हे अक्षर हेच आता तो देहधारणक्रम हा साभाळणारा एक देवच होय . ह्या अक्षरानें ते प्रथम बुद्धिभागस पाहवूं-पाहूं-लाग-ल्यानें, तेथे अनादिपण हे जे ह्या वासनाचे तच ह्या अक्षराचे परस्पर मित्रभावाचे असेच झाल्याने, तेथे हा मनुष्यजन्म हाच एक दिव्य जसे ह्या जगतास उचलून धरणारे-आपलें म्हणणारे-असा असून, तेथील देवता जी ईश्वर हीच येथ सत्ता होय-ज्याला दैव म्हणतात-भर्ता म्हणतात-दैविकी म्हणतात : तोच तेथे क्रम आपल्या ईश्वरभावाचा झाल्याने, तेथे आता हा देह जसा ह्या प्रारब्धासच मध्यवर्ती करून आपल्या ब्रह्मभावास पाहणे करून असतो : येथे ह्या ईश्वरभावाने म्हणजे सत्तेने जसा यथायोग्यतेच्या ईश्वरभावाचा असा एक मनुष्यप्राणी हा जसा देवच तो एक अक्षरास आलेला : तेथे अक्षर हीच सत्ता असून, त्याने हे जे देहघडीचे जीवित हें क्रमानेच सहजतेच्या अथवा साध्यतेच्या योग्यतेचे करून, तेथे जशी का एक प्रदक्षिणाच ह्या देहास झाली-जीवितास झाली-प्राणास झाली-अक्षरास आली : असे तें ईश्वरत्व हेच देहादेहासंबंधाचे झाल्याने, तेथे हा भाव हाच अनेकत्वाचे जे तेच सर्व कांहीं ह्या वृत्तीने एकत्वाचे करून, तेथे ईश्वरत्व हच ह्या वासनाना आपलेपण देऊन असतें (५१९)

असे जे ह्या ब्रम्हाचे स्थान-परब्रम्हाचे अनादिपण-' सत् ' चे काय किंवा ' असत् ' चे काय-जे एका ब्रम्हाचे असें तेच येथे ह्या भाव्य-भूतभावनाचे-भावाचे-म्हणणे असून, तेथें हा जन्मच मुळीं-

जो ह्या वासनेपासूनच झालेला-तोच आपला क्रम साधून असलेला असावा-तेथें ' मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मा नमस्कुरु । मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ (मी अ.१८-६५)-चें जें सत्य ते तुला प्रतिज्ञा करून सांगतो : कारण तूं मला अत्यंत प्रिय आहेस : असे जो एक ह्या नरदेहाचें येणें तें ह्या ब्रम्हास एक सहजतेनेंच नमस्कार करणारे असून, तेथें ह्या वासनाचें अनादिपण हेच एक महत्त्व पाहाणारे असल्याने, तेथें भावना जी तीच पुढें करून असणे तेच तेथीलचे अंग हें एक सहज सेवेचे लक्षण हे भूतमात्राना अत्यंत प्रिय करणारे असते : तेथें हीं भूतमात्रे जीं तीं ह्या चेतनेचीं झाल्यानें-त्यानाहि पण एक सहजलक्षणाचे चेतन मिळाल्याने-एक जसे का ह्या आत्म्याचे येणेच ते-ते काय केव्हाहि असणारे असेच असल्यानें, तेथे आत्मा आत्मा असे काहीं महत्त्व घेऊन असतच नाहीं : तेथे एक जे महत्त्व ते त्या भाव्यभूतभावनाचे असल्याने, तेथें मग आत्मा हा उगवणारा झाल्याने, तेथें ते काय म्हणणे जें 'आत्मा' असे ते काहींच पाहण्याचे मनावर घेत नाहीं . कारण जी काहीं कर्तव्यभूमिका ही त्या भाव्यासच मिळाली असल्याने, तेथें परिणामात्मक किंवा एक प्रदक्षिणेचे प्रकाशन -प्राण दक्षिणा दिली- तच मुळीं तो आत्मा होय : तेथे अनंत रूपाने असलेले-अंतच ज्यास नाहीं असे जे- आकाशमापन हे आता आतच आलेले किंवा असलेले हे केव्हाहि आहेच : परंतु तेथें जर हे भाव्य नाहीं, जसे ते बुद्धीच्या आटोपशीर असे आटोक्यात आणून ते घेण्याचे जर केले नाहीं, तर येथें काय काहींहि जर बोलिलेलें असेल, तर तें कशास बरे !

म्हणून येथे ' स्व ' प्रेम हेच जसे ' मन्मना भव होय, व ' तम् एव शरण गच्छ ' हे जसे का सहजपरिणामात्मक असे नामसत्तेचे अंग असून, येथें बुद्धीनें हार स्वाणे हें केव्हाहि करूच नय : म्हणून येथें दोनच गोष्टी महत्त्वाच्या होत . त्या म्हणजे एक प्रेमलक्षण ते ह्या भावनेने आपलेसे करावे- ह्यात सर्व हे बोलिलेले जे ते अंतर्भावाने आहेच . असे चालल्याने तेथें मगच ज्या उगवणाऱ्या ज्या ह्या इच्छाशक्तीच्या वगैरे बाजू त्या ह्या देहास वागविणाऱ्या होऊन असल्यानें, तेथें मग एक सहजतेचे असेच ते एक चालणे हें काय ते करीत असावे हेच ' :

तेथें प्राणपरायणतेनें जे मत्पर होणे तेच ते प्रेमाचें अंग होय

' सत्य ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ' असे जे ते एक ह्या भक्तास-अभक्तास-विभक्तास, किंवा भक्ति-अभक्ति-विभक्ति, अथवा अभक्त, विभक्त असे जे पाहाणे केलेले, तेथें स्तुति अथवा निंदा ती काय : तेथें असे जें काहीं स्तुति करणे तीच निंदा म्हटली जाणारी-जी एक भावाची का गुणाची का प्राकृतीची का तत्त्वाची तीच मुळीं येथीलचे महत्त्व हे लपविणेंच जणूं करीत आहे असे असल्याने, तेथें एक जे भावनेने असणें तेच व्हावे असे आहे : येथें मत्सर तो का-किंवा निंदा ती कुणाची ? येथें ते काय कसे म्हणावे ! सहजच जसे बाजूस बसणे हे उपवीताचे एक छायेचे-बिछावेचे-बिछाईततेचे- असे जे एकासनानें बांधले जावे ते गरीबतेचे असे बाजूसच होणे करणे, तें लीनतेचे अंग जसे एक तप वागविले गेल्यानें, तेथें तपच एक उभे राहिले असे : सहजगुणाचे सगुण का नव्हे असेच ' अशुश्रूषवे वाच्यम् ' : तेथे गूढत्वच लपलेले ते कसे काय ऐकण्याचें-श्रवणाचे-शुश्रूष असे एक सेवा करणेच हे वाच्यं जे त्याची : एष्यमाण-प्रेष्यमाण-प्रेक्षणेच एक असे तेंच येथे का ' तपस्क ' असे . हे असे ज गूढ ते अश्रौषम् असे सरहस्य ते ' शुश्रूषवे वाच्यम् ' असे असल्याने, तेथें तें सांगण्याचे करणे म्हणजेच काय ते प्रतिज्ञेचें बोलणेंच केलेलें कीं, जो माझ्या ठिकाणीं अत्यंत प्रेम करून हे गुह्य माझ्या भक्तांना सांगेल (अभिधास्यति), तो माझी पराम् म्हणजे श्रेष्ठ अशी जी भक्ति ती करणारा होऊन, मजमध्येच येऊन मिळेल (माम एव एष्यसि असंशयः) हे कालत्रयीं निःसंशय असेच आहे :

येथें हे श्रवण हे काय कान असेच नुसते नसून तेथें एक मनुष्यच जसे ' शुश्रूषा केली जावी ' अशा आशयाचा हा मनुष्य प्राणी, तेथें अद्‌भूततेचें रहस्य हेंच जसे एक महदद्‌भूत असे भूतरहस्य ते

भूतमात्र-प्राणिमात्र-वस्तुमात्र-जातमात्र-असे भूतमात्राचें एक भाव्यच करून असावे अशी ती सेवा ही 'भाव्य भाव्य' असे दर्शवीत असलेली-येथें ती अनुभाविका अशी एक परम 'का' असून ती अनुभवून असावी-माहितीची असावीच असावी (५२०)

तू आपले मन हे 'मीच' असे करून ऐस 'मन' हे मीच कर : माझे भजनाचे ठायीं प्रेम धर-प्रेम ठेव-प्रेमाने भजन कर . सर्वां ठायीं मला एकालाच नमस्कारून अस : हात 'जोडणे' हे स्वभावाचे उत्तम अंग आहे : सर्वत्र मज एकातेच नमस्कारी (५२१)

सदा सर्वदा, सर्वकाळ, नेहमीं माझ्याच अनुसधानाने ऐस : माझ्या अनुसधानाने असल्याने-असावेच व त्यानेच-त्या अनुसधानानेंच-सकल्पाचे जे-नसत्या सकल्पाचे जे-सकल्प भार हेच जाळून टाकावेत-नाहींसे करावेत-यालाच 'मद्याजी चोख' असे म्हटलेले

शुद्ध असे जे-चोग्य उत्तर देणे जे-तेथे दुसरा तिसरा आता बोल उठणेच नाहीं असे चोख-त्यानें तर तच एक अनुसधान आपलेसे केले . 'सकल्पणे' हे मुळींच नको : तेथे सधान हेच अनु म्हणजे नहमी पाठीवरच वाहवून घेतले आहे- अगावर घेऊनच त साभाळले आहे-असे जे त्यासच एक 'चोग्य', शुद्ध, निर्भीड असे म्हटलेले

शुद्ध स्वरुपाचे अनुसधानाने असणे हच एक हो 'मद्याजी' 'मद्याजी' हे जे म्हटलेले ते कसे ते नीटस सागणे म्हणजे त्या सगुण स्वरुपाच्या अनुसधानानें असणे हच त चोग्य असेच 'मद्याजींचे' होणे-त्या स्वरुपाने असणे होय यास 'मद्याजी' ह नाव आहे . त कशाकरिता बरे त अनुसंधान, तर सकल्पाना नि शेष जाळून टाकण्यास (देहबुद्धीनेच ते पुढे येणारे भूतप्रकृतीचे किवा भूताना प्रकृतीने आपल्या स्वाधीन करून घेतलेले असे ते सकल्प त्याना नि.शेष करण्यानेच) हे अनुसधान साधणारे होईल-तेथे एक 'मद्याजी' च एक निखळ, शुद्ध, चोग्य खरे असे

असा माझ्या आहेपणाचा झालास, तर माझ्याच स्वरुपास येशील हे काही एक माझे अतः-करणातील असेच तुजला सागण्याचे करतो

जे काहीं 'आम्ही' असे म्हणणारे-'आम्ही' असे जे काहीं एक सर्वस्व-तेच ह्या सृष्टीच्या आदिकाली ईश्वराने निर्माण केलेलें जे ते तीन प्रकार करून नामनिर्देशास आले आहे-ह्या सच्चिदानंद ब्रह्माचा-ब्रह्मपदाचा तीन प्रकारानीं निर्देश केला आहे : तेथे वेद, यज्ञ व ब्राह्मण असे निर्माण झालेले ते सर्वथैव ह्या ब्रह्म जानाति असौ' त्यानींच जसे का वागविले जाणारे . तेथे ह्या यज्ञाचे जे स्वरूप त इत्थभूततेचे सागितलेले असे असून, त एक म्हणजे शास्त्रोक्त कर्मे हीं सर्वदा 'ॐ' असा उच्चार करून सुरु होणारीं असलेली होत असलेलीं : 'अन अभिसंधाय फलम्' फलाची आशा न करतां जे यज्ञ-दान-तप क्रिया करणे ते 'तत्' अशा उच्चारानें-'सत्' ची योजना किवा प्रयोजना ही कर्माच्या प्रशस्तपणाने, सत्यभावाने, त्याचप्रमाणे साधुभावाने करण्यात येणारी होय . निष्ठा म्हणून जी आहे तिची जी स्थिति व तदर्थाय असे जे त्या सत् असे योजनेचे रूप येतें : प्रशस्त म्हणजे चागले असे : मनाच्या मोकळपणाचे-स्वच्छतेचे-पैसपणाचें-पैस घेऊन किवा देऊन असणारे असे ऐसपैसचे जे त्यासहि पण प्रशस्त, योग्य असे म्हटलेले आहे

ज्याप्रमाणे गारुड्याच्या बळानें निर्जीव बाहुल्या हालावयास लागल्याबरोबर लोकाच्या दृष्टीच्या ठिकाणीं कौतुक उत्पन्न होतें, त्याप्रमाणे नसलेला देह अनिर्वचनीय मायेनें उत्पन्न झाला आहे : अरे गड्या, हे वर्म श्रीगुरूंनीं जाणलें रे बाबा ! सद्रूप परमात्म्याचा मालक जो श्रीगुरु तो असे विवरण करून परमात्म स्वरूपाचे पक्वान्न तुला वाढीत आहे त्याचा विचार करून जत म्हणजे काळजीने जतन कर : ब्रम्ह निराकार व अलिप्त असून ते शरीरात असूनहि दिसत नाहीं : अशा ब्रम्हाचे जीवाशीं

ऐक्य आहे या विचाराचे तूं मनाने चिंतन करीत जा विषयरसाची आवड सोड या मायामोहाला भुलूं नको प्राणवायूच्या साहाय्याने योगाभ्यास करून सत्रावी नावाच्या अमृताच्या नळयाचा रस चाखीत जा श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, श्रीगुरु अशी शिकवण देतात व मग एकदा चित्तास 'मी ब्रम्ह आहे' या चिंतनाची संवय झाली कीं, सर्व गोष्टी आपोआप ब्रम्हरूप होतात असे ज्ञानेश्वरीकार श्रीज्ञानेश्वर महाराज गातात-म्हणतात (ज्ञा गा २९६)

येथे ज्या क्रिया होणाऱ्या त्याच्यामधील ज्या बाजू काहीं का कारणाने वगळलेल्या होतात, त्या तितक्या पुरत्या होऊन येत नाहींत तेथे आता तें प्रशस्तपण हेच लोकहिताकडे तितके लक्ष नच पुरविले गेले-तेथे सामुदायिक असे कर्म ते वेदापासून उत्पन्न होणारे असल्याने, व हे अविनाशीं अक्षर ब्रम्हापासून उत्पन्न होत असल्याने, तेथे सर्वव्यापी परमात्मा नेहमीं यज्ञात प्रतिष्ठित म्हणजे विराजमान असतोच असे जाण असे जे प्रवर्तित चक्र ते प्रत्येकाने 'अनुवर्तयामि' असच चालवावयाचे किंवा त्याला अनुसरून वागावयाचे असून, तेथ जो वागत नाहीं त्यास इंद्रियलपट म्हटले गेल्याने, काय ह्या भूतमात्राना काहीं प्रयोजनाचे करणे-किंवा आश्रयभततेचे करणे-त काय कसे ते तितक्या कृतकार्यतेच्या व्यापास पोहोचते नच झाल्याने, त असेच म्हण लागणारे की, 'सर्वभूतेषु अर्थव्यपाश्रयः कश्चित्' : आणि म्हणूनच तर येथे एक ज 'भाव्य भावनाचे' जे अंग तच जणूं वगळून जात असणारे-गळून जाणारे असे ( जसे कापडातून गळून जात त पाणी तस ). अध्यात्मचेतसाच्या दुसऱ्या बाजूस असणारे ते 'अचेतस.' किंवा 'परिपंथिन्' त्यानाच त जसे भोग अर्पण हच समजून घेऊन, तेथे मग जे बोललेले ते म्हणजे 'यज्ञाने तृप्त झालेले देव तुम्हाला इच्छित भोग निश्चयाने देतील, पण त्यानीं दिलेले भोग त्याना अर्पण करूनच भोगावेत :' त्यानीं-देवानीं-दिलेले भोग देवाना अर्पण करून भोगावे-ते तसे अर्पण न करिता स्वत.च भोगतो ( भाव्य भावयतामचे तत्त्वच समजत नसल्याने )-ते ब्रम्हतत्त्व व सर्वव्यापी परमात्मा याचा परस्पर मेळ कसा बसतो ते नच समजणारे झाल्याने-तसा मेळ नच बसवून घेतल्यामुळे-तथे 'देवा दास्यन्ते' चे परत करणे किंवा जोडून घेणे हेच जसे अनुलक्षिलेच नाही : म्हणून येथे त देवानीं जे तुमचे देणे दिलेले-दास्यच एक ह्या ईशसृष्टीस आपलेसे करून आदरिलेले-तेच आता जर जोडून घेऊन असेल, तर त आपलीं प्रदक्षिणा ही पाहाणारी होऊन, तेथे एक जोडणेच झाले-हातच जोडून असण झाले-किंवा पायच जोडून घेतले असे एक परम विनयाचे तसेच सत्वशीलतेचे अग होय : तेथ यज्ञ करून शेष राहिलेल्या भागाचे सेवन करणारे श्रेष्ठ पुरुष सर्व पापापासून मुक्त होतात . म्हणून येथे 'सर्वभूतेषु अर्थव्यपाश्रय.' हा काहींच्या काहीं लाभाचा का हेतूचा-का हेतूचा का हानीचा-तें जाणण्याचे प्रयोजनच त्याजजवळ उरत नसल्याने, तो आत्मरतीमध्येच रत, तृप्त व सतुष्ट असा होऊन असतो : तेथे पुरुषाचे पर म्हणजे श्रेष्ठपद त्यास प्राप्त होते : भूतमात्राकडूनच त्यास त पद प्राप्त झालेले तेथे आता भूताना कसल्या प्रयोजनाचे का हेतूचें का लाभाचे का हानीचे त पुरुषार्थाचें अंग त म्हणजे भव्य असे एक भूतभावनचे अगच व्हावे लागणारें होय : म्हणून येथे दोहींचाहि मेळ बसल्याने, तेथे एक भूप्रदक्षिणाच जशी झाली : म्हणून येथे वगळून गेलेले-गळून बाजूस झालेले-तें जसे एक भूतसृष्टीचे येथे जे मूळातूनच जाणे तेथे ते दृष्टिबधाचे असे स्वरूपसिद्धतेचे ते पाहिल्याने-तेथे पोहोचल्यानें-ते भेटल्यानें-तेथे सुखच एक साचलें-स्थिर होऊन आपले सचणे करणारे झाले : तेथे तू म्हणजे एक सुखाचा साठाच असा होऊन जाशील, होऊन असशील : चोरून ठेविलेले असे-व्यवस्थिततेचा संसार हा करण्याकरिता जे काहीं साचविलेले-चोरून ठेविलेले-बचतच जशी एक केलेली-तें आपुलेंच असे 'आम्हीचें' असे ठेविलेलें-ते तुजला मिळून सुखच एक संचले-मिळून आले असा एक परम सुखियाच असा तूं होऊन जाशील-होऊन असशील

असे त्या सावळया परब्रह्मानें-श्रीकृष्णानें (सावळियानें)-जे 'परब्रह्मच' एक असे श्रीकृष्ण त्यानीं-भक्तकामाचें पुरविणें करणारे असे कल्पवृक्षच जे ते श्रीकृष्ण त्यानीं-अहो एवढेच नव्हे, तर तेथें श्रीआत्मारामच एक त्यानीं-हा माझा आत्माच जसा एक परम सुखाचा झाला-आत्मा थंड झाला-विश्रांतीस आला-सुखानंदाचा झाला-असे त्यानीं केलेलें बोलणें-जे एक वचनामृतच असे संजय म्हणाला (५२२)

**अहो जी राया अवधारा । तव या बोला निवांतु म्हातारा ।**
**जैसा म्हैसा नुठी कां पुरा । उगाचि असे ॥ ५२३ ॥**
**तेथ संजयें माथा तुकिला । अहा अमृताचा पाऊस वर्षला ।**
**हा येथ असतुचि गेला । सेजिया गांवा ॥ ५२४ ॥**
**तऱ्ही दातारु हा आमुचा । म्हणोनि हें बोलितां मैळेल वाचा ।**
**काय करावें ययाचा । स्वभावोचि ऐसा ॥ ५२५ ॥**
**परी बाप भाग्य माझें । जें वृत्तांत सांगावयाचेनि व्याजें ।**
**कैसें रक्षिलें मुनिराजें । श्रीव्यासदेवें ॥ ५२६ ॥**
**इतुलें हें वाडे सायासें । जंव बोलतसे दृढ मानसें ।**
**तंव न धरेचि आपुलियाऐसें । सात्त्विकें केलें ॥ ५२७ ॥**
**चित्त एकवटलें आटऊ घेत । वाचा पांगुळली जेथींचिया तेथ ।**
**कंठीं बाष्प सद्गदित । रोमांच आले ॥ ५२८ ॥**
**अर्धोन्मीलित डोळे । वर्षतानी आनंदजळें ।**
**आंतुले सुखोर्मीचेनि मेळें । बाहेरी कांपे ॥ ५२९ ॥**
**ऐसा अवघाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी ।**
**लेइला मोतियांची कडियाळी । आवडे तैसी ॥ ५३० ॥**

(५२३) जी राया - ऐकिजत असे कीं या - इया म्हैसा=टोणगा नुठी - नेणे पुरा =महापुराला न जुमानता पाण्यातच बसतो (५२४) अहो-अहा तुकिला=डोलविला येथ असतुचि = हा धृतराष्ट्र येथें असून जणूं नसल्यासारखाच आहे (५२५) मैळेल=दूषित होईल करावे - कीजे. (५२६) बाप - थोर कैसें - कैसा रक्षिलें - रक्षिलो (५२७) इतुले - येतुलेनि हे वाडे - वाड सायासे = एवढा मोठा मानाचा निर्धार करून हर प्रयत्नानीं बोलत असता न धरवेचि - न धरेचि अनावर सात्त्विक अष्टभाव त्याच्या देहीं प्रगटले : स्तंभ, स्वेद, रोमाच, स्वर भग, वेपथु (कप), वैवर्ण्य (विवर्ण होणे), अश्रु व प्रळय हे अष्टभाव सात्त्विक होत हे या पुढील ४ ओव्यात स्पष्ट आहेत (५२८) एकवटलें - चाकाटले = चकित झाले, मग्न झाले कंठीं बाष्प सद्गदित - आपादकचुकित = नखशिखात (५२९) आतुले - आतुलिया मेळे - बळे (५३०) स्वेदकणिका = घामाचे बारीक कण कडियाळी = जाळी.

अहो जी, राया धृतराष्ट्रा, तुम्ही ऐकत आहात ना? तेव्हा तो धृतराष्ट्र राय हे ऐकतच होता, वर तोहि म्हणूं लागला कीं, मी ऐकत आहे : अहो, ऐकत आहांत तर तसे अवधारणे असावेच असावे-तेथें अवधारा असे जे बोलणे केले ते मी ऐकत आहेच आहे-असे झालेले बोलणें तें ऐकून राजा धृतराष्ट्र हा म्हाताराच तो काय त्याने बोलायाचें तें : तो निवातच बसला - जसा का टोणगा हा महापूर आला तरी बसूनच असतो-पुरास न जुमानतां पाण्यातच बसतो-तसा तो निवांतच दिसला शाखोपशाखाचें जे शास्त्राचें झालेले हें ज्ञान तेथें त्या टोणग्यास कांहींच समजणारें जसे होत नाहीं-तेथे कोणतें शास्त्र सांगितले जात आहे-काय बोलणें होत आहे-का तेथें ही जी विश्वाची रचना ही सांगितली जात

